KÂVYASANGRAHA. 53.

# THE MISCELLANEOUS POEMS

OF

## MOROPANT,

THE GREAT POET OF THE MAHÂRÂSHTRA.




PART III.

*EDITED WITH*

**CRITICAL AND EXPLANATORY NOTES, PREFACE AND APPENDICES**

BY

BÂLKRISHṆA ANANT BHIDE, B. A.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS

Bombay.

1905.

*Price 1½ Rupees.*

काव्यसंग्रह. ५३.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# स्फुटकाव्यें.

अगा! रसिककामनामरतरो! **मयूरेश्वरा!**
जणूं शिरिं सरस्वती तव दयाळ ठेवी करा; ।
प्रसाद, समता, तशी मधुरता उभी राहते;
कसे गुण अनंत हे तदितरें तुला लाभते? ॥
—विविधज्ञानविस्तार, **मुकुंदराय.**

## भाग तिसरा.

हा

**बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.**

यांनीं

अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन व प्रस्तावना आणि परिशिष्ट जोडून, अनेक हस्तलिखित प्रतींच्या आधारें तयार केला,

तो

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०५.

किंमत १॥ रुपया.

हा रसाल सुफळीं पिकला हो!
चाखणार रसवित्पिक लाहो; ।
ते करून मग कां स्तव संत
काळ हा न गणितील वसंत? ॥

# मोरोपंती स्फुटकाव्यें भाग ३ रा.

## प्रस्तावना.

---

१. मोरोपंती स्फुटकाव्यांचा तिसरा भाग आज आम्ही रसिकांस सादर करीत आहों. या भागांत केवळ तीनच प्रकरणें आहेत. वस्तुतः पाहतां कुशलवाख्यान व ब्रह्मोत्तरखंड यांना स्फुट काव्यें म्हणतां येणार नाहीं, इतकीं तीं मोठीं आहेत. प्रस्तुत भागांतील तीन प्रकरणांपैकीं (१) विनायकमाहात्म्य हें प्रकरण चांगलें रसाळ, मनोहर व सरळ उतरलें आहे. भाषापद्धतीकडे लक्ष्य दिलें असतां, हें प्रकरण पंतांनीं चांगल्या पोक्त वयांत लिहिलें असावेंसें दिसतें. (२) कुशलवाख्यान हें पंतांचें पहिलेंच मोठें काव्य असावें, असा आमचा होरा कां धांवतो, त्याचीं कारणें २४-२५ या पृष्ठांवर दाखल केलीं आहेत. हें काव्य, पंतांनीं नामरसायनांत म्हटल्याप्रमाणें, करुण व वीर या रसांची 'सुधानदी'च आहे. या काव्यांत ठिकठिकाणीं वर्णनशैली हृदयंगम असून, पंतांनीं रचनाचातुर्यही बरेंच दाखविलें आहे. हींत अवजड संस्कृत शब्द, लांबलांब समास वगैरे मधूनमधून विपुल आढळतात. तरी पण एकंदरींत आर्याभारताप्रमाणें या ग्रंथाची भाषा ठाकठिकीची, कसलेली व वळणशुद्ध भासत नाहीं. या काव्यांत कवीनें वृत्तवैचित्र्य व विविधशब्दालंकार यासंबंधें आपली हौस चांगली पुरवून घेतली आहे. कांहीं रसिकांच्या मतें या काव्यांत पंतांनीं भवभूतीच्या उत्तररामचरिताची धाटणी उठविण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु या म्हणण्यास काडीमात्रही आधार नाहीं. प्रथमतः, पंतांनीं होतां होईल तों आपली कृती मूळ जैमिनिकृतीलाच धरून केली आहे. कोठें चारपांच ठिकाणींच त्यांनीं जैमिनिकृतींत नाहींत अशीं वर्णनें पदरचीं दिलीं आहेत, परंतु त्या ठिकाणीं त्यांनीं जर कोणा कवीचें अनुकरण केलें असलें, तर तें रघुवंशकार कालिदासाचें केलेलें आहे, उत्तररामचरितकाराचें नाहीं, हें आम्हीं ग्रंथांतींच्या परिशिष्टांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. (३) ब्रह्मोत्तरखंड हें पूर्ववयांतच पंतांनीं लिहिलें असलें पाहिजे, हें ग्रंथान्तीं त्यांनीं आपल्याला 'नवीन कवि' म्हणून घेतलें आहे, ह्यावरून सिद्ध होतें. हा ग्रंथ पंतांनीं आपला गुरुबंधु सदाशिव केशव पाध्ये याच्या सांगण्यावरून रचिला आहे. (ब्रह्मोत्तरखंड ३२।१३ व २२।७६ पहा). या काव्यांत पंतांनीं मूळ सोडून कुशलवाख्यानाप्रमाणें रघुवंशादिकांच्या धाटणीवर स्वतंत्र वर्णनें लिहिलेलीं आढळत नाहींत. या सुमारास त्यांचें लक्ष्य रघुवंशादिकांच्या अनुकरणावरून उडून, पुराणांच्या मराठी प्रतिमा उठविण्याकडे वळलेलें दिसतें व हें त्यांच्या धंद्याला साहजिकच होतें. असें न होतां,

कुशलवाख्यानांत ज्या कलाचीं स्पष्ट लक्षणें दृष्टोत्पत्तीस येत आहेत, तो कालिदासादिकांच्या अनुकरणाचा कल जर पुढें पोसला गेला असता, तर पौराणिक विषयांवरच रघुनाथ पंडितांच्या नलोपाख्यानाच्या धोरणाचीं मोरोपंती काव्यें आपल्यास वाचावयास मिळालीं असतीं. असो. ब्रह्मोत्तरखंडाची भाषापद्धती जरी ठाकठिकीची व सोपी आहे, तरी ती आर्याभारताच्या पद्धतीशीं तोलून पाहिली तर ओज, प्रौढी वळदारपणा व मधुरता या गुणांत कमी दर्जाची उघड उघड ठरते.

२. प्रस्तुत भागांतील प्रकरणांवर यथाशक्ति अर्थनिर्णयात्मक, व इतर माहितीच्या टीपा दिल्या आहेत. शेवटीं एक परिशिष्ट जोडिलें आहे, त्यांत अधिक टीपा, शुद्धाशुद्ध, अर्थसादृश्य, वगैरेंचा समावेश केला आहे. हा भाग तयार करितांना रा० बाळकृष्ण सीताराम जोशी (मुरूड–जंजिरा) यांनीं जें अमोल साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहों. तसेंच रा० श्रीधर नारायण दातार (मुंबई), यज्ञेश्वर लक्ष्मण कर्वे (किहीम–अलीबाग), मोरो गणेश लोंढे (नागोठणें), लक्ष्मण गणेशशास्त्री लेले नाशिककर (पुणें), इत्यादि हितचिंतकांनीं तसदी घेऊन ज्या वेळोवेळीं सूचना केल्या त्यांबद्दल त्यांचे आभार मानणें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

३. अखेर वाचकांस एवढेंच विनविणें आहे कीं—

"अवगुण कुटा, लुटा गुण, दोषार्थ न गुण सुधी अव्हेरीतो; ।
कोंदण हीण म्हणोनी त्यजिल मणी जो, कसा जव्हेरी तो? ॥"

मुरूड–जंजिरा,
२३ सप्टेंबर १९०५.

**काव्यसंग्रहकार.**

# मोरोपंती स्फुट प्रकरणें भाग ३ रा याची

# विषयानुक्रमणिका.

एकूण ग्रंथसंख्या १८६१.

# मोरोपंतकृत स्फुट प्रकरणें.

## भाग तिसरा.

### १. विनायकमाहात्म्य.

(गीतिवृत्त.)

#### अध्याय पहिला.

श्री[1]विधि[2]जृंभेपासुनि [3]अत्यद्भुत पुरुष जन्मला [4]रक्त, ।
अंगीं [5]सुगंध ऐसा कीं, त्याचे सर्व गंध ते [6]भक्त. ॥ १

गंधांहीं स्वसुगंधें, घडिला वर्णे [7]जपाप्रसूनांहीं, ।
कोणी झाली जृंभेसम, करुनि तपा, जपा, [8]प्रसू नाहीं. ॥ २

---

१. विनायक हें दैवत विष्णूचा अंश आहे. ह्या दैवताचा प्रत्येक युगांत एक एक अवतार आहे; व प्रत्येक अवतारीं ह्याचा पार्वतीच्याच पोटीं संभव होतो, अशी कथा गणेशपुराणांत आहे:—शिव पार्वतीस म्हणतात–'चत्वार्यस्य रूपाणि चतुर्षु च युगेषु च । कृते दशभुजो नाम्ना **विनायक** इति श्रुतः॥ त्रेतायुगे शुक्लवर्णः षड्भुजोऽसौ **मयूरराट्**। सिंधुं हत्वापालयत्सोऽवतीर्य स्वालये प्रिये ॥ स एवायं रक्तवर्णश्चतुर्बाहुविराजितः। अवतीर्णो गृहे नौहि सिंदूरं निहनिष्यति ॥ नाम्ना **गजानन** इति त्रैलोक्ये ख्यातिमेष्यति । अयं कलियुगे देवि **धूम्रकेतु**रिति प्रथाम् ॥ (ग० पु० उ० अ० १२९.) इ० इ०. या चार अवतारांपैकीं द्वापारांतील सिंदूरासुरवधार्थ घेतलेला **गजानना**वतार प्रकृत प्रकरणांत वर्णिला आहे. हें प्रकरण गणेशपुराणावरून लिहिलेलें दिसतें, मात्र यांत गजासुराचा जो संबंध आणिला आहे, त्यास गणेशपुराणांत आधार नाहीं. २. ब्रह्मदेवाच्या जांभईपासून. एकदा शिव सहज ब्रह्मलोकीं गेले होते, त्यावेळीं ब्रह्मदेव निजलेले होते. शिवांनीं ब्रह्मदेवांस जेव्हां उठविलें, तेव्हां त्यांस निद्राभंगामुळें राग येऊन, त्यांनीं जी जांभई दिली, तीपासून एक महाघोर पुरुष उत्पन्न झाला, तोच **सिंदूर**. ३. अलौकिक, आश्चर्यकर. ४. लाल. ५. त्या पुरुषाच्या अंगीं असणाऱ्या सुगंधाचे. ६. आशांकित; दास. या गीतीच्या द्वितीय अर्धांत **असमालंकार** व्यंग्य आहे. ७. जपा+प्रसूनांहीं=जास्वंतीच्या फुलांनीं. मुळांत असें वर्णन आहे:—'यद्देहतश्चारुगंधो व्यानशे भुवनत्रयम् । जपाकुसुमदेहस्य प्रभयारुणिता दिशः ॥.' ८. जननी, माता. या अर्धांत **असमालंकार** आहे. ब्रह्मजृंभेपासून इतका सुंदर व बलवान् मुलगा झाला, कीं तसा मुलगा पोटीं येण्यापुरतें पुण्य कोणत्याही मातेच्या संग्रहीं नाहीं.

पुत्रस्नेहें त्रिजगज्जनकें, देवासुरादिवरदानें, ।
'सिंदूर' असें ठेवुनि नाम, बहु दिलीं तयासि वरदानें. ॥ ३
'होइल भस्म तुझा रिपु, तूं ज्यातें वेष्टिशील बाहूंनीं,' ।
हा अत्युग्र वर दिला, बहु कुर्वाळुनि, समीप बोहूनी. ॥ ४
स्ववरपरीक्षार्थ, कुमति बाहूंनीं त्याचि विधिस वेष्टाया ।
पाहे, फिरोनि येउनि, जेंवि वृकाच्या तशाचि चेष्टा या. ॥ ५
'मी पावलोंचि, दुर्नयत्यागाच्या हाहि खळ फळा लाहो,' ।
ऐसें म्हणतचि, देउनि पाठ कृतघ्नासि, विधि पळाला हो ! ॥ ६
ब्रह्मयाच्या पाठीला लागे तो बहु कृतघ्न सिंदूर; ।
त्या तापेंचि करपलें, काळें दिसतें म्हणून इंदूर. ॥ ७
विधि विष्णुकडे गेला, व्हाया वित्रास, तें निवेदून; ।
कीं, त्या सर्वशरण्यप्रवरासि स्मरुनिही, निवे दून. ॥ ८

---

१. सृष्टिकर्त्या ब्रह्मयानें. २. देव व दैत्य यांस वर देणाऱ्यानें. हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें, येथें **परिकरालंकार** झाला. ३. हातांनीं कंवटाळशील. ४. बोलावून. ५. कंवटाळण्याला. वरील अत्युग्र वर मिळाल्यावर सिंदूर निघून गेला. परंतु वाटेंत त्याच्या मनांत अशी शंका उद्भवली कीं, 'आपण जप, तप, ध्यान, स्वाध्याय वगैरे कांहीं एक केलें नाहीं. मग ब्रह्मदेवानें आपल्यास वर कां दिला ? आणि हा वर खरा तरी कशावरून ? कदाचित् ब्रह्मदेवानें वंचनही केलें असेल' असें मनांत येऊन स्वारी परत फिरली, व वरदात्या ब्रह्मदेवालाच वरप्रत्ययास्तव आलिंगन देण्यास सिद्ध झाली. भस्मासुराच्या. हा शिवभक्त असून, शिवानें प्रसन्न मनानें यास वर दिला कीं, 'तूं ज्याच्या मस्तकावर हात ठेविशील, तो तत्काळ भस्म होईल.' पुढें भस्मासुरानें वरप्रचीति पाहण्यासाठीं शंकराच्याच मस्तकावर हात ठेवण्याचा प्रयत्न केला. शंकरास या संकटांतून सोडविण्यासाठीं विष्णूनें मोहिनी अवतार घेतला. मोहिनीनें आपल्या सौंदर्यानें व मधुरवाणीनें भस्मासुरास भुलवून नाचण्यास लाविलें. नाचतांना हातवारे करीत असतां, भस्मासुरानें आपल्याच मस्तकावर हात ठेविला व तो तत्काळ भस्मरूप झाला. ही कथा येथें अनुसंधेय आहे. पंतांनीं 'भस्मासुराख्यान' म्हणून एक श्लोकबद्ध प्रकरण लिहिलें आहे. त्यांत शंकरसाहाय्यार्थ मोहिनीरूप न घेतां, वटुरूप धारण केलें असें वर्णन आहे. ७. चार, गमजा. ८. अनीतीच्या, अविचाराच्या. ९. पावो, लाभो. १०. त्याकडे पाठ फिरवून. ११. इंदु+उर=चंद्राचें उरःस्थळ. चंद्रावर दिसणारा कृष्णवर्ण, कलंक नाहीं; तर सिंदूराच्या कृतघ्नत्वानें जो संताप उत्पन्न झाला, त्यानेंच करपून काळेंठिक्कर पडलेलें तें चंद्राचें हृदय होय ! येथें प्रस्तुताचा निषेध व्यंग्य आहे, म्हणून ही **व्यंग्य अपह्नुति**. १२. त्रासरहित, निर्भय. १३. संपूर्ण रक्षणकर्त्यांत श्रेष्ठ अशा विष्णूस. १४. त्रस्त, दुःखित.

वंदुनि, पुसतां, सांगे ब्रह्मा प्रभुला स्वखेदहेतूतें,[1] ।
प्रार्थुनि म्हणे, 'म्हणति बा! सदय गुरु शरण्य वेद हे तूतें.' ॥ ९
विष्णु म्हणे, 'लोकेशा[2]! तूं मर्त्य स्पष्ट काय? हा यम रे[3]!? ।
हें व्यक्त[4] कृतघ्नजन, व्यसनांत पडोनि, म्हणुनि 'हाय!' मरे[5]. ॥ १०
तो सिंदूरासुरही वैकुंठामाजि विष्णुला पाहे; ।
बाहूंनीं[6] वेष्टाया त्यातें, विधितेंहि, दुष्ट तो बाहे[7]. ॥ ११
देव म्हणे, 'मी सात्विक[8], विधिनें प्रथमचि तुला दिली पाठ, ।
वेदांची मात्र असे या वृद्धपितामहा[10] किली पाठ[9]. ॥ १२
तव युद्धोत्साहाला समुचित[11] आहे महेश[12] कैलासीं. ।
करणेंचि तरि करावी स्पर्धा विंध्यें[13] सुमेरुशैलाशीं[14].' ॥ १३

---

१. आपल्या दुःखाचें कारण. २. ब्रह्मदेवा! 'हिरण्यगर्भो **लोकेशः** स्वयंभूश्चतुराननः' अमरकोश. ३. अन्वयः—रे! तूं स्पष्ट मर्त्य काय, हा यम [काय]? ब्रह्मदेवा! तूं काय खरोखर मानव आहेस? आणि हा काय यम आहे? [अशी शंका तुम्हांला पाहून माझ्या मनांत येते. तूं मर्त्य नाहींस, मग इतका कां भ्यालास?—हा भावार्थ.] ४. स्पष्ट. कृतघ्न मनुष्य संकटांत पडून, हाय हाय म्हणत मरणार, हें उघड आहे; [मग भिण्याचें कारण काय ?]. हें गीत्यर्ध सुंदर सुभाषित आहे. ५. येथें 'कृतघ्नांचा नाश व्हावयाचा' हें कारण सांगून, प्रस्तुत कार्य जें 'निर्भयत्व' तें सुचविलें, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा.** ६. भुजांनीं. ७. बोलावी. ८. सत्वगुणमय. ९. वेदाची किली पाठ असे=वेदाची कळ माहित असे, वेदपठण साधतें. ही **लोकोक्ति** आहे. किली=किल्ली, कळ. १०. ब्रह्मदेवाला. 'ब्रह्मात्मभूः सुरज्येष्ठः परमेष्ठी **पितामहः**' अमरकोश. ११. योग्य. या गीतींत **समालंकार** आहे. १२ शंकर. १३. मेरूप्रमाणें आपल्या भोंवतींही सूर्यानें नेहमीं भ्रमण करावें अशी इच्छा मनांत धरून, विंध्यपर्वत वाढूं लागला. अखेर तो इतका वाढला कीं सूर्याचा मार्ग खुंटला व सर्वत्र अंधकार माजून सृष्टिव्यवहार बंद पडले. तेव्हां देवांच्या विनंतीवरून, काशींतील तपोनिष्ठ अगस्त्य ऋषींनीं विंध्याचलाजवळ गमन केलें. त्या तपोनिधीस पाहतांच विंध्यानें भक्तिपुरःसर त्यास नमन केलें. तेव्हां 'मी दक्षिणेकडून येईपर्यंत तूं असाच विनम्र राहा' असें अगस्त्य ऋषींनीं सांगून तेथून जें प्रयाण केलें, ते पुन्हां म्हणून त्यास भेटले नाहींत! अशा रीतीनें मेरूशीं स्पर्धा करणारा विंध्य कायमचा ठेंगणा झाला. विंध्यानें सूर्याची गति विंधिली म्हणून त्यास 'विंध्य' हें नांव पडलें. विंध्य हा सात कुलपर्वतांपैकीं एक आहे. कुलपर्वतांचीं नांवें अशीं आहेत:—'महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । **विंध्यश्च** पारियात्रश्च, सप्तैते कुलपर्वताः ॥'. १४. मेरुपर्वत सोन्याचा व रत्नाचा आहे. हा भूमीच्या गर्भीं मध्यबिंदूच्या ठिकाणीं आहे, व त्याचे सभोंवतीं चंद्र, सूर्य, ग्रह, तारे वगैरे मंडलाकार फिरतात. हा पर्वत अर्थात् काल्पनिक आहे. परंतु 'मेरु हाच कैलास' असें कांहींचें मत आहे. ह्या गीतीच्या दोन अर्धांत बिंबप्रतिबिंबभाव असल्यामुळें **दृष्टांतालंकार** झाला आहे. सिंदूराचें प्रतिबिंब विंध्य असल्यामुळें, अखेर सिंदूराचाच पराभव होईल हेंही ह्या दृष्टांतांत सूचित केलें आहे.

ऐसें ऐकुनि, जाउनि कैलासीं, सर्वसाधुवित्तातें[1], ।
पाहे तो सिंदूर, स्वसमाधिसुखीं[2] निमग्नचित्तातें. ॥ १४

प्रभुच्या अंकीं होती श्रीगौरी, परम सुंदरी, तीतें ।
घेउनि निघे, धरी निजनाशा सुंदोपसुंदरीतीतें[3]. ॥ १५

ध्यानसुखीं न समजला जगदीशाला अनर्थ हा कांहीं, ।
सर्व प्रमथगणांहीं[4] जाणविला मग अशेष[5] हाकांहीं. ॥ १६

वृषभीं बैसुनि जातां अवलोकुनि सव्यथा पिनाकीतें[6], ।
'गौरीमोचन दुर्घट' म्हणति, ज्ञाते, तथापि नाकी[7] 'तें[8]'. ॥ १७

गांठुनि रुद्र, क्षुद्रप्रकृतिस[9] धिक्कारुनीहि, बहु दांपी[10], ।
तों धांवे, भुज उभवुनि[11] वेष्टाया ईश्वरासि[12] तो पापी. ॥ १८

इतुक्यांतचि बहु सदय प्रकटे नारायण प्रभु क्षिप्रें[13], ।
मोही त्या खळमतितें होउनि अद्भुतविचित्रवाग्विप्र[14]. ॥ १९

तो विप्र पुसोनि म्हणे, 'सिंदूरा! युद्ध शंभुशीं कर गा! ।
ज्यातें वरिल जयश्री, होइल गौरी स्वयेंचि[15] तत्करगा[16]. ॥ २०

मध्यस्थ बुधें[17] असावा, सांगे जें काय सार[18] साक्षी तें; ।

---

१. सर्व सज्जनांच्या धनाला=शंकराला. ही **रूपकातिशयोक्ति** आहे. २. आत्मचिंतनाच्या आनंदांत. समाधि हें योगाचें आठवें अंग आहे. ३. सुंदोपसुंद हे हिरण्यकशिपूचे वंशज होते. हे भाऊ भाऊ असून, ब्रह्मदेवाच्या वरानें एकमेकांशिवाय इतरांस अवध्य झाले होते. या वराच्या जोरावर या दोन असुरबंधूंनीं त्रैलोक्यास 'त्राहि त्राहि' करून सोडिलें. शेवटीं ब्रह्मदेवाच्या विनवणीवरून विश्वकर्म्यानें तिलोत्तमा नांवाची अप्रतिम स्त्री उत्पन्न केली. व एक दिवस सुंदोपसुंद हे प्रमदाजनांसह दारू पिऊन उपवनांत क्रीडा करीत असतां, तिलोत्तमा फुलें वेंचीत त्यांजवळ गेली. या लावण्यवतीस पाहतांच, दोघेही भुलले व तिच्या स्वामित्वाविषयीं त्यांच्यांत वाद लागून, हट्टाला पेटले व अंतीं परस्परांच्या हातून मरण पावले. ह्या कथेवर येथें कटाक्ष आहे. येथें **निदर्शनालंकार** आहे. ४. प्रमथ हे पिशाच असून शिवाचे अनुचर आहेत. ५. संपूर्ण, इत्थंभूत. ह्याचें विशेष्य 'अनर्थ.' ६. शंकराला. पिनाक हें शंकराचें धनुष्य आहे. ह्याच्या योगानेंच शिवानें त्रिपुरांचा नाश केला. ७. देव. अन्वयः—नाकी ज्ञाते, तथापि म्हणती, 'तें गौरीमोचन दुर्घट.' ८. येथें 'ते' असा निरनुस्वार शब्द घेऊन, 'ते नाकी' असा अन्वय घेणें बरें. ९. नीच स्वभाव ज्याचा अशाला. १०. भिववी, दरडावी. ११. उभारून. १२. शंकरास. १३. सत्वर. १४. चमत्कारिक व मोहक भाषण करणारा ब्राह्मण. १५. आपोआप. १६. त्याला वश, त्याच्या स्वाधीन. १७. पंडित, शाहणा. १८. खरें. हें गीत्यर्ध सुभाषित आहे व ह्या गीतींत **अर्थांतरन्यास** आहे.

मी वर्तविन[1] हरातें नयमार्गीं, याहि सारसाक्षीतें.'[2] ॥ २१
हितवचन मना आलें; दारुण[3] आरंभिला समर[4] यांहीं;[5] ।
हस्तींहीं[6] सिंहांशीं, कीं शरभांहीं[7] जसा समरयांहीं.[8] ॥ २२
आज्ञापिला परेशें[9] रक्षाया गुप्त परशु नीतीतें; ।
कीं जी सिंही, लंघूं[10] पाहे नीचाहि परशुनी[11] तीतें. ॥ २३
केले विनायकें त्या नकळत परशुप्रहार सिंदूरीं, ।
तेव्हां शोभति मुक्ताहार मुनीच्या सबाष्पबिंदूरीं.[12][13] ॥ २४
खळ बळहीन परशुच्या चिरकाळेंकरुनि होय आघातें, ।
रोधाया छळ[14] केला अरितें, पंजर[15] जसाचि वाघातें. ॥ २५
त्यासि म्हणे विप्र, 'तुझा झाला भंग[16] त्रिनेत्रशूलानें;[17] ।
मारिल; वृथा मरसि कां अभिमानानें विनाशमूलानें?'[18] ॥ २६
विफळश्रम होउनि तो सिंदूरासुर, उमेशि सोडून ।
गेला स्वस्थानातें, तेथुनि विप्रासि हात जोडून. ॥ २७

---

१. वळवीन. २. कमलनयनेतें, पार्वतीतें. ३. घोर, भयंकर. ४. युद्ध. ५. शिव आणि सिंदूर ह्यांनीं. ६. हत्तींनीं. कदाचित् येथें मूळचा 'सिंहांहीं' असा पाठ असावा, नाहीं तर तुल्यतुल्यांचा संग्राम होऊं शकत नाहीं. आणि दोन्हीं योद्ध्यांचें समत्व दाखविण्याचा तर कवीचा हेतू आहे, हें पुढील शरभांच्या उपमेवरून स्पष्ट दिसतें. ७. हें एक आठ पायांचें, सिंहाहून बलवान् असें कविकल्पित श्वापद आहे. ८. सम+रयांहीं=तुल्य+वेगांनीं=तुल्य (सारखा) आहे वेग ज्यांचा त्यांनीं. या गीतींत **उपमा** आहे. ९. विष्णूनें. 'सर्वसंग्रहां'त 'महादेवानें' अशी टीप आहे, परंतु ती चूक आहे. कारण पुढील गीतींतच विनायकानें (=विष्णूनें) सिंदूरावर परशुप्रहार केला, असें स्पष्ट म्हटलें आहे. मूळांतही असेंच आहेः— 'द्विजरूपधरो देवो मयूरेशस्ततस्तयोः । अंतराले प्रादुरासीत्कोटिसूर्यनिभः क्षणात् । परशुं मध्यतः कृत्वा वारयामास दैत्यपम् ।..................॥ अदृश्य एव परशुरस्य जघ्ने बलादुरः । क्षीणशक्तिं ततो दैत्यं त्रिशूलेनाहनद्धरः ॥ ग० पु० उ० अ० १२८. १०. अन्वयः—कीं जी (नीति) सिंही, तीतें नीचाहि परशुनी लंघूं पाहे. ११. शत्रुरूप कुत्री. येथें **परंपरितरूपक** आहे. १२. स+बाष्प+बिंदु+उरीं=सह+अश्रुजल+कण+हृदयावर म्ह० अश्रुबिंदु ज्यावर पडले आहेत, अशा त्यांच्या छातीवर. १३. अर्थः—तेव्हां मुनिजनांच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहून ते त्यांच्या हृदयावर गळले; आणि अश्रुबिंदूच मोत्यांच्या कंठीप्रमाणें शोभूं लागले. येथें बाष्पबिंदुमिषानें मुक्ताहार दिसूं लागले असा अर्थ निष्पन्न होतो. परंतु बाष्पबिंदूचा निषेध उघड नसून, व्यंग्य आहे. म्हणून ही **व्यंग्य अपह्नुति** होय. १४. कपट. १५. पिंजरा, सांपळा. १६. पराभव. १७. शंकराच्या त्रिशूलानें. १८. हानिकारकानें. मूल=हेतु, कारण. हा 'अभिमानानें' या पदाचा उद्देश.

गौरी विप्रासि म्हणे, 'तुजहुनि हितं[1] अधिक काय हो! तात? ।
तूं कोण? तुजहि गाउत, जेंवि शिवा मायबाप[2] गातात.' ॥ २८

द्विजरूपातें सोडुनि, निजरूप प्रकट करुनियां दावी; ।
कीं गौरीमति, जैशी साधुसभा, निजपदींच[3] नांदावी. ॥ २९

सायुध, चतुर्भुज, परमरम्याकृति, सिद्धि[4]बुद्धि[5] तत्सहित, ।
हरिरथ[6] विनायक, करी जो श्रितहित[7] जेंवि माय वत्सहित. ॥ ३०

तो श्रीविनायक प्रभु, जो या आधार सर्व विश्वास[8]; ।
निःश्वास[9] वेद ज्याचे, ज्याचा साधूंसि पूर्ण विश्वास[10]. ॥ ३१

देवं[11] म्हणे, 'जीस घडे, सर्वव्रतमुख्य जें, महासति! तें, ।
व्यसन निवारुनि, दे तें अपरमिता इच्छिल्या महास[12] तितें. ॥ ३२

जेणें तुज दुःख दिलें, त्या दुष्टातें वधावया युद्धीं, ।
उदरीं उपजेन तुझ्या, चंद्र जसा क्षीरसागरीं शुद्धीं. ॥ ३३

होउनि पुत्र तुझा, मी भक्तमनोरथ अशेष पुरवीन; ।
नुरवीन विघ्न, परमप्रबळहि लावूनि आधि[13] झुरवीन[14].' ॥ ३४

---

१. कल्याणकर. २. माझे आईबाप, (हिमालय हा गौरीचा पिता, व मेना ही तिची माता.) पार्वती म्हणते, '(मजवर प्रीति करून माझें रक्षण करणाऱ्या) शंकराची वाखाणणी माझे आईबाप जशी करितात, तशीच ते तुझीही करोत.' ३. स्वस्थानीं. ४. मंत्रविद्या. या आठ आहेत:–'अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा । प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्ट सिद्धयः ॥.' ५. ज्ञानशक्ति. सिद्धिबुद्धि यांस स्त्रिया कल्पून गणपती त्यांचा पति मानिला आहे. 'तूं सिद्धिबुद्धिभर्ता; देवा! ब्रह्मांड सृष्टिचा कर्ता' (पहा–मोरोपंतकृत गजाननस्तव. गीति ९.) ६. सिंहवाहन. येथें 'सर्वसंग्रहां'त 'गरुडवाहन' अशी टीप दिली आहे, परंतु ती चुकीची दिसते. कारण, एक तर 'हरि' याचा अर्थ 'गरुड' असा होत नाहीं, दुसरें गरुडवाहनस्थ असें गणपतीचें कधींच ध्यान नसतें, आणि तिसरें कारण हें कीं, पुन्हां हेंच स्वरूप गणपतीनें गौरीला दाखविलें आहे, तेथें त्याला 'सिंही' म्हणजे 'ज्याचा सिंह आहे असा' असें म्हटलें आहे:–'**सिंही**, रक्तांबरधर, तेजोनिधि, सिद्धिबुद्धिहृत्कांत' (पहा–अ० ३ गी० १९.) ७. आश्रिताचें कल्याण. ८. जगतीला. ९. श्वासोच्छ्वास. १०. भरंवसा. या गीतींत **उदात्तालंकार** आहे. ११. अन्वयः–देव म्हणे, 'हे महासति! जें सर्वव्रतमुख्य (=विनायकव्रत) तें जीस घडे, तें, व्यसन (=संकट) निवारुनि, तितें इच्छिल्या अपरिमिता (=विपुल, अमर्याद) महास (=आनंदास) दे. १२. कल्याणास. १३. मनोव्यथा, हृद्रोग. १४. हृद्रोग लावून, अत्यंत प्रबळ शत्रूलाही झुरणीस लावीन.

गुप्त विनायक झाला, निववुनि गौरीस [1]अमृतवर्षानें. ।
कैलासातें गेला मग शिव [2]सस्त्रीक परमहर्षानें. ॥ ३९

---

## अध्याय दुसरा.

सिंदूरासुर मग जग बहु, मर्यादेसि मानिना, गांजी; ।
त्यापासुनि होय जनां, गरुडापासूनि हानि [3]नागां जी. ॥ १
'[4]पीडित म्हणे, '[5]मदर्थेचि रचिले हे देव, विप्र, [6]मत्तातें.' ।
जाणों [7]दुर्विधि अभय [8]प्रभुकरवीं देववि [9]प्रमत्तातें. ॥ २
तेव्हां सुरवर, मुनिवर, गेले बहुसंकटीं [10]तया शरण, ।
[11]सुखहेतु सेतु ज्याचे दुस्तरसंसारसागरीं चरण. ॥ ३
दर्शन दे प्रभु, करिती तोंचि प्रणती [12]तया [12]असीमा, '[13]यां. ।
[14]आली धांवत, घेउनि जगदवनास्तव, दया, असी माया. ॥ ४
तो श्रीविनायक म्हणे, 'सुरमुनि हो! मी हरीन [15]आधीतें, ।
जें [16]आत्मदान देऊं केलें, देतों शिवेसि [17]आधीं तें. ॥ ५
गौरीचा सुत होतों, तेथें '[18]वरिजेल म्यां [19]गजाननता, ।
[20]व्यसनीं उपेक्षिलें पलमात्रहि [21]नक्राकुळा [22]गजा न [23]नता.' ॥ ६

---

१. अमृताच्या वर्षावानें. २. स्त्रीसह, पार्वतीसह. ३. सर्पांना. ४. पीडा देत. ५. माझ्याकरितां. ६. माझ्या पित्यानें (ब्रह्मदेवानें). ७. दुर्दैव. ८. विष्णूकडून. ९. मदांधास, माजलेल्यास. या गीतींत **उत्प्रेक्षा** आहे. १०. ईश्वरास, विष्णूस. ११. सुखाचें कारण. येथें **पर्यायोक्त** व **परंपरितरूपक** असे दोन अलंकार आहेत. १२. त्या मर्यादातीत प्रभूला (विष्णूला); त्या अनंताला; दिशा, काल इत्यादिकांनीं जो मर्यादित नाहीं अशा ईश्वरास. १३. यां= देवांस. १४. अन्वयः-[प्रभूची] दया, जगदवनास्तव (विश्वाच्या रक्षणासाठीं) अशी (=दर्शनरूप) माया घेउनी, धांवत आली. **चेतनगुणोक्ति.** १५. व्यथेतें, दुःखातें. १६. स्वांशदान, अपत्यरूपानें आपला अंश देणें. १७. प्रथम, अगोदर. १८. वरिली जाईल, स्वीकारली जाईल. १९. गजाननस्वरूप. २०. संकटांत. २१. मकरानें व्याकुळ केलेल्या. २२. गजेंद्राला. द्रविडदेशाचा राजा इंद्रद्युम्न हा अगस्तीच्या शापानें गजेंद्र झाला. तो एकदा त्रिकूटपर्वतावर ऋतुमत्सरांत पाणी प्यावयास गेला असतां, त्याचा पाय नक्रानें ओढून धरिला. तेव्हां त्या प्राणसंकटांत गजेंद्रानें मोठ्या भक्तिभावानें विष्णूचा धांवा केला. तेव्हां विष्णूनें ही त्याची निःसीम भक्ति पाहून तत्काळ धावणें केलें व त्याची सुटका केली. या कथेंतील नक्र हूहू गंधर्व होय. तो देवल ऋषीच्या शापानें नक्ररूप झाला होता. गजेंद्रमोचनाच्या वेळीं विष्णूनें नक्रास चक्रानें मारून त्यास शापमुक्त केलें. २३. नम्र. येथें गजेंद्रकथेचा उल्लेख करून, विष्णू नम्र जनांविषयीं फार दयाशील आहे, हें सामान्य तत्त्व सांगून, प्रस्तुत सूचित केलें आहे, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा** होय.

ऐसें सांगुनि, झाला गुप्त प्रभु, हर्षवूनियां जगती. ।
नग[1] [2]तीर्थरूप जीचा, परमसती होय गर्भिणी मग ती[3]. ॥ ७
तों तों सुरांत उत्सव, जों जों होती सतीस [4]डोहाळे, ।
जगदंबेचे एकानन[5] कवि वर्णील काय सोहाळे? ॥ ८
'रम्यवनीं क्रीडावें' हा सांगे प्रभुसि[6] दोहद[7] मनाचा, ।
तेव्हांचा वर्णावा किति उत्सव दासमोहदमनाचा[8]? ॥ ९
प्रभु पर्यंकिं वनांत क्रीडे येऊनियां शिवासहित[9]; ।
कैलासनिवासाहुनि वाटे गौरीस तो निवास हित. ॥ १०
होता [10]महेश, ज्याचें संदलिप्रिय[11] राज्य अनघ[12] राजीव[13], ।
त्याच्या आला, परिसुनि यश, निववायासि मन, घरा [14]जीव. ॥ ११
विनयें सुरगुरुचरणीं सुचिर महेशें समर्पिला माथा[15], ।
परम प्रसन्न होउनि त्यासि बृहस्पति म्हणे, '[16]धरानाथा! ॥ १२
पुण्यश्लोका[17]! बा! हें त्वन्मस्तक विश्ववंद्य हो राजा! ।
होतिल आधीं प्राप्ता पूजा त्या यांसि[18], फार थोरा ज्या. ॥ १३
देइल मुक्ति महेश्वर तुज, जन्म घडेल एक आणीक; ।
न ज्ञान गर्भवासीं नासेल, शिखींत[19] जेंवि माणीक.' ॥ १४

---

१. पर्वत (हिमालय). २. पिता. ३. येथें 'पार्वती' असें स्पष्ट न म्हणतां, तें नांव पर्यायानें सुचविलें आहे, म्हणून **पर्यायोक्तालंकार** झाला. ४. येथें डोहाळे होऊं लागले पार्वतीला, व आनंद झाला देवांना, असें आहे; म्हणून हा **असंगति-अलंकार** झाला. याचें लक्षणः—'भिन्नाधिकरणत्वे तु कार्यहेत्वोरसंगतिः.' म्हणजे कार्य आणि कारण हीं भिन्न भिन्न ठिकाणीं असलीं म्हणजे असंगति अलंकार होतो. ५. एक-मुख. सहस्रमुख शेष जेथें थकला, तेथें माझी कथा काय? असा अर्थ निष्पन्न होतो, म्हणून या गीत्यर्धांत **काव्यार्थापत्ति अलंकार** आहे. तसेंच 'एकानन' हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें येथें **परिकर**ही आहे. ६. शिवास. ७. डोहाळा. ८. भक्तजनांचें अज्ञान दूर करणाऱ्या शंकराचा. ९. पार्वतीसह. १०. नामविशेष राजा. (पुढें गीति २८ पहा.) ११. सज्जनरूप भ्रमरांचें आवडतें. १२. निष्पाप, मलरहित. १३. कमळ. येथें **परंपरित रूपक** आहे. १४. बृहस्पति, देवगुरु. १५. मस्तक. १६. भूपते! राजा! १७. पुण्य (पवित्र) आहे श्लोक (यश) ज्याचा अशा! शुद्धकीर्ते! १८. तुझ्या मस्तकास, म्हणजे तुला. १९. अग्नींत. माणीक जसें अग्नींत नष्ट होत नाहीं तसें तुझें ज्ञान पुनः जन्म प्राप्त झाला तरी नष्ट होणार नाहीं.

मग नारदासि न नमी, भाविबळें तो महेश अवमानी; ।
कीं दैववश असावें परमांनींही, जसेंचि अवमानीं. ॥ १५

देवर्षि म्हणे, 'लॉविल, तुज पाहुनि, कोण बोले वेनातें? ।
कीं त्याचें लाजविलें त्वां जें मैत्तत्व, बोलवेना तें. ॥ १६

प्राप्त असो तुज गजशिर, कीं न, क्षत होय, तरि लवे गा! तें. ।
हें द्याया, हा माझा शाप महोदार करिल वेगातें. ॥ १७

लोक गजासुर ऐसें म्हणतिल तुज, परमभाग्यमत्तातें.' ।
पावे महेशराजा या शापातें, सुरर्षिदत्तातें. ॥ १८

मग मरणानंतर, तो करिणीपासूनि जन्मला भूप, ।
वदनीं मात्र गजाचें, मानुष सर्वत्र अवयवीं, रूप. ॥ १९

---

१. होणाऱ्या कर्माच्या बळानें. दैववाद पंतांच्या काव्यांत वारंवार आढळतो. 'भावि प्रबळ; भ्रमतो सर्वहि, बालिश असो, असो सुकवि । होणार सत्पथींही दिवसाही डोळसासही चुकवी ॥' (मोरोपंत–आदिपर्व). २. थोरांनीं. अर्थः–जसें लहानांनीं तसेंच थोरांनींही नेहमीं दैवाधीन राहिलें पाहिजे. ३. लहानांनीं. ४. नारद. हा मूळचा दासीपुत्र होता. परंतु भगवद्भक्तांच्या संगतीनें त्याला भक्तीची गोडी लागली. पुढें देहपात झाल्यानंतर, तो ईश्वराच्या वरानें पार्षद झाला. पुढें कल्पांतीं तो श्वासवायूसह ब्रह्म्याच्या उदरांत शिरला. यानंतर सहस्र युगांनीं ब्रह्मदेव जेव्हां सृष्टि निर्माण करूं लागला, तेव्हां त्यानें नारदास आपल्या मांडीपासून उत्पन्न केलें. हा देवर्षि ब्रह्म्याचा मानसपुत्र असून, देवांना सर्व माहिती देणारा आहे. याला त्रिलोकींत स्वेच्छ संचार करितां येतो. यानें वीणावाद्य शोधून काढिलें, व यानें एक स्मृतिही रचिली आहे. याला आपल्या व देवांच्या करमणुकीकरितां व कल्याणाकरितां कळ लावून देण्याची फार हौस असते, म्हणून यास कलहप्रिय म्हणतात. (पुढें अ० ४ गी० २ व 'दत्तदयोदय' गी० ५४–६३ पहा.) ५. दोष देईल. ६. वेन राजाला. हा अंगराजाचा पुत्र. हा फार दुष्ट होता. यानें धर्ममार्ग उल्लंघिला म्हणून ब्राह्मणांनीं याला शाप देऊन याचें ऐश्वर्य व बल हीं नष्ट केलीं. 'मंत्रभागवतां'त पंत वेनाविषयीं म्हणतातः–'यज्ञाचा भोक्ता तो मीच' म्हणे धरुनि मद, तया **वेना** । द्विजशापहता 'या' हे सामोरे नरक वदत यावेना? ॥ (स्कं० २ गी० ५५). ७. उन्मत्तपणा, माज. येथें **प्रतीपालंकार** आहे. ८. अन्वयः–गा! तुज गजशिर प्राप्त असो, कीं (=कारण) तें क्षत (=अंकुशाच्या आघातानें जखमी) होय, तरी न लवे. ९. अन्वयः–माझा महोदार (=अत्यंत उदार) शाप, [तुला] हें (=गजशिर) द्याया (=देण्यासाठीं) वेगातें (=मोठ्या घाईतें) करील. येथें तूं अल्पकाळांत 'गज' होशील असें सांगावयाचें, परंतु तेंच जरा वळसा घेऊन सांगितलें आहे, म्हणून हें **पर्यायोक्त** झालें. तसेंच शापाच्या सद्यः-प्रतीतत्वानें त्याला 'महोदार' म्हटलें आहे, तेव्हां ती **व्याजस्तुति** होय. १०. नारदानें दिलेल्या. ११. हस्तिणीपासून; हस्तिणीच्या पोटीं. १२. मनुष्याचें. हें 'रूपा'चें विशेषण.

ऐसा झाला होता तो [1]त्याच वनांत फार बळकट, कीं ।<br>
देवांच्या, असुरांच्या, नव्हतें [2]तद्भंगहेतु बळ, [3]कटकीं. ॥ २०

तेथें तो [4]द्विरदासुर, [5]जातिस्मर, निजमनांत युक्तीतें ।<br>
योजुनि, आला श्रीहरहस्तें पावावयासि मुक्तीतें. ॥ २१

प्रमथगणातें पळवी, रक्षित होते बळी [6]निवासा जे; ।<br>
तो त्याहि मंडपातें भंगी, ज्यामाजि ती [7]शिवा साजे. ॥ २२

देवी प्रभुसि म्हणे, 'हो! शीघ्र करा [8]जीवितान्तदंड; पहा, ।<br>
दारुण गजवदनासुर मोडितसे कीं समक्ष मंडप हा.' ॥ २३

सोडुनि समाधि, [9]शर्वें सुरशत्रुप्रशमसद्यशोमूलें ।<br>
केला प्रहार [10]अंधकमथनकरें त्या गजासुरीं शूलें. ॥ २४

जैंवि नखें कमळ, तसें शूळें शिर शंभु जेधवां तोडी, ।<br>
सोडी, 'नमः शिवाय' व्यक्त म्हणुनि, देह, करहि तो जोडी. ॥ २५

स्वकरें स्वभक्त वधिला, यास्तव चित्तांत फार तळमळला, ।<br>
तो भक्तवत्सल प्रभु जाणों जोडुनि [11]अकीर्तिमळ [12]मळला. ॥ २६

मुक्तिहि देउनि त्यातें, [13]अनृणत्वास्तव [14]तदीय चर्मातें ।<br>
शिव पांघुरे, शिरातें पूजी, द्याया श्रितांसि [15]शर्मातें. ॥ २७

---

१. वर नवव्या गीतींत सांगितलेल्या रम्य वनांत. २. त्याला मारण्याचें कारण, त्याला मारूं शकेल असें. याचा संबंध 'बळा'कडे. ३. सैन्यांत. ४. द्वि (=दोन) आहेत रद (दांत) ज्याला तो द्विरद=गज. ५. पूर्व जन्मींची ज्याला आठवण आहे असा. जाति=जन्म. ६. शिवस्थानाला. ७. पार्वती. ८. जीविताचा नाश करणारा दंड; प्राणान्त शिक्षा. ९. सुर+शत्रु+प्रशम+सद्+यशस्+मूलें=देव+रिपु+नाश+उत्तम+कीर्ति+कारणें=देवाचे शत्रू जे दैत्य त्यांचा नाश करून मिळणारें जें उत्तम यश त्याचें मूळ कारण असा शर्व (=शंकर), त्यानें. १०. अंधकासुराचें मथन करणाऱ्या (शूलें). अंधक हा असुर कश्यप व दिति यांचा पुत्र. हा प्रमत्त होऊन देवांस व मानवांस त्रासवूं लागला, तेव्हां शंकरानें त्याला आपल्या त्रिशूलानें ठार केलें. या गीतींत 'शर्व' आणि 'शूल' यांचीं विशेषणें साभिप्राय आहेत. म्हणून **परिकरालंकार** होतो. ११. दुष्कीर्तिरूप मळ. **रूपक.** १२. येथें **उत्प्रेक्षा** असून **विषमा**चीहि छटा आहे. विषमाचें लक्षण:–'घटनानर्हयोर्यत्र घटना विषमं मतम्' म्हणजे ज्या दोन दोन गोष्टींचा किंवा पदार्थांचा संयोग अयोग्य आहे, त्यांचा संयोग झाला असतां विषमालंकार होतो. १३. ऋण फेडण्यास्तव. १४. त्याचें (गजासुराचें) कातडें. येथें 'मुक्ति' देऊन 'चर्म' घेतलें, म्हणून **न्यून परिवृत्ति** अलंकार झाला. १५. सुखातें.

## अध्याय तिसरा.

स्वमुखें सिंदूर वदे, बैसुनि सिंहासनीं, स्वमहिम्यातें, ।
श्रोत्यां अप्रिय जें, कां वर्णावें पावुनि श्रमहि म्यां तें? ॥ १

ऐकाल आदरें जरि, झाली जी तेधवां गगनवाणी, ।
तुमच्या सुखासि कांहीं, सुश्रोते हो! जगीं मग न वाणी. ॥ २

'सिंदूरा! स्वयशाचें स्वमुखें वर्णन सुमंद रचितो रे! ।
न वदे, करूनि दावी, अतिसुरसप्रद सुमंदरचि तोरें. ॥ ३

श्रुतिकटु गर्जसि, मूढा! पापा! तूं जंबुकांत जंबुकसा, ।
होईल पांचजन्यासम मते पाखंडपाणिकंबु कसा? ॥ ४

वमनें श्वाना, मूढा रुचतिं तव वचें तशीं असारेंच, ।
ऐक, कुबुद्धे! जेणें बहुतांचा उतरिला असा रेंच; ॥ ५

नेलें लयासि, कामक्रोधादिक जे, तशाहि उदरीतें, ।
आलें गौरीच्या, तव उतराया रेंच, तेज उदरीं तें.' ॥ ६

सिंदूर म्हणे, 'वदतें जें ऐसें वदन शत्रुचें कटु, तें ।

---

१. पंतांनीं आपल्या काव्यांत वर्णनसंक्षेप केलेला वारंवार आढळतो. वर्णनसंक्षेप करतांना प्रस्तुतसारखी सबब पंतांनीं अनेक वेळां पुढें आणिलेली आहे. 'खळकृत गुरुनिंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सुकवी। कीं ती श्रीगुरुभक्तिप्रेमामरपादपांकुरा सुकवी॥' (मोरोपंत–विराटपर्व–अ० ४ गी० १७). २. मी मोरोपंतकवी, यानें. ३. आकाशवाणी. ४. तोटा. ५. वर्णितो. ६. अत्यंत मूर्ख. ७. चांगला मंदार वृक्ष. मंदार किंवा मंदर हा स्वर्गांतील पांच कल्पवृक्षांपैकीं एक आहे. ८. आत्मप्रशंसा. ('वदे' क्रियापदाचें कर्म.) या ठिकाणीं 'तोरें' असा सानुस्वार पाठ घेतला तर बरें. अन्वयः–अतिसुरसप्रद (=उत्तम रस देणारा) सुमंदरचि तोरें (=डौलानें) न वदे, [परि] करूनि दावी. ही गीति उत्तम सुभाषित असून, हींत **अप्रस्तुतप्रशंसा** व **दृष्टांत** असे दोन अलंकार आहेत. ९. कानाला कडु लागणारें. १०. कोल्ह्यांत. येथें **उपमालंकार** आहे. ११. पांचजन्य हें विष्णूच्या शंखाचें नांव आहे. हा शंख समुद्रमंथनसमयीं निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक आहे. 'शंखो लक्ष्मीपतेः **पांचजन्य**श्चक्रं सुदर्शनम्' (अमर). १२. मान्य, पूज्य. १३. पाखंडाच्या (जंगमाच्या) हातांतील शंख. येथें **प्रतिवस्तूपमा** व **प्रश्न** असे दोन अलंकार आहेत. १४. ओकारी. १५. निःसार, पोकळ. अन्वयः– (जशीं) श्वाना वमनें (रुचतीं), तशीं तव असारेंच वचें मूढा रुचतिं. ही **वाक्योपमा** आहे. १६. माज. गीति ५ व ६ यांचें युग्म आहे. १७. अन्वयः–जे कामक्रोधादिक (षड्रिपू), (त्या) तशाहि उदरीतें (=उद्+अरीतें=उन्मत्त शत्रूंना) जेणें लयासि नेलें, तें तेज, तव रेंच(=मस्ती, गुर्मी) उतराया, गौरीच्या उदरीं आलें.

छेदुनि, भरा रंजांनीं; वर्णू मज योग्य सत्क्रियापटुतें.' ॥ ७
केले प्रदीप्त डोळे, लोपावे ज्यांसमोर आवे शें; ।
तो खळ उडोनि आला त्या श्रीगौरीकडेचि आवेशें. ॥ ८
शिरला जगदंबेच्या उदरीं तो कामरूप, मायावी, ।
त्या अतिरूक्षा द्याया न कविमनीं कां मरूपमा यावी? ॥ ९
तो करुनि गर्भमस्तककर्तन नर्तन करीत, चोर पळे, ।
खळकर्म गरळगुरु, कीं ज्याच्या श्रवणेंहि हृदय होरपळे. ॥ १०
'धन्य' म्हणेल प्रभुला, कापुनि दे दानदक्ष मासा जो, ।
'शिर नेउं दे' म्हणे तो, 'अत्यद्भुत मानद क्षमा साजो.' ॥ ११

---

१. धुळीनें. २. वर्णन करो. ३. चांगले लोक. ४. उत्तम क्रिया करण्यांत कुशल अशास, कर्तृत्ववानास. (हें 'मज' या सर्वनामाचें विशेषण). ५. फिके पडावे. ६. मडक्यांच्या भट्टया. ७. शेंकडों. या गीत्यर्धांत **प्रतीपालंकार** आहे. ८. त्वेषानें. ९. इच्छेस येईल तें रूप धरणारा. १०. चेटकी. राक्षस मंत्रविद्येंत व जादूंत फार प्रवीण असत. पुराणांत 'आसुरी माया' प्रसिद्ध आहे. ११. द्रवहीन. (मरुपक्षीं) निर्जल; व (सिंदूरपक्षीं) निर्दय. १२. मारवाड देशाची उपमा. १३. येथें **प्रश्नालंकार** असून **श्लेषमूलक उपमा** त्याचें अंग आहे. १४. गर्भाच्या मस्तकाचें छेदन. १५. नृत्य. १६. विषाहून श्रेष्ठ. येथें उपमेयभूत जें खळकर्म, त्याचें उपमानभूत विषावर श्रेष्ठत्व दाखविल्यामुळें **व्यतिरेक** झाला. १७. दानशूर. १८. जो दानदक्ष मासा कापुनि दे तो (शिबिराजा) प्रभुला 'धन्य' म्हणेल. येथें **व्यतिरेक** व **पर्यायोक्ति** असे दोन अलंकार आहेत. शिबि (ऊर्फ उशीनर) हा राजा मोठा दानशूर व सत्वशील होता. याची सत्वपरीक्षा पाहण्याकरितां एकदां अग्नि आणि इंद्र यांनीं अनुक्रमें कपोत आणि श्येन ह्यांचीं रूपें घेतलीं. मग त्याला धरून मारण्यासाठीं श्येन कपोताच्या मागें लागला. भयभीत झालेला कपोत आश्रयार्थ शिबीजवळ आला. शिबीनें कपोताला आश्वासन दिलें, व 'दया कर, कृपाळू हो. ह्या गरीब कपोताला मारूं नको' इत्यादि अनेक प्रकारें श्येनाची विनवणी केली. परंतु ती निष्फळ गेली. अखेर श्येनास संतुष्ट करण्याकरितां कपोताच्या भारंभार आपलें स्वतःचें मांस देण्यास शिबी तयार झाला. श्येन ह्या गोष्टीस कबूल झाला. कपोतरूपधारी अग्नीनें शिबीची बरोबर परीक्षा पाहण्याकरितां आपलें वजन वाढविलें. शिबीनें आपल्या अर्धाहून अधिक शरीराचें मांस कापून काढिलें, तरी तें कपोताचे भारंभार होईना. तरी धीर न सोडितां, अधिक मांस, कापण्यास सिद्ध झाला. तेव्हां अग्नि व इंद्र हे प्रसन्न होऊन, त्यांनीं आपापलीं वास्तव रूपें प्रगट केलीं, व शिबीचा धन्यवाद गाऊन, त्यास आशीर्वाद दिले. १९. प्रभु, गर्भरूप विष्णूचा अंश या गीतीच्या प्रथम अर्धांत जें कार्य वर्णिलें आहे, त्याचें कारण द्वितीय अर्धांत आहे; परंतु 'कारण' असा शब्द योजिला नाहीं. म्हणून हा **काव्यलिंग** अलंकार झाला. २०. मान देणारी.

शिविहि म्हणे, 'हर्ष यशीं पाहें, छिन्नीं न कष्ट मी मासीं,'[1] ।
प्रभु[2] मग काय वदावा? झालें हें कर्म अष्टमीं मासीं. ॥ १२

विंध्याचलासि गेला खळ, जेथें नर्मदा नदी नांदे, ।
टाकी तें शिर तींत, स्मृतिहि जिची शंर्मदान[3] दीनां दे. ॥ १३

शिर ज्यांत टाकिलें हो! म्हणतात गणेशकुंड जनता[4] तें, ।
त्यापासुनि करितातचि कृतकृत्य गणेश कुंडज[5] नतातें[6]. ॥ १४

नाहीं किमपि समजलें जैसें तें कायकर्म[7] बळदेवा[8], ।
प्रभुसामर्थ्यें यांही[9], सस्त्रीका हेंहि कर्मबळ देवा[10]. ॥ १५

दोहद पुरवुनि, नेउनि पुनरपि जगदंबिकेसि, कैलासीं, ।
राहे शिव धर्मकथा कथित सनकनारदात्रिपैलांसी[11]. ॥ १६

सुदिनीं शिवा तयातें[12], दीप करायासि अच्छवि[13], प्रसवे, ।

---

१. अन्वय:–मी यशीं हर्ष पाहें, छिन्नीं मासीं कष्ट न पाहें. या स्थळीं मांसच्छेदन कष्टकारक असतांही, कष्टाची उत्पत्ति होत नाहीं; म्हणून हा **विशेषोक्ति** अलंकार होय. याचें लक्षण:–'विशेषोक्तिरनुत्पत्तिः कार्यस्य सति कारणे.' २. अर्थ:–[ही प्रौढ वयाच्या शिबीची गोष्ट.] मग आठव्याच महिन्यांत हें [शिरच्छेदनाचें] कृत्य झालें असतां, ज्या प्रभूनें कष्ट न मानितां सहन केलें, त्या उदार प्रभूचें वर्णन काय करावें? [त्या प्रभूची यशःप्रीति केवढी असावी?] **काव्यार्थापत्ति.** ३. सुखदान. ४. जनसमूह, लोक. 'ता' हा समूहवाचक प्रत्यय आहे. ५. कुंडापासून उत्पन्न झालेले. गणेशपुराणांत गणेशकुंडाची कथा याहून बरीच निराळी आहे. या कुंडांतील रक्तोत्पलांनाच (=लाल खड्यांना) नार्मद (=नर्मदेंतील) गणपति म्हणतात. ६. नम्रांना, भक्तांना. ७. शरीरावर घडलेलें कार्य; शिरच्छेदन. ८. बळरामाला. कंसानें बंदींत टाकिलेल्या देवकीच्या पोटीं ईश्वरांश सातव्या गर्भीं आला. ईश्वरी मायेनें हा गर्भ देवकीच्या उदरांतून काढून, वसुदेवाची दुसरी स्त्री रोहिणी हिच्या उदरीं घातला. हें जें मायेनें गर्भचालन केलें तें गर्भास समजलें नाहीं. पुढें योग्य कालीं रोहिणी प्रसूत होऊन मुलगा झाला; तोच बळराम. बलरामाचीं नांवें 'रेवतीरमणो रामो **बलदेवो** हलायुधः । नीलांबरः सीरपाणिर्बलश्च मुसली हली ॥' (अमर). ९. गर्भांतील बाळकास. १०. अन्वय:–(तसेंच) सस्त्रीका (=पार्वतीसहित अशा) देवा (=शंकरास) हेंहि कर्मबळ (=दैवाचा प्रभाव) समजलें नाहीं. ११. **सनक**–विष्णूनें कुमारावतारीं जीं चार रूपें धारण केलीं त्यांपैकीं एक सनक होय. आत्मज्ञानाचा मार्ग नष्ट झाला होता, तो ह्या अवतारानें उद्धरिला. **अत्रि**–हा परम पुण्यवान् मुनि होता. हा सप्तर्षींपैकीं एक आहे. ह्याची पत्नी अनुसूया अत्यंत पवित्र साध्वी होती. तिच्या पातिव्रत्यतेजानें ब्रह्मादि तिन्ही देव अंशरूपें तिच्या पोटीं येऊन दत्तात्रेयावतार झाला. **पैल**–ऋषिविशेष. १२. गर्भातें. १३ अ+छवि=निस्+तेज, कांतिहीन. दिव्यांचें तेजही गणपतीच्या तेजानें कमी झालें–असा अर्थ. येथें **प्रतीपालंकार** आहे.

ज्याच्या पदीं वसाया लाविति चित्तासि अच्छ[१] विप्र सेवे[२]. ॥ १७
त्या श्रीविनायकातें पूर्वीं जैसें, तसेंचि ती पाहे, ।
राहे चित्र तशि क्षण, परमानंदासि ती सती लाहे. ॥ १८
सिंही[३], रक्तांबरधर[४], तेजोनिधि, सिद्धिबुद्धिहृत्कांत, ।
सायुध, दिव्य चतुर्भुज, परमरुचिर, सुचिर देखिला शांत. ॥ १९
प्रेमें करूंचि लागे, अंजलि बांधोनियां, नव[५] स्तुतितें, ।
न क्षणभरि स्फुरों दे तें अद्भुतदेह भवनवस्तु[६] तितें[७]. ॥ २०
तीतें म्हणे विनायक, 'हें रूप प्रत्ययार्थ[८] दाखविलें; ।
कीं तेंचि म्हणुनि समजे, वस्तु प्रथमानुभूत[९] चाखविलें. ॥ २१
आलों तुझिया, व्हाया सकळहि हतगर्व मंदरि[१०], पोटा; कीं[११] ।
नामचि म्हणेल माझें, 'हो सावध, सर्व मद रिपो! टाकीं.' ॥ २२
पुत्रत्वें करिन तुझें शुश्रूषण मी, सुखें सहा[१२] सति! तें, ।
प्रथम[१३] तव सुयश, मग सुर पिउत, सुधा जी, मुखें सहास तितें. ॥ २३
माझ्या[१४] यशोमृतातें, सिंदूरजतापसिंधु आटो, पी.' ।
ऐसें वदुनि विनायक दाखविलें तें स्वरूप आटोपी. ॥ २४
देहावरि[१५] येउनि, जों शंकरमहिषी[१६] शिवा पुढें पाहे, ।
तों सुरुचिरतनु[१७], अनुपम, अनलप्रभ[१८], शिशु, शिरोरहित[१९] आहे. ॥ २५
विशिरस्कतोकदर्शनजन्य[२०] शिवाशोक काय बोलावा? ।
राहे तदालिगंगानयनसरोजांतही[२१] न ओलावा. ॥ २६

---

१. निर्मळ. २. संवय. ३. अध्याय १ गीति ३० पहा. ४. लाल वस्त्र धारण करणारा. ५. नूतन, अपूर्व. ६. गृहांतील पदार्थ; भोंवतालच्या वस्तू. ७. अन्वयः—तें अद्भुतदेह तितें (=पार्वतीतें) क्षणभरहि भवनवस्तु स्फुरों न दे (=घरांतील, भोवतालच्या वस्तूंचें भान राहूं न दे). ८. अनुभवार्थ, प्रचीति येऊन खात्री व्हावी म्हणून. ९. पूर्वीं पाहिलेलें. 'वस्तु' हा शब्द संस्कृतसंप्रदायानुरूप नपुंसकलिंगी वापरला आहे. १०. माझे शत्रू. ११. कारण. १२. मान्य कर. १३. प्रथम सुर (=देव) तव सुयश [पिऊत] मग, जी सुधा, तितें(=त्या सुधेतें) सहास (=सोपहास, उपहास करीत) मुखें पिऊत. येथें 'यश इतकें मधुर आहे कीं देव अमृताचाही उपहास करितात' असें वर्णन आहे, म्हणून **प्रतीपालंकार** आहे. १४. अन्वयः—माझ्या यशोमृतातें पी, [आणि मग] सिंदूरजतापसिंधु (=सिंदूरापासून झालेला अपरिमित त्रासरूपी समुद्र) आटो. १५. भानावर येऊन. १६. शिवपत्नी पार्वती. १७. अत्यंत सुंदर आहे शरीर ज्याचें असा. १८. अग्नीसारखें तेज ज्याचें असा. १९. छिन्नमस्तक. २०. विगत (=गेलेलें) आहे शिर ज्याचें तो विशिरस्क. विशिरस्क+तोक+दर्शन+जन्य=मस्तकरहित मुलाच्या दर्शनापासून झालेला. २१. पार्वतीची सखी गंगा तिच्या नेत्रकमलांत सुद्धां. ही **अत्युक्ति** आहे. लक्षणः—'अद्भुतासत्यकथनं मतात्युक्तिरलंकृतिः'.

मेळविले देव सकळ जाउनि विधिनें [illegible] [1]अरिष्टांत,
आणुनि सभेंत अद्भुत तो बाळ स्थापिला [2]वरिष्ठांत. ॥ २७
त्यासि बृहस्पतिनारदविधिविष्णुप्रभृति [illegible] पाहुन,
साहुन शोक, करिती सुविचार, क्षण [3]तटस्थ [illegible]. ॥ [illegible]
'जरि परमपुरुष नसता, बहु, होउनि हा [4]परासु, ताप [illegible]विता, ।
साजे शोक[5]नगाची, [6]दैवींच्या या [6]परा [6]सुता, [7]पविता. ॥ २९
हा ज्ञानरूप, सेविति वि[8]द्यांसहित स्वयें [9]कळा यास.' ।
ऐसें म्हणोनि, विनविति सुर, [10]तत्वें देव तो कळायास. ॥ ३०
तो शिशुरूप विनायक भगवान् विशि[11]रोहि परम शुद्ध वदे, ।
निजतत्व कथुनि, सर्वब्रह्मादिसुरांसि विपुल [12]उद्धव दे. ॥ ३१
गुरु त्यासि म्हणे, 'प्रकटीं [13]शारदशशिशुद्धवदनराजीवा, ।
हो सुरजना, अमृतघन जेंवि दवीं [14]उद्धवद नरा, जीवा.' ॥ ३२
देव म्हणे, 'मदनुग्रह जो, सर्व सुरांसि तो [15]कवच नाकीं, ।
लावा [16]महेशगजशिर, बहुमानी तात तोक[17]वचना कीं.' ॥ ३३
नारद म्हणे, 'प्रभो! वद; अत्यद्भुत हा तुझा [18]अमल [18]काय. ।
[19]अस्मन्नयनाभाग्यें झालें एकचि शिरःकमल काय?' ॥ ३४
तो अद्भुत बाळ म्हणे, 'कथितों खळवृत्त सर्व, परिसा हो! ।
[20]म्यां साहिलें, सुदुःसह तरि, तुमचें मन तसेंचि परि साहो. ॥ ३५

---

१. सूतिकागृहांत, बाळंतिणीच्या खोलींत. २. श्रेष्ठांत, थोर मनुष्यांत. ३. स्तब्ध. ४. गतप्राण, मृत. हा परमपुरुष होता म्हणून मस्तकच्छेदनानेंही मृत झाला नाहीं—असा भाव. ५. शोकरूप पर्वताची, शोकपर्वत फोडणारी. ६. परा दैवींच्या सुता=मोठ्या दैववान् मुलाला. ७. वज्रत्व. येथें **रूपकालंकार** आहे. ८. चौदा विद्या. ९. चौसष्ट कळा. विद्या व कळा यांचा गणपति हा स्वामी असून, तो त्या आपल्या भक्तांस देतो. 'गानकवित्वादि कळा, ज्यांत सुधेची तशीच चव दात्या! । देशी देवा विद्या सर्वा-पुरुषार्थहेतु चवदा त्या ॥' (मोरोपंत—गणपतिप्रार्थना—गीति १६). १०. खरोखर. ११. मस्तकहीनही. १२. हर्ष. १३. शरदृतूंतील (प्रसन्न) चंद्राप्रमाणें शुद्ध अशा वदनकमलास. १४. आनंद देणारा. अन्वयः—जेंवि दवीं (=दावानळांत) अमृतघन नरा [व] जीवा (=प्राण्यांस) उद्धवद [होतो], [तेंवि] तूं सुरजना [उद्धवद] हो. १५. ढाल, आत्मरक्षणाचें साधन. १६. (नारदाच्या शापानें) गज झालेला जो महेशराजा, त्याचें शिर. १७. मुलाच्या बोलण्यास. १८. निर्मळ देह. १९. आमच्या डोळ्यांच्या दुर्दैवानें. २०. (तें खळवृत्त) सुदुःसह तरि साहिलें परि तुमचें मन [तें] तसेंचि (=माझ्या प्रमाणेंच) साहो.

अष्टम मासीं नेलें सिंदूरें, शिर करूनि खंडन हो! ।
[1]गुरुदत्तवरगजासुरशिर आतां या तनूसि [2]मंडन हो.' ॥ ३६
[3]सुरमुनि म्हणे, 'गजासुरशिर [4]सुरशिल्पें प्रभो, कसें जडतें? ।
तुज सुकर [5]विश्वघटका, बहु [6]पटुकोटींस कर्म जें जड, तें.' ॥ ३७
गजमुख दिसे विनायक या मुनिवचनाचियाचि [7]अवसानीं, ।
करि परिपूर्ण मनोरथ, जे न फळावेचि कोटिनवसानीं. ॥ ३८
तो आपणासि आपण तेजें देवांसही [8]अलंकारी, ।
[9]किंबहुना होय, यशें धवळुनि अमृतांशुला, कलंकारी. ॥ ३९
मुकुट, पदक, हार, [10]कटक, नूपुर, [11]केयूरें, [12]मुद्रिका [13]ल्यौला, ।
त्या दर्शना [14]अतिरसा [15]झेंड घालिति देव, जेंवि [16]काल्याला. ॥ ४०
आलिंगी पुत्रातें प्रेमें श्रीशंभुची उमा रमणी, ।
[17]श्रीकंठें, [18]वैकुंठें, कंठीं आलिंगिला [19]कुमारमणी. ॥ ४१
जयजयकार सुरांचे, झाले ध्वनि बहु सहस्रवाद्यांचे, ।

---

१. बृहस्पतीनें दिला आहे वर ज्याला असा जो गजासुर त्याचें मस्तक. 'सर्वसंग्रहां'त 'गुरूचा' अर्थ 'महादेव' असा केला आहे. परंतु तो चुकीचा आहे. 'तुझें मुख विश्ववंद्य होईल. मोठमोठ्या देवांस ज्या पूजा मिळावयाच्या त्या आधीं तुझ्या मस्तकाला मिळतील' असा वर महेशराजाला देवगुरु बृहस्पतीनें दिला होता, शंकरानें नव्हे. (अ० २ गी० १३–१४ पहा.) २. भूषण. येथें 'गजासुराचें शिर मला लावा' असें सरळ न सांगतां, तेंच पर्यायानें सांगितलें आहे, म्हणून हें **पर्यायोक्त** झालें. ३. देवगुरु बृहस्पति. ४. विश्वकर्म्याकडून. जसा मय हा असुरांचा शिल्पी, तसाच विश्वकर्मा हा देवांचा शिल्पी. ह्याला 'त्वष्टा' असेंही नांव आहे. ५. विश्वकर्त्यास. ६. कुशलांच्या अनेक कोटींस, कोट्यावधी कुशल मनुष्यांस. ७. विरामीं, अंतीं. ८. शोभवी, भूषवी. ९. अन्वयः–किंबहुना (=इतकेंच नव्हे तर) अमृतांशुला (=सुधाकराला, चंद्राला) यशें धवळुनि (=पांढरा करून), कलंकारी [चंद्राच्या कलंकाचा] शत्रू होय. येथें **तद्गुण** अलंकार आहे. याचें लक्षणः–'तद्गुणः स्वगुणत्यागादन्यतरान्यगुणग्रहः ।' म्हणजे जेथें 'एक पदार्थानें आपला स्वाभाविक गुण टाकून, अन्याचा गुण घेतला' असें वर्णन येतें, तेथें तद्गुण होतो. १०. कडीं. ११. दंडकडीं. १२. आंगठ्या. १३. [तो] घालिता झाला. १४. (दर्शनपक्षीं) अति आनंदमय; (काल्याच्या संबंधें) ज्यास पुष्कळ गोरस (=दूध, दहि इ०) आहे असा. १५. झडप, उडी. १६. गोपाळकाल्याला. १७. श्री (=कांति) आहे कंठांत ज्याच्या तो श्रीकंठ=शंकर. १८. विष्णूनें. वैकुंठ हें जसें विष्णुलोकाचें, तसें विष्णूचेंही नांव आहे. १९. सुतश्रेष्ठ, तो उत्तम मुलगा.

नतिनुतिकोटींचे[1] करि देवे[2] स्वीकार[3] अर्घपाद्यांचे. ॥ ४२
गंधर्व गात होते, अवलंबुनि मधुर सुस्वर[4] गतीतें, ।
पशुहि, अकर्णहि मोहों दे वशदे भक्तसुस्वरग तीतें.[5] ॥ ४३
नृत्य विलोकुनि, व्हाया जगदंबेचें सहर्ष तोकें[6], थवे ।
स्वर्वेश्यांचे[7] बहुशत नाचत होते; न हर्ष तो कथवे. ॥ ४४
भाद्रपदचतुर्थीत श्रीगजवदनावतार हा झाला, ।
या भालचंद्र[8] म्हणती; कीं दे निजभालचंद्र[9] शिव याला. ॥ ४५

## अध्याय चवथा.

बोलुनि, पळांत भिजवी जो, प्रेमजळें[10], अशेषविंदूर[11], ।
तो नारदमुनि गेला, जेथें होता सुरारि सिंदूर. ॥ १
सिंदूरें सत्कारुनि, बैसविला आपुल्या[12] पदीं, नमुनी, ।
सर्वत्र[13] पूज्य त्यासम कोणीही, जो कधीं न दीन मुनी. ॥ २

---

१. प्रणाम व स्तुति यांच्या कोटी त्यांचे. २. गजानन. ३. स्वीकारून. ४. गोड व मोहक [पदांच्या] चालीतें. ५. अन्वयः—भक्तसुस्वरग (=भक्तांचा कल्पवृक्ष, गजानन) वशदे (=कामदे, इच्छा पुरविणाऱ्या) तीतें (सुस्वर गतीतें) पशुहि (=मृगादि जनावरें) (व) अकर्णहि (=बहिरे किंवा ज्यांना कान नाहींत असे साप) मोहों दे (मोहित होऊं दे). गंधर्वांनीं गाइलेल्या स्तुतींत पशुसर्पादिसुद्धां मोहित झाले—हा भाव. वश=इच्छा. ६. बालक. ७. सुरांच्या वारांगनांचे, अप्सरांचे. समुद्रमंथनाच्या वेळीं उत्पन्न झालेल्या चौदा रत्नांत या आहेत. अप्सरस् शब्दाची व्युत्पत्ती अशी आहे:—'अप्सु निर्मथनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः । उत्पेतुर्मनुजश्रेष्ठः तस्मादप्सरसोऽभवन् ॥' ह्या गंधर्वपत्नी, स्वर्वेश्या व इंद्राच्या दासी होत. ह्या आपल्या सौंदर्यानें तपोनिष्ठांच्या तपांत विघ्न आणून, इंद्राला आपल्या वैभवाच्या चिरस्थायित्वाविषयीं निश्चित करितात. ८. भालीं (=कपाळीं) आहे चंद्र ज्याच्या तो भालचंद्र [बहुव्रीहिसमास]. हें नांव जसें शिवाला, तसेंच गजाननालाही आहे. ९. आपल्या भालावरील चंद्र. [तत्पुरुष समास]. १०. प्रेमाश्रूंनीं. नारदाचे गाणें फार भाविक व प्रेमळ असल्यामुळें, श्रोत्यांच्या मनांत प्रेमाचें भरतें येऊन, तें अश्रुरूपानें वाही. ११. सर्व ज्ञान्याचें ऊर. विंदु=ज्ञानी. १२. आपल्या स्वतःच्या सिंहासनावर. १३. अन्वयः—जो मुनि कधीं दीन (=याच्या करणारा) न, (तो) कोणीही (=कोणी असला तरी) सर्वत्र त्यासम (=नारदासारखा) पूज्य. येथें 'ज्यासम' असा पाठ घेऊन पुढील अन्वय करितां येईल:— ज्यासम (नारदाप्रमाणें) कोणीही सर्वत्र (सुर असुर वगैरे सर्वांचे ठिकाणीं) पूज्य न [व] जो मुनी कधीं दीन (म्लानमुख, चिंताकुल) [न]. येथें **अर्थांतरन्यास** आहे.

लावी, स्वप्रिय, सुरहित, कविरंजन व्हावयासि, कलहातें, ।
ज्यासि[2] बहुप्रिय हरिहरयशसें, व्यसनार्त म्हणति खल 'हा!' तें. ॥ ३
तो मुनि असुरासि म्हणे, 'तुजसम कोणी न देखिला अन्य. ।
तूं मात्र एक राजा, सिंदूरा! भूमिमंडळीं धन्य. ॥ ४
श्रम तिळहि न करितां, अतिदुर्लभ विधिनें तुला दिले वर ते, ।
ज्यांहीं स्वर्गीं सुरवर, नृप केले भग्न[3] या ईलेवरते. ॥ ५
वदवे न तुझ्या[6] महिमा, माझ्या या आनना, कपाळाचा, ।
तुजवांचूनि न झाला मदहंता आन नाकपाळाचा. ॥ ६
मेळविलें तेज तपें शक्रयमवरुणकुबेरतपनाहीं, ।
तूं[11] तदधिक तेजस्वी, पदरीं तों एक तिळहि तप नाहीं.' ॥ ७
विस्पष्टही जडहृदय नुमजे, कीं स्तवन तेंचि अस्तवन[12], ।
क्षण पावुनि तेज, म्हणे, 'सर्वाधिक आपणासि अस्तवन[13].' ॥ ८

---

१. लाविता झाला. नारदाला कलहप्रिय म्हणतात. परंतु त्याच्या कळ लावण्यांत वाईट हेतू नसतो. (अ० २ गी० १६ टीप पहा.) २. अन्वयः—व्यसनार्त (संकटानें त्रासलेले) खळ (जें) 'हा!' (=दुःखसूचक उद्गार) म्हणती, तें ज्यासि (=ज्या नारदास) हरिहरयशसें बहुप्रिय. दुष्टांच्या दुःखोद्गारानें नारदास आनंद होतो. येथें **विरोधाभास** आहे. ३. पराभूत. ४. पृथ्वीवर. ५. मुखाला. ६. तुझ्या कपाळाचा महिमा= तुझ्या दैवाचा थोरपणा; तुझें सुदैव. ७. मस्ती उतरणारा. ८. अन्य, दुसरा. ९. इंद्राचा. १०. इंद्र, यम, वरुण, कुबेर आणि सूर्य ह्यांनीं. ह्यांतील पहिले चार पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या दिशांचे अनुक्रमें अधिपति आहेतः—'इंद्रो, वह्निः, पितृपतिः (=यमः), नैर्ऋतो, वरुणो मरुत् (=वायुः) । कुबेर, ईशः, पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥.' ११. येथें **विभावना** आहे. याचें लक्षणः—'विनापि कारणं कार्यस्योत्पत्तिः स्याद्विभावना' म्हणजे कारणावांचून कार्योत्पत्ति झाली म्हणजे **विभावनालंकार** होतो. १२. [जें] स्तवन, तेंचि अस्तवन [होतें]. म्हणजे ही व्याजस्तुति होती हें सिंदूरास कळलें नाहीं. 'अंगीं पात्रता नसतां तुला महादेवानें वर दिले' ही आपली खरोखर निंदा आहे हें त्यास समजलें नाहीं. १३. अस्ताचलावरील वन. येथें प्रस्तुत सिंदूर व अस्तवन अप्रस्तुत आहे. परंतु अप्रस्तुताचा प्रस्तुताशीं इतका अभेद कल्पिला आहे कीं अप्रस्तुतांत अगदीं तन्मय होऊन, अप्रस्तुतानेंच प्रस्तुताचा निर्देश केला आहे, म्हणून ही **अभेदातिशयोक्ति** होय. हिचें लक्षणः—'जिगीर्योध्यवसानं तु प्रकृतस्य परेणयत् ।·········विज्ञेयातिशयोक्तिः सा ॥' म्हणजे अप्रस्तुतानें प्रस्तुत जणूं काय गिळिल्यामुळें, जेव्हां त्याचा अप्रस्तुतांतच लोप होतो, तेव्हां अभेदातिशयोक्ति होते. येथें सिंदूराला अस्तवन म्हटल्यामुळें, त्याचा लवकरच तेजोनाश व्हावयाचा आहे, हेंहि ध्वनित केलें आहे.

खळ त्यासि म्हणे, 'प्रथम स्वेच्छित, मग सांग तोषदा[1] वार्ता.' ।
जो मुनि अमृतमुदिरसा[2] निववी तत्काळ दोषदावार्त्ता[3]. ॥ ९
नारद म्हणे, 'तुझें तें माझें; हा बंधु अन्य कां गमला? ।
ऐक विचित्रा वार्ता, जैसें[5] म्हणतोसि काय[6] सांग मला. ॥ १०
सौभाग्यें, सौंदर्यें, सुयशें, जी हांसते उमा रतिला[8], ।
बा! छिन्नमस्तक, परमरुचिराकृति, जाहला कुमार तिला. ॥ ११
तो अत्यद्भुत, केवळ सच्चित्सुख मूर्त[9], काय सांगावें? ।
त्या त्यजुनि परा, जैसें हंसा सोडूनि वायसा गावें. ॥ १२
मुख नसतां, वदला; ते आयकिले म्यांचि बोल कानांहीं, ।
मज वाटे, तैसा तो कोणी विश्वांत बोलका नाहीं. ॥ १३
शिव भक्त म्हणुनि पूजित होता, तें हस्तिशिर तया जडलें, ।
घडलें, न घडावें, तें. विश्व परम विस्मयार्णवीं पडलें. ॥ १४
दुर्गेचें तोकं[10] जसें, तैसें नाहींच चांगलें[11] कांहीं, ।
पाहोनि अश्विनीच्या[12] गणिलें स्वकुरूप आंग लेंकांहीं. ॥ १५
जी भव्या तपनद्युति[13], लाजतिल निकट कसे न दीप तितें, ।
त्या लोपलेचि पाहुनि तेजस्वी[14], नद जसे नदीपतितें[15]. ॥ १६
यारूपें परमेश्वर धर्मप्रतिपालनार्थ अवतरला, ।
तरलेंचि[16] विश्व, केवळ न शचीचा[17] मात्र एक धव तरला.' ॥ १७
ऐसा प्रताप कानीं जैसा देवर्षिच्या मुखें पडला, ।

---

१. आनंद देणारी वार्ता, मनोरंजक बातमी. २. अमृताच्या घनाप्रमाणें. ३. दोषरूपी वणव्यानें त्रासलेले. येथें **परंपरितरूपक** आहे. ४. मी स्वतः (नारद). ५. ज्या अर्थी. ६. कांहीं तरी. ७. येथें **प्रतीपालंकार** आहे. ८. मदनाच्या स्त्रीला. ९. मूर्त सच्चित्सुख=मूर्तिमान् सच्चिदानंद, प्रत्यक्ष ईश्वरस्वरूप. १०. अपत्य, मूल. येथें **असमालंकार** आहे. ११. कोणतीही वस्तु किंवा कोणीही पुरुष. १२.अश्विनीच्या लेंकांहीं=अश्विनीकुमारांनीं. अश्विनी ही सूर्याची स्त्री व अश्विनीकुमारांची आई. हिनें घोडीचें रूप धारण केलें होतें. अश्विनीकुमार हे अश्विनीचे जुळे मुलगे. यांची सौंदर्याबद्दल ख्याति आहे. या गीत्यर्धांत **प्रतीपालंकार** आहे. १३. सूर्यकांति. **काव्यार्थापत्ति.** १४. तेजयुक्त पदार्थ किंवा पुरुष. १५. समुद्राला. या गीतीच्या प्रथम अर्धांत **प्रश्न**, द्वितीय अर्धांत **उपमा** व सबंध गीतींत **प्रतिवस्तूपमा** असे अलंकार आहेत. १६. अन्वय:-केवळ एक शचीचा धव (=एकटा इंद्र) मात्र न तरला. (तर) विश्व तरलेंचि. अर्थ:-इंद्रच एकटा गतवैभव परत मिळून संकटांतून तरला असें नव्हे, तर सर्व विश्वच तरलें. १७. इंद्राची स्त्री, इंद्राणी.

त्रासें [1]तोही, जाणों [2]पविपातें पात पर्वता घडला. ॥ १८
[3]परिजन घालिति, सहसा धांवुनि हाके, शवाशि वारा हो! ।
मुनिहि म्हणे, 'समरसुरस सेविन, हैं केशवा! शिवा! रोहो!' ॥ १९
[6]तों खळ उठोनि कोपें मुनिसि म्हणे, 'चाल बाळ दावाया, ।
नाहीं जरि, आजि [7]शैलभ तूं सांपडलासि [8]काळदावा यां.' ॥ २०
हांसुनि त्यासि मुनि म्हणे, 'उचितचि तुज दुर्जनासि चेष्टा या; ।
वांच्छित होतासि [11]वैरंदविधिसि भुजांनीं वधार्थ वेष्टाया.' ॥ २१
ऐसें म्हणोनि, झाला गुप्त मुनि; धरील [12]हरिस काय ससा? ।
देवर्षि हंससा, तो सिंदूर कुबुद्धि [13]पाप वायससा. ॥ २२
सांपडतो यासि कसा? व्यसनीं [14]ध्रुवादि साधु तारितसे, ।
जो [15]कामाद्यरिषट्का [16]त्रिभुवनकाळा दिसां [18]धुतारितसे. ॥ २३

---

१. सिंदूर. येथें 'पडला' या क्रियापदाचा संबंध 'प्रताप' आणि 'तोही' या दोन्ही कारकांकडे लावावयाचा आहे, म्हणून हें **क्रियादीपक** होय. २. वज्रघातानें. येथें **उत्प्रेक्षा** आहे. ३. सेवक. अन्वयः—सहसा (=लवकर) हांके धांवुनि (=हांकेबरोबर धांवत येऊन) परिजन (सिंदूराच्या) शवाशि (=मृतप्राय शरीरास) वारा घालिति. ४. सिंदूर. ५. जगो. ६. 'तो' असाही पाठ आहे. ७. टोळ. ८. काळदावा=काळानळाला, प्रळयाग्नीला. 'सर्वसंग्रहां'त 'काय दावा' असा पाठ आहे. परंतु 'काय'शब्दाचा बरोबरसा अर्थ लागत नाहीं. अर्थ आणि यमक ह्या दोहोंवरून आमचाच पाठ शुद्ध वाटतो. यमकाच्या साहाय्यानें पंतांच्या काव्यांतील चुकीचे पाठ अनेक वेळां ओळखतां येतात. ९. सिंदूरा. येथें **परंपरित रूपक** आहे. १०. अत्याचार, दुष्कृत्यें. या गीत्यर्धांत **समालंकार** आहे. याचें लक्षणः— 'समं स्याद्योगकथनं वस्तुनोरनुरूपयोः । कारणेनानुरूप्यं च कार्यस्यान्यस्समं मतम् ॥' म्हणजे जेथें दोन अनुरूप वस्तूंचा योग होतो तो **समा**चा एक प्रकार आणि कारणाला अनुरूप कार्य आहे असें वर्णन असेल तर तो **समा**चा दुसरा प्रकार. प्रस्तुत गीत्यर्धांत दुसऱ्या प्रकारचें सम आहे. यांचें उदाहरणः—'अन्योन्योचित राधाकृष्णांची प्रीति परमदृढ जडली । अबलाहननकृती तुज जातिभ्रष्टास योग्यशी घडली ॥.' ११. वर देणाऱ्या ब्रह्मदेवास. या गीतीच्या दोन अर्धांत कार्यकारणभाव असून 'कारणदर्शक' शब्द योजिला नाहीं; म्हणून हा **काव्यलिंगालंकार** आहे. १२. सिंहास. या गीत्यर्धांत **प्रश्न** व **प्रतिवस्तूपमा** असे दोन अलंकार आहेत. १३. दुष्ट. १४. ध्रुवादिक. नारदानें ध्रुव, वाल्मीकि इत्यादिकांस उपदेश देऊन, त्यांस ईश्वरस्वरूपज्ञान करून दिलें, व त्यांस अक्षय ईश्वरचिंतनांत तल्लीन केलें. नारदाविषयीं पंत 'दत्तदयोदयां'त म्हणतातः— 'वाल्मीकिव्यासशुकप्रल्हादध्रुवमुखांसि तो तारी । हरिभक्तिज्ञानरसें ओती जो शिष्यमूर्ति ओतारी ॥ ५६ ॥.' १५. कामादिक सहा शत्रूंस. हे सहा मनोविकार मनुष्याच्या हातून घोर पातकें करवितात, म्हणून यांस 'शत्रु' म्हणतात. १६. त्रिलोकास गांजणाऱ्या. १७. दिवसास, दिवसाढवळ्या, धडधडीत. १८. धुडकावितो. **काव्यलिंग.**

मुनि कैलासीं जाउनि दुर्गेसि म्हणे, 'यशें उमे! रुचिर ।
[1]क्षीरधिहुनि [2]कुक्षि तुझा, गाइल तव कीर्तितें सुमेरु चिर. ॥ २४

स्नेहास्तव म्हणसी तूं जरिहि तुझा [3]शंभुकल्प हा तनय, ।
तो खळ निर्दय, निर्भय, निस्त्रप अत्यंत, [4]अल्प, [5]हीतनय. ॥ २५

आला सिंदूर शिवे! [6]शील तयाचें तुला सकळ कळतें. ।
[7]अलिमन, गजें उचलितां पद तुडवाया फुलास, कळकळतें.' ॥ २६

प्रेमें मुनि सांगे, तों दीपाप्रति [8]करुनियां पतंग जवा ।
येतो जैसा, यावा भ्रमुनि मृगाधिपतिवरि [9]मतंगज वा, ॥ २७

सिंदूरासुर तैसा आला [10]दांटुनि गजाननावरि तो, ।
आवरितो [11]अगतायु [12]स्वांतासि, तिळहि [13]गतायु नावरितो. ॥ २८

घनसम गर्जोनि म्हणे, 'बाहिर सत्वर अरे [14]अरे! निघ, रे ! ।
छायेंत कठिण असतें, येतां [15]नवनीत [16]आतपीं [17]विघरे.' ॥ २९

---

१. क्षीरसागरापेक्षां. येथें **व्यतिरेक** आहे. २. कूस. येथें उमेचा कुसवा क्षीरसमुद्राहून अधिक सुंदर आहे असें म्हणून उमेच्या मुलाचें क्षीरसागरजातचंद्रावरील श्रेष्ठत्व सुचविलें आहे; आणि हा व्यंग्य अर्थच वाच्य आहे म्हणून हें **पर्यायोक्त** झालें. ३. शंकरतुल्य, शंकरासारखा. ४. क्षुद्र, नीच. ५. त्यक्तनय, नीतिहीन. म्हणून भीति बाळगण्यासारखा—असा भावार्थ. या गीत्यर्धांत **समुच्चयालंकार** आहे. ६. वृत्त, वर्तन. ७. भ्रमराचें चित्त. फुलाला तुडविण्याला हत्तीनें पाय उचललेला पाहून, फुलावर प्रेम करणाऱ्या भ्रमराचें मन हळहळतें, ही अप्रस्तुत गोष्ट सांगून त्या मुलावर (=गजाननावर) प्रेम करणाऱ्या नारदाचें मन तें संकट पाहून हळहळलें, ही प्रस्तुत गोष्ट सुचविली आहे. म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा**. ८. वेग करून, वेगानें. ९. हत्ती. गीति २७ व २८ यांचें युग्म असून, त्यांत **मालोपमा** आहे. साधारण धर्म भिन्न किंवा अभिन्न असून एकाच उपमेयाला अनेक उपमानें दिलीं असतां मालोपमा होते. १०. मुद्दाम. ११. शेषायुर्दाय आहे ज्याचा असा, ज्याचें आयुष्य संपलें नाहीं असा. १२. आपल्या मनास. १३. आसन्नमरण, ज्याची आयुष्याची दोरी तुटली आहे असा. येथें गीतीच्या प्रथमार्धांतील विशेषाचें समर्थन उत्तरार्धांतील सामान्य सिद्धांतानें केल्यामुळें हा **अर्थांतरन्यास** झाला. हें गीत्यर्ध सुंदर सुभाषित आहे. १४. शत्रो! १५. लोणी. १६. उन्हांत. १७. विरघळतें. येथें 'लोणी सावलींत घट्ट असतें, परंतु उन्हांत विरघळतें' ही अप्रस्तुत गोष्ट सांगून, गजानन बाहेर आला असतां, सिंदूराच्या प्रतापानलांत, विरघळून जाईल (=धैर्यहीन होईल) हा प्रस्तुताचा ध्वनि केला आहे, म्हणून ही **अप्रस्तुतप्रशंसा** आहे.

ये ध्याया [1]दुर्गोदरकुंभज, [2]सिंदूर विहिर यातें हो, ।
[3]त्याच्या पाहोनि, निजा [4]मारुत निंदू, [5]रविहि, रयातें हो ! ॥ ३०

बाळ म्हणुनि, धिक्कारी वीर्यमदें तो [6]इभानना [7]शतदा, ।
[8]त्रासें [9]प्रमथगणांचा झाला देहादिभाननाश तदा. ॥ ३१

भगवान् विनायक प्रभु सिंदूरातें म्हणे, 'अरे मंदा ! ।
[10]मंदारा मज बब्बुळ निंदिसि तूं [11]कपटविषलताकंदा ! ॥ ३२

[12]तत्काळ बसोनि गळां, प्रबळाचाही विनाश [13]चीप करी, ।
स्वल्पाहि अंकुशा मद अतिमत्तहि दाविना [14]शचीपकरी. ॥ ३३

बहु [15]शतयोजनविपुलाकारा सकळा नगाहि कांपवितो ।
मंदा ! एकें [16]अचळें न गणावा, लघु म्हणोनि, कां [17]'पवि तो ?' ॥ ३४

नाशी प्रबळा मोहा [18]चतुरक्षरमंत्र [19]सुगुरुकृतबोध, ।
आकार असो लघु, गुरु; तेजस्वी साधितो विजय [20]योधें. ॥ ३५

लघु बाळ [21]बालिशा ! मज म्हणसी तरि नीट मजकडे पाहें, ।
ज्याचें शिर हरिलें त्वां, तो गौरीपुत्र मी कसा आहें ?' ॥ ३६

ऐसें वदोनि, भगवान् गजमुख निज [22]विश्वरूप दावी तें, ।

---

१. दुर्गेचें (=पार्वतीचें) उदर हाच कुंभ (=घट) त्यापासून जन्मलेला जो विनायक हाच अगस्ति. अगस्तीनें सर्व समुद्र करतलांत घेऊन प्राशन केला या गोष्टीवर येथें कटाक्ष आहे. २. अन्वयः—यातें (=गजाननरूप अगस्तीतें) सिंदूर विहिर हो (=होवो). हें **परंपरितरूपक** आहे. येथें गजाननाला अगस्तीचें व सिंदूराला विहिरीचें रूपक देऊन, गजानन सिंदूराचें दमन सहज करील हें सुचविलें आहे. ३. स्वतःच्या (रयातें). ४. वायू. ५. वेगाला. येथें **प्रतीपालंकार** आहे. ६. गजाननाला. ७. शेकडों प्रकारें. ८. पार्षदगणाचा. ९. अन्वयः—तदा त्रासें (=भीतीनें) प्रमथगणाचा देहादिभाननाश (=देहादिज्ञानाचा नाश) झाला. म्हणजे शिवगण भीतीनें अगदीं गांगरून नष्टबुद्धि झाले. १०. अन्वयः—मज मंदारा (=कल्पवृक्षाला) तूं बब्बुळ (=बाभूळ) निंदिसि. **परंपरितरूपक.** ११. हे कपटरूप विषवल्लीच्या कांद्या ! १२. अन्वयः—चीप गळां बसोनि प्रबळाचाही तत्काळ विनाश करी. गीति ३३, ३४ आणि ३५ या सुंदर सुभाषित आहेत. या सर्वांत **अप्रस्तुतप्रशंसा** हा अलंकार असून, ३५ वींत **अर्थांतरन्यासही** आहे. १३. धोंड्याचा लांबट व पातळ तुकडा. १४. इंद्राचा हत्ती, ऐरावत. १५. शंभर योजनें विस्तृत आहे आकार ज्याचा अशा (नगास=पर्वतास). १६. पर्वतानें. १७. वज्र. १८. नारायणमंत्र. १९. सद्गुरूनें केला आहे बोध ज्याचा असा (नारायणमंत्र). २०. योद्धा. २१. मूर्खा ! २२. विराटरूप. ह्या विराटस्वरूपाचें वर्णन भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायांत सुंदर केलें आहे. 'नाना नेत्र मुखें ज्यांत, नाना अद्भुत दर्शनें । नाना आभरणें दिव्यें, नाना धरिलिं आयुधें ॥ दिव्यपुष्पें दिव्यवस्त्रें, दिव्यगंधें, विभूषितें । दिव्य सर्वाश्चर्यमय

जें ब्रह्मपदप्रमुखां सर्वां लीलालवें[2] पदां वीतें[3]. ॥ ३७

देता अभय प्रभुवर, जरि, होउनि गर्वहीन, हा[4] लवता[5], ।
होता शाश्वत; हरितां काळानें खर्वही[6] न हालवता. ॥ ३८

सामें दानेंहि म्हणे प्रथम शिवाबाळ; हा कशाला हो! ।
न वळेचि तरि, मग बहिःकोपलवें 'बाळहा कशा लाहो.'[7] ॥ ३९

सिंदूर विश्वरूप प्रभुवरिहि करी प्रहार उत्साहें[8]; ।
साधूंत पावलें जरि, तरि न सुवीरांत कर्म कुत्सा[9] हें. ॥ ४०

हुंकारें मद हरिला; धरिला अरि लाजवावया हरिला[10], ।
परि लावकग्रहें[11] बहु संकोच खगेश्वरें[12] तसा वरिला[13]. ॥ ४१

परिपक्क[14] शोण[15] रसफळ[16] जेंवि करतळांत, तेंवि तो चिरडे, ।
साफल्य[17] नुमजलें ज्या, तत्संश्रित[18] असुरवर्ग[19] तोचि रडे. ॥ ४२

प्रभुनें रगडुनि त्यातें, निजमस्तक[20], भरुनि हात, सारविला, ।
नच शोभला उदयनग[21], या रंगा धरुनि हा[22], तसा रविला. ॥ ४३

---

अनंत जगदात्मक ॥ नभीं सूर्यसहस्रांचें तेज एकसरां उठे । महात्मयाच्या तेजाची तरी तें न करी सरी ॥ एकीं अनेकधा तेथें विश्व सर्व पृथक् पृथक् । शरीरीं देवदेवाच्या देखे पांडव तेधवां ॥' (वामनपंडितकृत-गीतासमश्लोकी-अ० ११ श्लो० १०-१३).

१. ब्रह्मलोकादि. २. लीलालेशें, अगदीं सहज. ३. उत्पन्न करितें. ४. सिंदूर. ५. नम्र होता. ६. अणुही, तिळभर सुद्धां. 'सर्वसंग्रहां'त 'सर्वही' असा पाठ आहे. ७. अन्वयः—हो! तरि हा (=सिंदूर) कशाला न वळेचि; मग बहिःकोपलवें (=बाहेर थोडासा राग दाखवून) '(हा) बाळहा (=बाळघातक) कशा (=चाबूक) लाहो!' (असें म्हणे). ८. आवेशानें. ९. निंदा. अन्वयः—हें कर्म (=उत्साहानें प्रभूवर प्रहार करणें) जरी साधूंत (कुत्सा) पावलें, तरी सुवीरांत कुत्सा न (पावलें). १०. सिंहाला. येथें **प्रतीपालंकार** असून, **अनुप्रास**ही मनोहर आहे. ११. लावकपक्ष्याला धरून. १२. गरुडानें. १३. लावकासारख्या क्षुद्र पक्ष्याला धरण्यांत गरुडाला जसें शतकृत्य किंवा महत्व वाटत नाहीं व आपला प्रतिपक्षी अगदीं क्षुद्र व आपल्यास अननुरूप आहे असें पाहून त्यास जसा खेद होतो, तसाच आपला प्रतिपक्षी सिंदूर इतका क्षुद्र व हीनबळ आहे, हें पाहून त्याला धरितांना गजाननालाही संकोच वाटला. १४. चांगलें पिकलेलें. १५. लाल. १६. रसयुक्त फळ, रसाळ फळ, दळदार फळ. १७. प्रभूच्या हातानें मरणें म्हणजे मुक्ति मिळविणें, जीवितसाफल्य करून घेणेंच होय. १८. सिंदूराचा आश्रित. १९. दैत्यसमुदाय. येथें **काव्यलिंगालंकार** आहे. २०. 'मस्तक'शब्द पुल्लिंगी योजिला आहे, व तो 'सारविला' या क्रियापदाचें कर्म आहे. २१. उदयाचल, ज्यावर सूर्य उगवतो, असा पूर्वेकडील डोंगर. २२. अन्वयः—हा (=गजाननमस्तक) या (=लाल) रंगा धरुनि (जसा शोभला), (तसा) रविला (धरुनि) उदयनग नच शोभला. उगवतांना सूर्य रक्तवर्ण असतो, या गोष्टीवर कवीचा कटाक्ष आहे. येथें **व्यतिरेक** आहे.

स्तवुनि, नमुनि, कुसुमांची करिति सुर श्रीविनायकीं वृष्टी, ।
सृष्टि तशीच निवे, जशि विजयिसुतविलोकनें शिवादृष्टी. ॥ ४४

कनकशिपुच्या भ्याले बहु पाहुनि घातका, परि समोर ।
प्रल्हाद न भी; हर्षे फार घनें चातकापरिस मोर. ॥ ४५

---

## २. कुशलवोपाख्यान.

(विविधवृत्तें.)

### अध्याय पहिला.

गणपति, गुरु, गुह, गौरी, गिरीश, गंगा, गुणाढ्य गीर्देवी, ।
यांसि नमुनि, रामात्मज कुशलवचरितामृतासि संसेवी. ॥ १

---

१. हिरण्यकशिपूच्या. अन्वयः—कनककशिपुच्या घातका (=नृसिंहास) पाहुनि बहु भ्याले, परि समोर प्रल्हाद न भी; घनें चातकापरिस (=चातकापेक्षां) मोर फार हर्षे. या गीतीचा वरील गीतीशीं चांगलासा संबंध लागत नाहीं. कदाचित् यांपुढें आणखी एक दोन गीती असाव्यात असें वाटतें.
२. मोरोपंतांनीं या प्रकरणाचा आपल्या 'नामरसायन' नामक स्फुट काव्यांत असा उल्लेख केला आहे:—'जैमिनिकृताश्वमेधस्थित कुशलवचरित वर्णिलें आहे । बा ! हे रीति पहावी मज तों वाटे सुधानदी वाहे ॥ १०६ ॥.' यावरून हें काव्य 'नामरसायना'पूर्वी लिहिलें गेलें, हें तर उघडच आहे. परंतु आमच्या मतें हें काव्य तर पंतांच्या सर्व मोठ्या काव्यांतील आद्य आहे; म्हणजे गुरुगृहीं अध्ययन करीत असतां रघुकिरातादि ग्रंथ वाचून, तत्सदृश काव्य रचण्याची पंतांस इच्छा झाली व त्याचेंच फळ प्रस्तुतचें खंडकाव्य होय. या म्हणण्यास पुढील आधार आहेत. (१) या काव्याची रचना व वर्णनशैली यांत संस्कृत महाकाव्यपंचकाचें अनुकरण जितकें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतें तितकें इतरत्र येत नाहीं. (२) इतर मोठीं काव्यें पंतांनीं आपले गुरु, गुरुपुत्र, यजमानपुत्र, हरिदास इत्यादिकांच्या सांगण्यावरून रचिलीं आहेत व वारंवार त्यांत त्यांचें साह्य घेतलें होतें असें पंतच आपल्या त्या त्या काव्यांतून लिहितात. प्रस्तुत प्रकरणांत त्यांनीं तसें कोठेंच लिहिलें नाहीं व कोणाचा उल्लेखही केला नाहीं. तेव्हां आपल्या काव्यशक्तीचा पुरा प्रत्यय आला नसल्यामुळें, पंतांनीं हें आपलें आद्य काव्य त्याची स्फुटता न करितां लिहिलें; व हें जेव्हां सर्वांनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं पंतांच्या कवित्वशक्तीचें कौतुक केलें असलें पाहिजे व त्यानंतर पुढें यांची काव्यशक्ति पाहूनच कित्येकांनीं त्यांस नवीन काव्यविषय सुचविले असावेत. (३) तिसरा आधार भाषेचा. पंतांच्या इतर काव्यांच्या मानानें यांतील भाषा कमी सफाईदार दिसते. विशेषेंकरून या काव्यांतील कित्येक यमकें पाहण्यासारखीं आहेत. पंतांचें इतर कोणतेंही सयमक काव्य घेतलें, तर त्याचें यमकांत निदान अंत्य अक्षर व उपांत्य स्वर इतकीं तरी जुळतात. उपांत्य स्वरांत भेद बहुधा कोठेंही आढळत नाहीं. परंतु प्रस्तुत काव्यांत पुढील यमकें आढळतात:—'पुसे—वसे १—१६' 'सिंधो—बंधो ४—५५,५—३५,

श्रीमद्राघव तो त्यजी [1]वसुमतीकन्येसि निंदाभयें;
वाल्मीकिद्विजनायकाश्रमपदीं राहे [2]महीजा स्वयें।
तेजस्वी [3]यम जन्मले सुत, तिहीं यज्ञाश्व नेला, [4]तथा
युद्धीं तातहि जिंकिला; अशि [5]वरा गावी [6]मनोज्ञा कथा. ॥ २

[7]तातादेशेंकरुनि [8]विपिनीं राघवें वास केला,
तेथें चौर्ये [9]दशमुख हरी [1]मेदिनीकन्यकेला।
सुग्रीवाख्य [10]प्लवंगपतिशीं सख्य साधूनि, वाळी
त्याचा भ्राता वधुनि [11]विशिखें, दाविली त्या [12]दिवाळी. ॥ ३

पश्चाद् राम दशाननासि [13]ससुतामात्यासि युद्धीं वधी,
दे लंकेसि बिभीषणाप्रति धरा [14]सिंध्वर्कसोमावधी।

---

८-४,११-७' 'नातें-तीतें ४-८६' 'काननीं-ऐकुनी ४-८८' 'पावनी-मुनी ४-८८' 'सुखी-शिखी ५-७' 'गेला-झाला ५-२४' 'भेरी-हरी ६-४' 'पुरा-स्वरा ६-७' 'गृष्टी-कष्टी ८-९' 'नसे-दिसे ८-१९' 'कसें-दिसे ९-११' 'शिरें-करें १०-१' 'चक्रायुधें-नानाविधें १०-१०' 'मृतेभांतरीं-शिरीं १०-१४' 'पदाती-देती ११-५' 'कुशाला-केला ११-७' 'धसे-दिसे ११-१०' 'वर्षती-दाटती १२-३४' 'शिरें-करें १२-२६' 'बोले-झाले १४-१२' 'आपटे-फुटे १३-२५' 'निरता-विजिनृता १३-३०' 'पुसे-असे १३-३४' 'रणीं-गुणीं १३-३६' 'द्युति-स्थिति १३-३७' 'कर्मादिकें-कौतुकें १३-३८' 'कन्या-मान्या १३-७६'. (४) चवथा आधार मंगलाचरणाचा. यांत रामायणाचा कर्ता वाल्मीकि किंवा महाभारताचा व पुराणांचा व्यास यास वंदन मुळींच नाहीं. तेव्हां रामायण, भारत, भागवत व पुराणें लक्ष्यपूर्वक वाचण्याच्या पूर्वी व आपल्या काव्यशक्तीचा ओघ त्यांकडे वळविण्यापूर्वी हें काव्य रचिलें असलें पाहिजे असें वाटतें तेव्हां प्रस्तुतचें काव्य पंतांनीं आपल्या ऐन उमेदींत म्हणजे २०-२१ वर्षांचे असतां पन्हाळगडीं गुरुगृहीं इ. स. १७५० चे सुमारास लिहिलें असावें. यानंतरचें काव्य 'प्रश्नोत्तरखंड' होय. तें गुरुपुत्र सदाशिवाच्या सांगण्यावरून पंतांनीं पन्हाळगडीं १७५१-२ चे सुमारास रचिलें असावें. प्रश्नोत्तरखंडाची भाषा प्रस्तुत काव्याच्या भाषेपेक्षां अधिक वळणशुद्ध आहे. ३. षण्मुखस्वामी. ४. शंकर. ५. गुणयुक्त. ६. वाग्देवी, सरस्वती. या गीतीच्या प्रथम अर्धांतील अनुप्रास लक्ष्यांत ठेविण्यासारखा आहे. या मंगलाचरणांत पंतांचें उपास्य दैवत राम व आद्य कवी यांस नमन नाहीं, हें चिंत्य आहे. **गीतिछंद**.

१. भूकन्येला, सीतेला. २. सीता. ३. जुळे. ४. तसेंच, त्याप्रमाणेंच. ५. चांगली. ६. रम्य. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ७. वडिलांच्या आज्ञेनें. ८. अरण्यांत. ९. रावण. १०. वानरराजाशीं. ११. बाणानें. १२. त्या (=सुग्रीवाला) दिवाळी (सुखाचा दिवस) दाखविली. **मंदाक्रांतावृत्त.** १३. मुलगे आणि मंत्री यांसह. १४. सिंधु+अर्क+सोम+अवधी=समुद्र, सूर्य व चंद्र आहेत तोंपर्यंत, यावच्चंद्रदिवाकर.

[1]स्वाहेशास्यविशुद्धमैथिलसुतासंयुक्त रम्याकृती,<br>
    [2]साकेतासि [3]सुपुष्पकीं मग सुखें बैसोनि आला [4]कृती. ॥ ४<br>
जे सुग्रीवबिभीषणांगद[5]मरुत्पुत्रादि आले, सुखें<br>
    सेनासंयुत जानकीपतिगुण[6]स्तोमासि गाती मुखें ।<br>
श्रीरामागमनप्रहृष्ट [7]सकळायोध्या पुढें धांवली,<br>
    [8]पानीयासि जशी [9]तृषार्त सुरभी तैशी क्षणें पावली. ॥ ५<br>
गेल्यापासुनियां [10]चतुर्दश समा कष्टीचि जाला वनीं,<br>
    सीतालक्ष्मणयुक्त राघव, असें भावूनियां तो मनीं ।<br>
[11]सक्ष्मादेव, [12]कृपापयोधर, तदा त्याचा [13]पुरोधा, मुनी,<br>
    [14]आशीर्वादमिषें [15]सुधेसि, भगवान् वर्षे पुढें जाउनी. ॥ ६<br>
कैकेयीसुत, [16]वल्कलाजिनजटाधारी, प्रधानासवें<br>
    सामोरा रघुनायकाप्रति पुढें गेला [17]प्रभूतोत्सवें ।<br>
जाला [18]सन्नत राघवेंद्रचरणीं, रामें समालिंगिला;<br>
    [19]तत्प्रेमाश्रुकणें भिजे, रघुवरें जेंव्हां शिरीं हुंगिला. ॥ ७<br>
जाला तो नगरीं प्रविष्ट [20]सकळक्ष्मानाथचूडामणी,<br>
    लोकांच्या [21]हृदयांबुजीं बहु दिसा आनंदही त्या क्षणीं; ।<br>
कौशल्या, [22]घननादशत्रुजननी, [23]कांतारवासप्रदा<br>
    कैकेयीहि, रघूत्तमें नमुनियां [24]केली [24]प्रमोदास्पदा. ॥ ८

---

१. स्वाहा+ईश+आस्य+विशुद्ध+मैथिल+सुता+संयुक्त=स्वाहेचा पति जो अग्नी त्याच्या मुखांत (प्रवेश करून) अत्यंत निर्मळ ठरलेल्या जानकीसहित. २. अयोध्येस. ३. चांगल्या पुष्पक विमानांत. ४. कर्तृत्ववान्. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ५. मारुति. ६. स्तोमासि=समूहास. ७. सर्व अयोध्या; लक्षणेनें सर्व अयोध्यावासी जन. या लक्षणेस इंग्रजींत Metonomy म्हणतात. ८. पाण्यास. ९. तान्हेलेली गाय. येथें **वाक्योपमा** आहे. १०. चौदा वर्षें. ११. भूदेवांसह, ब्राह्मणांसह. १२. कृपासागर. १३. पुरोहित, वसिष्ठ. १४. आशीर्वादाच्या रूपानें. १५. अमृताला. येथें **मिषापह्नुति** नांवाचा अलंकार आहे; कारण 'मिष'शब्दानें प्रकृताचा निषेध होऊन, वसिष्ठानें दिलें तें आशीर्वचन नव्हे, तर अमृत होय असा अर्थ निष्पन्न होतो. १६. झाडांच्या सालीचें वस्त्र, मृगचर्म व जटा धारण करणारा. १७. मोठ्या आनंदानें. १८. एकनिष्ठपणें नम्र. १९. रामाच्या प्रेमाश्रूंच्या बिंदूनें. येथें **वत्सलरस** आहे. २०. सकलनृपशिरोमणि. २१. हृदयकमलांत. या प्रथमार्धांत **क्रियादीपक** आहे. २२. इंद्रजिताचा शत्रु जो लक्ष्मण त्याची आई, सुमित्रा. २३. वनवास देणारी. 'कांतरवासप्रदा कैकेयी प्रमोदास्पदा केली' यांत **विभावना** अलंकार असून **न्यूनपरिवृत्तीचाही** भास होतो. २४. आनंदस्थान केली, आनंदित केली.

कौशल्या, मलिना, कृशा, [1]स्वतनयाश्लेषें तदा हर्षली,
आनंदाश्रुकरूनि, राघवशिरीं डुंगूनियां, वर्षली ।
पूर्वींच्या परि विघ्न होइल, असें मानूनियां [2]क्षिप्र ती,
कोणातेंहि न पूसतां करि जणों [3]राज्याभिषेकाप्रती. ॥ ९

'हा अच्छेद्य, अभेद्य नंदन तुझा [4]अक्लेद्य, वत्से!' असें
मातें संकथिती [5]वसिष्ठमुख हे भूदेव, [6]मिथ्या कसें? ।
जालासि [7]प्रखरेषुभिन्नतनु तूं, बोलोनि ऐसें, करें
स्पर्शे, लक्ष्मण राम हीं स्वहृदयीं आलिंगुनी लेंकरें, ॥ १०

[8]श्वश्रूतें [9]क्षितिजा नमी, तंव तिहीं आलिंगिली आदरें,
कौशल्या मग ते वदे, [10]सुचुंबुकीं स्पर्शोनि तीतें करें, ।
'रामाशीं चिरकाळ सर्वसुखसंपूर्णा [11]स्वपत्या रहा,
पातिव्रत्यबळें तुझ्याचि तरला [12]दुःखाब्धिला वत्स हा. ॥ ११

वत्से! तूं रघुवंशभूषणमणी, स्तुत्या सतींच्या गणीं,
चारित्रासि तुझ्या [13]सुरेंद्ररमणी गाती सुखें स्वांगणीं, ।
त्वत्कोपेंचि [14]दशास्य दुर्मति कथाशेष त्रिलोकांत या
[14]झाला, कोण असा असे त्रिभुवनीं मारावयाला तया?' ॥ १२

कौशल्या यापरी ते [15]प्रमुदितहृदया बोलिली [16]मैथिलीला,
वर्णी [17]हर्षेंकरूनी स्फुरदधरमुखें रामसौमित्रिलीला. ।
केला राज्याभिषेक [18]क्षितिसुरतिलकें श्रीवसिष्ठें स्वतोषें,
विप्रांचे [19]संघ तेव्हां परम शुभदिनीं गर्जती मंत्रघोषें. ॥ १३

---

१. आपल्या मुलाच्या आलिंगनानें. २. लवकर. ३. पुन्हां राज्याभिषेकांत कदाचित् विघ्न होईल म्हणून कौशल्येनें गुप्तपणें रामास आपल्या अश्रूंनें अभिषेक केला—हा भाव. ही **हेतूत्प्रेक्षा** आहे. ४. न भिणारा. गीतेंत आत्म्याचें वर्णन असेंच आहे—'तूटे—जळे नच, भिजे न, सुके न, जाण । हा नित्य, सर्वगत हा, स्थिर हा पुराण ॥ अ० २. ५. वसिष्ठादिक ब्राह्मण. ६. तें खोटें कसें झालें? ७. तीक्ष्ण बाणांनीं विद्ध आहे शरीर ज्याचें असा. ८. सासूंना. ९. सीता. १०. सुंदर हनुवटीचे ठिकाणीं. ११. सु+अपत्या=उत्तम आहेत अपत्यें जिचीं अशी. १२. दुःखसागराला. येथें सीतेच्या सतीव्रतानें राम दुःखसागर तरला असें वर्णन आहे म्हणून ही **असंगति** होय. १३. तुझ्या चारित्रास (=शुद्ध चरित्रास) इंद्रस्त्रिया (=अप्सरा) आपल्या आंगणांत (=स्वर्गात) गात आहेत. १४. दुष्ट रावण नामशेष झाला. या पद्याच्या द्वितीयार्धांत **प्रश्न** व **असम** असे दोन अलंकार आहेत. १५. सानंदहृदया, हृष्ट आहे हृदय जिचें ती. १६. सीतेला. १७. हर्षानें खालचा ओंठ स्फुरण पावत आहे ज्याचा अशा मुखानें. १८. ब्राह्मणश्रेष्ठानें. १९. समूह. **स्रग्धरावृत्त.**

राज्यातें अज[१] तो करीत असतां, जाले दरिद्री धनी,
रोगी रोगविहीन, बालिश[२] रत ज्ञानाचिया साधनीं, ।
गाई त्या घटदोहनी[३], बहुरसा[४] सस्यावृता[५] मेदिनी[६],
यूपस्तंभसमन्विताहि[७] सरयू[८] लोकत्रयाल्हादिनी[९]. ॥ १४

दिव्यांस्वादुफळाढ्य[१०] भूरुह, लता संशोभती पुष्पिता[११];
आत्मापत्यमृतिप्रति[१२] क्षितितळीं पाहे न मातापिता; ।
वंध्या लब्धबहुप्रजा[१३], सकलही वर्ण[१४] स्वधर्मी रत,
श्रीरामाख्यसुधेसि[१५] कर्णचषकें पीती सुखें संतत[१६]. ॥ १५

पापातें न वसावया स्थळ दिसे, कोण श्रमाला पुसे?
नाहीं आश्रय, यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता वसे; ।
विघ्नातें बहु विघ्न होति, रुसली भीति त्रिलोकी बरी;
साकेतीं[१७] रघुनाथ सानुजसुहृद्[१८] राज्यासि जेव्हां करी. ॥ १६

जैमिनिकृत[१९]भारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा पहिला अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं[२०]. ॥ १७

---

१. जन्मरहित, ईश्वरांश, राम. पुढील चार पद्यांतील रामराज्याचें वर्णन सुरस आहे. २. मूर्ख. येथें **विरोधाभास** आहे. ३. घडाभर दूध देणाऱ्या. ४. विपुलजला. ५. धान्यानें व्याप्त. ६. पृथ्वी. ७. यज्ञस्तंभानें युक्त. ८. नदीविशेष. जिकडे तिकडे स्वस्थता व सुबत्ता असल्यामुळें, सरयूतीरावर ब्राह्मणांनीं अनेक यज्ञकर्में केलीं, त्यांचे स्तंभ इतस्ततः पसरलेले होते. ९. तीन्ही लोकांस आनंद देणारी. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** या पद्यांत **उदात्तालंकार** आहे. १०. झाडें अलौकिक गोड फळांनीं अगदीं खचून गेलीं होतीं. ११. फुललेल्या. १२. आपल्या मुलांच्या मरणाला. (अकालमृत्यु कोणाला येत नसे—हा भावार्थ.) १३. झालीं आहेत अनेक मुलें जिला अशी. येथें **विरोधाभास** आहे. १४. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चतुर्वर्ण. १५. (सर्व लोक) श्रीरामाख्यसुधेसि (=श्रीराम या नांवाच्या सुधेला; रामनामामृताला) कर्णचषकें (=कर्णरूप पेल्यानें) सुखें पीती (=पीत असत). येथें **परंपरित रूपक** आहे. १६. या पद्यांत **उदात्तालंकार** आहे. १७. अयोध्येंत. १८. आपल्या धाकट्या भावांसह. या पद्यांत **परिसंख्यालंकार** ध्वनित आहे; कारण पापाशिवाय, कोणाला स्थळाची वाण नसे; चिंतेशिवाय, कोणी सचिंत नसे; विघ्नाशिवाय, कोणाला विघ्न होत नसत, इ० अर्थ निष्पन्न होतो. १९. जैमिनी हा व्यासाचा शिष्य. यानें सर्व महाभारत रचिलें परंतु तें चांगलें प्रौढ नव्हतें म्हणून व्यासांनीं तें बुडविलें. मात्र अश्वमेधपर्व राहूं दिलें. त्या अश्वमेधपर्वांतील रामाश्वमेधोपाख्यानाच्या आधारें पंतांनीं प्रस्तुतचें खंडकाव्य रचिलें. २०. रसिकश्रेष्ठांनीं. **उद्गीतिछंद.** या छंदाच्या प्रथम व तृतीय चरणांत १२ मात्रा असून, द्वितीय चरणांत १५ व चतुर्थ चरणांत १८ असतात.

## अध्याय दुसरा.

नव[1] सहस्र समा क्रमिल्या भल्या, प्रकृति[2] त्या सुख फारचि लाभल्या, ।
नृपतितें वश नित्य असे प्रजा, रघुवरासि परंतु नसे प्रजा[3]. ॥ १

मोठ्या काळेंकरुनि मग ती गर्भिणी होय रामा[4];
रामातें ते बहु सुख करी पांडुवक्त्राभिरामा[5]; ।
ज्याची दृष्टि स्वसुतवदनप्रेक्षणातें भुकेली,
केली स्त्रीशीं दशरथसुतें त्या चतुर्मास केली[6]. ॥ २

तदनंतर रघुकुलवर पाहे स्वप्नास[7] पांचवे मासीं, ।
प्रातःकाळीं सांगे करुनि नमस्कार तें गुरूपाशीं[8]. ॥ ३

'गंगातीरीं जनकतनया त्यागिली देवरानें[9],
शोकग्रस्ता घडिघडि रडे फार उच्चस्वरानें. ।
कोमेलेंसें वदन, सुटला मूर्धजांचा[10] कलाप[11],
दीना वाणी, करि परिपरी[12] काननांतीं[13] विलाप. ॥ ४

अशि जनकनृपसुतेची स्वप्नांतीं पाहिली अवस्था मी, ।
मज सुख तिळ नच वाटे, चिंतेनें व्यापिलें मन स्वामी[14]!' ॥ ५

ऐसें भाषण रामाचें ऐकोनि, ऋषिसत्तम[15] ।
बोलता जाहला त्याशीं हरिता शिष्यहृत्तम[16]. ॥ ६

'श्रीरामा! जलदश्यामा[17]! देवर्षिनिकरप्रिया[18]! ।
गर्भशांत्यर्थ सीतेची कर पुंसवनक्रिया[19]. ॥ ७

कृष्णपक्ष सरे तांवत्[20] करावें विप्रतर्पण; ।
इहामुत्रहि[21] कल्याण देतें होय द्विजार्पण.' ॥ ८

---

१. नऊ हजार वर्षें. २. प्रजा. ३. संतति. **द्रुतविलंबितवृत्त.** ४. स्त्री, सीता. ५. गरोदरपणानें फिकट झालेल्या तोंडामुळेंच रम्य दिसणारी. ६. क्रीडा. शेवटल्या दोन चरणांत **दामयमक. मंदाक्रांतावृत्त.** ७. 'स्वप्नांत' असा पाठभेद. ८. वसिष्ठाला. **गीतिच्छंद.** ९. दिरानें (लक्ष्मणानें). १०. केशाचा. ११. समूह, वेणी. १२. नाना परीनें. १३. अरण्यांत. **मंदाक्रांतावृत्त.** १४. अहो गुरुजी! **गीतिच्छंद.** १५. ऋषिश्रेष्ठ. १६. शिष्याचे हृदयांतील अंधकार (=अज्ञान). **अनुष्टुपछंद.** १७. मेघश्यामा! १८. देव व ऋषि यांच्या समूहास प्रिय अशा! १९. पुंसवन नामक संस्कार. स्त्रीचे ठिकाणीं गर्भधारणेचीं चिह्नें दृष्टोत्पत्तीस आल्याबरोबर, तिला पुत्र व्हावा म्हणून जो संस्कार करितात, त्याला 'पुंसवन' म्हणतात. २०. तोंपर्यंत. २१. इहलोकीं व परलोकीं. अन्वयः—द्विजार्पण (=ब्राह्मणाला दिलेलें दान) इहपरलोकीं कल्याण देतें (=कल्याण देणारें, कल्याणकर) होय (=होतें).

नृपति तदा, नमुनि करें [1]कुशासनातें,
कुलगुरुच्या करि बहुमान्य [2]शासनातें ।
[3]हरिजिदरिप्रति [4]हरिसैन्यराजराजा,
मग '[5]जनकक्षितिपतिच्या' म्हणे 'घरा जा.' ॥ ९

जनकनृपवरासि सांग आदौ नमन करूनि मदीय वंदनातें. ।
मग वद, 'तव [6]दर्शनैकवांछा बहुत असे [7]अजसूनुनंदनातें.' ॥ १०

धरुनि बहुतशी विनम्र मुद्रा, [8]कुशिकसुतासि [9]महातपःसमुद्रा ।
विनवुनि [10]बहुपुण्यसंघराशी, [11]ऋषिजनवेष्टित आणिजे घराशीं. ॥ ११

अशि [12]दशवदनेभसिंहवाणी परिसुनि, लक्ष्मणवीर [13]बद्धपाणी ।
म्हणुनि, 'बहु बरें,' सुबुद्धिखाणी, सजनक कौशिकविप्र [14]शीघ्र आणी. ॥ १२

नमन करुनि लक्ष्मण स्वहातें, मृदुचि वदे [15]सुरवंद्यविग्रहातें; ।
'सजनक मुनि येतसे पुराला, झडकरि पूजुनि आणिजे घराला.' ॥ १३

करुनि [16]अनुजवाक्य मान्य, राम त्वरित उठे [17]त्रिजगन्मनोभिराम, ।
ऋषिजनयुत जाय त्या समोर [18]प्रमुदितचित्त, जसा [19]घनास मोर. ॥ १४

नमुनि, करुनि पूजन स्वहातें, हरि मुनिच्या प्रभु तो [20]पथश्रमाला, ।
विनवुनि [21]बहुपुण्यसंग्रहातें, प्रमुदित घेउनि ये [22]निजाश्रमाला. ॥ १५

मग [23]कुलगुरुसर्वविद्वसिष्ठप्रभृति [24]महीसुर, कौशिकादि [25]शिष्ट, ।
करुनि सुखि [26]महर्षिसत्तमाप्त, प्रभु करि [27]पुंसवनासि तो समाप्त. ॥ १६

---

१. कुशांचें आसन ज्याचें त्यातें, वसिष्ठमुनीतें. २. आज्ञेतें. ३. इंद्रजिताच्या शत्रूप्रति, लक्ष्मणाला. ४. वानरसैन्याचा राजा जो सुग्रीव, त्याचा राजा; राम. ५. जनकराजाच्या. **रमावृत्त.** ६. केवळ दर्शनाचीच वांछा, दर्शनाविषयींची अत्यंत उत्कंठा. ७. अजाचा पुत्र जो दशरथ त्याच्या मुलाला, रामाला. **पुष्पिताग्रावृत्त.** ८. कुशिकाचा पुत्र विश्वामित्र, त्याला. ९. कठिण तपोराशीला, मोठ्या तपस्व्याला. १०. अनेक गुणसमुदायांचा सांठा असा विश्वामित्र, अत्यंत पुण्यशील. ११. ऋषिजनांसहित. १२. रावणरूप हत्तीचा जो सिंह त्या रामाचें वचन. इभ=हत्ती. **परंपरितरूपक.** १३. जोडले आहेत हात ज्यानें असा, हात जोडून. १४. लवकर. १५. सुरांनीं वंदण्यास योग्य आहे विग्रह (=शरीर) ज्याचा अशा रामातें. १६. धाकट्या भावाचें वचन. १७. तीन्ही जगांतील लोकांना मनोहर. १८. आनंदयुक्त आहे मन ज्याचें असा. १९. मेघाला. **वाक्योपमा.** २०. वाटेच्या श्रमाला. २१. पुण्यराशी विश्वामित्राला. २२. आपल्या घराला. २३. पुरोहित व सर्व जाणणारा जो वसिष्ठ तो व इतर. २४. ब्राह्मण. २५. सज्जन, सभ्य. २६. मोठमोठे ऋषि व आपलें गणगोत. २७. मागें पृष्ठ २९ टीप १९ पहा.

तदनंतर [1]गंधाढ्य [2]दिव्यकेलीगृहांतरीं ।
कोणा एका [3]दिशीं रात्रौ तोषवूनि [4]मधूत्तरीं, ॥ १७

घेउनि निज अंकावरि जनकसुता, गर्भिणी नवी, रमणी, ।
तीस पुसे [5]लंकावरकाल, [6]क्षितिपाल, [7]सर्ववीरमणी; ॥ १८

'कृशांगि! पांडुराननें! [8]प्रजाफलोद्भवे लते!
[9]त्रपा त्यजूनि सांग, जे मनीं [10]स्पृहा असेल, ते. ।
विदे[11]हराजनंदिनि! प्रिये! पवित्रमानसे!
तुला [12]अदेय वस्तु राज्यमंडळांत या नसे.' ॥ १९

म्हणे श्रीरामरमणी, [13]रमणीयवपुर्धरा, ।
[14]धराकन्या, जगत्पद्मा, पद्माक्षी, [15]कंबुकंधरा. ॥ २०

'ऐकावें [16]मुनिवचनोद्गतश्रुतीचें [17]सद्गान श्रमहर [18]सर्वसंसृतीचें; ।
देखाव्या [19]मृगकुलसंकुला, विशाला, विप्रांच्या परम पवित्र, पर्णशाला; ॥ २१

देखाव्या ऋषिवनिता भल्या, कुलीना, निर्लोभा, [20]निजहृदयेशभक्तिलीना, ।
[21]नीवारच्छदफलकंदनीरमूळें सेवूनि, प्रमुदित ज्या समाधिमूळें; ॥ २२

देखावी [22]सुरतटिनी [23]लसत्तरंगा, [24]पापौघश्रमशमनी, [25]शिवांतरंगा, ।
जे वाहे [26]सलिलमिषें सुधाचि सारी, [27]आलोकेंकरुनचि जन्ममृत्यु [28]सारी.' ॥ २३

[29]जनकनृवरनंदिनीचा असा ऐकतां [30]दोहद,
करुनि सरस हास्य, तीतें म्हणे [31]शर्मसंदोहद. ।

---

१. ज्यांत (फुलें, धूपागरु इत्यादिकांचा) सुवास दरवळून राहिला आहे अशा. २. उत्तम रंगमहालांत. ३. दिवशीं. ४. गोड उत्तरांनीं, मधुर शब्दांनीं. **अनुष्टुप्छंद.** ५. लंकापतीचा (=रावणाचा) काल (=वधकर्ता). ६. राजा. ७. सर्व वीरांमध्यें श्रेष्ठ. **गीतिछंद.** ८. संततिरूप फल प्रसविणाऱ्या लते! ९. लज्जा. १०. इच्छा. ११. जनकपुत्रि! १२. देण्याला अशक्य. **पंचचामरवृत्त.** १३. सुंदर शरीर आहे जीचें अशी. १४. भूकन्या, सीता. १५. शंखाप्रमाणें बारीक आहे मान जिची अशी. येथें रमणी–रमणी(य),धरा–धरा, पद्मा–पद्मा(क्षी) हीं **द्वामयमकें** आहेत. **अनुष्टुप्छंद.** १६. मुनींनीं उच्चारिलेल्या वेदांचें, मुनींच्या वेदघोषाचें. १७. सुंदर पठन. 'सध्वान' असा 'काव्येतिहाससंग्रहा'चा पाठ आहे. १८. सर्व संसाराचें. १९. हरिणगणांनीं व्यापिलेल्या. **प्रहर्षिणीवृत्त.** २०. पतिसेवेंत गढून गेलेल्या. हृदयेश=पती. २१. गवत, पानें, फळें, कांदे, पाणी व मुळें. २२. देवनदी, गंगा. २३. चमकताहेत लाटा जिच्या अशी. २४. पापांचा समूह व कष्ट हे नाहींसे करणारी. २५. कल्याणकर आहे अंतरंग जिचें अशी. २६. पाण्याच्या मिषानें, पाण्याच्या रूपानें. येथें **मिषापह्नुति** नामक अलंकार आहे. २७. दर्शनानें. २८. दूर करी; नाहींसे करी. २९. जनकराजाच्या मुलीचा, सीतेचा. ३०. डोहळा, इच्छा. ३१. सुख देणारा.

'[1]उदधिउडुपहायनें त्वां जन्हीं सेविलें [2]दंडक, ।
तरि हि न तव तृप्ति चित्तीं कशी? काय हा [3]दंडक? ॥ २४

जा सकाळीं [4]वरारोहे! देखायास्तव पावनें, ।
[5]शांतसत्वगणाकीर्णे, गंगातीरतपोवनें. ॥ २५

ऐसें म्हणोनि [6]रघुवंशावतंस मग सीतेसवें प्रमुदित
[7]केलीगृहीं [8]जडितमंचीं निजे, [9]स्वजनरक्षार्थ जो [10]समुदित. ।
निद्रा तदा नयनमार्गेंकरूनचि शरीरांतरीं प्रसरली;
[11]राहोनियां प्रहर दोन स्वयेंचि मग सोडूनि दूर सरली. ॥ २६

मग [12]निशिचर, [13]चार, प्राज्ञ, [14]विश्वासराशी,
नमन करुनि रात्रौ [15]श्रीअयोध्यावरासी ।
म्हणति, '[16]मरणजन्मच्छेदका! [17]भूसुतापा!
जन सकळहि गातो त्वत्सुकीर्ति[18]प्रतापा.' ॥ २७

[19]पृथक् पृथक् [20]चारजनाननें अशी, [21]लोकश्रुती ऐकुनियां, तदा [22]वशी ।
तयांस आज्ञा मग [23]मर्त्यदेव दे; त्यांतील एकासह तो असें [24]वदे; ॥ २८

'माझें, वा मम भार्येचें, बंधूचें, जरि दुष्कृत, ।
जालें असेल तुजला [25]प्रकृतीच्या मुखें [26]श्रुत, ॥ २९

---

१. चवदा वर्षें. उदधि=४ व उडुप=१; आणि 'अंकानां वामतो गतिः' या नियमानें उदधि–उडुप म्हणजे चवदा. येथें उदधि आणि उडुप यांचा समास युक्त असून केला नाहीं, हें चिंत्य आहे. हायन =वर्ष. २. दंडकारण्य. ३. रीति. येथें **दंडक** हा शब्द नियोजून कवीनें या श्लोकाचें वृत्त 'दंडक' आहे, असें सुचविलें आहे. प्रत्येक पादांत प्रथम दोन नगण असून, पुढें सारखे रगण असणें हें 'दंडका'चें लक्षण. ४. उत्तम आहेत आरोह(=श्रोणी) जिचे अशा स्त्रिये! हे सुंदरि! ५. सौम्य प्राणिगणांनीं (=हरिणादिगणांनीं) व्यापलेली. **अनुष्टुप्छंद.** ६. रघुकुलश्रेष्ठ, राम. ७. क्रीडा-गृहांत, रंगमहालांत. ८. हिरेजडित पलंगावर. ९. आपल्या प्रजेच्या संरक्षणार्थ. १०. उद्युक्त, तयार. ११. केवळ दोनच प्रहर निद्रा सेवून, पुन्हा प्रजापालनार्थ व राज्यव्यवस्थित्यर्थ राम उठले–हा भावार्थ. **अमृतध्वनिवृत्त** ऊर्फ **अश्वधाटी.** १२. रात्रीचा संचार करणारे. १३. हेर. १४. पूर्ण विश्वासू. १५. अयोध्यापतीला, रामाला. १६. जन्ममरणाची परंपरा तोडणाऱ्या! १७. भूसुता+पा=सीतेच्या पते! १८. प्रताप=पराक्रम. **मालिनीवृत्त.** १९. एकेका, निरनिराळ्या. २०. हेरांच्या तोंडून. २१. लोकवार्ता. २२. आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवणारा, इंद्रियदमनशील. २३. नृप. २४. **इंद्रवंशावृत्त.** २५. प्रजेच्या तोंडून. २६. ऐकलेलें, ठाऊक. **अनुष्टुप्छंद.**

तरि सत्य वदें, चारा! कैशी स्थिति असे जनीं; ।
'दंडापासुनि[1] भीतीतें कदापि न धरीं मनीं.' ॥ ३०
ऐसें ऐकोनि, नमुनी, चार तो राघवाप्रति ।
कथिता जाहला ज्यातें, ऐका त्यातेंचि संप्रति. ॥ ३१
[2]कोचित् खळरजकाची [3]गृहिणी [4]कलहार्तमानसा होती, ।
न विचारुनी [5]धवातें, पळोनि गेली [6]पितृक्षया हो! ती. ॥ ३२
अनुचित जाणुनि, कन्या जामातृगृहासि आणिली तातें, ।
हातीं देता जाला, त्यातें जोडूनियां स्वहातातें. ॥ ३३
बहुविध सांत्वन केलें, परि तत्क्रोधाग्नि लेश न विजाला, ।
[7]रोषारुणदृक्, [8]दष्टाधर, ऐसें रजक बोलता जाला. ॥ ३४
'पुनरपि [9]दशवदनसदनगता घरीं नांदवीतसे [10]रामा, ।
[11]तो काय मी?' म्हणउनी बाहु उभारूनियां वदे, रामा! ॥ ३५
'राजा म्हणउनि [12]सरलें त्यातें, परि मी तसें कदा न करीं.' ।
आयकिलें इतुकें, हें बोलत होता असें [13]सुहृन्निकरीं. ॥ ३६
[14]स्वर्गंगेच्या [15]सलिलीं आयकिला, पाहिला नसे [16]पंक; ।
[17]त्रिजगद्गेयचरित्रा! तद्वत् कैंचा तुला असे [18]पंक? ॥ ३७
[19]सकृदुच्चारणमात्रें तरती [20]दुरितार्णवीं महापापी, ।
[21]निरत शिवहि, मग तव गुणसुधेसि जन कोण कीं न बापा! पी? ॥ ३८
पितृवचन सत्य केलें, खळ वधिले, [22]त्रिदशविप्र तोषविले, ।

१. दंडाच्या, शिक्षेच्या. भयदर्शक शब्दांचा प्रयोग संस्कृतांत पंचमीबरोबर होतो; त्या नियमास अनुसरून पंतांनीं येथें 'पासुनि' हें शब्दयोगीअव्यय वापरिलें आहे. २. कोणी एक. ३. बायको. आर्यावर्तांतील आर्यांत बायकांना **घरांत** किती महत्व होतें व हलीं आहेही हें या व 'कुटुंब' शब्दांवरून स्पष्ट होतें. ४. भांडणामुळें दुखावलें आहे मन जिचें अशी, भांडून रुसलेली. ५. नवऱ्यातें. ६. बापाच्या घरीं. **गीतिछंद.** ७. रागानें लाल झाले आहेत डोळे ज्याचे असा. ८. चावला आहे खालचा ओंठ ज्यानें असा. ही **स्वभावोक्ति** आहे. ९. रावणाच्या घरीं राहिलेली. १०. स्त्री. ११. तो राम. म्हणउनी=म्हणून, असें. १२. खपलें, शोभलें, पचलें, साजलें. १३. आपल्या मित्रसमूहांत. १४. आकाशगंगेच्या. १५. पाण्यांत. १६. चिखल. हें गीत्यर्ध **सुभाषित** आहे. १७. तीन्ही लोकांनीं गाण्यास योग्य आहे चरित्र ज्याचें अशा! हें विशेषण हेतुगर्भ आहे म्हणून **परिकर** झाला. १८. दोष, पाप. **वाक्योपमा.** १९. (तुझे गुण) एकदांच उच्चारल्यानें. २०. पापसमुद्रांत. **रूपक.** २१. रममाण झालेला. या गीत्यर्थांत कैमुतिकन्याय आल्यामुळें **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला आहे. २२. देव व ब्राह्मण.

निजगुणमुक्तादामें दिव्यस्त्रीकंबुकंठ भूषविले. ॥ ३९

जन दुर्वार तथापि, स्वैर सुधापानमत्त बोलतसे. ।
सकलकलुषतिमिररवे! प्रामाण्यचि युक्त हेहि बोल तसे." ॥ ४०

ऐसें ऐकोनियां, राम चिंतेला मानसीं धरी. ।
लोकापवादवित्रस्त विचारातें मनीं करी. ॥ ४१

'जाली वन्हिमुखीं शुद्धि, तथापि जन निंदिती; ।
टाकावी, कीं न टाकावी हे शुद्धचरिता सती? ॥ ४२

कैशी हे त्यागावी सद्वृत्ता, साधुसंमता, प्रमदा? ।
श्रोत्रीयमुखें जैशी त्याज्या स्वाचारपद्धती न कदा. ॥ ४३

त्यागीन अवश्य इला, विप्र जसे कलियुगीं निज श्रुतिला.' ।
ऐसें हृदयीं चिंती, वारंवार स्मरोनि साश्रु तिला. ॥ ४४

'जलजलसद्रम्यमुखी, नवनवनीतापरीस मृदुला हे, ।

---

१. आपले गुण हेच मोत्यांचे हार त्यांनीं. **रूपक.** मोत्यांचें शुभ्रत्व व सद्गुणांचें कविसंकेतानें ठरलेलें शुभ्रत्व हीं लक्ष्यांत घेतलीं पाहिजेत. २. देवांगनांचे (=अप्सरांचे) शंखासारखे सुंदर कंठ. मुक्तामाला गळ्यांत घातल्यामुळें शोभा आणते, व रामाची कीर्ति गाइल्यामुळें कंठाला शोभा आणते; अशा रीतीनें कवीनें 'रामगुण' व 'मुक्तादाम' यांचें रूपक कल्पिलें आहे. येथें 'कंठ भूषविणें' हा शब्दप्रयोग श्लिष्ट आहे, म्हणून हें **श्लेषमूलक रूपक** आहे. ३. गीति ३८ व ३९ यांत ३७ गीतींतील निष्पंकत्वाचीं कारणें दिलीं आहेत, परंतु 'कारण' हा शब्द कोठेंच योजिला नाहीं, म्हणून या गीतींत **काव्यलिंगा**लंकार झाला. तसेंच ३९ व्या गीतींतील एकेक गोष्टच निष्पंकत्वाला पुरे आहे; तेव्हां येथें एकैकशः कार्यक्षम असणाऱ्या अनेक वस्तूंचा उल्लेख झाल्यामुळें येथें **समुच्चय** आहे. ४. वारण्यास कठीण. जन दुर्वार=लोकांचें तोंड धरितां येत नाहीं. ५. सकल+कलुष+तिमिर+रवे !=सर्व पापरूप अंधकाराच्या सूर्या! हे पापनाशना! 'काव्येतिहाससंग्रहा'चा 'सकल**कलुषित**तिमिररावें' असा पाठ आहे. परंतु त्यांत छंदोभंग होतो व अर्थही चांगलासा बसत नाहीं. तरी तो अपपाठच समजला पाहिजे. येथें **परंपरित रूपक** आहे. ६. (तो सुरामत्त वाटेल तें भकत आहे.) [तेव्हां] त्याचे हेहि बोल तसे [च] (=तितकेच) प्रामाण्य [व] युक्त (=खरे व योग्य) [असणार]. म्हणजे त्याचे शब्द खोटे आहेत, त्यांत कांहीं अर्थ नाहीं–असा भाव. ७. लोकापवादाला भ्यालेला. **अनुष्टुप्छंद.** ८. रावणवधानंतर सीतेनें केलेल्या अग्निदिव्यावर कटाक्ष आहे. अ० १ श्लो० ४ पहा. ९. सुशील. १०. सज्जनांना मान्य. ११. स्त्री. १२. ब्राह्मणश्रेष्ठानें. **वाक्योपमा. गीतिवृत्त.** १३. वेदविषेला. येथें कलियुगांतील धर्मभ्रष्टतेवर कटाक्ष आहे. तत्संबंधी मंत्रभागवत स्कं० १२ गीति २७-३६ पहा. १४. जल+ज+लसद्+रम्य+मुखी=कमलाप्रमाणें तेजस्वी व मनोहर मुख जिचें अशी. १५. नव्या लोण्याहून. येथें **व्यतिरेक** आहे.

शिव! शिव! मजविण भीरू न वनवसतिदुःखभोगणें लाहे.' ॥ ४५
एवं चिंताव्याकुल दीनास्य नै तो वदे, निजे, हाले. ।
सेवार्थ भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न, तया समीप तों आले. ॥ ४६
अतिदीनमानसातें रामातें पाहतांचि, ते सुमती, ।
शत्रुघ्न, भरत, लक्ष्मण, परस्पर उपांशु यापरी वदती. ॥ ४७
'जाला उशीर, यास्तव आला कीं कोप रामचंद्राला? ।
दानें द्विजांसि न दिलीं, हें गमलें कीं क्रियावितंद्राला?' ॥ ४८
एवं दुःखाकुल ते, वंदुनि, म्हणती पवित्रवृत्तातें; ।
'कां न सुखविशी आम्हां, भृत्यांतें त्वत्पदस्थचित्तातें.' ॥ ४९
ऐसें वदोनि, वंदिति ते सारे रामपादपद्मातें, ।
भक्तमयूरेश्वरकृतिचित्ताच्या केलिसद्मातें. ॥ ५०
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा दुसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ५१

---

## अध्याय तिसरा.

अथ भरतप्रभृतिनिजानुजांसि सारें कळवितसे निशि कथिलें, जसें खेचारें. ।
चरणरजेंकरुनचि नाशिता अघातें, स्वमत असें कथित असे तदा तिघांतें. ॥ १
'श्रुतीतें निंदितो जैसा पाखंडी पापभाजन, ।
रक्षोगृहीता यासाठीं मैथिलीतें तसा जन. ॥ २
योगी जैसा त्यजितो संसारभयास्तव स्वममतेला, ।
अपवादभयास्तव मी कीर्तिप्रतिपालनार्थ सीतेला.' ॥ ३

---

१. लाभे. येथें कदाचित् **'साहे'** असा मूळचा पाठ असावा. या गीतींतील प्रत्येक पादारंभींचा **छेकानुप्रास** फार सुंदर आहे. येथील सीतेचीं विशेषणें सहेतुक असल्यामुळें **परिकरा**लंकार होतो. २. दीनमुख. ३. हें अव्यय 'वदे' 'निजे' 'हाले' या तिन्हीं क्रियांशीं संधेय आहे. ४. हळूच. ५. क्रियांसंबंधानें निरलस. क्रिया=कर्तव्य. ६. सुशील रामाला. ७. तुझ्या चरणीं ज्यांचें चित्त गुंतलें आहे अशा चाकरांना. ८. रामभक्त जो मोरोपंत त्याच्या काव्याच्या व मनाच्या. ९. क्रीडागृहाला. **उद्गीतिछंद.** अ० १ पद्य १७ टीप २८ पहा. १०. भरतादि (=भरत वगैरे) आपल्या धाकट्या भावांस. ११. रात्रीं. १२. आपल्या हेरानें. १३. पायाच्या धूळीनेंच पापाचा नाश करणारा राम. **रमावृत्त.** १४. वेदांना. १५. नास्तिक. १६. पापाचें माहेरघर, अत्यंत पापी. १७. रक्षः+गृहीता=राक्षसानें धरलेली. **अनुष्टुप्छंद.** १८. म्हणून. **वाक्योपमा.** १९. यशा[illegible] करण्यासाठीं. **वाक्योपमा. गीतिछंद.**

ऐसें आकर्णितां, त्यांच्या [1]नीर नेत्रांतुनी गळे; ।
रोमांच उठले देहीं, दु:खानें दाटले गळे. ॥ ४

पुसूनियां [2]शोकेपाणी, [3]पाणी जोडूनियां नयें, ।
रामापुढें दीन वाणी [4]वाणी भरत [5]हे स्वयें. ॥ ५

"[6]अंत्यजसदनापासुनि पूर्वीं जे आणिली बळें गाय, ।
[7]संसर्गपातकास्तव पुनरपि ते धेनु टाकिजे काय? ॥ ६

शुद्धि दिली वह्निमुखीं, प्रविशवुनीयां [8]विशंक निज [9]काय; ।
त्या दिव्याचें **रामा**! स्मरण नसे सांग, आज तुज काय? ॥ ७

'जाला ज्या मानवाला [10]मरणद [11]वनितापुत्रवित्तादिशोक,
त्याला नाहीं च कांहीं,' बुधजन म्हणती, '[12]पुण्यलभ्योच्चलोक.' ।
'**सी**ता हे सून माझी, सुविमळचरिता; यामुळें देवलोकीं,
रे वत्सा! वर्ततों मी प्रमुदित, मजला [13]ऊर्ध्वनेत्रें विलोकीं.' ॥ ८

[14]एवं सदैव गगनीं [15]विमानगत तात बोलिला वदनें, ।
त्याचें स्मरण करावें! **रामा**! त्वां [16]ज्ञानिलोकहृत्सदनें. ॥ ९

स्मरण करीं, पूर्वीं जें वदला [17]व्योमस्थ [18]देवसंघात. ।
करुणाब्धे! **सी**तेसह न करावा आत्मकीर्तिचा [19]घात." ॥ १०

एवं वदोनि, **भर**तें केलें **रा**मासि वंदन, ।
जाला [20]अश्रुजलभ्रष्टहृदयालिप्तचंदन. ॥ ११

---

१. पाणी. **स्वभावोक्ति. अनुष्टुप्छंद.** २. शोकाश्रु. शोक आणि पाणी यांचा समास चिंत्य आहे. ३. हात. या गीतींत पाणी–पाणी व वाणी–वाणी हीं **दामयमकें** आहेत. ४. वर्णी, बोले. ५. ही (दीन वाणी). ६. चांडाळाच्या घरांतून. ७. (चांडाळाच्या) स्पर्शापासून उत्पन्न झालेल्या पातकास्तव. **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार. **गीतिवृत्त.** ८. निर्भयपणानें. ९. देह. १०. मरण देणारा, प्राणघातक. ११. स्त्री, पुत्र, धन इत्यादिकांचा शोक. १२. पुण्यानें प्राप्त होणारा उत्तम लोक. १३. डोळे वर उचलून. **स्रग्धरावृत्त.** १४. असें. १५. विमानांत बसलेला दशरथ. १६. विद्वान् लोकांच्या हृदयाच्या निवासस्थानानें, विद्वल्लोकांचीं चित्तें ज्याच्या ठिकाणीं रममाण झालीं आहेत अशा त्वां. **गीतिवृत्त.** १७. आकाशस्थित. १८. देवसमूह. रावणवधानंतर स्वर्गस्थ दशरथानें भूलोकीं येऊन लंकेच्या समरभूमीवर रामाला दर्शन दिलें. त्या वेळीं तो व विमानस्थ देव जें बोलले तें येथें अनुसंधेय आहे. १९. नाश. येथें **सहोक्तिनामक** अलंकार आहे. २०. अश्रु+जल+भ्रष्ट+हृदय+आलिप्त+चंदन=आसवांनीं पुसून गेलें आहे हृदयावर लाविलेलें चंदन ज्याचें असा. **अनुष्टुप्छंद.**

ऐकोनि ऐसें, वदे [1]**जान**कीजानि; 'लोकापवादेंचि होते यशोहानि. ।
ज्याच्या नसे कीर्तिचा जाहला नाश, त्याला न मारावया दक्ष [2]**की**नाश. ॥ १२
मेले **ह**रिश्चंद्रवैन्यादि[3] जे संत, ते या जनामाजि आहेत [4]जीवंत. ।
ज्या [5]बंधुयोषित्सुतांहीं [6]यशोभंग, स्वप्नांतरीं ही तयासी नसो [7]संग. ॥ १३

कित्येकांहीं [8]देहदानें रक्षिलें [9]स्वयशोधन, ।
म्हणोनि **सी**तात्यागें मी करितों [10]कीर्तिशोधन. ॥ १४
म्यां वांचावें, असें चित्तीं असेल तुझिया जरी, ।
'[11]**सी**तात्यागनिषेधार्थ शब्द बोलों नको तरी.' ॥ १५

**सौ**मित्रि क्रोधतप्त [12]क्षितिपतिसि म्हणे, 'प्रार्थना ऐक, **रा**मा!
मिथ्या लोकापवादेंकरुनि [13]विकलुषा त्वां त्यजावी न [14]रामा; ।
म्लेच्छांहीं निंदिजेते [15]श्रुति, म्हणउनियां काय ते विप्रलोकीं
टाकावी? हें विचारेंकरुनि बुधपते! [16]शास्त्रनेत्रें [17]विलोकीं. ॥ १६
सांग मला हें सत्य तूं दोषज्ञांचा राय ।
स्त्रीकलहास्तव पंडितें [18]मयि त्यजावी काय?' ॥ १७

---

१. राम. जानकी जाया ज्याची असा. पुलिंगी बहुव्रीहि समासाचा अंत्य अवयव 'जाया' असेल, तर त्याला 'जानी' हा आदेश होतो. २. यम. **सारंगवृत्त.** ३. वेनराजाचा मुलगा. वेनराजा (विनायकमाहात्म्य—अ० २ गी० १६ टीप १० पहा.) दुष्ट होता आणि धर्मबाह्याचरणानें व ब्रह्मशापानें तो नरकवासास पात्र झाला. परंतु ब्राह्मणांना पुन्हां त्याची कींव आली. तेव्हां त्यांनीं वेनावर दया व्हावी म्हणून ईश्वराची प्रार्थना केली, त्यावरून देवानें वेनाच्या पोटीं **पृथु** नामक अवतार घेतला. या पृथूनें आपल्या पुण्यशीलाचरणानें पित्याचा नरकवास चुकविला. मंत्रभागवत—स्कंद २ गीति५५—५८ पहा. ४. 'जे मेले, ते जीवंत आहेत' हें **विरोधाभासाचें** सुंदर उदाहरण आहे. ५. भाऊ, बायका व मुली ह्यांच्या योगें. 'काव्येतिहाससंग्रहा'चा 'बंधुयोषित्सुताही' असा पाठ आहे. ६. कीर्तिहानी. ७. संसर्ग. श्लोक १२ व १३ उत्तम **सुभाषित**रूप आहेत. ८. आपलें शरीर देऊन. शिबिराजाची कथा येथें ग्राह्य आहे. (विनायकमाहात्म्य—अ० ११—१२ पहा.) ९. आपली कीर्ति हेंच वित्त. १०. कीर्तीची शुद्धि; कीर्तीचें निष्कलंकत्व. **अनुष्टुप्छंद.** ११. सीतेच्या त्यागाविरुद्ध. १२. रामराजास. १३. वि+कलुषा= पापरहिता, निष्पाप. १४. स्त्री. १५. **वेद.** अर्थसादृश्यार्थ मागें अध्याय २ पद्य ४३ पहा. १६. शास्त्र हेच डोळे त्यांनीं. १७. ही गोष्ट विचारपूर्वक शास्त्रसंमत पद्धतीनें तूं पहा. **स्रग्धरावृत्त.** १८. आई. येथें 'त्य' या संयोगाच्या योगानें मागील 'य' च्या दोन मात्रा व्हावयाला पाहिजे होत्या. **दोहावृत्त.** पंतांपूर्वी मराठींत दोहावृत्त क्वचितच वापरलें जात असे. तेव्हां आर्येप्रमाणें दोहाही मराठींत आपण नवीनच आणला म्हणून पंतांना अभिमान वाटत असे—'महाराष्ट्र भाषेत ही

**शत्रुघ्नें**ही बहु विनविला **राम** सामप्रकारें,
तेंही जालें विपिनरुदितासारिखें व्यर्थ सारें; ।
अप्रस्तावीं विफळचि असे काम, ऐसेंचि आहे;
मेघापायीं न तिळभरिही नीर सारंग लाहे. ॥ १८

**सीता**त्यागद्विजपजननीं वाढला दुःखसिंधू;
शोकाश्रूंहीं भिजविति तदा भूमितें **राम**बंधू, ।
कन्यात्यागश्रवणजनितक्लेशमूर्च्छेसि गेली,
शिंपोनीयां म्हणउनि जणों जीवनें शांत केली. ॥ १९

स्वबंधु करिताति हे करुण मंजु शब्दें स्तव,
कलंक परि लागतो निजकुळासि **सी**तेस्तव ।
असा करुनियां बरा दृढ विचार, लंकापति-
कुळांतक असें वदे कठिन, कीं श्रुती कांपती; ॥ २०

'अपवादभयास्तव मी स्वतनूतेंही तुम्हांसवें, देखा, ।
त्यागिन सहसा, मग या **सी**तेचा कायसा असे लेखा? ॥ २१

**र**घुपतिमुखें कैकेयीचा सुतें, श्रवणीं अशीं
कठिन वचनें स्वांतोद्वेगप्रदें शिरलीं जशीं, ।
हळु हळु रडे; गेलें सर्व स्वधैर्य तदा लया;
अनुजयुत तो जाता जाला त्यजूनि तदालया. ॥ २२

---

**दोहारीति** नवीच । रची मयूरेश्वर, इला मनीं धरील कवीच ॥.' विठ्ठलस्तुति–दो० ९. हें पद्य **सुभाषित** आहे.

१. गोडीनें, गोड मधुर शब्दांनीं. २. अरण्यरोदनाप्रमाणें. ३. अकालीं, अयोग्य काळीं. ४. इच्छा. ५. मेघ गेले असतां. ६. हरिण. या शब्दाचा 'बगळा' असाही अर्थ आहे; व हे दोन्ही अर्थ येथें लागू पडतील. या श्लोकाचें उत्तरार्ध सुंदर **सुभाषित** आहे. **मंदाक्रांतावृत्त.** ७. सीतेचा त्याग हाच द्विजप (=चंद्र) त्याच्या उदयानें. **रूपकालंकार.** 'त्याग' व शीतलत्वानें प्रसिद्ध असणारा जो 'चंद्र' यांचें रूपक जरा चमत्कारिक दिसतें. ८. आपली कन्या म्ह० सीता हिचा त्याग हे शब्द श्रवण करून उत्पन्न झालेल्या क्लेशांनीं (आलेली) मूर्च्छा, तीप्रत. ९. पाण्यानें, नयनजलानें. ही **हेतूत्प्रेक्षा** आहे. १०. दीन. ११. गोड, सौम्य. १२. रावणाच्या कुलाचा नाश करणारा राम. १३. कानांचा थरकांप होतो. हें **चेतनगुणोक्ती**चें उदाहरण आहे. **पृथ्वीवृत्त.** १४. तुम्हांसह. '**काव्येतिहाससंग्रहा**'चा 'तुम्हांसि हे' असा पाठ आहे. १५. एकदम. १६. हिशेब, पर्वा. **गीतिवृत्त. काव्यार्थापत्ति.** १७. भरत. १८. कानांत. याचा संबंध 'शिरलीं' या क्रियापदाकडे. १९. स्वांत+उद्वेग+प्रदें=अंतःकरणाला दुःख देणारीं. २०. आपला धाकटा भाऊ **शत्रुघ्न** त्यासह. २१. त्या घराला. रामाच्या वाड्याला. **हरिणीवृत्त.**

[1]दुःखाभिभूत नृप जाणोनि, शिंपित [2]धरेतें स्वनेत्रकमळें,  
होता [3]निबद्धकर **सौ**मित्रि, पूजित [4]दृगब्जें [5]तदंघ्रिकमळें. ।  
जो न [6]स्वनामरसपानाभिलाषपरलोकव्रजासि [7]भव दे, ।  
तो, **ल**क्ष्मणासि नयनाहीं विलोकुनि, असें [8]भूमिवल्लभ वदे. ॥ २३

'मम शब्द करूनि मान्य, टाकीं, **क्षि**तिकन्येप्रति **जा**न्हवीतटाकीं. ।  
अथवा स्वकरेंचि मार मातें, जरि **सी**तेस्तव पावसी [9]श्रमातें. ॥ २४

**भा**गीरथीच्याचि [10]तटाकरानीं टाकीं, तुला मी नमितों करांनीं. ।  
'[11]**सी**तापरित्यागज दोष' मातें असो, नसो तूज [12]गुणोत्तमातें.' ॥ २५

अशि परिसुनि वाणी, बंधुला हात जोडी;  
[13]अवनतमुखपद्में दीर्घ [14]निःश्वास सोडी. ।  
तुरगसह रथातें आणवी [15]सूतहातें;  
पुसुनि [16]गुरुसि, गेला क्षिप्र **सी**तागृहातें. ॥ २६

उतरूनि रथावरूनि, जाला [17]विनत [18]**क्ष्मा**तनयापदांबुजाला. ।  
मग तोषविलें तयास तीनें, पुसुनि स्वागत आदरें, सतीनें. ॥ २७

[19]**ल**क्ष्मणागमनकारणास ती तत्क्षणींच समजे महासती. ।  
[20]**रा**वणप्रमुखराक्षसांतदा [21]देवरांसह असें वदे तदा. ॥ २८

१. दुःखानें व्याप्त. २. पृथ्वीतें. ३. जोडिले आहेत हात ज्यानें असा. ४. नेत्रकमळानें. ५. रामाचे कमळासारखे सुंदर पाय. 'रामाच्या पायाकडे एकसारखा पहात होता' हाच अर्थ जरा आढेवेढे घेऊन सांगितला आहे म्हणून हें **पर्यायोक्त.** ६. स्व+नाम+रस+पान+अभिलाष+पर+लोक+व्रजासि=आपले (=रामाचे) नामामृताच्या प्राशनाविषयींच्या इच्छेंत तत्पर अशा लोकसमूहास. येथें 'राम' असें सरळ न म्हणतां, बराच द्राविडी प्राणायाम करून रामपदार्थाचा बोध केला आहे म्हणून हेंही **पर्यायोक्त**च. ७. संसार, जन्ममरणयातना. ८. राजा राम. **अमृतध्वनिवृत्त.** येथें इतर बंधूंपेक्षां राम व लक्ष्मण या दोघांचें किती रहस्य, अन्योन्य प्रेम व विश्वास होता हें फार सुंदर रीतीनें सुचविलें आहे. या पद्यांत बरेच **यतिभंग** आहेत. ९. दुःखातें. **माल्यभारावृत्त.** १०. तटाकावरील (=तीरावरील) रानांत. ११. सीतेच्या त्यागापासून होणारा दोष. १२. गुणांनीं उत्तम अशास. **उपजातिवृत्त.** १३. नम्र, खालीं वांकविलेल्या मुखानें. १४. उसासा. १५. सारथ्याच्या हातानें, सारथ्याकडून. १६. वडील बंधूस, रामास. **मालिनीवृत्त.** १७. नम्र. १८. सीतेच्या चरणकमळाला. **माल्यभारावृत्त.** १९. लक्ष्मणाच्या येण्याच्या कारणास. २०. रावणादि राक्षसांस मारणारी सीता. २१. दीराबरोबर. **रथोद्धतावृत्त.**

'**सौ**मित्रे! [1]म्यां विनोदें करुनि निशि [2]जगत्कामकल्पद्रुमातें
**रा**मातें याचिलें जें, **र**घुकुलतिलकें अर्पिलें तेंचि मातें; ।
[3]ऐसें मानीत होतें परि निज हृदयीं, कीं खरें होत नाहीं,
[4]यावत् [5]सस्यंदनातें तुज न निरखिलें आपुल्या लोचनांहीं. ॥ २९

जाहलासि [6]**ह**रिजिच्छमना! तूं [7]**रा**मशब्दसहकारवसंत, ।
बोलिलें वचन सिद्धिसि नेती [8]सत्यसंध, [9]**म**नुसंभव, संत.' ॥ ३०

बोलोनि ऐसें, '[10]द्रविणें [11]दुकूलें घे देव[12]राच्या स्वमतानुकूलें. ।
'[13]श्रेयोभिवृद्ध्यर्थ' म्हणे [14]**अ**जा ती, 'पूजीन हस्तें [15]सवधू [16]द्विजाती.' ॥ ३१

[17]स्वर्णाच्या [18]मणिचित्रिता स्वपतिच्या वंदूनियां पादुका,
**सी**ता ठेवितसे रथीं [19]मुनिमनोरत्नाचिया संदुका. ।
तो धन्य क्षितिपाल **मै**थिल जनीं, लोकत्रयाल्हादिनी
ऐशी [20]कांतपदांबुजकनिरता ज्याची सती [21]नंदिनी. ॥ ३२

[22]सुरेंद्रद्विरदगामिनी **ज**नकनंदिनी [23]क्षिप्र ती,
निघे मग पुसावया [24]हृदयनाथमातेप्रती. ।
[25]स्वभालगतकुंकुमांकित करूनि तीचीं पदें,
असें वदतसे मुखें [26]निजवरप्रमोदास्पदें. ॥ ३३

---

१. रात्रीं. २. जगताच्या इच्छा पुरविण्याच्या कामीं जो कल्पवृक्ष त्या रामातें. ३. परंतु मनांत मला असें वाटत होतें कीं तें (=रामवचन) खरें होणार नाहीं. ४. जोंपर्यंत. ५. रथयुक्तातें. **स्रग्धरावृत्त.** ६. इंद्रजितास मारणाऱ्या! ७. रामचंद्राच्या वचनरूप आंब्यास (फुलवून फलद्रूप करणारा) वसंतकाळ. **परंपरितरूपक.** ८. सत्यप्रतिज्ञ, वचन पाळणारे. ९. मनूपासून झालेले, मनूचे वंशज. या श्लोकांत **अर्थांतरन्यास** अलंकार आहे. **स्वागतावृत्त.** १०. द्रव्यें. ११. रेशमी वस्त्रें. १२. दिराच्या मनास वाटलीं तीं. येथें 'स्व'शब्द निरर्थक भासतो. १३. सुख वाढण्यासाठीं. १४. जन्मरहिता, सीता. ही लक्ष्मीचा अंश होती म्हणून अजा. १५. सस्त्रीक, स्त्रियांसहित. १६. ब्राह्मण. १७. सोन्याच्या. १८. रत्नें बसवून चित्रविचित्र केलेल्या. १९. मुनींचीं मनें हींच रत्नें त्यांच्या पेट्या, ज्यांमध्यें मुनिमनें गुंतलीं आहेत अशा. **परंपरितरूपक.** २०. पतीच्या चरणकमलीं एकनिष्ठतेनें रममाण झालेली. २१. मुलगी. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** २२. ऐरावतासारखी (मंद) गति (=चालण्याची ढब) आहे जिची अशी. २३. त्वरित. २४. पतीच्या मातेला, सासूला. २५. तीचीं पदें (=पावलें) स्वभालगतकुंकुमांकित (=आपल्या कपाळींच्या कुंकुवानें चिन्हित झालेलीं अशीं) करूनि म्हणजे सासूच्या पायीं शिरसा वंदन करून. **पर्यायोक्ती**चें उदाहरण आहे. २६. आपल्या (प्राप्त झालेल्या) वराच्या आनंदाचें स्थान, त्यानें. याचा संबंध 'मुखा'कडे. **पृथ्वीवृत्त.**

'मज दोहद[1] जाहला असे कीं, निरखावें नयनें सुरापगेला[2]. ।
[3]**स**गरात्मजदोषपंक जीच्या जलयोगें सकल क्षयासि गेला. ॥ ३४
[4]सुरमानवनागलोककांता बहु माहात्म्य जिचें सदैव गाती, ।
जरि होइल आपुली [5]अनुज्ञा, तरि पाहीन सुखें **सु**रापगा ती. ॥ ३५
नेली[6] जयानें **ह**रिजित् क्षयाला, तो अग्रजाज्ञेस्तव [7]मत्क्षयाला, ।
करावया पूर्ण मनोरथातें, आला असे घेउनियां रथातें.' ॥ ३६

ते म्हणे तिजला, '[8]नवीनशिरीषपुष्पसुकोमले!
[या] गृहागमनेंचि हे तव [9]पादपल्लव [10]कोमले; ।
जासि सांग कशी वनाप्रति? वृक्ष कंटक तीव्र ते.
वक्त्रकांति सुकेल, होइल ओष्ठ शुष्क; पतिव्रते!' ॥ ३७

**कौ**सल्येची [11]स्नेहसंद्रत्नखाणी वाणी ऐशी आयके **रा**मराणी. ।
[12]पाणी तीतें जोडुनी, [13]लोकगीता **सी**ता बोले [14]भारती हे [15]विनीता. ॥ ३८

'मम [16]वर [17]वनवासी कंटकध्वंसकारी,
मरणजलधिमग्न [18]स्वप्लवंगांसि तारी, ।
[19]विमलगुणसुधेचा सिंधु हा **रा**मराजा,
[20]अनुदिन जपतां, कां ओष्ठ[21] वाळेल माजा? ॥ ३९

असे [22]भवत्कृपाछत्रच्छाया मन्मस्तकीं सदा; ।
कसे [23]क्लेशार्ककिरण स्पर्शतील मला वदा?' ॥ ४०
पीती [24]स्वकर्णाजलिंहीं एवं [25]वागमृता [26]सत्या, ।

१. डोहाळा; गर्भारपणींची इच्छा. २. भागीरथीला. ३. सगराच्या मुलांचा पापरूपी चिखल, सगरपुत्रांचा पापमल. भगीरथानें गंगेस मृत्युलोकीं आणून आपल्या पतित पितरांचा उद्धार केला या कथेवर येथें कटाक्ष आहे. **माल्यभारावृत्त.** ४. देव, मनुष्य व नाग यांच्या स्त्रिया. ५. परवानगी. ६. ज्यानें हरिजित् (=इंद्रजित्) लयाला नेला तो म्हणजे लक्ष्मण. ७. माझ्या गृहाला. **उपजातिवृत्त.** ८. ताज्या शिरीषाच्या फुलाप्रमाणें कोमल सीते. ९. तरुदलाप्रमाणें नाजूक असे पाय. १०. कोमेजून गेले. 'काव्येतिहाससंग्रहा'चा 'म हा गमनें हि हे......'असा पाठ आहे. **विबुधप्रियावृत्त.** ११. प्रेमपूर्ण. १२. हात. १३. जगत्स्तुता. १४. वाणी. १५. नम्र. **शालिनीवृत्त.** १६. पति. १७. अरण्यवासांत (शत्रुरूप) कांट्यांचा नाश करणारा. १८. आपल्या वानर योद्धयांस. १९. स्वच्छ गुणरूप अमृताचा सागर. २०. दररोज. २१. ओष्ठ वाळेल=ओंठ सुकेल, श्रमानें व दुःखानें मुख निस्तेज होईल. **मालिनीवृत्त.** २२. आपल्या कृपाछत्राची सांवली. २३. क्लेशरूप सूर्याचे किरण. **परंपरितरूपक. अनुष्टुप्छंद.** २४. आपले कान, याच ओंजळी त्या भरून. २५. वाणी हेंच अमृत, त्यास. २६. त्या सुशील स्त्रिया, तिघी सासवा.

देती आशीर्वादयुक्त [1]आज्ञापाथेय तीस त्या. ॥ ४१

कैकेयी, रामजननी, सुमित्रा, या तिघींस ती, ।
[2]कृतप्रदक्षिणा वंदी, पुसे, मग निघे सती. ॥ ४२

[3]रघूत्तमांघ्रिसारसा, स्मरे [4]प्रहृष्टमानसा, ।
बसोनियां रथावरी, प्रयाण [5]तूर्ण ते करी. ॥ ४३

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
हा तिसरा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ४४

---

## अध्याय चवथा.

वनाप्रति [6]विनागसा दवडिली [7]धरानंदिनी,
म्हणूनि बहु दुःखिता [8]स्वपटहस्वनाक्रंदिनी, ।
निवारित असे तदा सकरुणा अयोध्या सती
[9]समीरणचलांशुकध्वजकरें जणों तीस ती. ॥ १

मार्गीं चालत असतां, दीरासह ते बसोनि रम्य रथीं, ।
ऐशा दुश्चिन्हातें पाहे [10]क्षितिकन्यका अरण्यपथीं. ॥ २

पुढें येउनियां, [11]भीमा बोले [12]वाग् अशिवा [13]शिवा; ।
लवे लोचनही तीचें त्या काळीं उजवें [14]जवें; ॥ ३

धांवती, मार्ग लंघूनी, मृगांचीं व्याकुळें कुळें. ।
पाहुनी [15]दुर्निमित्तांतें, म्हणे दीरास ती सती. ॥ ४

'दुश्चिन्हांतें स्वनेत्रांहीं [16]रक्षोवृंदापहा! पहा, ।

---

१. प्रवासासाठीं फराळाचें सामान. **रूपकालंकार.** २. केली आहे प्रदक्षिणा जिनें अशी, प्रदक्षिणा करून. ३. रामाच्या चरणकमलाला. ४. आनंदयुक्त आहे हृदय जीचें ती सीता. ५. सत्वर. **प्रमाणिकावृत्त.** लक्षणः—जरा लघू गुरू बरे । पदांत आठ अक्षरें ॥ प्रमाणिकाभिधा तिला । 'स्वधर्म देइ मुक्तिला' ॥. ६. निरपराध. ७. भूकन्या, सीता. ८. आपले वाजणारे जे नगारे त्यांच्या नादानें रडणारी; (नगरांत वाजण्याच्या नगाऱ्याच्या मिषानें अयोध्या रडत होती—हा भावार्थ. येथें **अपह्नुतिध्वनि** आहे.) ९. वाऱ्यानें हलतें आहे फडकें ज्याचें, अशा ध्वजरूप हातानें. **रूपक.** यापुढें 'जणों' शब्द येऊन, एकंदर श्लोकांतील अलंकार **उत्प्रेक्षा** आहे. **पृथ्वीवृत्त.** १०. सीता. **गीतिवृत्त.** ११. भयंकर. १२. अशिवा वाग्= अशुभ वाणी. १३. कोल्ही. १४. जोरानें. (उ)जवें, जवें व (अ)शिवा, शिवा, हे **छेकानुप्रास** आहेत. असेच अनुप्रास पुढील दोन्हीं श्लोकांत साधिले आहेत. **अनुष्टुपछंद.** १५. अपशकुनांना. १६. राक्षसगणनाशका लक्ष्मणा!

भयसंसूचका[1] भेलू[2] रडते भैरवें[3] रवें. ॥ ५

गोमायु[4] आणिक मृगें रडताति वाटे[5] व्यापूनि, यास्तव मला भय फार वाटे. ।
लोकैकपालक मदीय मनोविसावा, **श्री**राम बंधुसह नित्य सुखी असावा. ॥ ६

जनस्थानीं[6] आले खरमुखमहाराक्षस[7] रणीं,
तयांतें दावी जो शमननगरद्वारसरणी[8]; ।
उदार प्रत्यर्थीप्रति[9] शरघनाच्या वितरणीं[10],
असो तद्बाहूंचें बळ खळबळध्वांततरणी[11]. ॥ ७

साक्षात्पातकमूर्ति, **रावण**, जगत्तोषांबुजाचा[12] करी,
पाषाणीं जलराशि[13] बांधुनि तया कोळातिथी[14] जो करी. ।
विद्याश्रीमदमद्यमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी[15],
माझा प्राणसखा, निरंतर असो **श्री**रामराजा सुखी.' ॥ ८

एवं गौतमदारतारणधनुर्भंगादिलीलांस[16] ती,
मार्गातें क्रमितां, स्मरोनि, पतिला कल्याण भाकी[17] सती. ।

१. भाविभय सुचविणारी. २. कोल्ही, भालू. ३. भयंकर स्वरानें. ४. कोल्हा. ५. मार्गांत येऊन. या व वरील तिसऱ्या श्लोकाशीं रघुवंशाच्या चवदाव्या सर्गातील ४९–५० हे श्लोक ताडून पाहण्यासारखे आहेत. पंतांनीं रघुवंशांतील हे श्लोक पाहिले असले पाहिजेत हें उघड आहे. **वसंततिलकावृत्त.** ६. दंडकारण्यांत, नाशिकक्षेत्रीं. ७. खरादि मोठमोठे राक्षस. ८. यमपुरीचा रस्ता. ९. शत्रूंना. १०. बाणसमूहाचें दान देण्यांत. येथें 'घन शरांच्या वितरणीं' हा पाठ अधिक सरळ होतो. अर्थः—शरांचा वर्षाव करण्यांत मेघ (असा बाहु). ११. शत्रुसैन्यरूप अंधकाराला सूर्य, म्हणजे शत्रुसैन्याचा नाश करणारें. **परंपरितरूपक. शिखरिणीवृत्त.** १२. विश्वाचें सुख हेंच कमळ त्याला जो (हानिकारक) हत्ती, असा रावण. **परंपरित रूपक.** १३. दगडांनीं समुद्र बांधून, समुद्रावर सेतू बांधून. १४. यमाचा पाहुणा करी, मारी. हें **पर्यायोक्त** आहे. १५. विद्या+श्री+मद+मद्य+मूढ+हृदय+स्वर्+द्विट्+मरुद्+वासुकी=विद्या+लक्ष्मी+गर्व+सुरा+भ्रांत+चित्त+स्वर्ग+शत्रु+वायु+सर्प=विद्या आणि वैभव यांपासून उत्पन्न होणारी गर्वरूप दारू पिऊन ज्याचें चित्त भ्रमलें आहे असे देवांचे शत्रू जे रावणादि दैत्य तेच वारे, त्यांना (पिऊन नाहींसा करणारा) जो सर्प असा राम=मदोन्मत्त राक्षसांस मारणारा. रामास सर्पाची उपमा चांगली नाहीं आणि हें सर्व लांबलचक सामासिकपद घालण्यांत कांहीं खुबीही नाहीं. **परंपरित-रूपक.** सर्प वारा खाऊन राहतात या कविसमयाचा आधार घेऊन हें रूपक साधिलें आहे. 'वाताशन' हें नांव याच गोष्टीवरून सर्पास पडलें आहे. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १६. गौतमपत्नी अहिल्या हिचा चरणरजानें केलेला उद्धार व सीतास्वयंवरसमयीं शिवधनुष्याचा भंग व इतर केलेलीं कृत्यें, त्यांना. १७. ईश्वराजवळ मागे.

सर्वांचाहि असाच [1]दंडक असे, [2]प्रीतिप्रकर्षास्तव
होतो व्यर्थचि नित्य [3]इष्टविरहें चित्तांत चिंतोद्भव. ॥ ९

नेत्रांहीं अवलोकुनी [4]स्मृतिभवद्विण्मौलिमालाकृति,
[5]चिंताकुंचितचित्तवृत्तिस 'पहा माते!' म्हणे तो [6]कृती; ।
'हे [7]हंसस्वरभाषिणी तुजकडे [8]पद्मेक्षणें पाहते
[9]स्वर्गंगा, [10]लहरीभुजा उचलुनी भेटावया बाहते. ॥ १०

फलपुष्पपल्लवभरें [11]लवले तरुराज तूज करिती नमनें; ।
[12]विहंगारवें कुशल हे पुसती; सुख फार यांसहि [13]तवागमनें. ॥ ११

सकरुणहृदयें पवित्र केलें, अवचित देउनि दर्शन [14]स्वैरांनीं, ।
म्हणउनि [15]मधुपांगना प्रहर्षें, तव गुण वर्णिति मंजुळ [16]स्वैरांनीं. ॥ १२

आली कीं बहु दिवसीं स्वकाननातें, देखाया [17]दशमुखजिन्मनोभिरामा, ।
या [18]येती क्षितिपति[कीर्ति]शुभ्रवर्णा, सामोन्या म्हणुनि तुला [19]मराळरामा.' ॥ १३

---

१. रीति. २. अत्यंत प्रेमामुळें. ३. इष्ट (=आवडत्या) वस्तूचा किंवा जनाचा विरह झाला असतां. या श्लोकांतील उत्तरार्ध उत्तम **सुभाषित**मय आहे. **अर्थांतरन्यास** अलंकार. ४. कामशत्रूच्या मस्तकावरील मालेच्या आकाराची (म्ह० शंकराच्या मस्तकीं श्वेतपुष्पमालेप्रमाणें शोभणारी) गंगा. स्मृतिभव=मनोभव, मदन. ५. चिंतेनें जिची मनोवृत्ति अगदीं व्याकुळ झाली आहे अशा सीतेस. ६. कर्तृत्ववान् (लक्ष्मण). ७. हंसांच्या स्वरानें बोलणारी (गंगा). ८. कमलरूप डोळ्यांनीं. ९. भागीरथी. १०. लहान लहान तरंगरूप हात. येथें **रूपक, चेतनगुणोक्ति** व **उत्प्रेक्षाध्वनि** असे अलंकार आहेत. ११. लवले (विशेषण)=लवलेले. १२. पक्ष्यांच्या शब्दानें. **अपह्नुतिध्वनि.** १३. तुझ्या येण्यानें. येथें तव+आगमनें यांचा संधि चुकीचा आहे, कारण हा सामासिक शब्द होऊं शकत नाहीं. 'तव' हें षष्ठीचें रूप आहे व समासांत 'त्वद्' असें रूप झालेंच पाहिजे. परंतु असे समास मंजूर करण्यांत वारंवार आढळतात. **प्रमिताक्षरावृत्त.** १४. आपल्या अरण्यांत. १५. मधुपी, भ्रमरी. १६. शब्दांनीं. **हेत्वलंकार. पुष्पिताग्रावृत्त.** १७. रावणाचा पराभवकर्ता जो राम, त्याच्या मनास रंजविणारी सीता. १८. या चरणांत मुळांत एक शब्द सुटला होता; म्हणून 'काव्येतिहाससंग्रहा'च्या संपादकांनीं 'पत्नि' असा शब्द स्वकल्पनेनें घातला. तेथें क्षितिपतिपत्नि! =हे राजस्त्रिये सीते! असा अर्थ केला पाहिजे. परंतु यांत मनोहरता दिसून येत नाहीं. आमच्या मतें मूळचा सुटलेला शब्द 'कीर्ति' किंवा तदर्थक दुसरा असावा. 'क्षितिपतिकीर्तिशुभ्रवर्णा' हा एक बहुव्रीहि समास करून, तें 'मराळरामा' याचें विशेषण घ्यावयाचें. 'क्षितिपतिकीर्तिशुभ्रवर्णा'=रामराजाच्या यशाप्रमाणें शुभ्र आहे रंग ज्यांचा अशा. हें वर्णन मनोहर असून, कविसमयास अनुसरून आहे. येथें **हेतूत्प्रेक्षा** असून 'क्षितिपतिकीर्तिशुभ्रवर्णा' हें विशेषण सहेतुक आहे म्हणून **परिकरालंकार**ही आहे. १९. हंसस्त्रिया, हंसी, वरटा. **प्रहर्षिणीवृत्त.**

ऐकोनियां दे[1]वरभारतीतें, संतोष झाला मग फार तीतें. ।
विलोकितां त्या [2]अमरापगेला, संताप तीचा वि[3]लयास गेला. ॥ १४

सीतेसि पाहतां हर्षे दे[4]वी गौर[5]पयोधरा; ।
गंगावलोकनें तोषे [6]देवी गौर[7]पयोधरा. ॥ १५

त[8]रणिवर बसुनि, झडकर त[9]रणिकुलवरक्षमाभृदनुकूला, ।
दे[10]वरंतिकरनदीच्या देवरसह जाय शीघ्र पर[11]कूला. ॥ १६

करूनियां मज्जन वि[12]श्वपावनीं व[13]नीं, प्रवेशे मग जानकी वनीं. ।
सचिंत पाहे मग देवरास ती सती, म्हणे, 'आश्रम कां न दीसती?॥ १७

शा[14]र्दूलपंचमुखऋक्षवृकादिसेना पादोत्थधूलिपटलें दि[15]नकृत् दिसेना. ।
पं[16]चास्यदारितगजेंद्रशिरोविमुक्ता सर्वत्र भूमिवर त्या दिसताति मु[17]क्ता. ॥ १८
सिं[18]हहतद्विरदशोणितसिक्त पृथ्वी, [19]तद्दंतसंघपटला बहुसाल [20]वाटे, ।

---

१. दिराचें भाषण. २. अमर+अपगेला=देव+नदीला=गंगेला. ३. नाशाला. **उपजातिवृत्त.** ४. गंगादेवी. ५. पांढरें पाणी धरणारी, शुभ्रजला. ६. राणी=सीता. ७. शुभ्र आहेत स्तन जीचे अशी; शुभ्रस्तनी. येथें गंगा व सीता यांचें परस्पर प्रसन्नत्व वर्णिलें असल्यामुळें **अन्योन्यालंकार** झाला आहे. याचें लक्षण:—'परस्परोपकारस्य कथनेऽन्योन्यमिष्यते । लक्ष्म्या विराजते राजा, राज्ञा लक्ष्मीर्विराजते ॥.' तसेंच 'गौरपयोधरा' या श्लिष्ट पदानें त्यांचें सादृश्य व प्रेमहेतु हीं सुचविलीं आहेत, तेव्हां या हेतुगर्भ विशेषणांच्या योगानें **परिकरालंकार**ही झाला आहे. **अनष्टुप्छंद.** ८. तरीवर, लहान नौकेवर. ९. तरणि+कुल+वर+क्षमाभृत्+अनुकूला=सूर्य+वंश+उत्तम+राजा+वशा=सूर्यवंशी जो राजा राम त्याची स्त्री. १०. गंगेच्या. रति=आनंद. ११. पलिकडच्या तीराला. येथें 'तरणि–तरणि' व 'देवर(ति)–देवर' हे **आद्ययमक** मनोहर आहेत. **गीतिवृत्त.** १२. विश्वास पवित्र करणाऱ्या. १३. पाण्यांत. येथें 'वनीं–वनीं' व '(देवरा)स ती–सती' हे **दामयमक** आहेत. **वंशस्थवृत्त.** १४. शार्दूल+पंचमुख+ऋक्ष+वृक+आदि+सेना+पाद+उत्थ+धूलि+पटलें=वाघ, सिंह, आस्वल, लांडगे इत्यादि वनपशुगणाच्या पायांनीं उडालेल्या धुळींच्या पटलानें. १५. सूर्य. १६. सिंहानें फोडलेल्या गजराजाच्या मस्तकांतून पडलेल्या. १७. मोतीं. **वसंततिलकावृत्त.** या वनवर्णनांत पंतांनीं लांबलांब संस्कृत समासांची अगदीं रेलचेल करून सोडिली आहे. सरळ पुराणग्रंथांशीं चांगला परिचय होण्यापूर्वीं व संस्कृतांतील काव्यपंचकाशीं परिचय झाल्यावर हें काव्य पंतांनीं लिहिलें असावें या म्हणण्यास यानें पुष्टता येते. १८. सिंहानें मारलेल्या हत्तींच्या रक्तानें शिंपलेली. १९. त्या हत्तींच्या दंतराशीचें आस्तरण (=पटल) आहे जीवर अशी पृथ्वी. २०. वाटेवर.

[1]शुभ्रप्रसूनमयदामविभूषितांगी स्त्री [2]रक्तचंदनविलेपितमूर्ति [3]वाटे. ॥ १९

[4]शार्दूलहस्तगतकंठमृगांगनाचीं वाणी [5]भयास्तव जणों शिरते स्वकानीं, ।
निर्द[6]ग्धभूमिरुह हे नयनीं विलोकीं, [7]क्रूरद्विजिव्हगणफूत्कृतिपावकांनीं. ॥ २०

[8]घनरवांतकरा! खणतो पहा, [9]वनबिडाल महीस कसें वनीं, ।
बहु भयंकर कर्कश हे महा, परम [10]संस्पृह [11]मूषकसेवनीं. ॥ २१

[12]दावग्रस्तवनोत्थधूमनिकरीं पक्षी न ते दीसती;
. निर्द[13]ग्धांडशिशुप्रलापनरवें आहेतसे भासती. ।
पं[14]चास्याहतसांद्रकज्जलनिभस्तंबेरमांचीं शवें,
मातें दूरुनि [15]गंडशैल गमती [16]संदेहबुद्ध्युद्भवें. ॥ २२

[17]क्षमासमाना [18]क्षांत्यर्थी, रूपीं प्रत्यक्ष [19]**मासमा**, ।
न दीसती कां आजूनि [20]पुण्यनीरनदी सती? ॥ २३

हो[21]मधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना, ।
न दीसती आजुनी कां साध्वी [22]संतापमोचना. ॥ २४

ब्रह्मचारी, [23]दंडमौंजीहरिणाजिनमंडित, ।
न दीसती कां अद्यापि [24]सद्विद्यासक्त पंडित. ॥ २५

---

१. पांढऱ्या फुलांच्या माळेनें सुशोभित आहे अंग जिचें अशी. २. तांबडें चंदन लाविलेलें आहे जिचे शरीरास अशी. ३. वाटते, भासते. येथें **उत्प्रेक्षालंकार** आहे. ४. सिंहाच्या पंज्याखालीं सांपडला आहे गळा ज्यांचा अशा हरिणींची. ५. जणूं काय भयानेंच. **हेतूत्प्रेक्षा.** ६. जळलेले वृक्ष. ७. निर्दय सर्पसमूहाच्या फूत्कारांच्या अग्नींनीं. ८. मेघनादाचा (=इंद्रजिताचा) अंत करणाऱ्या लक्ष्मणा! ९. रानमांजर. १०. सकाम, तत्पर, उत्सुक. ११. उंदीर खाण्यांत. **द्रुतविलंबितवृत्त.** १२. वणव्यानें जळणाऱ्या रानांतून निघणाऱ्या धुरांच्या लोटांत. १३. (वणव्यानें) जळलेलीं अंडीं व पिलीं यांच्या निमित्त (पक्ष्यांनीं केलेल्या) शोकाच्या स्वरानें. १४. पंचास्य+आहत+सांद्र+कज्जल+निभ+स्तंबेरमांची=सिंहानें मारलेल्या, अगदीं काजळासारख्या काळ्या हत्तींची. स्तंबेरम=हत्ती. १५. भूकंपानें तुटून अलग झालेल्या डोंगरांचे कडे. १६. मन ससंदेह होऊन, मनांत शंका उद्भवून. **उत्प्रेक्षालंकार. शार्दूलविक्रीडितवृत्त.** १७. पृथ्वीसारख्या. १८. क्षांतिरूप धनांत; सहनशीलपणांत. १९. लक्ष्मीसारख्या. मा=लक्ष्मी. २०. पुण्यरूप जलाच्या नद्या; पुण्यवती. या श्लोकांत पूर्वार्धांत **मालोपमा** व उत्तरार्धांत **परंपरितरूपक** असे अलंकार आहेत. तसेंच 'क्षमासमा (ना)– (प्रत्य)क्ष मासमा' व 'न दीसती–नदी सती' हीं **आद्यंतयमकें** लक्ष्यांत ठेवण्यासारखीं आहेत. सती=(तपस्व्यांच्या) पतिव्रता स्त्रिया. **अनुष्टुप्छंद.** २१. यज्ञांच्या धूम्रानें कर्णापर्यंत लाल झालेले आहेत तांबड्या कमळांच्या पाकळीसारखे डोळे ज्यांचे अशा. २२. संतापापासून मुक्त करणाऱ्या. २३. पळसाचा दंड, मुंजनामक गवताचा कडदोरा व हरिणाचें चर्म यांनीं सजलेले. २४. उत्तम विद्यांत रममाण झालेले.

आम्नायप्रतिपाद्यधर्मसरणीपांथ[1], प्रसन्नाकृती[2],
संसारांबुनिधानपानकरणीं[3] कुंभात्मजन्मे[4], कृती, ।
शापानुग्रहदक्ष[5], कां न दिसती भूदेव[6] अद्यापि ते,
चिंता लक्ष्मण! सर्पिणी म्हणुनियां, तोषामृतातें पिते[7]. ॥ २६
रघुवीरपदाब्जसेवनातें[8] करुनी[9] अंतर, धांवलें वनातें. ।
अशि मी अविवेकलब्धपापा[10]; सुकृती लोक कसा दिसेल बापा[11]?॥ २७
पवित्राश्रमवासी ते पवित्रासिच दीसती, ।
लक्षीजे तो न नेत्रांहीं कौशिकीं[12] पद्मिनीपती[13].' ॥ २८
प्रजावतीची[14] अशि दीन वाणी आणी दिराच्या नयनांसि पाणी, ।
असें वदे रावणपुत्रहंता[15], संतापसंतप्तमनोनियंता[16]. ॥ २९
'ते पावनाश्रम पहा दिसताति दूर, व्योमासि[17] चुंबित असे द्विजहोमधूर, ।
जावें इतःपर हळूहळु धूमराजी लक्षी करूनि[18], दिसते विजितांबरा[19] जी. ॥ ३०
लोकप्रवादें त्यजिलें वनांतीं तुला जगद्वंद्यपदें[20] वरानें.' ।
प्रशोकबाष्पाकुलकंधरानें[21], सांगीतलें हें तिस देवरानें. ॥ ३१
'मातर्नमस्ते[22] क्षमस्वापराधी न, मानीं मला, सर्वथा मी पराधीन[23].' ।

१. वेदप्रोक्त (=वेदमान्य) धर्ममार्गाचें अवलंबन करणारे. पांथ=पथिक, प्रवासी. २. शांत आहे चर्या ज्यांची असे. ३. संसाररूप जो समुद्र (=अंबुनिधान) त्यास प्राशन करण्यांत. ४. कुंभपुत्र, अगस्त्य. हें **परंपरितरूपक** आहे. अगस्त्यानें समुद्रप्राशन केलें होतें, ही कथा अनुसंधेय आहे. ५. शाप किंवा आशीर्वाद देण्यांत तत्पर असे. ६. ब्राह्मण. ७. चिंतारूप सर्पीण तोषरूप अमृताला पिऊन नाहींसें करिते. **परंपरितरूपक. शार्दूलविक्रीडितवृत्त.** ८. रामचंद्राच्या चरणकमलाच्या सेवेला. ९. सोडून. १०. अविचारानें प्राप्त झालें पाप जिला अशी. ११. बाबा लक्ष्मणा! 'बाबा!' व 'बापा'! हे शब्द प्रेमपूर्णत्वदर्शक आहेत. **मालयभारावृत्त.** १२. घुबडांनीं. १३. सूर्य. **दृष्टांतालंकार. अनुष्टुप्छंद.** १४. भावजयीची. १५. इंद्रजिताचा वध करणारा लक्ष्मण. १६. संतापानें त्रासलेल्या मनाचें नियमन (=सांत्वन) करणारा. हें विशेषण हेतुगर्भ असल्यामुळें **परिकरालंकार** आहे. **उपजातिवृत्त.** १७. आकाशास. १८. येथून त्या धुराच्या लोटावर लक्ष्य ठेवून (=त्याच्या धोरणानें) त्वां हळुहळू पुढें जावें. येथें 'लक्ष्मी करून' असा 'काव्येतिहाससंग्रहा'चा पाठ आहे. परंतु तो अपपाठ दिसतो. १९. जिंकिलें आहे (आपल्या नील कांतीनें) आकाश जिनें अशी. **वसंततिलकावृत्त.** २०. विश्वास पूज्य आहेत पावलें ज्याचीं अशा पतीनें (=रामानें). २१. अनिवार शोकानें उत्पन्न झालेल्या आसवांनीं दाटला आहे कंठ ज्याचा अशा दिरानें (=लक्ष्मणानें). **उपजातिवृत्त.** २२. मातर्! नमस् ते=माते! तुला वंदन करितों. क्षमस्व (अहं) अपराधी न (अस्मि)= क्षमा कर. (मी) अपराधी नाहीं. या चरणांतील वाक्यें संस्कृत आहेत, म्हणून 'क्षमस्व' व 'अपराधी' यांतील संधि चुकीचा नाहीं. २३. परतंत्र.

बोलोनि हें नम्र झाला, रडे फार; अस्रालि[1] ते मौक्तिकांचा जणों हार. ॥ ३२

ऐसें ऐकोनि वाणीतें शोकें, दीर्घस्वरें रडे. ।
मूर्च्छावातविनिर्धूता[2] सीतारंभा[3] धेरे[4] पडे. ॥ ३३

करूनि वामहस्ताचें[5] छत्र शक्रजिदंतक,[6] ।
सांशुकातें[7] दक्षिणातें[8] करी सत्तालवृंतक.[9] ॥ ३४

तिच्या तनुसि शिंपुनी स्वनयनोदकें, 'लेखनी,'
म्हणे, 'तव जळो विधे! सुविषमाक्षरांची[10] खनी. ।
असेल घडली जरी रघुवरांघ्रिसेवा[11] मला,
प्रशोकभरमूर्छिता[12] त्वरित हे उठो कोमला.' ॥ ३५

अंतर्बहिस्थित[13] रघूत्तमसूनु धांकें,[14] प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया. ।
मोहांधकारपतिता[15] विधिच्या विपाकें,[16] नेत्रें हळूच उघडी रघुवीरजाया. ॥ ३६

निघूनियां[17] कश्मलसिंधुच्या कडे,[18] पाहे दिराच्या मुखनीरजाकडे; ।
बोले, 'मला त्यागुनि काननीं कसा जाशील वत्सा! स्वपुरासि लोकसा[19]? ॥ ३७

मदर्थ स्नेहानें सदयहृदया! त्वां निजकरें
जनस्थानीं[20] केलीं छेदनसदनें[21] हृत्सुखकरें, ।
फळें पुष्पें मूळें प्रतिदिवस आणूनि सुरसें,
वनातेंही केलें, श्रम न गणुनी, स्वात्मघरसें.[22] ॥ ३८

---

१. अश्रुपंक्ति, आसवांचा ओघ. **उत्प्रेक्षालंकार. सारंगवृत्त.** २. मूर्च्छनारूप वायूनें कांपविलेली. ३. सीतारूप केळ. **परंपरित**रूपक. ४. पृथ्वीवर. **अनुष्टुप्छंद.** ५. डाव्या हाताचें. ६. लक्ष्मण. ७. वस्त्र आहे ज्यांत अशास. ८. उजव्या हाताला. ९. चांगला पंखा. १०. दुष्ट अक्षरांची खाण अशी (लेखणी). दुष्ट अक्षरें लिहिणारी. ११. रामाच्या चरणांची सेवा. १२. मोठ्या शोकानें मूर्च्छित झालेली. **पृथ्वीवृत्त.** १३. आंतील (=गर्भांतील) व बाहेरील रघुवंशज म्ह० गर्भस्थ अपत्य व लक्ष्मण. १४. भिई. येथें 'रघूत्तमसूनु' हें अनेकवचन असून, 'धाके' हें क्रियापद एकवचनी आहे. हा 'काव्येतिहाससंग्रहां'तील पाठ आहे. कदाचित् 'अंतर्बहिः-स्थितरघूत्तमसूनुधांकें' असें तृतीयांत सामासिक पद खरा पाठ असावें. धाकें=भीतीनें. प्राकृत संस्कृत ज्यांचे अवयव आहेत असे समास मोरोपंतांच्या काव्यांत व सद्यःकालीन मराठींतही आढळतात. १५. मूर्च्छारूप अंधकारांत पडलेली. १६. दैवाच्या परिणामानें, दैवाच्या विलक्षण करणीनें. **वसंततिलकावृत्त.** १७. मूर्च्छारूप समुद्राच्या तीरास येऊन म्ह० सावध होऊन. **रूपक.** १८. मुखकमलाकडे. १९. परक्यासारखा, तिऱ्हाइताप्रमाणें. **इंद्रवंशावृत्त.** २०. दंडकारण्यांत, नाशिकप्रांतीं. २१. पर्णकुटिका. २२. सु+आत्म+घरसें=चांगल्या आपल्या स्वतःच्या (राहत्या) घराप्रमाणें. **विरोधाभास** अलंकार. 'स्वात्मघरसें' हा संस्कृतप्राकृतावयवी समास चिंत्य आहे. **शिखरिणीवृत्त.**

आतां मदर्थ, वद, कोण तशा विशाळा, येथें करील तुजवांचुनि पर्णशाळा? ।
जातोसि टाकुनि कसा मज एकलीला? हा! [1]दारुणा परमपापविपाककीला.॥ ३९
पूर्वी पुढें सतत रक्षित **राम** होता, [2]काळानळीं सुरसपत्नघृतासि होता. ।
मागें तसाचि, मज मानुनियां [3]**सु**मित्रा, केलेंचि रक्षण सदैवहि तूं [4]**सु**मित्रा! ॥ ४०

माथां रत्नकिरीट, [5]कुंडलयुग [6]श्रोत्रीं विराजे बरें,
बाहू [7]अंगदभूषणें विलसती, [8]सन्मध्य पीतांबरें; ।
कंठीं मौक्तिकहार, चंदनउटी अंगीं, [9]घनश्यामला
ऐसी **रा**घवमूर्ति यावर कधीं भेटेल वत्सा! मला? ॥ ४१

[10]सांद्रानंदसुधानिधि, [11]स्मितजित**प्रद्युम्नरा**कापती,
ज्यातें पाहुनि [12]देवलोकवनिता [13]कामज्वरें [13]कांपती; ।
[14]कस्तूरीतिलकाभिराम [15]मम हृन्नेत्रैकविश्राम तें,
रम्य [16]श्मश्रुल **रा**घवानन कधीं भेटेल वत्सा! [17]मतें? ॥ ४२

अंतर्बहिर्[18]भवरवि [19]स्वकरें सदाही [20]मिथ्याप्रपंचपथिकास नरास [21]दोही. ।
[22]तत्तापसंततिस जो स्मरणेंच नाशी, [23]रामांघ्रि देइल कधीं सुख लोचनांशी? ॥ ४३

'**सी**ते! **सी**ते!' [24]म्हणवुनि वनीं शोधितां नित्य मातें,
जो आलिंगी [25]निजभुजयुगीं वद्द [26]वल्लीद्रुमातें, ।

१. दुर्दैवाच्या करणीची ज्वाळा मोठी कठीण आहे! **अर्थांतरन्यास** अलंकार. चतुर्थचरण **सुभाषितमय** आहे. **वसंततिलकावृत्त.** पाठभेदः–'°विपाकलीला.' २. देवांचे सपत्न (=शत्रू) म्ह० राक्षस तेच तूप त्यास मृत्युरूप अग्नींत होमणारा; राक्षसांचा काळ. **परंपरितरूपक.** ३. लक्ष्मणाची आई. ४. हे लक्ष्मणा! ५. कुंडलांची (=कुड्यांची) जोडी. ६. कानांत. ७. दंडकडीं वगैरे दागिने. ८. सुंदर कटिभाग. ९. मेघाप्रमाणें नीलवर्ण. **शार्दूलविक्रीडित.** १०. अत्यंत आनंदरूप अमृताचा ठेवा. ११. हास्यानें जिंकिला आहे प्रद्युम्न (=मदन) आणि राकापती (=चंद्र) ज्यानें असें. राका=चंद्रिका, चंद्रप्रकाश. १२. अप्सरा. १३. मदनविरहाच्या तापानें कांपतात. हें वर्णन सीतेच्या तोंडीं जरा अप्रशस्तच आहे. १४. कस्तूरीच्या टिळ्यानें सुंदर (दिसणारा). १५. माझ्या मनाचें व डोळ्यांचें एकटें आरामस्थान. १६. ज्यावर केंस (=मिशी) आहेत असें. १७. मातें, मला. १८. संसाररूप सूर्य. १९. आपल्या किरणांनीं. २०. आभासमय (=खोटा) जो संसारमार्ग त्यावरील पांथांस (=प्रवाश्यांस). **परंपरितरूपक.** २१. जाळतो, भाजितो. हें श्लोकार्ध सुंदर **सुभाषित** आहे. २२. त्याच्या संतापश्रेणि, त्याला एकसारखा होणारा जो ताप (त्रास), त्याला. २३. रामाचा पाय. **वसंततिलकावृत्त.** २४. 'म्हणवुनि' आणि 'म्हणुनि' यांचा पंतांनीं अनेक वेळां अभेदानें उपयोग केलेला आढळतो. २५. आपल्या बाहुद्वयानें. 'युग भुजयुगीं' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे. तो अपपाठ दिसतो. युग=जोडी. २६. लता आणि झाडें यांना.

मत्प्राप्त्यर्थ द्विजवरसखा, मुख्य [१]भर्ता जगाचा,
पूर्वी झाला वि[२]रहविमना मित्र [३]शाखामृगांचा. ॥ ४४

जाणोनियां [४]क्षिप्र [५]मदाशयाला, म्हणे धरावें [६]प्रमदाशयाला; ।
येऊनि पूर्वी मम [७]तातपूतें, केला धनुर्भंग नितांत [८]पूतें. ॥ ४५

[९]मद्दिधिकलशभवानें [१०]रामकृपासिंधु शोषिला सारा; ।
आतां मज [११]शफरीला कैंचा अन्यत्र [१२]वांसरा! थारा? ॥ ४६

[१३]स्वभ्रातृघातोद्यमभीषणातें, [१४]व्यापार हा योग्य बिभीषणातें; ।
वत्सा! तुझी केवळ नम्र मुद्रा; कां धाडिलें [१५]तूंज [१५]दयासमुद्रा? ॥ ४७

त्यजावया मज जनहीन काननातें, [१६]प्रयोजिला अदय [१७]सुकंठ कां न नाथें? ।
कुकर्म हें विहि[१८]त तया [१९]वलीमुखाला, तुझ्या [२०]मलीमसरुचि [२१]पावली मुखाला. ॥ ४८

[२२]श्वश्रूजनासि माझें नमन निवेदूनि, [२३]सर्वविदितनया! ।
स्मरण धरुनि, सांगावा निरोप हा त्यास [२४]पंक्तिरथतनया.' ॥ ४९

[२५]सांगुनि असें दिराला, निरोप हा पाठवी [२६]क्षितिवराला. ।

---

१. पति, नायक. २. वियोगानें दुःखी, कष्टी. ३. वानरांचा. 'वानरांचा मित्र झाला' हें वाक्य द्व्यर्थी आहे. एक, सुग्रीवाबरोबर सख्य करून वानरांचा मित्र झाला; दुसरें, तरुलतांना आलिंगून वानराप्रमाणें वनचर भासूं लागला. **विषमालंकार. मंदाक्रान्तावृत्त.** ४. लवकर. ५. माझ्या मनोदयाला. ६. स्त्रीकराला. शय=हात. प्रमदाशयाला धरावें=स्त्रीचें पाणिग्रहण करावें, विवाहविधि करावा. ७. (माझ्या) बापाच्या नगरीला, मिथिलेला. ८. पवित्रानें. हा श्लोक मागील श्लोकाच्या पूर्वींचा असावा असें वाटतें. नाहीं तर गोष्टींची कालपरंपरा जुळत नाहीं. **उपजातिवृत्त.** ९. माझ्या दुर्दैवरूप अगस्तीनें. १०. रामदयेचा सागर. ११. मत्सीला. **परंपरितरूपक.** १२. हे वत्सा लक्ष्मणा! **गीतिच्छंद.** १३. आपल्या बंधूचा (=रावणाचा) घात करण्याचा उद्योग करण्याइतका क्रूर, त्यानें. हें विशेषण सीतेनें बिभीषणाला लावणें जरा अयोग्यच. १४. धंदा, कृत्य (सीतात्यागाचें). **समालंकार.** १५. दयासागराला तुला. **विषमालंकार. उपजातिवृत्त.** १६. नेमिला. १७. वानरराज सुग्रीव. १८. योग्य. १९. माकडाला. **समालंकार.** २०. काजळाची कांति, काळिमा. २१. लागली. **रुक्मिणीवृत्त.** २२. सासूंना. 'जन' हा शब्द समुच्चयवाचक आहे. २३. समग्र नीति जाणणाऱ्या लक्ष्मणा! २४. दशरथाच्या मुलाला, रामाला. **गीतिवृत्त.** २५. इतकें सांगून. सीतेनें आपला निरोप सांगण्यास सुरवात केली आहे; व त्याचा प्रस्ताव पंतांनीं या गीतींत केला आहे. काव्येतिहाससंग्रहांत ही गीति ५४ व्या श्लोकानंतर आहे. परंतु ती मोठीच चूक आहे. कारण ५१–६१ या १० श्लोकांत सीतेचा निरोप आहे. ६२ व्या श्लोकांत निरोप संपल्याचें कवीनें स्पष्ट लिहिलें आहे. प्रस्तुत गीतींत त्या निरोपाचा स्पष्ट प्रस्ताव केलेला आहे. तेव्हां ही गीति मध्यंतरींच न येतां ५१ व्या श्लोकाच्या पूर्वींच आली पाहिजे हें उघड आहे. म्हणूनच ती आम्हीं येथें घातली आहे. २६. राजाला, रामाला. येथें पहिल्या दोन व शेवटल्या दोन चरणांत **यमक** आहेत.

दृढ करुनि हृदय, कानें तो ऐकावा समस्त रसिकानें. ॥ ५०
'ध्यानेक्षणें[1]करुनियां हृदयाख्यधामीं[2] पायांसि लक्षित असें तुमच्या सदा मी. ।
प्रत्यक्ष लागुनि परी मम मस्तकाला, देतील यावर कधीं न कळे सुखाला. ॥ ५१
हृत्कायवाक्कर्मजदोष[3] मातें नसे, कसें हें न कळे वैराला[4]? ।
सत्वक्षयें[5] पातक; अन्यथा, मी, न वाहतें हीन[6] कलेवराला[7]. ॥ ५२
आहे मी सत्वसंपन्ना[8], कृपात्याग नका करूं; ।
असाधु अथवा साधु परंत्वत्याज्य[9] लेंकरूं. ॥ ५३
अपराधवियुक्ता[10] मी, परि मज त्यजिलें[11] वनांत भूमिवरें. ।
बुध म्हणति, 'दैव दुस्त्यज.' तें आलें प्रत्ययासि[12] आजि बरें. ॥ ५४
दोषज्ञ! सेव्य! सुचरित्रसुधैकासिंधो[13]! सर्वैकवंद्य! नृपसत्तम! दीनबंधो! ।
कां त्यागिलें मज वनीं? करुणांबुवाहा[14]! त्वद्विप्रयोग[15] बहु दारुण राघवा! हा. ५५
त्वत्पादपद्मभजनाविण भारभूतें[16] या जीवितेंकरुनि केवळ भार भूतें[17]. ।
टाकूं जरि त्वरित निंद्य कलेवराला, विघ्नस्वरूप तव वीर्यनिषेक[18] झाला. ॥ ५६
वियोगभीतिस्तव विग्रहांतें[19] नें[20] लाविला चंदनलेप हातें; ।

१. चिंतनरूप डोळे, त्यांच्या योगानें. 'ध्यानें क्षणें करुनियां' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे, परंतु तो चुकीचा आहे. २. मनोरूप मंदिरांत. **वसंततिलकावृत्त.** ३. मन, शरीर, वाणी व करणी यांजपासून उत्पन्न होणारें पाप; मानसिक, शारीरिक, वाचिक व क्रियात्मक पाप. ४. वराला=नाथाला. 'कळलें वराला' असा काव्येतिहाससंग्रहाचा पाठ आहे, परंतु त्याचा चांगलासा अर्थच होऊं शकत नाहीं. आमच्या पाठाचा अर्थ सुंदर होऊन, यमकावरून तोच खरा पाठ असावा हें निश्चित होतें. ५. गर्भनाशानें. ६. निरुपयोगी. ७. शरीराला. **उपजातिवृत्त.** ८. गर्भिणी. ९. परंतु+अत्याज्य=परंतु टाकण्यास अयोग्य. हें वाक्य मराठी असल्यामुळें हा संधि अगदीं चूक आहे. परंतु हा अपपाठ असावा असें दिसतें. व्याकरणशुद्धतेकडे पूर्ण लक्ष देणाऱ्या पंतांचा हा प्रमाद नसून, लेखकाचा असावा अशी जबरदस्त शंका येते. 'परीं अत्याज्य' असा मूळचा पाठ असावासें वाटतें. **अनुष्टुप्छंद.** या श्लोकाचें द्वितीयार्ध **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यास.** १०. निरपराध. ११. येथें 'त्य' या संयुक्त व्यंजनानें मागील ऱ्हस्व स्वरास दीर्घत्व आणिलें नाहीं. असें पंतांच्या काव्यांत क्वचितच आढळतें. १२. प्रतीतीस, अनुभवास. हें गीतीचें द्वितीयार्ध **सुभाषित**मय आहे. **अर्थांतरन्यासालंकार.** **गीतिवृत्त.** १३. उत्तम चरित्ररूप अमृताच्या ठेव्या! १४. दयाघना. १५. तुझा विरह. येथें सर्वगुणैकसंपन्न असा जो राम, त्यापासून उत्पन्न होणारा वियोग फार कठिण आहे असें वर्णन असल्यामुळें हें एक प्रकारचें **विषम** आहे. **वसंततिलकावृत्त.** १६. जड वाटणाऱ्या. १७. पृथ्वीला. १८. वीर्यसिंचन, गर्भ. १९. शरीराला. २०. तुमच्या व माझ्या शरीराला थोडासा तरी अलगपणा येईल म्हणून मीं कधींही अंगाला चंदनाची उटी सुद्धां लाविली नाहीं.

मध्यें[1] नदीपर्वतवृक्षलक्ष येऊनि, झालासि कसा अलक्ष[2]? ॥ ५७
प्रसूति झाल्यावरि, देहनाथा! करीन मी तीव्र तप[3]:प्रयोगा; ।
जन्मांतरीं होउनियां तुझी स्त्री, जेणें[4] न पावें क्षण विप्रयोगा. ॥ ५८
स्वहृदय अशनि[6]हुनि कठिण, हें तथ्यचि या क्षणीं मला कळलें. ।
विरह[5]घनपतनविदलित[7] आजुनि शतचूर्ण[8] होइना जळलें[9]. ॥ ५९
अंतर्वत्नी[10] पत्नी त्यजिली त्वां, जेंवि [11]पांसुला रामा[12]. ।
हें काय विहित तुझिया कुळास, [13]शीळास? पंडिता[14]! रामा! ॥ ६०
त्वत्पादनीररुहलंपट[15] चित्त माझें; त्याणेंहि आजि मजला त्यजिलें सखा[16] जें. ।
होतां स्वदैव विपरीत, निजाप्तमित्रें होताति, केवळचि हेतुविना, [17]अमित्रें.' ॥ ६१
निरोप हा सांगुनि देवराला[18], सीता तयाला मग दे वराला[19]. ।
म्हणे, 'तुतें क्षेम[20] असो अशातें; सदा सुबुद्धे! बहु पाव शातें[21]. ॥ ६२
एवं कथावा रघुनंदनातें, निरोप हा, सांगुनि वंदनातें. ।
[22]केलेल जैसें तुजला, कृपाळा! जाऊनि तैसें विनवीं नृपाळा.' ॥ ६३
ओक[23]आत्मधनस्त्रीतें, ओकें[24] मानूनि मानसें, ।
तोकें[25]वद् रोदन तदा तो करी, ऐकतां [26]असें. ॥ ६४

---

१. लाखों नद्या, पर्वत व झाडें आड येऊन. काव्येतिहाससंग्रहाचा 'जाऊनि' असा पाठ आहे. २. अदृश्य. **विषमा**लंकार. **उपजातिवृत्त.** ३. घोर तपश्चर्या. ४. ज्या तपश्चर्येच्या योगानें. ५. विरहाला. ६. वज्राहून कठिण. ७. वियोगरूप जो घण (=मोठा हातोडा) त्याच्या घावानें फुटलेलें. ८. राई राई एवढें शंभर छकलें झालेलें. ९. मेलें, दुष्ट. (हा शब्द नेहमीं स्त्रियांच्याच बोलण्यांत येतो.) येथें **व्यतिरेक** व **काव्यलिंग** असे दोन अलंकार आहेत. **गीतिवृत्त.** १०. गरोदर. ११. जारिणी. १२. स्त्री. १३. स्वभावास. १४. शाहण्यासुर्त्या! हें विशेषण हेतुगर्भ असल्यामुळें **परिकरालंकार** झाला आहे. १५. तुझ्या चरणकमलीं रममाण झालेलें. १६. मित्र, सोबती, माझें मन म्हणजे माझा नेहमीचा सोबती; परंतु तेंही आज तुझ्या पायीं आसक्त होऊन मला आज सोडून गेलें. मी **शून्यवृत्ति** झालें आहें—हा भावार्थ. येथें 'त्वत्पाद०' हें विशेषण सहेतुक आहे म्हणून **परिकर.** तसेंच 'मन सखा असूनही सोडतें' म्हणून **विरोधाभास.** १७. शत्रु. हें श्लोकार्ध सुंदर **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यासा**लंकार. **वसंततिलकावृत्त.** १८. दिराला. १९. आशीर्वादास. २०. कल्याण. २१. सुखाला. **उपजातिवृत्त.** २२. तुला जसें बरें दिसेल तसें. २३. घर, आपलें द्रव्य व पत्नी यांस. ओकस्=घर. 'ओकस्' हा शब्द विसर्गान्त असल्यामुळें, समासांत पुढील 'आ-' स्वरानें त्याचा लोप झाला व बाकी राहिलेला 'अ' हा स्वर प्रगृह्य (=असंधेय) झाला. तेव्हां 'ओकआत्मधन०' हा समाससंधि चुकीचा नाहीं. २४. ओकारी. २५. लहान मुलासारखा. २६. येथील 'ओक–ओक' व 'तोक(वत्)–तो क(री)' हे आद्ययमक. **अनुष्टुप्छंद.**

'[1]विपिनीं वनदेवता सदा तुज रक्षूत, न दुःख हो कदा.' ।
मृदु बोलुनियां असें, तिला नमुनी, **लक्ष्मण** वीर चालिला. ॥ ६५

**अ**योध्येला जातां, त्यजुनि तिजला, तो बहु रडे,
[2]तनू नेली कष्टें, परि मन तयाचें न मुरडे. ।
जसा वत्स [3]स्वांबाविरहभवतापें तळमळे,
तसा हाही, ज्याचें वदन रडतां [4]केवळ मळे. ॥ ६६

[5]नयनागोचर देवर झाल्यावर, ती पडे [6]धरेवरती. ।
तळमळ करि, पळभरि [7]कळ न पडे, करपद तिला न [8]आंवरती. ॥ ६७

जनहीन वनस्थानीं दीना, **जनक**नंदिनी, ।
[9]राजरामा, [10]रजोरिक्ता, रुचिराक्षी, रवें रडे. ॥ ६८

झाला दिसेना असा जे क्षणीं दीर, गेला तिचा, तीस सोडूनियां, धीर; ।
[11]हृच्छोकवल्मीकभूकश्मलव्याळ चावे, धरी घट्ट [12]मातेसि तत्काळ. ॥ ६९

[13]गळतीसमान नयनें गळती; [14]लपनें न येति [15]धडे [16]आलपनें; ।
[17]निजविग्रहासि उठवी निजवी; **जन**कात्मजा स्मरतसे जनका. ॥ ७०

शोक [18]लास्य करी [19]हृदंगणि, कंठ केवळ शोकला,
कोमलाननपूर्णचंद्र तिचा तदा बहु [20]कोमेला, ।
'कां पती रुसला?' म्हणे, सकळेंद्रियें बहु कांपती,
भार तीस निजांग होय; वदे अशी मग [21]भारती. ॥ ७१

---

१. रानांत. **वियोगिनीवृत्त**. २. मनाचा आधार जी तनू, ती नेली तरी मन फिरेना, असें वर्णन आहे, म्हणून ही **विशेषोक्ति.** ३. आईच्या वियोगापासून होणारें दुःख त्यानें. ४. नुसतें, पूर्णपणें. **शिखरिणीवृत्त.** ५. डोळ्याला दिसेनासा. ६. जमिनीवर. ७. कळ (=दुःख) थांबेना. किंवा कळ=कळणें, समज. जसें 'लाळणें'पासून 'लोळ.' ८. सांवरती, पेलती. **गीतिवृत्त.** ९. राजाची स्त्री, राणी. १०. रजोगुणरहित, सात्विक. सत्वरजस्तम हे तीन गुण असून यांच्या मिश्रणानें मनुष्याचा स्वभाव बनलेला असतो. **अनुष्टुप्वृत्त.** येथें पूर्वार्धांत '**न**'चा **श्रुत्यनुप्रास** असून उत्तरार्धांत 'ज' आणि 'र' यांचा **छेकानुप्रास** आहे. ११. हृदयांतील शोक हेंच वारूळ त्यापासून उत्पन्न झालेला मूर्च्छारूप (=कश्मळ) साप. **परंपरितरूपक.** १२. आईला, पृथ्वीला. **सारंगवृत्त**. १३. अभिषेकपात्राप्रमाणें. १४. मुखानें. १५ नीट. १६. बोलणें, शब्द. १७. आपल्या शरीरास. **स्वभावोक्ति. प्रमिताक्षरावृत्त.** येथील 'गळती–गळती' 'लपनें (आ)लपनें' 'निजवि(ग्रह)–निजवी' 'जनका(त्मजा)–जनका' हीं **आद्यंत यमकें** पाहण्यासारखीं आहेत. १८. नाच. १९. मनोरूप अंगण्यांत. २०. निस्तेज झाला, कोमेजला. २१. वाणी. येथी-लही प्रत्येक पादांतील **आद्यंतयमक** सुंदर आहेत. **विबुधप्रियावृत्त.**

'जनकाची मी कन्या, रघुपतिची स्त्री, त्रिविष्टपीं[1] मान्या, ।
तदपि अशी मदवस्था; शिव! शिव! लिहिलेंसि काय? कमळस्था[2]!॥ ७२

येईल लक्ष्मण फिरोनि, न दूर गेला,
मद्धैर्य[3]लोकविषयींच विनोद[4] केला; ।
कीं स्वप्न हा क्षणिक दुःखसुखप्रदाता?
किंवा स्वकर्मफळ भोगवितो विधाता[5]?॥ ७३

रघुकुळतिळका! मेदिनीपाळका[6]!
सुहृदयपदका[7]! पापपंकोदका[8]! ।
सुहृदलिकमला[9]! नीरदश्यामला[10]!
अतुलभुजबळा! भग्नरक्षोबळा[11]! ॥ ७४

प्रवर्तोनियां सर्वथा आग्रहातें[12], त्यजावें जरी येक्षणीं विग्रहातें[13], ।
तरी[14] भ्रूणहत्येमुळें उग्र हातें करील स्वयें धर्म तो विग्रहातें.' ॥ ७५

तोषधनाचे तस्कर[15], त्या सीतेचे असे विलाप वनीं ।
शिरले जेव्हां सत्वर दुःखप्रद ते चढोनियां पवनीं[16]; ॥ ७६

शुक पिक सकल कलकलस्वरेंकरुनि भोंवतींच आरडती, ।
विविधपतगनिकररवच्छलेंकरुनि[17] भूमिभूलता[18] रडती. ॥ ७७

---

१. त्रिजगांत. २. कमलासना! ब्रह्मदेवा! **गीतिवृत्त. विषम.** ३. माझें धैर्य पाहण्यासाठीं. ४. मस्करी. ५. ब्रह्मदेव. येथें **संदेहा**लंकार आहे. **वसंततिलकावृत्त.** ६. महीपाळा! राजा! ७. ज्याच्या हृदयावर सुंदर पदक आहे अशा! ८. पापरूप चिखलाच्या (=चिखल धुऊन टाकणाऱ्या) जला! ९. सज्जनरूप भ्रमरांच्या कमला! १०. मेघश्यामा! घननीला! ११. भंगिलीं(=मारिलीं) आहेत राक्षसांचीं बळें (=सैन्यें) ज्यानें अशा तूं! **चंद्रिका** किंवा **उत्पलिनीवृत्त.** १२. हट्टाला पेटून. १३. शरीराला. १४. अन्वयार्थः–तरी भ्रूणहत्येमुळें (=गर्भहत्येमुळें) तो उग्र धर्म स्वयें (=स्वतः यमधर्म) (आपुल्या) हातें विग्रहातें (=दंडानें, शिक्षेला) करील. **भुजंगप्रयातवृत्त.** १५. आनंदरूप द्रव्य चोरणारे चोर, अत्यंत करुणामय व दुःखजनक. **परंपरितरूपक.** 'तोषधनाचे' ही **कर्मणि षष्ठी** आहे. १६. वाऱ्यावर बसून, वाऱ्याबरोबर जाऊन. **गीतिवृत्त.** गीति ७६ व ७७ यांचें **युग्म** आहे. १७. विविध+पतग+निकर+रव+च्छलें+करुनि=नाना+पक्षि+गण+शब्द+मिषें+करुनि. १८. भूमिभू+लता=वृक्ष व लता. वृक्ष व लता हीं गहिंवरून पक्ष्यांच्या किलकिलाटाच्या मिषानें रडूं लागलीं. ही **मिषापह्नुति** आहे. ही गीति व पुढील ८७ पर्यंतचीं पद्यें यांत उत्तम pathetic fallacy म्हणजे **करुणात्युक्ति** आहे.

टाकुनि नाट्यरसातें[1] धांवुनि आले तिच्या समीप शिखी,[2] ।
शिंपुनि निज नेत्रजळें, म्हणति, 'सतीचा विझो प्रकोपशिखी.'[3] ॥ ७८

शिंपिति नेत्रजळांहीं, स्वल्प शिवति, भूमि धांवतां हरिणें; ।
स्वदुहितृशुगग्नितप्ता[4] क्षिति म्हणउनि पोळती जणों चरणें. ॥ ७९

शीतळकमलजळांहीं वर्षति तीच्या तनूवरि भ्रमरी. ।
निजवालधिचमरांहीं[5] वीजिति[6] तिस किंकरींपरी[7] चमरी.[8] ॥ ८०

मुमदालसा, जलार्द्रा, ज्यांच्या सजळें करीं,[9] शिरीं कमळें, ।
ऐशा करिणी सेविति तिस [10]कर्णव्यजनमारुतें विमळें. ॥ ८१

[11]उदकस्थखगगणांहीं धांवुनि ते शिंपिली जलकणांहीं. ।
करिति [12]शकुंतद्विजवर पक्षच्छायेसि शीघ्र तीजवर. ॥ ८२

झालें हंसांचें कुळ[13] तें व्याकुळ तेथ जानकीशोकें, ।
ज्यांच्या मुखनयनांहुनि गळति मृणालें[14] जळें तदवलोकें.[15] ॥ ८३

[16]पंचास्यव्याघ्रऋक्षप्रभृतिवनचरें केवळें[17] क्रूर सत्वें,[18]
तींही तत्काळ झालीं सकरुणहृदयें [19]भूसुताशुद्धसत्वें ।
जें [20]सन्मार्गप्रचारेंकरुनचि असतें संग्रहीं पुण्य हो! तें
[21]सर्वव्यापन्महीध्रप्रशमनविषयीं वज्रवत् दक्ष होतें. ॥ ८४

कुशें,[22] कंटक, गोक्षुर,[23] संचरणीं[24] चरणीं क्षतद[25] स्वमुखें शिवती, ।
शिवें[26] ती परि भूपतिची रमणी रमणीयपदांसि जपे पतिच्या. ॥ ८५

---

१. नाचण्याच्या रंगाला. २. मोर. ३. दुःखरूप अग्नी. प्रकोप=संताप, दुःख. येथें **उत्प्रेक्षाध्वनि** आहे. ४. आपली मुलगी (सीता) तिच्या दुःखरूप अग्नीनें पोळलेली. शुक्–ग्=दुःख, शोक. **हेतूत्प्रेक्षा**. ५. आपल्या पुच्छरूप चवरींनीं. वा(बा)लधि=पुच्छ. ६. वारा घालितात. ७. दासींप्रमाणें. ८. हरिणी. ९. सोंडेंत. १०. कान हेच पंखे, त्यांच्या वाऱ्यानें. ११. जलांत राहणाऱ्या पक्षिसमूहांनीं. १२. शकुंत नांवाचे उत्तम पक्षी. १३. मंडळ, समूह. १४. कमळांचे देंठ. १५. त्याच्या दर्शनानें, तें पाहून. १६. सिंह, वाघ, अस्वल इत्यादि रानटी जनावरें. १७. सर्वस्वीं, सर्वथैव. १८. प्राणी. १९. महीजा जी जानकी तिच्या सात्त्विकवृत्तीनें. २०. चांगल्या आचरणानें. २१. सर्व दुःखरूप पर्वताच्या नाशांत. येथें **रूपक** व **उपमा** यांचा संकर आहे. या श्लोकाचें उत्तरार्ध **सुभाषित** आहे. **शार्दूलविक्रीडित.** २२. दर्भ. २३. कांटेगोखरू, सराटे. २४. चालतांना. २५. क्षतें (=जखमा) पाडणारीं. काव्येतिहाससंग्रहाचा 'क्षतदस्थ मुखें' असा पाठ आहे. परंतु तो अर्थहीन असल्यामुळें अपपाठच समजला पाहिजे. २६. कल्याणकर. हें 'पदांसि' या विशेष्याचें विशेषण. **तोटकवृत्त.** येथें '(सं)चरणीं–चरणीं,' 'शिवती–शिव ती,' 'रमणी–रमणी(य)' हीं **दामयमकें** आहेत.

निजजननी क्षिति, हेही[1] क्षितिजा, जाणूनियां असें नातें, ।
आलिंगुनि समजाविति म्हणउनि धूलिस्वसा[2] जणों तीतें. ॥ ८६

हृद्गत मी परि कांहीं इच्या श्रमाचा नव्हेचि परिहार, ।
म्हणुनि जणों अश्रूतें[3] गाळी मुक्ताफळच्छळें हार! ॥ ८७

संगें घेउनि वेदशास्त्रनिपुण छात्रांसि[4] त्या काननीं[5]
यूपार्थ भ्रमतां,[6] क्रतुस्तव[7] विलापातें तिच्या ऐकुनी, ।
साक्षाद्भस्मजटाभृदीश्वर[8] जणों मूर्ती जगत्पावनी
आला तेथ दयानिधान भगवान् वाल्मीकिनामा मुनी. ॥ ८८

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
हा चवथा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ८९

---

## अध्याय पांचवा.

समीप येऊनि कळेवराशी[9] पाहे, तदा त्यासि कळे वरांशी.[10] ।
जेणें न राहे श्रमभार[11] तीचा, केला मृदूपक्रम[12] भारतीचा. ॥ १

'वत्से! काय तवाभिधान[13]? रडसी कां काननीं निर्जनीं?
कोणाच्या सुकृतैकनीरनिधिच्या[14] वंशांत झाली जनी[15]? ।
कोण त्वत्पति? टाकिलें अकरुणें आणोनि येथें तुला
कोणीं? सर्वहि सांग तूं मज निज क्लेशाचिया हेतुला.[16]' ॥ २

वाणीतें ऐकतां, तीचें चित्त संतोष पावलें. ।
बोले, वंदूनि शिरसा[17] मुनिचीं दिव्य पावलें. ॥ ३

---

१. ही सीता सुद्धां. २. धूलिरूप बहीण. **उत्प्रेक्षालंकार. गीतिवृत्त.** ३. मोत्यांच्या मिषानें. शीतलहारानेंही तिचा संताप निवाला नाहीं, व ती लोळत असतांना तिच्या गळ्यांतील मुक्ताहार तुटला-हा भावार्थ. मोतीं शीतलत्वगुणानें संस्कृत कवींत प्रसिद्ध आहेत. येथें **हेतूत्प्रेक्षा** व **मिषापह्नुति** यांचा संकर आहे. ४. शिष्यांस. ५. अरण्यांत. ६. यज्ञस्तंभाकरितां फिरत असतांना. ७. यज्ञासाठीं. ८. जणूं काय प्रत्यक्ष भस्म व जटा धारण करणारा शंकरच असा. **उत्प्रेक्षालंकार. शार्दूलविक्रीडितवृत्त.** ९. शरीराजवळ. १०. वरा+अशी=चांगली, श्रेष्ठ अशी, थोरा मोठ्याची अशी. ११. श्रमांचें ओझें. १२. गोड बोलण्याचा आरंभ. भारतीचा=शब्दांचा, बोलण्याचा. **उपजातिवृत्त.** १३. मागें, पृ० ४४ टीप १३ पहा. १४. पुण्याच्या सागराच्या, अत्यंत पुण्यवानाच्या. १५. जन्म. १६. कारणाला. **शार्दूलविक्रीडित.** १७. मस्तकानें. 'शिरसा' ही 'शिरस्'शब्दाची संस्कृत तृतीया आहे. **अनुष्टुप्.**

'महामुने! [1]मैथिल तात माझा; मन्नाम सीता; पति रामराजा; ।
[2]भूवल्लभाज्ञाप्रियमंदिरानें आणूनि येथें, त्यजिलें दिरानें.' ॥ ४

ऐसें ऐकूनि, वाल्मीकि वदता जाहला मुखें, ।
[3]आकर्णावें रसज्ञांहीं स्वस्थ होऊनियां सुखें. ॥ ५

'सर्वज्ञानिजनासि [4]संमत असा श्रीमैथिल त्वत्पिता,
वत्से! तूंहि [5]पतिव्रताजनशिरोभूता जगत्पूजिता, ।
माझा केवळ तो सखा दशरथ [6]क्षोणीशचूडामणी,
या वेळेसि कशी न होशिल दयापात्र, क्षितिस्वामिणी![7] ॥ ६

केलें दुष्कर देवकार्य, सकल [8]क्ष्मादेव केले सुखी;
न्यायें भूपति पाळितो [9]निजजनक्लेशाटवीचा शिखी; ।
माझा क्रोध तथापि मैथिलसुते! आहेचि रामावरी,
दोषावांचुनि टाकिली अकरुणें [10]सत्वोदरी सुंदरी. ॥ ७

[11]रिपुयमयमपुत्रप्राप्तिला पावसी, ते
करितिल सुख तूतें; टाकिं चिंतेसि, सीते! ।
मुलि! उठ चल माझ्या [12]पुण्यपुंजाश्रमाला;
शिव! शिव! बहु रानीं पावलीस श्रमाला. ॥ ८

[13]मदाश्रमपदाश्रितस्थिरचरासहि [14]व्यापदा
कदापि न शिवे, सुखी [15]विगतवैर सारे सदा. ।
उदास हृदयीं न हो, [16]द्विजवधूसुता [17]शर्मदा
[18]न दावितिल भिन्नता तुज [19]महानुकंपास्पदा. ॥ ९

---

१. मिथिलेचा राजा, जनक. २. राजाच्या (=रामाच्या) आज्ञेचें आवडतें घर असा, त्यानें. रामाचा जो प्रिय असून, राम ज्याला विश्वासाचीं कामें सांगतात अशानें. ह्याचा 'दिरानें' या विशेष्याशीं संबंध आहे. **उपजातिवृत्त.** ३. ऐकावें. **अनुष्टुप्.** ४. मान्य. ५. सर्व पतिव्रतांत श्रेष्ठ. ६. राजाधिराज. ७. हे राज्ञि! येथें प्रथमेचे तीन चरण व चतुर्थ चरण यांत कारणकार्यसंबंध आहे व कारणदर्शक शब्द योजिला नाहीं, म्हणून **काव्यलिंगा**लंकार झाला. **शार्दूलविक्रीडित.** ८. ब्राह्मण. ९. आपल्या प्रजाजनांच्या व भक्तांच्या क्लेशरूप अरण्याचा शिखी (=अग्नि). **परंपरितरूपक.** १०. गर्भवती. या श्लोकाच्या द्वितीयार्धांत **काव्यलिंगा**लंकार आहे. ११. रिपु+यम+यम+पुत्र+प्राप्तिला=शत्रूचे यम (=नाशकर्ते) अशा जुळ्या मुलांच्या लाभास. यम=जुळें. १२. पुण्याचा केवळ सांठा अशा आश्रमाला. **मालिनीवृत्त.** १३. माझ्या आश्रमांत असणाऱ्या स्थावर जंगम वस्तूंसही. १४. दुःख, विपत्ति. १५. शत्रुत्वरहित. १६. ब्राह्मणस्त्रिया. १७. सुख देणाऱ्या. १८. भिन्नपणा दाखविणार नाहींत; परकेपणा दाखविणार नाहींत. १९. अत्यंत दयाळू. **पृथ्वीछंद. छेकानुप्रास.**

होइल सुखप्रसूती, [1]अपत्यसंस्कारविधिहि **भू**तनये! ।
वत्से! मदाश्रमाला मानुनियां [2]स्वगुरुचें निकेतन, ये.' ॥ १०

एवं तदा ऐकतां विप्रवाणीस, झाला महातोष [3]**का**कुत्स्थराणीस. ।
चित्तीं म्हणे, 'हा मुनि स्तुत्य [4]विश्वास, ठेवीं तयाच्या पदीं घट्ट [5]विश्वास.' ॥ ११

पुशी [6]**अ**वनिजा [7]निजाश्रुसलिलालिला सुविकला [8]कलानिधिमुखी. ।
उठूनि, नमुनी मुनीस, मग ती गती करि तदा [9]तदाश्रमपदा. ॥ १२

[10]सद्विद्यासक्तशिष्यव्रजतनयसुतास्त्रीयुत [11]ब्रह्ममाला
सामोऱ्या तीस आल्या, परिमुनि सहसा [12]**रा**मरामागममाला. ।
आशीर्वादामृतानें [13]मुनिवरघन ते तीवरी वर्षती; तें
पाहूनि ब्राह्मणांचें सदयपण, महा जाहला हर्ष तीतें. ॥ १३

म्हणति ऋषिस्त्री, [14]होतें स्पर्श करुनियां तदीय देहातें, ।
'आम्हीं सर्व [15]तवाश्रित, आलिस तूं आपुल्याचि गेहातें. ॥ १४

फार तूं श्रमलीस [16]हिंस्रगणाचिया भवनीं वनीं,
दुःखभीतिस यावरि **क्षि**तिकन्यके! न मनीं [17]मनीं.' ।
प्रार्थिली असि, पूजिली मग [18]तापसीनिकरें करें,
अर्पिलीं तिस कंदमूळफळें [19]मुनिप्रवरें [20]वरें. ॥ १५

मग [21]शिष्यप्रकरानें, पावुनि **वा**ल्मीकिच्या [22]निदेशाला, ।
निर्मुनियां स्वकरानें दिधली **भू**नंदिनीस [23]दलशाला. ॥ १६

---

१. मुलाचे लहानपणचे पुत्रावण, नामकरण, चूडाकरण इत्यादि संस्कार व विधि. २. आपल्या वडिलांचें घर. **गीतिवृत्त.** ३. रामाच्या राणीस. ४. विश्वाला. ५. भरंवसा. **सारंगवृत्त.** या श्लोकांत द्वितीयार्धांत **काव्यलिंग** आहे. ६. भूसुता, सीता. ७. आपल्या असवांच्या धारांना. ८. चंद्रवदना. ९. त्याच्या पर्णकुटीला. येथील **दामयमकें** पाहण्यासारखीं आहेत. **जलोद्धतगतिवृत्त.** पंतांनीं याच वृत्तांत व अशींच यमकें साधून एक सबंध रामायण लिहिलें आहे. १०. विद्याव्यसनी शिष्यांचे समूह, मुलगे, मुली व बायका यांसह. ११. ब्राह्मणवृंद. १२. राम+रामा+आगमाला=रामाच्या स्त्रीच्या येण्याला. १३. मोठमोठे मुनी हेच मेघ. **परंपरितरूपक. शार्दूलविक्रीडित.** १४. तिला हातानें कुरवाळून. १५. मागें, पृ० ४४ टीप १३ पहा. **गीतिवृत्त.** १६. श्वापदसमूहाच्या. १७. मानीं. या चरणाचा काव्येतिहाससंग्रहाचा असा पाठ आहे.–'दुःखभीति**समया**वरि **क्षिति** क्षितिकन्यके न मनीं मनीं.' परंतु हा पाठ चुकीचा आहे. कारण छंदोभंग व अर्थहीनत्व असे दोन दोष त्यांत आहेत. १८. तपस्व्यांच्या स्त्रीसमूहानें. १९. मुनिश्रेष्ठांनीं. २०. उत्तम. हें 'फळें' याचें विशेषण. **विबुधप्रियावृत्त. छेकानुप्रास.** २१. शिष्यगणानें. २२. आज्ञेला. २३. पर्णकुटी. **गीतिवृत्त.**

पूजी राघवपादुकांप्रति; नमी वाल्मीकिला ते सती;
सेवी तद्वदनोद्गतोत्तमकथापीयूषधारेस[1] ती; ।
सिंपी श्रीतुलसीवनासि तमसाविश्वंभराकारणें[2],
अर्पी वेंचुनियां सुमांसि मुनिच्या देवार्चनाकारणें. ॥ १७

वन्याहारपरा[3], कृशा, सुमलिना, संवीतवल्कांबरा[4],
कांतध्यानधरा, सदैव तमसास्नानैकबद्धादरा[5], ।
ऐशी रामवियोगतप्तहृदया सीता मुनींद्राश्रमीं,
कल्पव्यायतवासरांसि[6] परम क्लेशेंकरूनि क्रमी. ॥ १८

गर्भाचे नव मास पुण्यविपिनीं[7] संपूर्ण झाल्यावरी,
वृद्धस्त्रीसमुपासिता[8], जसि महासिद्ध्यासिता[9] शांकरी[10], ।
सल्लग्नग्रहयुङ्निशीथसमयीं[11] पुत्रद्वयातें सुखें
वैदेही प्रसवे, सती प्रमुदिता[12] गीतासि गाती मुखें. ॥ १९

शोभे प्रदक्षिणार्चि[13] स्वधेश[14], होतां सती प्रसूता हे, ।
झाल्या विमला काष्ठा[15], शीतळ सौरभ सदागती[16] वाहे. ॥ २०

द्युतिकरपुत्रयुगाला[17] यदा प्रसवली विदेहकुलभूषा, ।

१. श्रीवाल्मीकिच्या मुखांतून निघणाऱ्या कथामृताच्या धारांना. २. तमसा नदीच्या पाण्यानें. विश्वारंभीं 'पाणी' असून, त्यांतून 'पृथ्वी'ची उत्पत्ति झाली, या गोष्टीवर लक्ष्य ठेवून पाण्याला 'विश्वंभराकारण' (=पृथ्वीचा उत्पत्तिहेतु) असें म्हटलें आहे. 'सोऽभिध्याय शरीरात्स्वात्सिसृक्षुर्विविधाः प्रजाः । अप एव ससर्जादौ तासु बीजमवासृजत् ॥ ८ ॥ तस्मिन्नण्डे स भगवान् उषित्वा परिवत्सरम् । स्वयमेवात्मनो ध्यानात्तदण्डमकरोद्द्विधा ॥ १२ ॥ ताभ्यां स शकलाभ्यां च दिवं भूमिं च निर्ममे । मध्ये व्योम दिशश्चाष्टावपां स्थानं च शाश्वतम् ॥ १३ ॥' (मनुसंहिता--अध्याय १ ला.) **शार्दूलविक्रीडित.** ३. रानटी फळमूळांवर उपजीविका करणारी. ४. नेसली आहे झाडांच्या सालींचीं वस्त्रें जी, अशी. ५. तमसेच्या स्नानाची जिला अत्यंत हौस आहे अशी. ६. कल्पाप्रमाणें मोठे (=दुःखमय व म्हणून कंटाळवाणे वाटणारे) अशा दिवसांना. ७. पवित्र अरण्यांत. ८. म्हाताऱ्या स्त्रिया जिच्या भोंवतीं मिळाल्या आहेत अशी. ९. मोठमोठ्या सिद्धि जीच्याजवळ बसल्या आहेत अशी. १०. शंकरविभूति. ११. शुभ लग्न व ग्रह यांनीं युक्त अशा मध्यरात्रीच्या वेळीं. निशीथ=मध्यरात्र. १२. आनंदित. १३. प्रदक्षिण+अर्चि=उजवीकडे वळत आहेत ज्वाला ज्याच्या असा. हें एक शुभशंसक चिन्ह आहे. १४. स्वधापति, अग्नि. स्वधा आणि स्वाहा या अग्नीच्या पत्नी मानलेल्या आहेत. १५. दिशा. १६. वारा. **गीतिवृत्त.** १७. अत्यंत तेजस्वी अशा पुत्रांच्या जुळ्याला, दोन तेजस्वी मुलांना.

मुग्धांस[1] पर्णशाळा वाटे तेजेःसमूहमंजूषा[2]. ॥ २१

ज्या दलशालेमध्यें होता श्रुतिशास्त्रतत्वलीन[3] मुनी, ।
तेथें धांवत जाउनि बद्धांजलि[4] शिष्य बोलती नमुनी. ॥ २२

'ब्रह्मन्! भवत्प्रसादें सीता व्याली[5] किशोरयुगळाला[6], ।
त्याच्या तेजःप्रसरें दीपाचा गर्व सर्वहि गळाला. ॥ २३

भास्करविधू[7] म्हणावे, तरि तापकलंकसंवियोजित[8] कीं; ।
दिसताति साधुचिन्हें, सामुद्रिकशास्त्रसंमतें जितकीं. ॥ २४

कुशल वचन ऐकतांचि ऐसें, कुशलवमुष्टिधर[9] द्विजेंद्र गेला; ।
रुचिरवदनबालकद्वयाच्या रुचिरवसंग्रहणें[10] प्रहृष्ट झाला. ॥ २५

होते जे करपंकजीं[11] कुशलव क्ष्मानिर्जरें[12] रक्षिले,
त्यांहीं ते शिशु मंत्रपूततमसापाथःकणें[13] प्रोक्षिले[14]. ।
नामें तींच सुजातकर्मसमयीं[15] चित्तांतरीं भाविलीं[16],
बाराव्या दिवसांत नामकरणीं अत्यादरें ठेविलीं. ॥ २६

द्वादशाब्दीं[17] कुमारांचीं केलीं मौंजीनिबंधनें, ।
तपःशिखिमुखक्षिप्तस्वपूतवपुरिंधनें[18]. ॥ २७

१. भोळ्या लोकांना. काव्येतिहाससंग्रहकारांची 'स्त्रियांना' अशी टीप आहे. २. प्रकाशाच्या झोतानें भरलेली पेटी. **भ्रांतिमान्** अलंकार. ३. वेदशास्त्रांनीं प्रतिपादिलेल्या तत्वांचें मनन करण्यांत गढलेला. ४. हात जोडून. ५. हा शब्द हल्लीं स्त्रीजनांसंबंधें कधींच लावीत नाहींत. त्याचा केवळ जनावरांसंबंधेंच प्रयोग करण्यांत येतो. ६. मुलांच्या जुळ्याला. या गीतीच्या द्वितीयार्धांत **प्रतीप** अलंकार आहे. ७. सूर्यचंद्र. ८. (सूर्याप्रमाणें) दाह उत्पन्न करणारें तेज व (चंद्राप्रमाणें) कलंक यांहीं रहित. या अर्धांत **निश्चयान्त संदेहा**लंकार असून **क्रम** व **व्यतिरेकध्वनि**हि आहे. ९. दर्भ व लव्हाळे यांची मूठ (=मुठींत राहण्याइतकी जुडी) धरणारा. १०. रुचि+रव+संग्रहणें=कांति व शब्द यांच्या सेवनानें; कांति पाहून व शब्द ऐकून. **पुष्पिताग्रा** किंवा **औपच्छंदसिकवृत्त**. ११. हस्तकमलांत, हातांत. १२. भूदेवानें=ब्राह्मणानें. १३. मंत्रानें पवित्र केलेल्या तमसेच्या जलबिंदूंनीं. १४. शिंपिले. १५. पुत्रावणाच्या वेळीं. १६. मनांत आणलीं, मनांत ठरविलीं. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १७. बाराव्या वर्षीं. १८. तपोरूप अग्नीच्या वदनांत अर्पिलें आहे आपलें पवित्र शरीररूप इंधन ज्यानें अशानें, तपश्चरणानें कृश झालेल्या वाल्मीकिनें. येथें **परंपरितरूपक** व **पर्यायोक्त** असे दोन अलंकार आहेत. **अनुष्टुप्.** अर्थसादृश्य:–'आंगें होउनि सत्तपोहुतवहीं तो सर्वदा सर्पण, स्वच्छत्वें नृप जाहला सुमणिचा जैसा नवा दर्पण. ।' (मोरोपंतकृत भीष्मभक्तिभाग्य, स्फुटकाव्यें, भाग २ रा.)

मागोन आणवि तदा जो वसिष्ठमुनिच्या [1]नंदिनीप्रति मुनी,
प्रार्थी कवींद्र तिस पूजूनि विप्रजनसंभोजनार्थ नमुनी. ।
त्या कामधेनुतनुपासून दिव्य विविधान्नें बहु प्रकटलीं;
तत्सेवनें [2]विपिनवासिद्विजेंद्ररसनाग्रें मुखांत [3]नटलीं! ॥ २८

[4]विधृतचतु:षष्टिकला, [5]मुक्ताहारा, मनोहरा, विमळा, ।
वरिति चतुर्दश विद्यास्वयंवरवधू तयांस मग सकळा. ॥ २९

[6]अध्यापिली मुनीनें त्यातें [7]रामायणाभिधा स्वकृती, ।
गाती [8]वीणातालस्वरमिश्रितमंजु ते कुमार [9]कृती. ॥ ३०

[10]कुशलवगानावसरीं गीतरसें मृगकुळें न तीं चरती, ।
[11]अष्टौ सात्विक भाव श्रोतृगणीं एकदांचि संचरती. ॥ ३१

[12]कुशलवगानावसरीं तच्छ्रवणें भुजगलोचनें निवती, ।
शून्या होय [13]सुधर्मा, [14]पवनाचे द्वार फार मानवती. ॥ ३२

कोणी [15]कृपाण, कोणी [16]सुचर्म, कोणीं समर्पिले बाण; ।
कोणी किरीट, कोणी [17]कार्मुक, कोणीं दिलें [18]तनुत्राण. ॥ ३३

एवं त्यांच्या गानें झाला [19]नोहीं कधीं चमत्कार? ।
कोणीं पण विप्रांहीं केला नाहीं तयांसि सत्कार? ॥ ३४

१. वसिष्ठमुनीच्या आश्रमांत असणारी कामधेनूची मुलगी नंदिनी, तिला. याच नंदिनीला बळजबरीनें नेण्याचा विश्वामित्रानें घाट घातला होता, परंतु तो फसला. (मोरोपंतकृत महाभारत—आदिपर्व—'गोहरण' पहा.) २. अरण्यांत राहणाऱ्या ब्राह्मणांच्या जिभल्यांचीं बोंडें. ३. नाचलीं. या चतुर्थ चरणांतील वर्णनाची शैली जरा विनोदी (humorous) आहे. **अमृतध्वनिवृत्त.** ४. (विद्यापक्षीं) चौसष्ट कलांसह; (वधूपक्षीं) चौसष्ट कलांनीं संपन्न. ५. (विद्यापक्षीं) मुक्त जनांचेंही (=मुनीचेंही) मन आकर्षण करणाऱ्या; (वधूपक्षीं) मोत्यांचे हार घातले आहेत ज्यांनीं अशा. **श्लेषमूलक रूपक. गीतिवृत्त.** ६. शिकविली. ७. रामायण नांवाचें आपलें काव्य. ८. वीण्याचा आवाज व ताल यांच्याबरोबर मंजुळ रीतीनें. ९. हुशार. १०. कुश आणि लव यांच्या गाण्याच्या वेळीं. ११. आठही सत्वगुणद्योतक मनोविकार. अष्टौ=आठ. हें 'अष्टन्' या संख्याविशेषणाचें संस्कृत प्रथमेचें रूप होय. आठ सात्विकभाव:—स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, वेपथु, वैवर्ण्य, अश्रु आणि प्रलय (=चेष्टानिरोध). १२. काव्येतिहाससंग्रहाचा 'लवकुश' असा पाठ आहे. १३. देवांची सभा. १४. वाऱ्यासाठीं राखलेल्या वाटा, उघड्या, झरोके, खिडक्या, दरवाजे वगैरे. देवांची सभा सुद्धां शून्य झाली, कारण ज्याला त्याला कुशलवांचें गाणें फारच मोहक वाटून, जो तो खिडक्यांतून, दारांतून, झरोक्यांतून उभा राहून कुशलवांचे आलाप ऐकूं लागला; व सभेंत कोणीच ठरेना! १५. तरवार. १६. चांगली ढाल. १७. धनुष्य. १८. चिलखत. १९. नेहमींचे चमत्कार झाला—हा भावार्थ.

दुष्टहृत्पद्मसारातें[1] पीती त्यांचे शिलीमुख[2], ।
सज्जनांच्या पदांभोजीं[3] हेचि होती शिलीमुख[4]. ॥ ३५

एवं **वाल्मीकि**सेवानिरत **कुशलव** स्वप्रसूच्या[5] सतीच्या
आज्ञेतें सेवनातें[6] क्षणहि न चळती[7], साधु जैसे **श्रु**तीच्या. ।
वन्याहारी, परंतु प्रमुदितचि सदा ते महाधैर्यसिंधू,
भिन्ना मूर्तीच त्यांच्या, न मन, निवसती यापरी दोघं[8] बंधू. ॥ ३६

**जै**मिनिकृत**भा**रतगतहयमेधीं **कुशल**वाख्यानीं ।
अध्याय पांचवा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ३७

---

## अध्याय सहावा.

**सा**केतीं[9] श्री**व**सिष्ठप्रभृतिमुनिंस[10] तो **राम** सन्मार्गचारी,
'क्षाळावा ब्रह्महत्यामळ सुकृतजळें कोणत्या?' हें विचारी. ।
ते **लं**केशांतकाला[11] द्विजवर म्हणती, 'हे जगच्**छक्र**[12]! तूतें
नाहीं दुःसाध्य कांहीं, पण कर विधिवद्वाजिराजक्रतूतें[13]; ॥ १

**आ**म्नायाच्या[14] मतें स्त्रीरहित नर नव्हे यज्ञकर्माधिकारी;'
जाला या हेतुसाठीं कनकजनकजाकांत[15] तो **ता**टकारी. ।
दीक्षास्वीकार केला मुनिजनवचनप्रेरितें[16] विश्वतातें[17],
योजूनी त्राणकर्मी[18] मखहयपतिच्या[19] त्या **सु**मित्रासुतातें[20]. ॥ २

'**कौ**सल्या एकवीरा, तदुदरभव जो **राम का**कुत्स्थ वीर,
हा तन्मुक्ताश्व[21]; या ते धरु समरबळी, ज्यासि होईल धीर.' ।

---

१. दुर्जनांच्या हृदयरूप कमलाचें सार [=(हृदयपक्षीं) रक्त, जीवन; (कमलपक्षीं) मधु, मध]. २. (हृदयपक्षीं) बाण; (कमलपक्षीं) भ्रमर. ३. चरणकमलीं. ४. भ्रमर. **अनुष्टुप्.** येथें **श्लेषमूलक विरोधाभास** व **परंपरितरूपक** असे अलंकार आहेत. ५. आपल्या आईच्या. ६. येथें 'आज्ञेतें **सेवण्यातें**' किंवा '**आज्ञेच्या** सेवनातें' असा पाठ अधिक शुद्ध झाला असता. ७. चुकती. ८. दोन. **शार्दूलविक्रीडितवृत्त**. ९. अयोध्येंत. १०. श्रीवसिष्ठादि मुनींना. ११. रावणांतकाला, रामाला. १२. जगदिंद्रा! पृथ्वीपते! १३. यथाविधि अश्वमेधाला. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १४. वेदांच्या. १५. सोन्याच्या सीतेचा पति. रामानें सीतेची एक सोन्याची प्रतिमा करवून व तिला सहधर्मचारिणी मानून यज्ञविधीस आरंभ केला–हा भाव. १६. (वसिष्ठादि) मुनींच्या सांगण्यावरून. १७. जगज्जनकानें, रामानें. १८. (अश्वाचें) रक्षण करण्याचे कामीं. १९. यज्ञीय (=यज्ञासाठीं आणलेल्या) अश्वश्रेष्ठाच्या. २०. लक्ष्मणाला. २१. त्यानें (=रामानें) सोडलेला घोडा.

एवं सौवर्णपत्रीं लिहुनि रघुवरें बांधिलें वाजिभाळीं,
सोडी विध्युक्त[1] त्यातें, निजकरकमळें पूजुनी साधु काळीं. ॥ ३

अक्षौहिणीत्रयपति[2], व्यथितारिनारी[3], शत्रुघ्न सत्वर निघे, तुरगानुसारी; ।
सोत्साहसैनिककराहतपीनभेरिध्वान[4], प्रतीपनृपतोषधनापहारी[5]. ॥ ४

शत्रुघ्नध्वजिनीपदाहतरजःस्तोम[6] स्वयें अंबरीं,
त्या यात्रासमयीं[7] उडोनि शिरला नीरात्मबिंबांतरीं[8]; ।
झाला चिक्कणपंक[9] घट्ट जडला स्वच्छेंदुदेहास[10], तो
धौतस्फाटिकभांडकज्जल[11] तसा आजूनिही दीसतो[12]. ॥ ५

वाजींच्या मुखफेनघर्मसलिलें[13], दंतिव्रजाच्या मदें[14],
झाला पंकिल[15] मार्ग; पत्तिस[16] पदें होतीं विलंबप्रदें[17]. ।

---

१. 'विध्युक्त' हा शब्द चुकीचा दिसतो. कदाचित् 'विधियुक्त' या ऐवजीं हा शब्द किंचित् दुर्लक्षानें कवीनें योजला असेल. 'विध्युक्त=विधि+उक्त=विधीनें सांगितलेला' हा अर्थ चांगलासा लागू पडत नाहीं. 'विधियुक्त,' 'विधिपूर्वक,' 'यथाविधि' इत्यादि प्रकारचा शब्द अर्थाशीं मिळू शकेल. २. तीन अक्षौहिणींचा अधिपति; एक अक्षौहिणी म्हणजे २१८७० रथ, तितकेच हत्ती, ६५६१० घोडे आणि १०९३५० पायदळ एवढें सैन्य होय. ३. त्रासविल्या आहेत शत्रुस्त्रिया ज्यानें असा; म्हणजे शत्रुत्व स्वीकारणाऱ्या राजांना मारून त्यांच्या स्त्रियांना ज्यानें दुःख दिलें आहे असा. येथें 'राजांना मारणें' हें कारण 'राजस्त्रियांचें दुःख' या कार्यानें सुचविल्यामुळें **अप्रस्तुतप्रशंसा** झाली. ४. मोठ्या आनंदानें सैन्यांतील लोकांनीं आपल्या हातांनीं वाजविलेल्या मोठमोठ्या भेरींचा नाद. पूर्ववाक्यांतून 'निघे' हें क्रियापद घेऊन, त्याचा '°ध्वान' हा कर्ता घ्यावयाचा. ५. दुष्मानाप्रमाणें वागणाऱ्या राजांचें तोषरूप धन हरण करणारा. तिसऱ्या व चवथ्या चरणांचें एक सामासिक पद करून त्याचा संबंध शत्रुघ्नाकडे लाविला म्हणजे रचना व अर्थ दोन्ही सरळ होतात. **वसंततिलकावृत्त.** ६. शत्रुघ्नाच्या सैन्याच्या पायांनीं उधळलेल्या धुळीचा लोट. ध्वजिनी=सेना. ७. सैन्याच्या प्रयाणसमयीं, सैन्य कूच करित असतां. ८. जलमय आहे बिंब ज्याचें अशा चंद्राच्या हृदयांत. 'नीरात्मबिंब'त्व हें धूळीचा चिखल होण्याचें कारण असल्यामुळें येथें **परिकर** व **काव्यलिंग** असे अलंकार आहेत. ९. चिकट चिखल. १०. चंद्राच्या स्वच्छ शरीराला (म्ह० बिंबाला). ११. स्वच्छ पांढऱ्या स्फटिकाच्या भांड्यावरील मस. १२. येथें चंद्रकलंकाचा अपन्हव करून त्यावर चिक्कणपंकाचा आरोप केला आहे म्हणून हा **अपन्हुति** अलंकार झाला. अंत्य चरणांत **उपमा** आहे. **शार्दूलविक्रीडित.** १३. तोंडांतील फेसानें व पाण्यानें. १४. हत्तींच्या समूहाच्या (गंडस्थलांतून वाहणाऱ्या) मदानें. १५. चिखलट. १६. पायदळास. १७. पदें विलंबप्रदें होतीं=पावलें भराभर पडत ना; पावलें टाकणें कठिण होऊं लागलें.

नानावाद्यनिनाद सज्जनमनःश्रोत्रांसि झाला सुधा,[1]
दुष्टांच्या तर चित्तमोहकरणीं[2] व्यालास्यजन्मा[3] सुधा.[4] ॥ ६

रत्नस्वर्णविभूषिता,[5] गजघटाघंटारणन्नूपुरा,[6]
वाजिस्यंदनवाहना, शुभयशोहास्या,[7] सुवाद्यस्वरा, ।
नानाभूपशिरःकिरीटमणिदीपा[8] ह्या रिपुघ्नाप्रती[9]
ओंवाळूनि, अनेकमानववरश्री[10] घट्ट आलिंगिती. ॥ ७

संगरीं मखवाजिहारिधराधिपव्रज[11] मर्दिला,
तच्चिताभसितें[12] सितें[13] बहु पूजणार कपर्दिला,[14] ।
जो तृणानन[15] भूपें तो न दिनेशसूनुकरीं[16] दिला;
आत्मनामगतार्थ[17] सार्थ[18] पराक्रमें प्रतिपादिला.[19] ॥ ८

महामानी होते, परि परिभवें दास्यपर[20] ते
परें[21] स्वांगें[22] जाले; मग विजयिशत्रुघ्न परते, ।
कविश्रीवल्मीकप्रभवमुनिसंस्थानवसुधा[23]
पथीं झाली सेनानयननिकरातें[24] नव सुधा.[25] ॥ ९

---

१. अमृत. २. मनाला बेशुद्धि आणण्यांत. ३. सर्पाच्या तोंडांतून निघालेली=विषारी. ४. दारू. या श्लोकांत द्वितीयार्धात **विरोधाभास** आहे. ५. रत्नें आणि सोनें यांनीं सजविलेली. ६. गजगणांच्या घांटा हींच रुणझुणणारीं नूपुरें आहेत जिचीं अशी. ७. सुंदर यश हेंच आहे हास्य जिचें अशी. ८. अनेक राजांच्या मस्तकावरील मुकुट हेच दिवे त्यांना. हें 'ओंवाळून' याचें कर्म. येथें **यतिभंगा**चा दोष स्पष्ट आहे. असे दोष **पंतां**च्या कृतींत अगदींच विरळा असतात. 'दीपा ओंवाळून' या पदानें अनेक राजांनीं आपलीं मस्तकें शत्रुघ्नाच्या पायांवर लवविलीं हा उद्दिष्टार्थ पर्यायानें सुचविला आहे. ९. शत्रुघ्नाला. १०. अनेक राजांची राज्यलक्ष्मी. येथें '**रत्नस्वर्ण**विभूषिता' इत्यादि श्लिष्ट विशेषणांनीं 'श्री'चें स्त्रीशीं साम्य सुचविलें आहे, म्हणून ही **समासोक्ति**. ११. यज्ञीय अश्वाचें हरण करणारा राजांचा समुदाय. येथें काव्ये० सं०चा 'मखवाजि**हर**धराधिपव्रज' असा पाठ आहे, परंतु त्यांत छंदोभग होतो. १२. त्यांच्या चिताभस्मानें. १३. स्वच्छ, पांढऱ्या. १४. शंकराला. १५. दांतीं गवत धरणारा राजा, शरण आलेला राजा. तृणानन=तृण आहे तोंडांत ज्याच्या असा. बहुव्रीहि. १६. सूर्याचा मुलगा यम त्याच्या हातांत. १७. आपल्या नांवाचा अर्थ; (शत्रुघ्न=शत्रूस मारणारा) नांवाचें सार्थत्व दाखविलें म्हणून हा **निरुक्ति** अलंकार आहे. १८. योग्य. येथें काव्ये० सं०चा 'बहु' असा छंदोभंगमय अपपाठ आहे. १९. सिद्ध केला. **विबुधप्रियावृत्त.** २०. सेवेंत गढलेले. २१. शत्रू. २२. स्व+अंगें. 'मानी असूनही सेवापर झाले' या वर्णनांत **विशेषोक्ति** आहे. २३. कवि+श्री+वल्मीकप्रभवमुनि (=वारुळांतून जन्मलेला मुनि, वाल्मीकि)+संस्थान (=वसति)+वसुधा (=जागा)=विद्वान् वाल्मीकीची राहण्याची जागा. २४. सेनेच्या डोळ्यांच्या समुदायास. २५. अमृत. हें **रूपक** आहे. **शिखरिणीवृत्त.**

त्या मुनिवराश्रमाच्या नंदनवनगर्वतस्करोपवनीं[1] ।
अवनीशवाह[2] शिरला, स्वजवें[3] लज्जेसि निर्मिता पवनीं. ॥ १०

त्या गहनींच्या[4] दूर्वा, मरकतमणिपुंजदीप्तिच्या[5] सवती, ।
हरिच्या[6] हरिति मनातें, तरुणनराच्या जशा विलासवती[7]. ॥ ११

वनरक्षणार्थ तेथें करवाली[8], विप्रपुत्रगणशाली[9], ।
होता लव वीर, जसा ग्रहसंधानप्रयुक्त[10] करमाली[11]. ॥ १२

तेणें वनीं अकस्माद् दूर्वांकुरसेवनानुरक्त[12] हरी[13] ।
अवलोकितांचि त्याची श्री तन्मानससरोरुहासि[14] हरी. ॥ १३

नंदनवनभ्रमागतशक्राश्वभ्रांत्यधिष्ठितस्वांतें[15] ।
कांतें[16] वीरश्रीच्या धरिला वाजी लवें रुषाक्रांतें[17]. ॥ १४

हयभालबद्धकांचनदललिखितार्थग्रहप्रदीप्तमदें[18] ।
कदलीस बांधिला हय कुशानुजें निजकरें खळश्रमदें[19].' ॥ १५

'कौसल्या एकवीरा, मम जननि नव्हे वीरसू[20]? काय वंध्या?'
ऐसें बोलोनि केली क्षितिदुहितृसुतें[21] दृग्द्वयें[22] तुच्छ संध्या[23], ।

१. नंदनवनाचा (=इंद्राच्या उपवनाचा) गर्व हरण करणाऱ्या बागेंत. **प्रतीपा**लंकार. २. अवनि+ईश+वाह=राजाचा घोडा. ३. आपल्या वेगानें. या अर्धांतही **प्रतीप** आहे. **गीतिवृत्त.** ४. रानांतील. ५. पाचेच्या तेजाच्या सपत्नी. येथें **व्यतिरेक** आहे. ६. अश्वाच्या. ७. सुंदर स्त्रिया. ८. (हातीं) तरवार धरणारा. ९. (बरोबरच्या) ब्राह्मणांच्या मुलांनीं शोभणारा; ज्याच्या बरोबर बरींच ब्राह्मणांचीं मुलें आहेत असा. १०. ग्रहांच्या सान्निध्यानें युक्त, ज्याच्याजवळ ग्रह आहेत असा. ११. सूर्य. ग्रहमालामध्यवर्ती जसा सूर्य, तसा ब्राह्मणबटुमध्यवर्ती लव शोभत होता. **उपमा.** १२. कोंवळ्या कोंवळ्या दूर्वा खाण्यांत रंगलेला. १३. घोडा. १४. त्याच्या हृदयरूप कमळाला. १५. नंदनवनाचा भास होऊन आलेला हा इंद्राचा घोडा आहे, अशा भ्रांतीनें ज्याच्या मनांत प्रवेश केला आहे अशानें. हें 'लवा'चें विशेषण. **भ्रांतिमान्** अलंकार. १६. वीरश्रीच्या कांतें=वीरश्रीच्या पतीनें, अत्यंत वीर्यशाली (लव) त्यानें. १७. क्रोधाविष्टानें, रागावलेल्यानें. १८. घोड्याच्या कपाळावर बांधलेल्या सुवर्णपत्रिकेंतील लेखाच्या अर्थरूप ग्रहानें (=पिशाचानें) भडकला आहे मद ज्याचा अशा (लवानें). 'अर्थग्रह' याचा अर्थ, 'अर्थ मनांत घेणें' असाही होऊं शकेल. १९. दुष्टांना श्रम (=दुःख) देणाऱ्यानें. हें 'करें'चें विशेषण. २०. वीराची आई. २१. पृथ्वीच्या मुलीच्या मुलानें, सीतापुत्रानें. २२. नेत्रद्वयानें. २३. संध्याकाळ. लवानें आपल्या (लाल) डोळ्यांनीं संध्याकाळची लाली कःपदार्थ करून सोडिली. त्याचे डोळे रागानें फार लाल झाले—हा भावार्थ. **प्रतीप** अलंकार.

तेव्हां मित्रें[1] तयातें म्हणति, 'हय वृथा बांधिला, सोड याला,
भूपाश्वत्राणकारी[2] दवडतिल तुला श्राद्धदेवालयाला[3].' ॥ १६
एवं सभयसुहृज्जनलपितातें[4] आयकोनि, धीरमणी[5] ।
तो लव वदे कुलोचित, ठेवुनि[6] मतिला द्विषद्बलाक्रमणीं[7]. ॥ १७
'विप्रस्त्रीकुक्षिजन्मे[8] भयविकळ तुम्हीं, क्षत्रियादेहभू[9] मी,
सोडूं वाजीस धाकें, तरि मज न हंसे काय हे सर्व भूमी? ।
मृत्युः[10] श्रेयः कथंचित्, जरि हरिकरितां[11] अर्पिला[12] दुर्जनांहीं,
लोकांमध्यें परंतु क्षितितनुजनिला[13] लाज होणार नाहीं.' ॥ १८
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
साहावा[14] अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १९

## अध्याय सातवा.

अशांत आली चतुरंग[15] सेना, जीच्या रजें भानुसि भू दिसेना ।
अन्योन्यशब्दग्रहणीं स्व भेरी वृंदस्वनें घे लटिकेंचि भेरी. ॥ १
'कोठें हय? कोठें हय?' असें म्हणत धांवले पुढें सादी[16], ।
रंभास्तंभनिबद्धस्वहयासि[17] तदीय दृष्टि आसादी[18]. ॥ २
निकटस्थ लववयस्यस्तोमातें[19] म्हणति वीर ते, 'कोणी ।

१. सोबती. 'मित्र' हा शब्द संस्कृतांत नपुंसक आहे व पंतांनीं तो येथें तसाच वापरला आहे. २. राजाच्या घोड्याचे रक्षक. ३. यमाच्या घराला. **शार्दूलविक्रीडित.** ४. भ्यालेल्या सोबत्यांचे भाषणाला. ५. तो धीरश्रेष्ठ, अत्यंत धैर्यवान्. ६. निश्चय करून. ७. शत्रूचें बळ (=सैन्य किंवा सामर्थ्य) मर्दन करण्यांत. **गीतिवृत्त.** ८. ब्राह्मणींच्या पोटीं जन्मास आलेले. ९. क्षत्रियेचा मुलगा. १०. मृत्युः श्रेयः कथंचित्=मरण हें अपार सौख्यच होय. श्रेयः=सौख्य. कथंचित्=अवर्णनीय रीतीनें. ११. घोड्यानिमित्त. १२. दिला. याचा संबंध 'मृत्यू'कडे. १३. सीतेच्या मुलाला. **स्रग्धरा**वृत्त. १४. काव्ये० सं०चा **'हा साहावाध्याय'** असा अपपाठ आहे. १५. हत्ती, घोडे, रथ व पायदळ हीं चारी अंगें जींत आहेत अशी. उत्तरार्ध अन्वयार्थः–अन्योन्यशब्दग्रहणीं भेरी (=बहिरी झालेली) भेरी (=नौबद, नगारा) वृंदस्वनें (=भेरींच्या समूहाच्या नादानें, नौबदींच्या ताफ्यांच्या आवाजानें) स्व (स्वन) (=आपलें स्वतःचें वाजणें) लटकेंचि घे (=खोटेंच मानी). **चेतनगुणोक्ति.** काव्ये०सं०चा पाठः–'······स्वभेरी । वृंदस्वनें जें लटकें चि भे री. ॥'. **उपजाति.** १६. घोडेस्वार. १७. केळीच्या उभ्या ओंड्याला बांधलेल्या आपल्या घोड्याला. १८. गांठी, पाही. १९. लवाच्या सोबत्यांच्या समूहास. **गीतिवृत्त.**

[1]हरिरंभासंबंधें केली अमरावतीतशी [2]क्षोणी?' ॥ ३

ऐसें ऐकोनि, म्हणती विप्रांचीं त्यांस लेंकरें, ।
'[3]हयरत्न लवें वीरें [4]रंभेशीं बांधिलें करें.' ॥ ४

एवं [5]पूर्वाश्रमस्थद्विजवचन तिहीं सेविलें [6]आत्मकानें,
हांसोनी वीर तेव्हां म्हणति, 'न कळतां, बांधिला [7]अर्भकानें, ।
रंभेपासूनि आतां, उशिर न करितां, [8]रामयज्ञीयवाजी
सोडा, सोडा; अयोध्यानगरगतपथीं चालवा, चालवा; जी!' ॥ ५

धनू धरुनियां करीं [9]तुरगमोचनोपक्रमीं,
लव त्वरित धांवला [10]विगतभी [11]महाविक्रमी, ।
म्हणे '[12]रणधुरीण हो! धरुनि गर्व [13]निःसार हा,
वृथा मज न जिंकितां, [14]हरिस सोडितां कां? रहा.' ॥ ६

अशि परिशिली वाणी त्याची तिहीं जरि त्या क्षणीं,
तदपि [15]भटें ते झाले सिद्ध [16]स्वघोटकमोक्षणीं. ।
मग लव तदा त्या वीरांच्या करांसि शरें हरी,
[17]धरणिधरपक्षांतें वज्रेंकरूनि जसा [18]हरी. ॥ ७

विच्छिन्नहस्त भट ते म्हणती 'धरा हो! पाडा [19]किशोर धरणीवरि, हा न राहो.' ।
कोपेंकरूनि मग सैनिक त्या [20]प्रधानीं एकावरी बहुत वर्षति आयुधानीं. ॥ ८

न स्पर्शती लवांगाला तीं शस्त्रें देहघातकें, ।
जैसीं श्री[21]गौतमीतोयस्नातमर्त्यास पातकें. ॥ ९

१. हरि (इंद्र, पक्षीं घोडा) व रंभा (अप्सरा, पक्षीं केळ) यांचा योग जुळवून. **श्लेषालंकार.** २. पृथ्वी. ३. उत्तम घोडा. ४. केळीला. **अनुष्टुप्.** ५. ब्रह्मचारी ब्राह्मणबटूंचें वचन. ब्रह्मचर्य, गृहस्थपणा, वानप्रस्थ व संन्यास हे चार ब्राह्मणांचे आश्रम होत. ६. काव्ये० सं०चा 'स्वात्मकानें' असा पाठ आहे. आतमकानें=आपल्या कानानें. ७. बालकानें, नेणत्या पोरानें. ८. रामाचा यज्ञसंबंधीं घोडा. **स्रग्धरा.** ९. घोडा सोडण्याचा यत्न चालला असतां. 'धनुर्धरुनिया' असा काव्ये० सं०चा पाठ. १०. निर्भय. ११. पराक्रमी. १२. रणांतील म्होरक्यांनो! अहो समरशूर हो! १३. निष्फळ, पोकळ. १४. घोड्याला. **पृथ्वीछंद.** १५. योद्धे. १६. आपला घोडा सोडण्यांत. १७. पर्वतांच्या पंखांना. येथें **यतिभंग** आहे. १८. इंद्र. **हरिणी**वृत्त. १९. बालक, पोर. २० उत्तमांनीं. हें 'आयुधांनीं'चें विशेषण. **वसंततिलका.** २१. श्रीगोदावरीच्या पाण्यांत स्नान केलेल्या मनुष्यास. **उपमा. अनुष्टुप्.**

त्यांच्या शस्त्रगणासि, ओढुनि धनुर्वल्लीस[1] वेगें करें,
योगी संसृतिबंधनाप्रति[2], तसा छेदी स्वबाणोत्करें[3]; ।
सादी[4], पंक्ति[5], रथी, अनेकपपक[6], श्रांतोनि भूमंचकीं[7],
गृध्रव्रातवितानसावलिस[8] ते घेती निजेलाच कीं. ॥ १०

केले स्यंदन[9] चूर्ण बाणानिकरें[10], वाजी द्विधा छेदिले,
वीरांचे शुभ[11] देह वांटुनि शिवागृध्रादिकांसी[12] दिले; ।
[13]शुंडादंडविहीन भूमिपतित व्यांक्रोशती[14] वारण[15],
कोणाच्याहि शरेंकरूनि न घडे त्याचें रणीं वारण[16]. ॥ ११

हातीं [17]कोदंड, देहीं दृढ कवच[18] बरें, अक्षयी दोन भाते,
[19]रक्षोवृंदस्थरामस्मृतिस उपजवी जानकीसूनुभा[20] ते. ।
पांचां पांचां शरांहींकरुनि न हृदयीं भेदिलें कोणत्याला?
एवं युद्धप्रसंगीं बहु बळ वधिलें; वारितो कोण त्याला? ॥ १२

केलें यापरि बालकें निज बळीं[21] शार्दूलविक्रीडित[22],
जाला याकरितां रिपुघ्न[23] परम [24]क्रोधानळें पीडित. ।
आला बैसुनियां रथीं शरधनुष्पाणी[25], कृपाणी[26], रणीं;
त्यातें 'तिष्ठ'[27] म्हणे, स्वकीय मतिला ठेवूनि तन्मारणीं. ॥ १३

शत्रुघ्न क्षितिजासुतें खर शरें भाळीं, उरीं ताडिला;
चारीही हय वेधिले, ध्वज मग च्छेदूनियां पाडिला; ।

---

१. धनुष्याच्या दोरीस. २. संसाराच्या गुंत्याला. ३. आपल्या बाणांच्या समूहानें. ४. शिलेदार. ५. पायदळ. ६. द्विपपक=हत्तीवर बसणारे. ७. पृथ्वीरूप मंचकावर. ८. गिधाडांच्या टोळ्या हेंच छत, त्याच्या सांवलींत. येथें **रूपक व उत्प्रेक्षा** यांचा संकर असून **पर्यायोक्त**ही आहे. अनेक घोडेस्वार, पायदळ वगैरे सैन्य मेलें—हा भाव. **शार्दूलविक्रीडित.** ९. रथ. १०. बाणांच्या समूहानें. ११. धारातीर्थी पडलेले म्हणून शुभ (=मंगल). १२. कोल्हीं, गिधाडें इत्यादि पशुपक्ष्यांस. १३. ज्यांच्या विशाळ सोंडा तुटल्या आहेत असे. १४. ओरडती. १५. हत्ती. १६. निवारण; अटकाव. १७. धनुष्य. १८. चिलखत. १९. राक्षसांच्या सैन्यांत (लढत) उभा राहिलेला जो राम त्याच्या आठवणीला. २०. सीतेच्या मुलाचें तेज. येथें **स्मृत्यलंकार** आहे. २१. सैन्यांत. २२. वाघाची लीला. या श्लोकाचें वृत्तही हें म्ह० **शार्दूलविक्रीडित** आहे. पंतांनीं या काव्यांत असे वृत्तनामदर्शक शब्द मधून मधून योजिलेले आढळतात. (मागें अ० २ श्लो० २४ टी० ३ पहा.) २३. शत्रुघ्न. २४. क्रोधरूप अग्नीनें. २५. बाण व धनुष्य हातांत आहेत ज्याच्या असा. २६. तरवार घेतलेला. येथें 'प' व 'ण' याचा **छेकानुप्रास** आहे. २७. उभा राहा. हें 'स्था=उभें राहणें' या धातूचें आज्ञार्थी द्वितीयपुरुषीं एकवचनी संस्कृत रूप आहे.

होते जे रथचक्ररक्षक भट, स्वर्गासि ते धाडिले;

[1]चापज्या हरिली; शिलीमुख[2] असे बारा **लवें** सोडिले. ॥ १४

[3]सैज्य करुनि चापातें, शत्रुघ्न म्हणे **लवासि**, 'सांभाळीं'. ।

मग [4]खरनाराचत्रय [5]खदिरानळनिभ समर्पिलें भाळीं. ॥ १५

तो तेधवां [6]स्मितजितौषधिपास्य [7]मानी त्या [8]सायकासि [9]बिसतंतुसमान मानी. ।

त्यातें म्हणे **लव**, '[10]विगर्वित [11]बाहुसारें, वीरा! तुझें बळ दिसे इतुकेंचि [12]सारें!॥ १६

ऐसें बोलुनियां, **लवें** निरखिला **शत्रुघ्न** [13]रौद्रेक्षणें;

केला [14]चापतुरंगसारथिरथध्वंसाकुलात्मा क्षणें. ।

तो बोले शरयुक्त [15]कार्मुक करीं घेऊनियां दूसरें,

'जा, बाळा! तुज जीवदान दिधलें, [16]दे पाठ, मागें सरें'. ॥ १७

ऐसें बोलुनि, [17]**राघवें** [18]खरशर क्रोधें तदा सोडिला,

तो बाण [19]स्वशिलीमुखें **लवभटें** मध्यें द्विधा तोडिला; ।

होता [20]सद्गतिमान्, [21]अधःपतन तैं जालेंचि त्याला परी,

वादी जे नर [22]कूटसाक्ष वदती, [23]तत्पूर्वजांच्यापरी. ॥ १८

**शत्रुघ्नें** दुसरा शिलीमुख[24] तदा [25]बाणासनीं जोडिला,

तोही चापसमेत **भूमितनयापुत्रें** शरें तोडिला. ।

---

१. धनुष्याची दोरी. या श्लोकांत **कारकदीपक** आहे. कारण 'ताडिला' 'वेधिले' इ० सर्व क्रियांचा संबंध 'क्षितिजासुतें' या एका कारकाशीं आहे. २. बाण. ३. दोरीनें संयुक्त असे. ज्या=धनुष्याची दोरी. ४. तीन तीक्ष्ण बाण. ५. खदिराच्या निखाऱ्यासारखे प्रखर. **गीतिवृत्त.** ६. स्मित+जित+ओषधिप (=चंद्र)+आस्य (=मुख)=कोमल हास्यानें ज्यानें जिंकिल आहे चंद्र असें मुख आहे ज्याचें तो; ज्याचें सुहास्यवदन चंद्राहूनही सुंदर आहे तो. **व्यतिरेक**अलंकार. ७. स्वाभिमानी. ८. बाणाला. ९. कमलाच्या तंतूप्रमाणें. **उपमा.** १०. ज्याविषयीं विशेष गर्व वाहिला आहे अशा, ज्याविषयीं विशेष वल्गना केली आहे अशा. ११. बाहुबळानें, बाहुबळावरून. १२. लव म्हणतो, 'ज्याअर्थीं तूं आपल्या बाहुबळाचा इतका गर्व वाहतोस, त्याअर्थीं तुझें बळ इतपतच आहे असें मला दिसतें.' **वसंततिलका.** १३. रागानें भयंकर झालेल्या डोळ्यांनीं. १४. धनुष्य, घोडे, सारथी व रथ यांचा नाश झाल्यामुळें गडबडलें आहे मन ज्याचें असा. १५. धनुष्य. १६. मला तोंड देऊं नकोस, पाठ माझ्याकडे फिरवून रणांतून जा. **शार्दूलविक्रीडित.** १७. रघुकुलोत्पन्न शत्रुघ्नानें. १८. तीक्ष्ण बाण. १९. आपल्या बाणानें. २०. (बाणपक्षीं) अत्यंत वेगाचा; (पूर्वजपक्षीं) ज्यांना मुक्ति मिळाली आहे असे. २१. खालीं पडणें; (पक्षीं) स्वर्गाहून च्युत होऊन नरकांत पडणें. २२. खोटी साक्ष. २३. त्यांच्या पूर्वजांसारखें. **उपमा.** २४. बाण. २५. धनुष्यावर.

पूर्वी ज्या विशिखें[1] द्विजारिलवणायु[2] प्राशिलें भूवरी,
　त्यातें, त्याच धनुर्लतेप्रति, तदा सौमित्रि[3] हातीं धरी. ॥　　१९
सोडी वन्हिनिभाशुगाप्रति[4], वदे, 'मेलाशि रे! या क्षणीं.'
　तेव्हां बाण अमोघ हें समजला, आलोकितां स्वेक्षणीं[5]. ।
'यातें अग्रज[6] भंगिता, परि नसे[7]; मी जानकीच्या महा-
　पातिव्रत्यबळेंचि खंडिन;' म्हणे, 'आला असो भीम[8] हा.' ॥　२०
ऐसें वदोनि, केले दोन तयाचे निजाशुगें[9] तुकडे; ।
आले तत्पूर्वार्ध च्छिन्नाहिनिभ[10] स्वभंगहेतुकडे[11]. ॥　　२१
आधीं चापासि खंडी, मग जनकसुतासूनुवक्षस्थळाला[12],
　त्या काळीं मोहभारें[13] क्षितिवरि सहसा देह त्याचा गळाला. ।
झाली नेत्रांबुजाला[14] रजनि[15], न समजे युद्धभू, गेह वा हें.
　त्या बाळाला सचैल[16] स्नपनचि[17] घडलें शोणिताच्या[18] प्रवाहें. ॥　२२
आली मृत्युसमा यदा अशि रणीं मूर्च्छा महामानिला[18],
　त्या काळीं हतशेषवीरनिकरें[19] आनंदसा मानिला. ।
भेरींच्या प्रकरासि[20] ताडिति, मुखें शंखासि ते फुंकिती;
　त्यांचा हर्ष[21] न सांठवे त्रिभुवनीं, तो म्यां वदावा किती? ॥　२३
झाला, त्यासि विलोकितां, सदय तो शत्रुघ्ननामा कृती[22]
　'शिपा यासि,' म्हणे भटांसि[23], 'दिसतो हा बाळ रामाकृती.' ।

१. बाणानें. २. लवणासुराचें आयुष्य. मधुदैत्याचा मुलगा लवण. हा फार माजून ब्राह्मणांना त्रास देत होता. त्याचा शत्रुघ्नानें वध करून ब्राह्मणांस निर्भय केलें. ३. सुमित्रेचा मुलगा, शत्रुघ्न. सुमित्रेला लक्ष्मण व शत्रुघ्न असे दोन जुळे मुलगे झाले, अशी वाल्मीकिरामायणांत कथा आहे. ४. अग्नीसारख्या (तेजस्वी) बाणाला. ५. आपल्या डोळ्यांनीं. ६. ज्येष्ठ बंधु, कुश. ७. परि (तो येथें) नसे. ८. भयंकर. ९. आपल्या बाणानें. १०. तुटलेल्या सापाप्रमाणें. ११. आपणास तोडणाऱ्याकडे, लवाकडे. **गीतिवृत्त.** १२. लवाच्या छातीला. १३. मूर्च्छनेनें. १४. डोळ्यांपुढें काळोखी आली. १५. वस्त्रांसकट. १६. स्नान. १७. रक्ताच्या. **स्रग्धरा.** १८. मोठा अभिमानी जो लव, त्याला. १९. (लवाच्या हातून) मरून बाकी जे शिल्लक राहिले होते त्या सैनिकांच्या समूहानें. २०. समुदायास. २१. येथें आधेय जो 'हर्ष' तो 'त्रिभुवन' या आधारापेक्षां मोठा आहे असें वर्णन असल्यामुळें, हा **अधिकालंकार** झाला. **शार्दूलविक्रीडित.** २२. धन्य; कर्तबगारीचा. २३. सैनिकांना.

[1]छायावायुजलोपचारित लव [2]स्वस्यंदनीं स्थापिला,
सेनायुक्त[3], हयासि सोडुनि, निजायोध्यापथें चालिला. ॥ २४
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
अध्याय सातवा हा श्रवण करावा गुणज्ञमुख्यांनीं. ॥ २५

---

## अध्याय आठवा.

एवं जैसें निघालें [4]कटक, धरुनियां मूर्छितातें लवातें,
तेव्हां त्याचे सखे ते त्यजिति उपवनीं [5]लोचनांभोलवांतें. ।
हस्तांपासोन [6]पुस्तें गळति सटसटां, धीर गेला [7]लयाला,
जाती सांगावयाला मग बहुत [8]जवें [9]भूमिकन्यालयाला. ॥ १

म्हणति [10]पृथुक, 'जानकि! स्वाश्रमीं [11]मेध्य [12]दूर्वांकुरासक्त [13]कश्चिन् नृपाचा [14]हरी
पाहिला त्वत्सुतें [15]दिव्यलीलाकरें.
'[16]नरवरहय हा, सख्या! यासि बांधों नको,' यापरी वारिला फार आम्ही, परी [त्या]
[17]निषेधासि सोडूनियां, बद्ध केला करें. ।
प्रबळ कटक तेथ आलें, तदा युद्ध आरंभिलें, [18]बाणनिर्भिन्नपत्त्यश्वमातंगवीरांग-
रक्तोदकें निर्मिल्या [19]वाहिनी.
तदुपरि भट एक झाला पुढें; तच्छरें मूर्छितातें लवातें निजस्यंदनीं स्थापुनी,
स्वात्मदेशाकडे जातसे [20]वाहिनी'. ॥ २

हें वर्तमान परिसोनि म्हणे [21]क्ष्माजा, 'गेला असेल जरि धर्म वृथा न माजा, ।
[22]यावत् कुशागमन होय, लव स्वहातें, तावत् करू [23]नतिस न [24]स्वपितामहातें. ॥ ३

---

१. सावली, वारा व पाणी यांचे ज्याला उपचार केले आहेत असा. २. आपुल्या (शत्रुघ्नाच्या) रथांत. ३. सेनेसह. हें 'शत्रुघ्ना'चें विशेषण. ४. सैन्य. ५. डोळ्यांतील पाण्याचे (=अश्रूंचे) थेंबांना. ६. पुस्तकें. ७. नाशाला. येथें 'काव्ये० सं०'चा पाठ 'तयाला' असा आहे. परंतु तो यमकावरून व अर्थावरून चुकीचा ठरतो. ८. त्वरेनें. ९. सीतेच्या आश्रमाला. **शार्दूलविक्रीडित.** १०. मुलें. ११. यज्ञीय, यज्ञसंबंधीं. १२. कोंवळें गवत खाण्यांत गुंतलेला. १३. कोणी एक. १४. घोडा. १५. आश्चर्यजनकलीला करणाऱ्यानें. हा शब्द योजून या श्लोकाचें वृत्त **'लीलाकर दंडक'** आहे असेंही सुचविलें आहे. दंडकाचें लक्षण मागें अ० २ श्लो० २४ टी० ३ या स्थळीं पाहा. १६. राजाचा घोडा. १७. (आम्हीं केलेला) निषेध मनास न आणून. १८. बाणांनीं जखमी केलेल्या पायदळ, घोडे, हत्ती, व (त्यांजवरील) वीर यांच्या रक्तानें. १९. नद्या. २०. सेना. येथील तृतीय चरणांत **'अत्युक्ति'** आहे. २१. सीता. क्षमा=पृथ्वी. २२. कुश येईपर्यंत. २३. नमनास. २४. आज्याला, दशरथाला. लव मरून स्वर्गवासी होऊं नये—हा भाव. **वसंततिलका.**

अकरुणभटबाणभिन्नवत्सा! तुजविण मी तशि, गौ जशी विवेत्सा. ।
करुनि खळजनासवें कैलीला, अहह! मला त्यजिलेंसि एकलीला. ॥ ४

वांछा वृथा धरुनि अन्यमहीपवाहीं, कां त्यागिली स्वतनु दुःखनदीप्रवाहीं? ।
वाहूं किती तरि असे बहु दुःखराशी? कां दैवसृष्ट मजला न वधी खरासी? ॥ ५

झालीं जीं उँटजांगणीं उमटलीं आतांचि जातां पदें,
[होतीं तीं हृदयास या इषुपरी अत्यंत संतापदें,] ।
नांनावृक्षलतालवालरचनाकौशल्य हें भाजितें
मच्चित्ताप्रति, जें करें विरचिलें त्वां पद्मशोभाजितें. ॥ ६

उडुपनिभ त्वद्वदन, स्मृतिगत होऊनियां, मुला! तापवितें. ।
होइल केव्हां शोकक्षितिध्रभेदार्ह जेंवि धरिता पवितें? ॥ ७

**वा**ल्मीकि जवळ नाहीं, **कु**शही गेला असे अरण्यातें, ।
सैनिकचोरापासुनि सोडवितें कोण लवहिरण्यातें?' ॥ ८

धरूनियां यापरि शोकदीक्षा, **सीता** करी पुत्रपथप्रतीक्षा. ।
वत्सें वियुक्ता जसि होय गृष्टी, तीहूनि ते कोटिगुणेंहि कष्टी. ॥ ९

१. निर्दय वीरांच्या बाणांनीं जखमी झालेल्या बाळा! २. जिचें वांसरू तिला अंतरलें आहे अशी. **उपमा.** ३. भांडणाला. **पुष्पिताग्रा.** ४. परक्या राजाच्या घोड्याविषयीं. ५. दैवानें (एकाएकीं) उत्पन्न केलेला. हें 'खरासी'चें विशेषण. ६. खर+असी=तीक्ष्ण+तरवार. **वसंततिलका.** ७. आश्रमाच्या आंगणांत. ८. काव्ये० सं०त छापलेल्या प्रतींत या श्लोकाचा द्वितीय चरण गळलेला आहे. तरी खरा चरण मिळेपर्यंत वाचकांचा मध्येंच खंड पडून विरस होऊं नये म्हणून आम्हीं हा चरण नवीन बनवून कंसांत घातला आहे. पण मयूरकृतीला हें ठिगळ लाविल्याबद्दल कदाचित् कांहीं रसिक आमच्यावर रुष्ट होतील, म्हणून आमचें मन किंचित् साशंक होत आहे. ९. बाणाप्रमाणें. १०. अनेक तऱ्हेचे वृक्ष, वेली यांचीं आळीं रचण्यांतील चातुर्य. ११. कमलाची शोभा जिंकिली आहे ज्यानें अशा (करें). येथें इष्ट कारणापासून तद्विरुद्ध अनिष्टफलोत्पत्ति होते असें वर्णन आहे. म्हणून ही एक प्रकारची **विभावना** आहे. **शार्दूलविक्रीडित.** १२. चंद्रप्रतिम; चंद्रासारखें. १३. संताप देतें. चंद्र थंड, परंतु चंद्रप्रतिम जें मुख तें ताप देतें, म्हणून ही **विभावना.** १४. शोकरूप पर्वतास फोडण्यास योग्य (=समर्थ). १५. पवितें धरिता=इंद्र. **परंपरितरूपक. आर्यागीतिवृत्त.** वृत्तलक्षणार्थ पुढें अ० १० पद्य १७ वरील टीप पाहा. १६. लवरूप सोन्याला. **परंपरितरूपक. गीतिवृत्त.** १७. कुशाच्या वाटेकडे डोळे लावून होती. १८. वांसराला अंतरलेली. १९. दुभती गाय. २०. कोटीपटीनें. गुण=पट. **व्यतिरेका**लंकार. **उपजाति.**

अशांत घेऊन समित्फळांला, आला वनाहूनि कुश क्षयाला. ।
समीप येऊन, मनांत तर्क असा करी मातृदृगब्जअर्क. ॥ १०
'सकाळ येतां मजशीं दैवाला, निवारिलें म्यां स्वमुखें लवाला. ।
पुढें नये क्रुद्ध म्हणोनि काय? कधीं न कीं आजिअसें निकाय'. ॥११

वैनीं, देहीं दुर्निमित्तें पाहिलीं, त्यांसि आठवी. ।
चिंतानदी विवेकार्क[10]किरणौघेंचि आटवी. ॥ १२

निजोटजांतीं[11] द्विडिभांकुशानें[12] विलोकिली भूमिसुता कुशानें ।
स्वपुत्रतापोन्मथितांगवल्ली[13], जशी अरण्याग्निविमृष्ट[14] मल्ली[15]. ॥ १३
अश्रुप्रवाहस्नपितांगयष्टी[16] विलोकितां, तो कुश होय कष्टी. ।
अर्पूनि[17] मातेप्रति वायुवारी, मूर्छेसि तीच्या अतिशीघ्र वारी. ॥ १४
'वद रोदनमोहहेतुला[18], उचिता अंब[19]! दशा न हे तुला. ।
तव दुःख न नाशिलें जरी, तरि लोकीं व्यसुताचि[20] साजिरी. ॥ १५
अहह! श्रम जाहला तुला, न दिसे यासि जगत्रयीं तुला[21]. ।
तव वक्त्रनिशीन[22] कोमला, मग तें जीवित ही नको मला. ॥ १६
वाल्मीकिपादांबुजयुग्मलीन[23], त्वदंघ्रिसेवाकमलिन्यलीन[24], ।
कोठें असे तो लव? सांग, मीं न विलोकिला वेदपयोधिमीन[25]'. ॥ १७

---

१. घराला. २. आपल्या आईचे डोळे हींच कमळें, त्यांना (फुलविणारा) सूर्य **परंपरितरूपक.** येथें 'मातृदृगब्ज' व 'अर्क' या एका सामासिक पदाच्या अवयवांत संधि अवश्य पाहिजे होता. परंतु तो केला नाहीं. म्हणून हा **'विसंधि'** दोष होय. 'मातृदृगंबुजार्क' असा पाठ निर्दोष झाला असता. ३. अरण्याला. ४. केव्हांही. येथें काव्ये० सं०चा 'तधीं' असा पाठ आहे. ५. आजच्यासारखें. ६. घर. **उपेंद्रवज्रा.** ७. शरीरावरील (दुश्चिन्ह); म्हणजे नेत्रस्फुरण इ०. ८. दुश्चिन्हें, अपशकुन. ९. याचा कर्ता 'कुश' अध्याहृत. १०. विवेकरूप सूर्याच्या किरणांच्या झोतानें. **परंपरितरूपक. अनुष्टुप्.** ११. आपल्या आश्रमाच्या अंतीं (=मागें). १२. शत्रुरूप हत्तींचा जो अंकुश त्यानें. **परं० रूपक.** १३. आपल्या पुत्राच्या दुःखानें विव्हल झालें आहे कोमल शरीर जिचें, अशी. १४. वणव्यानें चाटलेली (=भाजलेली). १५. मालती नांवाची फुलवेल. **उपमा. उपेंद्रवज्रा.** १६. आसवांच्या ओघानें न्हालें आहे शरीर जिचें अशी. १७. वारा घालून व पाणी शिंपून. **उपजाति.** १८. रडणें व मूर्च्छा यांचें कारण. १९. आई! २०. मरण. **अनुप्रासा**लंकार. **वियोगिनीवृत्त.** २१. उपमा. **असमा**लंकार. २२. वदनचंद्र. वक्त्र+निशा+ईन=वदन+रजनी+पति. २३. वाल्मीकीच्या चरणकमलीं आसक्त. युग्म=जोडी. २४. तुझ्या चरणाची सेवा हीच एक कमलिनी तिजवरील (भक्तीनें लुब्ध झालेला) भ्रमर. **परंपरितरूपक.** २५. वेदरूप समुद्रांतील(यथेच्छ विहार करणारा) मत्स्य. **परंपरितरूपक उपजातिवृत्त.**

तदुपरि म्हणे **सीता**, स्पर्शोनि[1] हृत्[2] करपल्लवें,
'तुरग धरिला कोणा एका धरापतिचा **लवें**, ।
समरसमयीं त्याहीं वक्षःस्थळीं दृढ भेदिला,
धरुनि नगरा नेला, दुःखक्षमाध्र[3] मला दिला. ॥ १८

सदय, भगवान्, श्रीमान्, वा[4]ल्मीकि ही जवळी नसे.
तुजविण **कुशा**! आतां त्राता जनीं न दुजा दिसे. ।
मम भुज[5] नको छेदूं दैवा! त्यजीं बहु कोप हा;
अहह! करुणापांगें[6] मातें सकृत्[7] तरि तूं पहा.' ॥ १९

प्रलापबीज[8] **सीते**च्या मुखें आकर्णितां असें, ।
म्हणे **कुश**, 'स्वस्थ चित्तें, मातः[9]! स्वसदनीं असें[10]. ॥ २०

त्यातें होऊत शक्रप्रभृतिसुर[11] रणीं साह्य, माते! तथापि
दुष्टातें आहवीं[12] त्या मम निशित[13] शर व्यापितील प्रतापी[14]. ।
सिंहाशीं[15] काय कोल्हे करितिल समर? व्यर्थ चिंता तुला हे.
जिंकूनि त्वत्सुतातें कवण जयधन ब्रह्मगोळांत[16] लाहे? ॥ २१

जननि! मज निषंग[17], चाप, वर्म[18], त्वरित समर्प किरीट, खड्ग, चर्म[19]. ।
**लव** लवकरिच स्वआश्रमातें तेवं सुत[20] आणिल; तूं त्यज श्रमातें.' ॥ २२

असे स्वसूनुचे सुशब्द ऐकतां, महासती
त्यजूनि शोक, लोचनें पुसूनि, होय हांसती. ।
किरीट, सन्निषंग[21], चर्म, वर्म, खड्ग, चाप, ती
**कुशा**सि दे, दशाननासि मर्दिता जिचा पती[22]. ॥ २३

१. येथें **'यतिभंग'** हा दोष आहे. २. हृदय. ३. दुःख+क्षमा (=पृथ्वी)+अभ्र=दुःखाचा डोंगर. येथें सोन्यासारखा मुलगा नेला व बदला दुःखाचा डोंगर दिला, असें वर्णन आहे म्हणून हें **'न्यूनपरिवृत्ती'**चें अत्युत्तम उदाहरण आहे. **हरिणीवृत्त.** ४. येथें **'यतिभंग'** आहे. ५. हात. माझा हात म्हणजे माझा मुलगा लव, जो मला आपल्या स्वतःच्या अवयवासारखा प्रिय व बळ देणारा आहे. ही **रूपकातिशयोक्ति** आहे. ६. दयापूर्ण दृष्टीनें. ७. एकदा. ८. शोकाचें कारण. ९. हे आई! 'मातः' हें 'मातृ'शब्दाचें संस्कृत संबोधनरूप आहे. १०. रहा. **अनुष्टुप्**. ११. इंद्रादि देव. १२. लढाईत. १३. तीव्र. १४. हें 'शरां'चें विशेषण. १५. येथें **दृष्टांता**लंकार आहे. १६ ब्रह्मांडांत. **स्रग्धरा.** १७. बाणांचा भाता. १८. चिलखत. १९. ढाल. २०. तुझा मुलगा म्हणजे मी कुश स्वतः. **पुष्पिताग्रा.** २१. चांगला भाता. काव्ये० सं०चा 'किरीटवन्निषंग' असा आहे. त्याचा अर्थ 'मुकुटासह भाता' असा होऊं शकेल. २२. हें जानकीचें वर्णन हेतुगर्भ आहे, म्हणून हा **परिकरा**लंकार होय. **पंचचामरवृत्त.**

'हा जातों मी' म्हणुनि, नमुनी क्ष्मासुतेच्या पदातें,
जाता झाला रिपुदळ वधूं[1], ओष्ठ चावीत दांतें, ।
जैसा सिंहीतनय विदळूं जाय मातंगजातें[2];
बाहू तांडी[3] भयरहित तो, क्रूरही भीति ज्यातें. ॥ २४

तो जाऊनि श्रीरामाची सेना, पाहे, चित्तीं भी त्याला भासेना. ।
बोले त्यासी वीरश्रीचा कांत, क्ष्मापुत्रीचा[4] संहर्ता आकांत. ॥ २५

'उभे, उभे, हो भट! युद्धकामी आलों असें हो! कुशनाम हा मी. ।
मला पराभूत जरी कराल, मम[5]ानुजातासि तरी हराल. ॥ २६

असेल सामर्थ्य, तरीच चापीं मौर्वीसि[6] जोडा, विशिखासि[7] सोडा; ।
नसेल सामर्थ्य तथापि, सारे हस्तासि जोडा, मम बंधु सोडा. ॥ २७

पृथ्वीवरि चापातें, स्वशिरातें [वा] तऱ्ही लववा, ।
तुम्ही द्रुत सोडावा निज जीवितकाम[10], तो लव वा. ॥ २८

एवं प्रोद्दाम[11] शब्द ग्रहण करुनियां, त्यांस तो काळ[12] वाटे.
उच्चद्वायूत्थधूलिव्रज[13] तिमिरसम व्योमगर्भांत[14] दाटे. ।
वातोद्धूत प्रभूत[15] ध्वज खणखणती, शीर्ण झाल्या पताका.
झालें शांत क्षणें तें रज, मग[16] शमनीं ऱ्हेषितें आणि हाका. ॥ २९

तेव्हां शत्रुघ्न सेनापतिस मग म्हणे, 'तूं निवारीं कुशातें,
सेनाव्यूहास[17] मीही दृढतर रचितों, आज रक्षूं यशातें.' ।

१. निर्दळण्याला, मारण्याला. २. माजलेल्या हत्तीला. ३. दंड थोपटी. **मंदाक्रांतावृत्त.**
४. क्ष्मापुत्रीचा आकांत संहर्ता=सीतेचा शोक दूर करणारा, कुश. हें **पर्यायोक्त** आहे. **मयूरी-वृत्त.** ५. माझ्या भावास (=लवास). **उपजातिवृत्त.** ६. धनुष्याच्या दोरीला. ७. बाणास.
८. येथें 'हें करा किंवा तें करा' अशी सवड दिल्याचें वर्णन आहे म्हणून हा **विकल्पा**लंकार झाला. ९. येथें काव्ये० सं०चा 'स्वशिरातें तऱ्ही [तुम्ही] लववा' असा पाठ आहे. परंतु त्यावरून कोणतेंच वृत्त जुळत नाहीं. आम्हीं स्वीकारलेल्या पाठानें हें **उपगीतिवृत्त** ठरतें. उपगीतींत प्रथम व तृतीय चरणांत बारा आणि द्वितीय व चतुर्थ चरणांत पंधरा मात्रा असतात.
१०. प्राणाची आशा. या उपगीतींतही वरील श्लोकाप्रमाणेंच **विकल्पा**लंकार आहे. ११. उद्धट.
१२. यम. १३. (जोरानें) सुटणाऱ्या वाऱ्यानें उडालेल्या धूळीचा लोट. १४. आकाशाच्या पोकळींत.
१५. पुष्कळ. १६. मग शमनीं (=मरणांत, मरण आल्यामुळें) ऱ्हेषितें (=घोड्यांचीं खिकाळणीं) व (योद्ध्यांच्या) हांका (हीं शांत झालीं). या अंत्य चरणांत **क्रियादीपक** आहे; **स्रग्धरावृत्त.**
१७. (शत्रूला तोंड देण्यासाठीं केलेली) सैन्याची रचना, तीम.

तें ऐकूनी वदे तो [1]बळरमण, 'शिशो! [2]तिष्ठ तिष्ठ'ति गर्वें,
अर्पी [3]दिग्बाण, ज्यांचीं खरतर वदनें [4]आततें सर्व पर्वें. ॥ ३०

तेव्हां त्याच्या शरांचें कुशळ **कु**श शरें भूतळीं चूर्ण पाडी,
[5]पार्ष्णिग्राहाश्वसूतांप्रति भटपति तो मृत्युलोकासि धाडी. ।
[6]चापांगत्राणतूणासिरथवरकिरीटादिकांतें स्वबाणें
छेदूनि, [7]क्रोधरक्तेक्षण मग घडवी त्यासि [8]नाकासि जाणें. ॥ ३१

'हा! हा!' शब्द तदा [9]बळीं प्रगटला [10]तद्बंधु **ना**गाभिध,
क्रोधोग्रेक्षण [11]हस्तिमस्तकग तो आला द्विषत्सन्निध. ।
क्षेपी शक्तिस, तत्क्षणीं **कु**श करी तीचें शरें वारण,
[12]क्रूरेषुप्रकरें करें करुनियां [13]छिन्नांघ्रि [14]तद्वारण. ॥ ३२

[15]नागापासुनि **ना**ग भूमि उतरे, हस्तीं गदेला धरी;
तीतें तत्करपंकजासहित तो पाडी शरें भूवरी. ।
त्याचा [16]वामहि [17]चक्रयुक् [18]शय शरें तोडी तदा, तो पदें
येतां धांवत, पादयुग्महि हरी बाणद्वयें तापदें. ॥ ३३

[19]धूलीधूसरशोणितार्द्रतनु तो चित्तांत कोपें कढे,
धांवे, **रा**हु जसा **र**विप्रति, तसा [20]**क्ष्मा**योनिपुत्राकडे. ।
तद्वीर्यें बहु तोषला **कु**श करी [21]स्वांतीं तयाचा स्तव,
छेदी तीव्र शरें शिरासि, [22]**म**खहा घे [23]मुंड मालेस्तव. ॥ ३४

एवं मारुनियां तयासि, मग तो **शत्रुघ्न**सेनेप्रती
छेदी तीक्ष्ण शरें, तदा म्हणति ते, 'कल्पांत कीं संप्रति!' ।

---

१. सेनापति. २. 'उभा रहा, उभा रहा' असें. ३. दहा बाण. ४. सर्व पर्वें आततें=सर्व बाजूंनीं विस्तृत, मोठीं. ५. त्याचे अनुचर, घोडे व सारथी यांस; पार्ष्णिग्राह=अनुचर, मागून येणारे योद्धे. ६. चाप+अंगत्राण (=चिलखत)+तूण (=भाता)+असि (=तरवार)+रथवर (=उत्तम रथ)+किरीट+आदिकातें. **यतिभंग**दोष. ७. रागानें लाल झाले आहेत डोळे ज्याचे असा (कुश). ८. स्वर्गास जाणें, मरणें. ९. सैन्यांत. १०. त्याचा (=सेनापतीचा) नागनांवाचा भाऊ. ११. हत्तीच्या गंडस्थळावर आरूढ झालेला. १२. तीक्ष्ण बाणांच्या समूहानें. १३. तोडले आहेत पाय ज्याचे असा. १४. त्याचा हत्ती. **शार्दूलविक्रीडित.** १५. हत्तीवरून. 'भूमि' (=भूमीवर) ही अधिष्ठानार्थी प्रथमा. 'भूमिं' असा सानुस्वार पाठ घेतल्यास, ती सप्तमीच होईल. 'भूसि' हा पाठ अधिक सरळ. १६. डावा. १७. ज्यांत चक्र आहे असा. १८. हात. १९. धुळीनें मळलेलें व रक्तानें न्हालेलें शरीर आहे ज्याचें असा (तो नाग). २०. सीतापुत्र कुश, त्याकडे. २१. मनांत. २२. (दक्षाच्या) यज्ञाचा नाश करणारा, शिव. २३. शिर. शूर योद्धा धारातीर्थीं पडला असतां, त्याचें मस्तक घेऊन, तें शिव आपल्या मुंडमालेंत घालतो ही गोष्ट येथें अनुसंधेय आहे.

[1]पादाताश्वतुरंगपर्वतनिभेभ [2]क्ष्मातळीं लोळती,
[3]सद्यःशोणितपानतत्परशिवागृध्राननें पोळती. ॥ ३५
जे होते [4]मदमत्तवारणशिरीं, जे अश्वपृष्ठावरी,
जे [5]कार्त्तस्वररत्नभूषितरथीं, [6]जैसे [6]विमानांतरीं, ।
[7]तद्बाणाहत ते [8]अधःपतनभाक् झाले महासंगरीं,
[9]जो कन्याद्रविणें स्वजीवन करी, तत्पूर्वजांचेपरी. ॥ ३६
एवं त्यांचें सैन्य तेव्हां कुशानें, केलें तीक्ष्ण [10]द्विण्महेभांकुशानें, ।
लोकांमध्यें वेदशास्त्रोक्तधर्में होतीं क्षीण क्षिप्र तैसीं [11]कुकर्में. ॥ ३७
जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
अध्याय आठवा हा श्रवण करावा कवींद्रमुख्यांनीं. ॥ ३८

## अध्याय नववा.

शत्रुघ्न क्रुद्ध तेव्हां नवशरनिकरें शत्रुला क्षिप्र ताडी,
[12]तो त्याचें, [13]तद्रथाचें, रज [14]अनिलकरें स्वर्गलोकासि धाडी. ।

---

१. पादात (=पायदळ)+अश्व+तुरंग+पर्वतनिभ (=पर्वतप्राय, पर्वता एवढाले)+इभ(=हत्ती). येथें 'अश्व' व 'तुरंग' हे दोन एकार्थीच शब्द कां योजिले आहेत, तें कळत नाहीं. २. पृथ्वी-तळीं, भुईवर. ३. सद्यः (=ताजें)+शोणित(=रक्त)+पान+तत्पर(=गढलेलें)+शिवा(=कोल्हीं)+गृध्र(=गिधाडें)+आननें. ताजें रक्त उष्ण असल्यामुळें त्यांचीं तोंडें भाजलीं–हा भावार्थ. ४. माजलेल्या हत्तीच्या मस्तकांवर. ५. सोनें व रत्नें यांनीं शृंगारलेल्या रथांत. ६. जसे विमानांतच (म्हणजे देवांप्रमाणें). येथें 'जैसे' हा अपपाठ असून, 'जे वा' हा खरा पाठ असावा. तसा पाठ घेतल्यास अर्थ असा होईल:–'किंवा जे विमानांत बसून लढत होते.' ७. त्या कुशाच्या बाणांनीं जखमी झालेले. ८. अधःपतनयुक्त, खालीं पडलेले. ९. या चरणावरून पंतांच्या वेळीं हल्लीं-प्रमाणेंच कित्येक निर्दय आईबापें आपल्या पोटच्या गोळ्याचा विक्रा करून आपलीं पोटें जाळीत होतीं हें सिद्ध होतें. **उपमा**लंकार. **शार्दूलविक्रीडित.** १०. शत्रुरूप मोठ्या हत्तींना जो अंकुश त्यानें. **परंपरितरूपक.** ११. अन्वयः–एवं तीक्ष्ण द्विण्महेभांकुशानें कुशानें तेव्हां त्यांचें सैन्य (जैसें क्षीण) केलें, तैसीं लोकांमध्यें वेदशास्त्रोक्तधर्में कुकर्में क्षिप्र (=लवकर) क्षीण होतीं. येथें 'सैन्य क्षीण करणें' हें खरोखर उपमेय आहे आणि 'कुकर्मांचें क्षीण होणें' हें उपमान आहे. परंतु येथें 'उपमाना'ला 'उपमेय' करून, 'उपमेय' 'उपमान' करण्यांत आलें आहे, म्हणून हें **प्रतीपालं**-काराचें उदाहरण आहे. **शालिनीवृत्त.** १२. तो=शत्रु, कुश. १३. त्याचें रज (=त्या बाणांचे राई राई एवढे तुकडे) व तद्रथानें रज (=त्याच्या रथाची धूळी). १४. वाऱ्याच्या हातानें, वाऱ्याकरवीं.

सौमित्रीच्या हृदब्जीं[1] क्षेत[2] करुनि, रथोपस्थदेशींच[3] पाडी.
तत्सेनामांसखंडें बकककरटशिवागृध्रयूथासि[4] वाढी. ॥ १

त्या काळीं बहुतचि तत्करें गळाले, जे होते मग हतशेष, ते पळाले. ।
दैवानें लवहि तदा विमोह[5] जाला; आलिंगी[6], नमन करून, अग्रजाला[7]. ॥ २

'बंधो! त्वां बहु अनवद्य[8] कर्म केलें, दुष्टाचें कटक[9] बरें क्षयासि नेलें. ।
त्वद्योगें लवहि न शत्रुभीति मातें, तूं आज्ञा कर, धरितों तुरंगमातें.' ॥ ३

आज्ञा होतां सीतापुत्राची, हातें वृक्षीं बांधी श्रीरामाच्या वाहातें[11]. ।
युद्धाकांक्षी[12] वाय्वग्नीसे ते बंधू एके जागीं झाले शौर्याचे सिंधू. ॥ ४

गेले जे हतशेष सैनिक, तिहीं साकेत[13] आसादिलें.
स्वस्वांतीं[14] म्हणती, 'अहो! बहु बरें सत्कार्य हें साधिलें!' ।
झाले सावध, यज्ञमंडपमहाद्वारासि ते पावले.
तद्दृग्भृंग[15] रघूत्तमांघ्रिकमलामोदार्थ[16] झेंपावले[17]. ॥ ५

मेखळारुरुचर्मपिप्पलदंडशृंगसभाजित[18],
स्वर्णभूतनयासमन्वित[19], भूमिदेवसभाजित[20], ।
होमधूमविलोहितेक्षण[21], सानुकंपनिरीक्षित[22],
प्रेक्षिला भरताद्युपासितपाद[23], राघव, दीक्षित[24]. ॥ ६

---

१. शत्रुघ्नाच्या हृदयांत. २. भेद, जखम, घाय. ३. रथाच्या बाजूला. ४. बगळे, कावळे, कोल्हीं व गिधाडें यांच्या थव्याला. **कारकदीपक. शार्दूलविक्रीडित.** ५. गेली आहे मूर्च्छा ज्याची असा, सावध. ६. 'आलिंगन' असा काव्ये० सं०चा पाठ आहे, तो वृत्तावरून उघड चुकीचा ठरतो. ७. वडिल भावाला, कुशाला. **प्रहर्षणीवृत्त.** ८. स्तुत्य, उत्तम. ९. सैन्य. १०. कुशाची. ११. घोड्याला. १२. युद्धाला उत्सुक झालेले. **मयूरीवृत्त.** १३. अयोध्या गांठली. १४. आपल्या मनांत. १५. त्यांचे डोळे हेच भ्रमर. १६. रामाच्या चरणरूप कमलाच्या स्वादासाठीं. १७. झेंपा घालूं लागले. येथें काव्ये०सं०चा असा पाठ आहे:—'रघूत्तमांघ्रिकमलामोदार्थसे पावले.' परंतु त्याचा अर्थ लागत नाहीं. १८. कटिसूत्र, मृगचर्म, पिंपळाचा दंड, व शिंग यांनीं युक्त. १९. सोन्याच्या केलेल्या सीतेनें (=तिच्या प्रतिमेनें) युक्त. २०. पृथ्वीवरच (आपल्या राजसभेनें) जिंकिली आहे देवसभा ज्यानें असा. मागें अ० ८ श्लो० ६ यांतील 'पद्मशोभाजितें (करें)' हा बहुव्रीहि समास प्रस्तुत समासासारखाच आहे. 'भूमिदेवसभाजित' याचा अर्थ 'भूमिदेवांनीं' म्हणजे ब्राह्मणांनीं 'सभाजित' म्हणजे पूजिलेला असाही होऊं शकेल. २१. यज्ञाच्या धुरानें लाल झाले आहेत डोळे ज्याचे असा. २२. दयापूर्ण आहे दृष्टि ज्याची असा. २३. भरत वगैरे ज्याच्या पायाजवळ बसले आहेत असा. २४. यजमानदीक्षा ज्यानें घेतली आहे असा. **विबुधप्रियावृत्त.**

ते सारे म्हणति, नमून 'पूर्णकामा! **श्रीरामा**! रघुतिलका! पवित्रनामा! ।
त्वद्वाजी क्षितिवर हिंडतां, तयाला पूजूनी सकळहि लोक [1]पूत झाला. ॥ ७

धरिला तुरंग ज्यांहीं, [2]रविनंदनलोकमार्गही त्यांहीं. ।
एवं स्वामी! पाहीं, विजयचि झाला तव प्रतापांहीं. ॥ ८

एवं तो हय रक्षिला, नृपजनें **शत्रुघ्न** वाखाणिला,
**वा**ल्मीक्याश्रमसन्निध त्वदनुजें वीरेश्वरें आणिला. ।
कोणेक द्विजबाळ विघ्न करिता झाला पथीं, त्याप्रती
येतां जिंकुनिया, [3]तदग्रज दुजा आला महादुर्मती. ॥ ९

तेणें [4]सानुज सैन्यपाळ वधिला, **शत्रुघ्न**ही ताडिला,
हृत्पद्मीं बहु [5]तीक्ष्णबाणनिकरें, निर्जीव तो पाडिला, ।
केलें त्या शिशुनें असें तव बळीं [6]शार्दूलविक्रीडित,
आलों त्वच्चरणासमीप नृपते! [7]तत्साध्वसें पीडित.' ॥ १०

परिसुनि म्हणे त्यांतें **सी**तापति, 'भ्रमलां कसे?
**शिव**! **शिव**! [8]पिशाचाविष्टोक्तासमान मला दिसे. ।
**हर**! **हर**! नसो यज्ञस्थानीं [9]प्रजल्प. उगे रहा.
[10]मदनुजनिला ताडी ऐसा न **विष्णु**, '[11]न [12]**वृ**त्रहा.' ॥ ११

ऐसें ऐकुनि, त्यासि वंदुनि शिरीं, ते बोलती सन्मती,
'देते ज्ञान, [13]अनादि मोह[14] हरुनि, [15]त्वन्नामधेयस्मृति. ।
[16]पैशाचभ्रमजन्म होइल विभो! आम्हासि कां? [17]शर्मदा!
तूझे सेवक, तूज गाउनि, तुला संप्रेक्षितां सर्वदा.' ॥ १२

---

१. पवित्र. **प्रहर्षणीवृत्त.** २. सूर्यपुत्र जो यम त्याच्या प्रदेशाचा रस्ता. **दीपक. गीतिवृत्त.** ३. त्याचा मोठा भाऊ. **शार्दूलविक्रीडित.** ४. सेनापती व त्याचा भाऊ. ५. तीव्र बाणांच्या समूहानें. ६. सिंहासारखें (शूरपणाचें) कृत्य. या शब्दानें श्लोकाचें वृत्तही सुचविलें आहे. ७. त्याच्या भयानें. ८. भूतानें झपाटलेल्याच्या बोलण्याप्रमाणें. **यतिभंगदोष.** ९. (अशुभ) बडबड. १०. माझ्या धाकट्या भावाला. ११. हा शब्द काव्ये०सं० च्या प्रतींत गळलेला आहे. १२. इंद्र. इंद्रानें वृत्रासुराचा वध केल्यावरून हें नांव त्याला पडलें. **हरिणीवृत्त. काव्यर्थापत्तिध्वनि.** १३. ज्याला आदि (=आरंभ) नाहीं असा, अगदीं जुनाट. १४. अज्ञान. १५. तुझें नामस्मरण. १६. भूतबाधेचा उद्भव. येथें द्वितीय व तृतीय चरणांत कार्यकारणभाव असून 'कारण' किंवा तत्सदृश शब्द योजिला नाहीं, म्हणून हा **काव्यलिंगा**लंकार आहे. १७. हे सुखदात्या! **शार्दूलविक्रीडितवृत्त.**

ऐसें ऐकुनियां, राम पावला हृदयीं श्रम. ।
मग बोले लोकैक[1]कामकल्पद्रुम मनोरम. ॥                    १३

'जंबुकें[2] वधिला सिंह, बुडाला गोष्पदीं[3] करी, ।
झाली कशी कालगत्या[4] विपरीताचि[5] हे परी[6]? ॥                    १४

रे वत्सा! लक्ष्मणा! तूं लवणरिपु[7]चिया मृत्युपाशासि खंडीं,
वाजीतें सोडवूनि, द्विजशिशुसि बरें मद्यशोघ्नासि[8] दंडीं[9]. ।
वीरा! तूं मेघनादांतक[10], मजहुनिही कीर्ति तूझी विचित्रा,
त्वां[11] पुत्रें लोकवंद्या, अदिति[12] जशि, तशी माय माझी सुमित्रा. ॥ १५

आज्ञा वाहुनि मस्तकीं, नमुनियां, सौमित्र तेव्हां निघे.
तत्सेनाहतदुंदुभिस्वन[13] तदा स्वर्गासि पोंहूं[14] रिघे. ।
एकस्त्रीव्रतपूत[15] सर्व भट ते प्रोद्दामवीर्यास्पद[16]
स्वांतीं मानिति जीवितासि तृणवत्, सिंधूसिंही गोष्पद. ॥                    १६

वाजींच्या खुरकुट्टणें[17]करुनियां पाषाण झाले चुरा,
सांगायास्तव रेणुदूत[18] बहुधा[19] गेला सुरांच्या पुरा. ।
भूभृत्कल्पमतंगजोद्भटघटाभाराकुलांगी[20] धरा,
कन्यापुत्रविनाश मानुनि जणों[21], झाला तिला कापरा. ॥                    १७

१. लोकांच्या इच्छांचा (इच्छा पुरविणारा) कल्पवृक्ष. **रूपक. अनुष्टुप्छंद.** २. कोल्ह्यानें. ३. गाईच्या (चिखलांत उमटलेल्या) पावलांत (=त्यांत सांचलेल्या पाण्यांत). **असंभवा**लंकार. ४. (वांकड्या) काळाच्या करणीनें. ५. उलट. ६. प्रकार, स्थिति. ७. शत्रुघ्नाच्या. ८. माझें यश नष्ट करणाऱ्यास. ९. शिक्षा कर. १०. इंद्रजिताला मारणारा. ११. तूं पुत्र लाभल्यामुळें. ही केवळ संस्कृत रचना आहे. १२. देवमाता व कश्यपाच्या स्त्रियांपैकीं एक. **स्रग्धरावृत्त.** १३. त्याच्या सैन्यानें वाजविलेल्या भेरींचा नाद. १४. ही **हेतूत्प्रेक्षा** आहे. १५. एकपत्नी व्रतानें पवित्र झालेले. हें 'प्रोद्दामवीर्यास्पद'त्वाचें कारण आहे, म्हणून हा **काव्यलिंगा**लंकार. १६. अत्यंत प्रबळ वीर्याचें माहेर. **शार्दूलविक्रीडित.** १७. टापांनीं कुटल्यामुळें. १८. धूलिकण हेच दूत. **रूपक.** १९. ही **हेतूत्प्रेक्षा** आहे. २०. भूभृत्कल्प (=पर्वताप्रमाणें मोठे)+मतंगज (=माजलेले हत्ती)+उद्भट (=व्रात्य)+घटा (=समूह)+भार+आकुल (=पीडित, त्रस्त)+अंगी=पर्वतप्राय हत्तीच्या भारानें त्रासलेली. २१. जणूं काय आपल्या मातवांचा नाश झालाच असें समजून. **हेतूत्प्रेक्षा.**

गेल्या [1]शत्रुजनांगनाक्षियुगुळीं तत्सैन्यधाकें [2]धुनी,
 [3]होतें जें तृण तेंहि **राम**रिपुचीं तुंडें [4]बैळें शोधुनी. ।
होतां हीन लताद्रुमें, न मग तीं संशोभतीं काननें,
 जैशीं [5]**रा**मसुरद्रुतद्गुणलतासंत्यक्त [6]लोकाननें. ॥ १८
 एवं **सौ**मित्रि जाऊनी रणभूमीस पावला. ।
 [7]जीवशेष, [8]धरासंस्थ, [9]निजानुज विलोकिला. ॥ १९
 **जै**मिनिकृत**भा**रतगत**हय**मेधीं **कुशल**वाख्यानीं ।
 हा नववा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ २०

---

## अध्याय दहावा.

त्या सेनेसि विलोकितां **कुश** म्हणे, 'आतां करावें कसें ?
 आहे फारचि [10]दुष्प्रधर्ष बळ हें, [11]**दे**वाधिपाचें जसें.' ।
तेव्हां त्यासि कथी **लव**, 'क्षितितळीं या सैनिकांचीं शिरें
 कोहाळ्यापरि फोडिजे फटफटां क्रूरें शरें, कीं [12]करें. ॥ १
नाहीं योग्य तुझ्या बळासि [13]बैळ हें; [14]**कुं**भोद्भवाला जसा
 [15]अंभोराशि, तसा तृणासम गमे सैन्यौघ मन्मानसा. ।
मातें चाप नसे, रणांत रिपुनें केले शरें तूकडे.'
 पाहे, बोलुनियां असें, **लव** तदा तो [16]**लो**कबंधूकडे. ॥ २
[17]त्रिभुवनरक्षादक्षा! नमितों तुजला, [18]स्वभक्त**सुर**वृक्षा! ।

१. शत्रूंच्या स्त्रियांच्या दोन्ही डोळ्यांत. २. नद्या. शत्रुस्त्रियांच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह वाहूं लागले—हा भाव. उन्मत्त शत्रू मेल्यावर त्यांच्या स्त्रिया ओक्साबोक्सीं रडूं लागल्या. **पर्यायोक्ता**लंकार. ३. (जे शत्रू भित्रे होते) त्या शत्रूंच्या तोंडांत बळेंच तृण शिरलें; म्हणजे भित्रे राजे दातीं तृण धरून लक्ष्मणास शरण आले. **पर्यायोक्त.** ४. मुद्दाम, उद्देशून. ५. रामरूपी कल्पवृक्षानें व त्याच्या गुणरूप लतांनीं सोडलेलीं. ६. लोकांचीं तोंडें. ज्यांच्यांवर रामप्रसाद नव्हता अशा लोकांचीं मुखें, वृक्षहीन अरण्यापेक्षांही वाईट दिसूं लागलीं. **व्यतिरेका**लंकार. ७. धुगधुगी मात्र राहिली आहे असा. ८. भुईवर पडलेला. ९. आपला पाठचा भाऊ शत्रुघ्न. **अनुष्टुप्.** १०. मर्दन करण्यास कठीण असें. ११. इंद्राचें. १२. हातानें. **उपमा. शार्दूलविक्रीडित.** १३. सैन्य. १४. कुंभापासून उत्पन्न झालेले अगस्तिमुनि. १५. समुद्र. **उपमा.** १६. सूर्याकडे. १७. विश्वाचें संरक्षण करण्यांत तत्पर! १८. आपल्या भक्तांच्या कल्पवृक्षा!

[1]तिमिरद्विपहर्यक्षा! [2]तेजःपक्षा! [3]क्षतामरविपक्षा! ॥ ३
[4]स्वजनभवांबुधितरणे! त्रिजगद्भूषणमहामणे! [5]तरणे! ।
दे मंज चापास रणीं, दाविन दुष्टासि [6]काळगृहसरणी.' ॥ ४

एवं संस्तवितां, [7]दिनेश भगवान् श्रीमान् दयासागर
स्नेहें दे शिशुला [8]धनुव्रततिला देखावया [9]संगर ।
हातीं घेउनियां, म्हणे **लव कुशा**, 'स्वोत्कर्ष मातें गमे.
'[10]श्रीविघ्नेश्वर! ते नमः, [11]कुरु कृपां, [12]निर्विघ्नमस्त्वद्य मे!' ॥ ५

जैसे [13]वायुविभावसू, **कुश लव** क्रोधें तसे धावले.
[14]विस्फारूनि धनुर्लतांसि, सहसा सैन्यांतरीं पावले. ।
केलें मर्दन, [15]मांसकर्दमपटें [16]रक्तस्रवंती किती
तेथें वाहति; पाहती [17]भटें, मनीं कल्पांतसे तर्किती. ॥ ६

[18]सेनानी **लक्ष्मणाचा** [19]प्रकटबळयशा **काळजिन्नाम**, त्याला
संगें घेऊनि, **रामानुज** [20]**घनरवहा** तो पुढें शीघ्र झाला. ।
दोघेही बाणजाळेंकरुनि मग रणीं रोधिती त्या **कुशाला**,
तेव्हां एका **लवानें** द्रुततर [21]वेरिली सर्वसेना विशाला. ॥ ७

फिरे सेनेमध्यें अभय, [22]विपिनांतीं [23]अनळसा,
जयाची [24]दोर्वल्ली सतत शरदानीं [25]अनळसा. ।

---

१. अंधकाररूप हत्तीच्या (=हत्तीस मारणाऱ्या) सिंहा! हर्यक्ष=सिंह. काव्ये० सं० कारांनीं 'हर्यक्ष' याचा अर्थ 'रुद्र' असा केला आहे. परंतु मग 'द्विप' याचा अर्थ 'गज, गजासुर' असा करावा लागेल. २. तेजाच्या पुंजा! ३. जखमी केले आहेत देवांचे शत्रू (=राक्षस) ज्यानें अशा! **गीति-वृत्त.** ४. आपल्या भक्तांना भवसमुद्रांत तारणाऱ्या तारवा! हें विशेषण 'लवाला या संकटांत सूर्य तारील' असें सुचवित आहे, म्हणून तें सहेतुक आहे, तेव्हां **परिकरा**लंकार झाला. ५. सूर्या! ६. यमाच्या घराची वाट. ७. सूर्य. ८. धनुष्याला, धनुर्लतेला. ९. युद्ध. १०. हे विघ्ननाशका! (गजानना!) मी तुला नमस्कार करितों. ११. कृपा कर. १२. आज मला विघ्न न येवो. **शार्दूल-विक्रीडित.** १३. वारा व अग्नी. १४. ओढून. १५. मांसाच्या चिखलाच्या आवरणानें (थरानें). १६. रक्ताच्या नद्या. १७. योद्धे. **अनुमाना**लंकार. १८. सेनापति. १९. मोठें (होतें) बळ व कीर्ति ज्याची असा. २०. इंद्रजिताचा हंता, लक्ष्मण. २१. गांठिली, (तिला) तोंड दिलें. कदाचित् येथें 'वधिली' असा पाठ असावा. २२. रानांत. २३. अग्नीप्रमाणें. **उपमा.** २४. धनुष्याची दोरी. २५. चपळ.

[1]रथेभांच्या [2]पंक्ती [3]तुरगवरपादातसहिता,
लवातें वेष्टूनी, बहुत [4]वसती वीरविहिता. ॥ ८

कितेक रथ मोडिले, ध्वज कितेकही तोडिले,
कितेक शर सोडिले, गज कितेकही झोडिले, ।
असंख्य भट ताडिले, यमपुराकडे धाडिले,
[5]शिरःप्रकर पाडिले, बहुत यापरी नाडिले. ॥ ९

तेव्हां [6]शूलगदापरश्वसिलताशक्त्यृष्टिचक्रायुधें
[7]कुंतप्रासभृशुंडिमुद्गरमहापाशादि नानाविधें ।
सर्वांहीं त्यजिलीं लवावर; तदा तो त्यांस खंडी शरें, ।
मूर्खाच्या वचनासि पंडित जसा निःशंक [8]युक्तयुत्तरें. ॥ १०

तेव्हां मागें फिरोनि, क्षततनु लव तो अग्रजालागिं पाहे,
तों, तो कोठें दिसेना, मग निज हृदयीं फार चिंतेसि वाहे, ।
[9]प्रावृण्मेघापरी ते सुभट भटशिरीं वर्षती आयुधांहीं,
जैसा [10]भूमिध्र, तैसा तिळभरि न चळे; [11]वर्णिला तैं बुधांहीं. ॥ ११

शत्रुघ्नें लवणासुर [12]प्रमथिला पूर्वीच, [13]तन्मातुळ
आला जो रुधिराक्षनाम शरण श्रीरामभीत्याकुळ, ।
त्या दुष्टें हरिलें [14]शरासन, तदा वेगें रिघे तो नभीं,
तेव्हां तो लव, चक्र घेउनि, उडे [15]व्योमीं तयाला न भी. ॥ १२

जैसा [16]आमिषलुब्ध [17]श्येन व्योमीं शिरे, तसा शोभे; ।
चक्रें [18]शक्रानुजसा, [19]देवस्त्रीवृंद पाहतां लोभे. ॥ १३

---

१. रथ व हत्ती यांच्या. २. रांगा. ३. उत्तम घोडे व पायदळ यांसह. ४. ज्यांत (उत्तम) वीर आहेत अशा. **शिखरिणी.** ५. मस्तकांच्या राशी. **पृथ्वी. पुष्पयमक.** ६. शूल (=भाला)+गदा+परशु (=फरशी)+असिलता (=तरवार)+शक्ति (=एक फेंकण्याचें उत्तम पोलादी शस्त्र)+ऋष्टि (=दुधारी तरवारी)+चक्र+आयुधें. ७. कुंत (=भाला)+प्रास (=एक फेंकण्याचें हत्यार)+भृशुंडि (हत्यार ?)+मुद्गर (=गदा)+महापाश (=मोठमोठ्या काढण्या, फांस)+आदि (=वगैरे). ८. सयुक्तिक(=योग्य) उत्तरानें. **उपमा. शार्दूलविक्रीडित.** ९. पावसाळ्यांतील ढगांप्रमाणें. १०. डोंगर. **उपमा.** ११. स्तविला, वानिला. **स्रग्धरा.** १२. मारला. १३. त्याचा मामा. १४. धनुष्य. १५. आकाशांत. **शार्दूलविक्रीडित.** १६. मांसावर आसक्त झालेला. १७. ससाणा. १८. इंद्राचा धाकटा भाऊ म्हणजे विष्णु, त्यासारखा. १९. अप्सरांचा समुदाय. **गीतिवृत्त.**

भूमीसंस्थित सर्व वीरवर, '[1]हा माया. पडेल स्वयें,
किंवा काय करील तेंचि न कळे' हें बोलती तद्भयें. ।
कोणी भ्याड रथाबुडींच दडती, कोणी [2]मृतेभांतरीं,
कोणी ऊर्ध्व शरांसि योजिति, किती [3]चर्मासि घेती शिरीं. ॥ १४

मंत्र्याचेहि **जि**तश्रमादि सुत जे **दि**[4]क्स्यंदनाच्या दहा,
त्यांहीं चक्र विखंडितां [5]रुडनळें जाला **ल**वाचा [6]दहा. ।
सारेही पडती सुतीक्ष्ण [7]पैरिघें संताडितां ते तसे,
अंतीं नास्तिक [8]वेदबाह्य नरकीं [9]दुःशास्त्रवेत्ते जसे. ॥ १५

तेव्हां तो रुधिराक्ष राक्षस गदा हाणी **ल**वाच्या शिरीं.
मूर्छा पावुनियां, उठे पुनरपि क्रोधें [10]मुहूर्तांतरीं. ।
केशीं त्यासि धरूनि, मस्तक तदा [11]कुंतायुधानें हरी.
[12]भास्वद्दत्त धनू करीं करुनियां, गर्जे [13]हरीच्यापरी. ॥ १६

पुनरपि तो **ल**व तेव्हां क्षणमात्रें वेष्टिला महासेनांहीं. ।
गर्भापासुनि बाहिर पडल्यावर जेंवि [14]जंतु अज्ञानांहीं. ॥ १७

[15]तृणेन्धनाच्छादित [16]आश्रयाश जसा [17]तयाचाचि करी विनाश, ।
सेनागणीं वेष्टित तो शरांहीं मर्दी [18]तयालाचि भयंकरांहीं. ॥ १८

**जै**मिनिकृत**भा**रतगत**ह**यमेधीं **कु**शलवाख्यानीं, ।
अध्याय दहावा हा श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १९

---

### अध्याय अकरावा.

**सौ**मित्रीशीं **कु**शाशीं प्रखरतररणीं ज्या क्षणीं [19]योग जाला,
**सी**तेचा सूनु गर्जे निरखुनि मृगराड् उग्र जैसा गजाला. ।

---

१. हा लव राक्षसमायाच आहे, हा मायावी आहे. २. मेलेल्या हत्तीच्या कातड्यांत. ३. ढालीला. ही **स्वभावोक्ति** आहे. **शार्दूलविक्रीडित.** ४. दशरथाच्या. ५. राग हाच अग्नी, त्यानें. ६. दाह, भडका. ७. चक्रानें. ८. वेदास न मानणारे. ९. दुष्ट शास्त्रांचा (=चार्वाकादि अधर्मीयांच्या ग्रंथांचा) व्यासंग करणारे. **उपमा.** १०. घटकाभऱ्यानें. ११. भाल्यानें. १२. सूर्यानें दिलेलें. १३. सिंहाप्रमाणें. १४. प्राणी. उपमा. या अध्यायांतील बऱ्याच **उपमा** आध्यात्मिक विषयांतील आहेत. **आर्यागीतिवृत्त.** याच्या प्रथम व तृतीय पादांत बाराबारा व द्वितीय व चतुर्थ पादांत अठराअठरा मात्रा असतात. १५. तृण व लांकडें यांनीं झांकलेला. काव्ये० सं०चा 'तृणें घनाच्छादित' असा पाठ आहे. तो चुकीचा ठरतो. १६. अग्नी. १७. काव्ये०सं०चा 'तयाचा विकरी' असा पाठ आहे. १८. सेनागणालाच. **उपजातिवृत्त.** १९. गांठ, सामना.

सोडी पांचां शरांतें **घ**नरववरिपु; तो त्यांसि तोडूनि, बोले,
'मागें न स्यंदनातें[1] कर, तव पिशितें[2] तर्पितों आजि कोलें[3].' ॥ १

ऐसें बोलोन, तेणें स्वरिपुरथ शरें ताडितां भोवताला,
भोंवे[4] वेगें मुहूर्त क्षितिवरि करितां[5] अश्व गेले लयाला. ।
तो अन्यस्यंदनस्थ[6], द्रुत[7] विशिखयुगें[8] वर्म[9] तोडूनि पाडी,
कोपें बाणत्रयानें त्वरित हरिपदीं[10] तत्किरीटासि धाडी. ॥ २

म्हणे **कुश**, 'भला! भला! त्यजुनि वैरिता संप्रती,
रणांत हरिलेंसि तूं जरि मदीय भाराप्रती[11], ।
तुझ्या बळभरासि मी हरिन आज, विश्वास हा
मनीं धरुनियां रहा, शरगणासि माझ्या सहा.' ॥ ३

आग्नेयास्त्रास[12] सोडी **कुश**, अनळ[13] तदा भाजुनी तद्रथाला,
जाळी वीरव्रजाला[14], ध्वजरथतुरगां, उष्ट्रकांला, गजांला. ।
नाना शस्त्रें जळालीं, कितिक शिखिभयें[15] योधवृंदें[16] पळालीं,
छत्रें, वर्में गळालीं; सुरुचिर वसनें फार भस्मीं[17] मिळालीं. ॥ ४

**सौ**मित्री वारुणास्त्रें[18] शमवित, दुसऱ्या मारुतास्त्रासि[19] सोडी,
तेव्हां वायु प्रचंड ध्वज, रथ, गज, जे त्यांसि अत्यंत झोडी. ।
आकाशीं शुष्कपर्णापरि किति फिरती, भ्रांत सारे पदाती.
स्वर्गातें वृक्षजाती[20] द्विजसम[21] उडती, शैलही[22] भीति घेती. ॥ ५

१. रथातें. 'स्यंदनातें मागें न कर' म्हणजे रथ मागें फिरवून आतां पळून जाऊं नकोस. २. मांसानें. ३. डुकरें. येथें 'कोल्हें' असाही पाठ असणें संभाव्य आहे. **स्रग्धरावृत्त.** ४. वाटे. ५. ?. 'फिरतां' असा पाठ असेल काय? ६. नवीन रथांत बसलेला लक्ष्मण. ७. लवकर. ८. दोन बाणांनीं. ९. चिलखत. १०. घोड्यांच्या पायांजवळ. ११. बळाला, शक्तीला. अन्वयः—जरि तूं संप्रती वैरिता त्यजुनि (=शरण येऊनि) मदीय भाराप्रती हरिलेंस, (तरि) तूं भला! भला! **पृथ्वीवृत्त.** १२. अग्निजनक अस्त्र. १३. अग्नि. १४. वीर-समूहाला. १५. अग्नीच्या भयानें. १६. वीरांचे समूह. १७. राखेंत. **स्रग्धरावृत्त.** १८. मे-घास्त्रानें. १९. वायुजनक अस्त्राला. 'सोडी' या क्रियेचा कर्ता 'कुश' अध्याहृत. २०. निरनिराळे वृक्षांचे समूह. २१. पक्ष्याप्रमाणें. २२. 'शैलही भीति घेती' म्हणजे या अस्त्राच्या वाऱ्यानें आम्हीही उडून जाऊं कीं काय अशी अचल जे डोंगर त्यांनांही धास्ती पडली. पाठभेदः—'स्वर्गातें वृक्ष जाती; द्विजसम उडती शैलही, भीति देती.' येथें डोंगर पक्ष्यांप्रमाणें उडूं लागले, व आतां हे आपल्या अंगावर पडतील कीं काय अशी लोकांस भीती वाटूं लागली असा अर्थ निघेल.

सेनानी मग लक्ष्मणाप्रति म्हणे, 'मी यासि संहारितों,
ऐकाकी तव साध्य होइल, पहा, अस्त्रांस[2] मी वारितों.' । [1]
ऐसें ऐकुनियां म्हणे कुश, 'वृथा मूढा! किती जल्पसी?
त्वज्जिव्हा हरितों बरें, मदिषुला[3] छेदों जरी कल्पिसी.[4]' ॥ ६

ऐसें बोलोनि, जिव्हा हरि बळपतिची, तोहि बाणें कुशाला
ताडी कोपें हृदब्जीं, क्षितिदुहितृसुतें तत्कर च्छिन्न केला. ।
अर्धेंद्वाकारबाणें[5] मग रुचिर शिर च्छेदितां, रामबंधू
सेनानीमृत्युकाळीं बहुत खवळला मानसीं शौर्यसिंधू. ॥ ७

आधीं अर्पुनि बाण दारुण सहा, अर्पी बळें शक्तिला;
कुंतातें[6], असिला, गदेसि, मग तो दावी महाशक्तिला. ।
त्यागी मुद्गर आणखी परशु या दोहींस, त्यांला करें ।
सीतेचा सुत सप्तधा[7] क्षितितळीं छेदूनि पाडी शरें. ॥ ८

ज्यांपासूनि नभोंतरीं शिखिशिखा[8] विद्युत्समा फांकती,
ऐसे बाण लवाग्रजें कवळितां लोकेशही[9] धाकती. ।
त्यांहीं लक्ष्मणहृत्कपाटकवच[10] च्छेदूनियां भेदिलें,
त्यातें भूवरि पाडिलें, मग कुशें मूर्च्छासुहस्तीं[11] दिलें. ॥ ९

जेव्हां दूरुनि बंधुसिंहनिनद[12] श्रोत्रीं[13] तयाच्या धंसे[14],
पाहे, तों बळराजिवेष्टित[15] लव क्ष्मासुतजाला[16] दिसे. ।
हातीं घेउनि खड्गचर्म, परम क्रोधें तदा धांवला,
अग्नीलागिं सहाय मारुत जसा जाऊनियां पावला[17]. ॥ १०

द्विधा गज विदारिले, रथहि धूळिला अर्पिले,
पदातिहय चूर्णिले, पिशितभुक्[18] क्षणें तर्पिले. ।

---

१. सेनापती लक्ष्मणास म्हणतो, 'मी याच्या अस्त्रांस वारितों. तुम्हीं त्या अस्त्रांकडे लक्ष्य देऊं नका. म्हणजे ह्या एकट्यालाच मारणें तुम्हांला शक्य होईलसें वाटतें.' २. येथें काव्ये० सं०चा 'ही' असा पाठ आहे. ३. माझ्या बाणांना. ४. बेत करितोस. **शार्दूलविक्रीडित.** ५. अर्धचंद्राकार बाणानें. **स्रग्धरावृत्त.** ६. भाल्याला. ७. सात प्रकारें फोडून, सात तुकडे करून. **शार्दूलविक्रीडित.** ८. अग्नीच्या ज्वाळा. ९. इंद्र, वरुण, यम व कुबेर हे चार दिक्पाळ. १०. लक्ष्मणाच्या छातीवरील चिलखत. ११. मूर्च्छेच्या ताब्यांत. काव्ये० सं०चा 'मूर्च्छास्वहस्तीं' असा पाठ आहे. १२. भावाचा सिंहनाद. १३. कानांत. १४. शिरे. १५. सैन्याच्या रांगांनीं वेढलेला. १६. कुशाला. १७. पोंचला. १८. मांस खाणारे, कोल्हीं, गिधाडें इत्यादि.

कितेक [1]पललक्षमाधर विनिर्मिले [2]क्ष्मातळीं,
कितेक रुधिरें नदी, कितिक कूप, वापी, तळीं. ॥ ११

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं।
अकरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ १२

## अध्याय बारावा.

श्रीमद्राघव दीक्षित, स्वहृदयीं चिंता करूनी, वदे;
'रे! वत्सा! भरता! स्वदर्शन मला सौमित्र तो कां न दे? ।
ज्यांहीं जिंकुनि पाडिला [3]त्वदनुज, [4]क्रैत्वश्व नेला असे,
त्यांच्या सर्व यशासि घेउनि, कसा आला न? बोला, कसें? ॥ १

सौमित्रिप्रति संगरीं निरखितां देवादिही धाकती,
तेथें मंदमती किती द्विजशिशू! युद्धीं कसे ठाकती? ।
[5]जन्योद्युक्तमना ममानुज जधीं होईल; तेव्हां तया
सांगा कोण [7]शरण्य या त्रिभुवनीं नाशावया तद्भया? ॥ २

कोपें [8]प्रवर्त्ततां द्विजशिशुमथनीं शौर्यासिंधु मद्भ्राता, ।
[9]सुतनाशाकुलचित्ता प्रार्थी कोणासि तेथ तन्माता? ॥ ३

[10]धर्मगृहापासुनिहि स्वबळें आणील बंधुरत्नातें, ।
[11]चंडपराक्रममंडित न चुकेल [12]प्राज्ञ तो प्रयत्नातें. ॥ ४

---

१. मांसाचे पर्वत. २. पृथ्वीच्या पृष्ठावर. हें **अत्युक्तीचें** (exaggeration) उत्तम उदाहरण आहे. **पृथ्वीवृत्त.** ३. तुझा धाकटा भाऊ शत्रुघ्न. मागें 'शत्रुघ्ना'स 'सौमित्रि' म्हटलें आहे. तेव्हां तो सुमित्रेचा मुलगा होता. भरत हा निःसंशय कैकेयीचा होता. तेव्हां येथें कवीनें कैकेयीच्या जुळ्या मुलांबद्दलची लौकिक कथा व सुमित्रेच्या जुळ्या मुलांची रामायणी कथा यांचा घोंटाळा केला आहे. भरत हा रामापेक्षां लहान, परंतु लक्ष्मण व शत्रुघ्न याच्या आधीं जन्मला होता म्हणूनही कदाचित् येथें शत्रुघ्नाला भरताचा धाकटा भाऊ म्हटलें असेल. ४. यज्ञाचा अश्व. **शार्दूलविक्रीडित.** ५. येथें कैमुतिकन्यायानें **अर्थापत्ति** नांवाचा अलंकार आहे. ६. जन्य+उद्युक्त+मना=लढाईविषयीं उत्सुक झालें आहे मन ज्याचें असा. ७. आसरा देणारा. ८. वागतां, क्रिया करितांना, तयार झाला असतां. ९. मुलांच्या मृत्यूनें विव्हळ झालें आहे मन जिचें अशी. **गीतिवृत्त.** १०. यमाच्या घरांतून सुद्धां. ११. प्रखर पराक्रमानें युक्त. १२. शहाणा. येथें 'चंडपराक्रममंडित' व 'प्राज्ञ' हीं विशेषणें 'प्रयत्न करण्यांत न चुकण्याचें' कारण दाखवितात, म्हणून हा **काव्यलिंगालंकार** आहे.

मम यज्ञविघ्नकारक दारक[1] कोठूनि पावले आजी[2]? ।
करुनि अवज्ञा माझी, वाजी धरिला, विनिर्मिला आजी. ॥ ५

अंगद, सुगळ[3], बिभीषण, पवनज[4], यांतें कसें अनादरिलें? ।
फणिफणमणी[5] न जाणुनि, मंदश्वरत्न[6] द्विजात्मजें हरिलें. ॥ ६

अन्य मदीय सुहृज्जन त्यांचाहि मनांत न धरिला लेखा[7], ।
धाकहि ज्यास न कांहीं द्विजसुतचेष्टित[8] विचित्र हें देखा. ॥ ७

सौमित्रिप्रति माझ्या संदेशातें[9] सुशीघ्र नेति असे, ।
आणावे चार[10] भले, भरता! अस्वस्थ चित्त आजि असे. ॥ ८

तत्सेवालाभरतें[11] आणविले पांच दूत तेव्हां भरतें ।
बोले हृतभूभर[12], तें ऐका येतें कृपांबुनिधिला[13] भरतें. ॥ ९

द्विजबाळ मोहनास्त्रें मोहुनि जीवंत लक्ष्मणा! धरणें, ।
रिपुसिंधुनिमग्नयशःशरीर[14], यातें असें समुद्धरणें[15]. ॥ १०

तूं शूर, वीरसेवितरथ, स्वधृतिमान्[16], धनुःश्रुतिज्ञ[17], कृती; ।
अपराधी, परि रक्षीं, विरथ, निराश्रय, शिशू, पशुप्रकृती[18]. ॥ ११

१. मुलगे. २. युद्ध. 'आजि' हा शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी तसाच पुल्लिंगीही आहे. ३. सुग्रीव किष्किंधेचा वानरराज व रामाचा दोस्त. ४. रामभक्त मारुति. ५. सर्पाच्या फडेवरील रत्न. ६. उत्तम घोडा, (पक्षीं) घोडा हेंच रत्न. येथें **रूपक** आहे. ७. पर्वा. ८. ब्राह्मण-पुत्राचे चाळे. **विरोधाभासा**लंकार. ९. निरोपाला. १०. हेर. ११. रामाची जी सेवा तीपासून होणाऱ्या लाभावर ज्याचें मन बसलें आहे असा, त्यानें. १२. हृतभूभर बोले=ज्यानें पृथ्वीचा भार (राक्षसादिवधानें) हरिला आहे असा राम बोलूं लागला. १३. दयासागराला, करुणरसाला. १४. शत्रूरूप समुद्रांत बुडालेलें यशोरूप शरीर. समुद्रांत जसें शरीर बुडावें तसें शत्रुकृतींत आपलें यश बुडालें आहे, तर शत्रूस पराभवून फक्त आपलें यश पुन्हां उज्ज्वळ कर—हा भावार्थ. १५. बाहेर काढणें. १६. आंगचेंच बळ ज्याला आहे असा. १७. धनुर्विद्या जाणणारा. १८. पशुतुल्य स्वभाव ज्याचा असा, आडाणी. येथें लक्ष्मण व कुशलव यांचे परस्पर विसंवादी गुण वर्णिले असल्यामुळें **विरुद्धगुणन्यासा**लंकार आहे. तसेंच लक्ष्मणाच्या प्रत्येक गुणांत क्रमानें चढती पायरी व कुशलवांच्या गुणांत क्रमानें उतरती पायरी दाखविली असल्यामुळें दोहोंतही **सारालंकार** झाला. तसें 'अपराधी' असून त्याचें 'रक्षण करणें' यांत **विशेषोक्ति** आहे, कारण सामग्री असूनही कार्य होत नाहीं. पुन्हा 'विरथ' 'निराश्रय' इ० विशेषणानें रक्षणाचें कारण दाखविलें आहे म्हणून **काव्यलिंग.** तसेंच 'विरथ' इ० विशेषणांतील एकच रक्षण करण्यास पुरेसें कारण असतां, तीं सर्व दिलीं आहेत, म्हणून हा **समुच्चया**लंकार. तसेंच या गीतींत 'र'चा **वृत्त्यनुप्रास** आहे.

जे परबाळावरती करिति दया, त्यांसि कीर्तिमा[1] वरिती; ।
बहुपुत्रपौत्रलालनसुखभाजन संसृतीसि[2] मधु करिती. ॥ १२
सीतावदनांबुजनिभ[3] पुत्रानन मीं विलोकिलें नाहीं, ।
संसृतिनदीप्रवाहीं मज कांहीं सुख न लाभलें पाहीं. ॥ १३
कां विपिनीं[4]? कोण पिता, माता? स्थळ कोण? हें विचारावें. ।
आणावें मजपाशीं, त्यांचें भय सर्वही निवारावें.' ॥ १४
एवं सांगत असतां क्षतजोक्षितगात्र[5] वीर बहु आले, ।
वेपथुकंपभयाकुळ[6] रामातें नमुनियां सुखी झाले. ॥ १५
तेव्हां ते म्हणती, 'जगत्रयपते! सौमित्रि गेल्यावरी
शत्रुघ्नासि विलोकितां खवळला, युद्धासि कोपें करी, ।
त्या काळीं मग त्या रणीं द्विजसुतें सेनापती मर्दिला,
देवासह्य परंतु लक्ष्मण कृती तो मोहहस्तीं दिला. ॥ १६
जेणें राक्षस लक्षकोटि वधिले, शौर्याब्धि, वीराग्रणी,
जेणें इंद्रजिदप्रधृष्य[7] मथिला सर्वास्त्रवेत्ता रणीं,
गाती ज्याप्रति मर्त्यदेवरमणी[8], जो धीरचूडामणी[9]
तो विप्रात्मजबाणभिन्न पडला संमूढ[10] युद्धांगणीं. ॥ १७
हस्त्यश्वोष्ट्रपदातिरक्ततटिनी[11] क्षोणीतळीं[12] वाहिल्या,
ज्यांचीं दुर्गम[13] मांसकर्दमतटें[14]; नाहीं अशा पाहिल्या.
शक्रच्छिन्नगरुद्गिरिव्रज[15] तसे नागेंद्र[16] संचेष्टती. ।
कोणाचे करपाद भिन्न, किति हृच्छल्यें[17] बहू कष्टती. ॥ १८

१. यश व लक्ष्मी. येथें कीर्ति व लक्ष्मी यांवर अव्यक्त असा स्त्रीचा आरोप केला आहे, म्हणून ही **समासोक्ति.** २. संसाराला.ही गीती सुंदर **सुभाषित** आहे. ३. सीतेच्या मुखकमलासारखें. ४. अरण्यांत. ५. रक्तानें भरलें आहे शरीर ज्यांचें असे. ६. कांपरें, हुडहुडी व भीति यांनीं विव्हळ झालेले. ७. इंद्रजित्+अप्रधृष्य=जिंकण्यास अशक्य असा इंद्रजित्. हा समास जरा विलक्षण आहे. 'अप्रधृष्य' हा पहिला अवयव असून, 'इंद्रजित्' हा दुसरा असता म्हणजे सरळ कर्मधारय झाला असता. ८. मानवस्त्रिया व अप्सरा. ९. धीरशिरोरत्न, शूरश्रेष्ठ. १०. मूर्च्छित. येथें **समुच्चय** व **विषम** असे अलंकार आहेत. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ११. हत्ती, घोडे, उंट व पायदळ यांच्या रक्ताच्या नद्या. १२. भूपृष्ठावर. १३. चालून जाण्यास कठीण. १४. मांसाचा चिखल आहे ज्यांवर अशीं तटें. ही **अत्युक्ति** असून या चरणाच्या अंतीं **असमालंकार** आहे. १५. इंद्रानें फोडलेले लाल कावेच्या डोंगरांचे समूह. १६. मोठमोठे हत्ती. रक्तानें लडबडलेले हत्ती लाल कावेच्या डोंगराप्रमाणें दिसत होते. **उपमालंकार.** १७. छातींत भरलेल्या बाणांनीं.

[1]नानावीरशिरःसरोजनिकराकीर्णक्षमेच्या तळीं
[2]गृध्रश्येनशिवासकृत्प्रजबकस्तोमींहि वाढे [3]कळी. ।
एवं संक्षय पावलें बळ रणीं, [4]क्षोणींद्रचूडामणी!
दीक्षा सोडुनि धांव, [5]कीर्तिरमणी नेली, असें तूं [6]गणीं.' ॥ १९

असें वचन ऐकतां परम [7]मोह तो पावला,
पडे क्षितिवरी भ्रमें, **भर**त तत्क्षणीं धांवला, ।
धरी उचलुनी, द्विजव्रज [8]तदाशिषा योजिती,
जळें कितिक शिंपिति, [9]व्यजनमारुतें [10]वीजिती. ॥ २०

मग उघडुनि नेत्रांतें करुणावचनेंकरूनि **राम** म्हणे,
'हा वत्स! अहह **लक्ष्मण**! हा बंधो! हा [11]प्रवीरमूर्धमणे!' ॥ २१

**भर**त म्हणे, '**र**घुनाथा! [12]धर्मच्युत [13]शोच्य, हा तसा नोहे. ।
तच्छोकें न समुचिता [14]विकळ दशा, [15]धैर्यरत्नसानो! हे. । २२

निर्दोषा त्यजिली वनीं **जन**कजा तेव्हांचि वीराग्रणी
झाला [16]पंकिल **लक्ष्मण**, स्वतनुला तो भार ऐसें गणी,
[17]तो सारा [18]**कु**शचंडकांडतटिनीमध्यें स्वयें धूतला, ।
झाला पूतचि; तद्यशें धवळिलें स्वर्गासि, या भूतळा. ॥ २३

मीही होइन पूत, **राम**! वरदा! आज्ञा मला आज दे.'
[19]**कै**केयीसुत **राम**पादनत तो, प्रार्थूनि, एवं वदे; ।
'जा, वत्सा! उठ; कोण तो **कु**श असे? जाण, **स्वसेने**सि घे.'
ऐसें **रा**घववाक्य ऐकुनि, तदा तोही [20]प्रहर्षें निवे. ॥ २४

१. अनेक योद्ध्यांच्या मस्तकांच्या समूहानें भरलेल्या पृथ्वीच्या. शिरःसरोज=शिरकमळ. २. गिधाडें, ससाणे, कोल्हीं, डुकरें व बगळे यांच्या समूहांत. असकृत्प्रज=डुकरें (ज्यांना वारंवार पुष्कळ प्रजा होते अशीं). ३. भांडण. ४. हे राजश्रेष्ठा! ५. कीर्तिरूप स्त्री. ६. मान. ७. मूर्च्छा. ८. त्यांच्या (=आपल्या) आशीर्वादांस. द्विजव्रज=ब्राह्मणसमुदाय. ९. पंख्याच्या वाऱ्यानें. १०. वारा घालिती. **पृथ्वीवृत्त. स्वभावोक्ति.** ११. थोर वीरांच्या शिरोमणे! **गीतिवृत्त.** १२. धर्मभ्रष्ट, पापी. १३. शोक करण्यास योग्य. अन्वयः—धर्मच्युत [मनुष्य] शोच्य [होय], [परि] हा (=लक्ष्मण) तसा (=धर्मच्युताप्रमाणें शोच्य) नोहे. १४. विव्हळ. १५. हे धैर्याच्या मेरुपर्वता! येथील विशेषणांच्या सहेतुकत्वामुळें **परिकरालंकार** आहे. १६. मळिण; पापी. १७. तो पंक, तो मळ. १८. कुशाच्या भयंकर बाणरूप नदींत. येथें लक्ष्मण मरून 'पूत झाला' असें दोषाचें गुणरूपानें वर्णन केलें असल्यामुळें हा **अनुज्ञा**नांवाचा अलंकार आहे. **शार्दूल वि० वृत्त.** १९. भरत. २०. मोठ्या आनंदानें.

'[1]तातादेशकरें वनें बहुत रे! म्यां सेविलीं [2]भीकरें,
त्वांही चीरे[3]जटाधरें मम वचः केलें खरें आदरें, ।
जीवंत द्विजलेंकरें धरुनियां जा आण, वत्सा! बरें.'
ऐसा भूमिसुतावरें भरत तो आज्ञापिला उत्तरें. ॥ २५

ऐकुनियां, [5]सत्वरतें भरतें तो प्रार्थिला सुसत्वर, तें.
'[6]बळमथनकुशळ खळ ते कसे धरावे? न मानस त्वरतें. ॥ २६

दोघे बाळक [7]काळकराळ कवण ते? न तूजला कळती, ।
जाणत असेल मारुति कीं अंगद, [8]सचिव नीतिमान् सुमती.' ॥ २७

अंगद म्हणे, 'वनीं त्या अपवादें त्यागिली सती सुमती, ।
[9]त्वद्गोत्रोद्भव झाले तीच्या ठायीं शिशू असे गमती.' ॥ २८

मग जांबवदंगदनलनीलपवननंदनादि वीरमणी ।
[10]रमणीयवेषभूषित निघती [11]क्षम सर्व [12]विष्टपाक्रमणीं. ॥ २९

[13]नरवानरसंकुल बल [14]भूमिव्योमासि वेष्टुनी चाले, ।
[15]भारार्त शेषमस्तक हाले, मग भूमिकंप बहु झाले. ॥ ३०

[16]क्षरती मदोदकांहीं [17]गंभीरध्वान [18]कज्जलाभ [19]करी, ।
[20]भूगत [21]घन हे मानुनि, [22]मुग्धाजन फार कौतुकासि करी. ॥ ३१

[22]गणिकास्पर्शें होतें क्षीण यशः, पुण्यपुंजही जळती; ।
म्हणुनि जणों [23]बहुभुक्ता [23]क्षितिला धर्मज्ञ [24]हरि न [25]आंतळती. ॥ ३२

---

१. वडिलांची आज्ञा पाळणाऱ्या (म्यां). पाठभेदः—तातादेशकरें वनें बहुतरें. २. भयंकर (वनें). ३. वल्कलें व जटा धारण करणाऱ्या (त्वां). येथें भरताच्या नंदिग्रामवासावर कटाक्ष आहे. ४. रामानें. येथील **यमक**चमत्कार मनोहर आहे. ५. सत्वशील, सात्विक; **गीतिवृत्त.** ६. सैन्याचें मर्दन करण्यांत हुशार. ७. यमासारखे भयंकर. हें **अश्वधाटीयमक** आहे. येथें **यतिभंग** आहे. ८. मंत्रि. ९. तुझ्या वंशांत झालेले, तुझे वंशज. १०. सुंदर पोशाखानें नटलेले. **दामयमक.** ११. समर्थ. १२. विश्वाचें उल्लंघन करण्यांत. १३. मनुष्य व वानर यांनीं युक्त. १४. पृथ्वी व आकाश यांस. सैन्यांतील मनुष्यें भूपृष्ठावर चालत असल्यामुळें व वानर आकाशांत उड्डाण करून जात असल्यामुळें, त्या सैन्यानें पृथ्वी आणि आकाश हीं दोन्हीं व्यापिलीं होतीं. १५. ओझ्यानें थकलेलें. १६. गळती, स्रवती. १७. मोठा आहे आवाज ज्यांचा असे. १८. काजळी रंगाचे. १९. हस्ती. २०. भुईवर आलेले मेघ. २१. स्त्रीजन, **भ्रांतिमान्** अलंकार. २२. वेश्येच्या स्पर्शानें. **सुभाषित.** २३. पुष्कळांनीं भोगलेल्या पृथ्वीला. २४. घोडे; येथें 'वानर' अशी काव्ये० सं०ची टीप आहे. परंतु वरील गीतींत 'हत्तींचें' वर्णन आहे, तेव्हां या गीतींत 'घोड्यांचें' वर्णन अधिक संभवनीय दिसतें. २५. शिवती. येथें **अनुमान, हेतूत्प्रेक्षा** व 'बहुभुक्ता' व 'धर्मज्ञ' हीं विशेषणें हेतुगर्भ असल्यामुळें **'परिकर'** असे तीन अलंकार आहेत.

चापी, [1]रुक्मरथी, प्रचंडमुसली, [2]कांडी, [3]कृपाणी, [4]गदी,<br>
हारी, कीतिक कुंडली, [5]सुकवची, [6]चर्मी, [7]किरीटांगदी, ।<br>
देवांच्या परि शोभती भट, [8]चलत्क्षोणीध्र तैसे [9]रदी,<br>
[10]झाल्या त्या कटकें तदा क्षितितळीं नामैकशेषा नदी. ॥ ३३

[11]स्वर्णाचे ध्वज [12]अंबरीं झळकती, दानोदकें वर्षती<br>
हस्ती गर्जति, धूळिचे [13]व्रज [14]घन [15]व्योमांतरीं दाटती, ।<br>
झाला [16]कर्दम, [17]दानघर्मसलिलें तीं वाहती, सांचती,<br>
[18]वर्षा मानुनियां [19]शिखी बहुसुखी [20]कांतांसवें नाचती. ॥ ३४

ऐसा सेनेसमेत त्वरित **भ**रत तो जाय बंधुद्वयातें<br>
रक्षायातें, प्रतापें [21]कुशल **कुशल**वालागिं जिंकावयातें. ।<br>
भेरी[22]ध्वानें सुरांला बधिर करुनियां [23]युद्धयज्ञक्षमेला<br>
पावे, जेथें **सु**मित्रासुतभटजनही कोटि, कीं लक्ष, मेला. ॥ ३५

कोठें [24]अंगुलिहस्तपादरदनत्वङ्मूर्धजांत्रें, शिरें;<br>
कोठें अर्ध [25]कलेवरें, [26]गलदसृक्पूरें [27]महाभीकरें; ।<br>
कोठें [28]कुंडलनिष्कहारकटकें [29]त्रुट्यत्किरीटांगदें;<br>
ऐसें तेथ धरातळीं निरखिलें **रा**मानुजें **सां**गदें. ॥ ३६

त्या स्थानीं **लक्ष्म**णाला [30]सलवणरिपुला शोधितां [31]क्षिप्र गेला,

---

१. सोन्यांचे रथ ज्यांचे आहेत असे (योद्धे). २. बाण धरणारे. ३. तरवारवाले. ४. गदा फिर-विणारे. ५. चिलखत घातलेले. ६. ढालवाले. ७. मुकुट व बाहुभूषणें वापरणारे. ८. चालते डोंगर. ९. हत्ती. **उपमा.** १०. हें मोठें सैन्य एकाद्या अफाट नदाप्रमाणें संचार करीत असल्यामुळें, (साधारण गंगायमुनादी) नद्या (फिक्या पडून) नुसत्या नांवाच्या नद्या झाल्या. **प्रतीपालंकार. शार्दूल० वृत्त.** ११. सोन्याचे. १२. आकाशांत. १३. लोट. १४. दाट. 'व्रजघन' असा एक शब्द घेतला तर 'लोटांचे मेघ, मेघांप्रमाणें दिसणारे लोट' असा अर्थ होईल. १५. आकाशांत. १६. चिखल. १७. हत्तीचा मद व घाम यांचें पाणी. १८. पावसाळा. 'वर्षा' हा शब्द स्त्रीलिंगी आहे. १९. मोर. २०. लांडोरींसह. येथें **भ्रांतिमान्** अलंकार आहे. विजेसारखे दिसणारे ध्वज, मेघासारखे वर्षणारे व गर्जणारे हत्ती, मेघासारखे दिसणारे व काळोखी पाडणारे धूळीचे लोट, दानघर्मांनीं झालेला चिखल व त्यांचें सांचलेलें किंवा वाहणारें पाणी, यायोगानें मोरांना वर्षाकालाची भ्रांति झाली. २१. चतुर, कर्तृत्ववान्. **यमक.** २२. नगाऱ्यांच्या नादानें. २३. युद्धरूप यज्ञाच्या भूमीला, समरांगणाला. २४. अंगुलि (=बोटें)+हस्त+पाद+रदन (=दांत)+त्वङ् (=कातडी)+मूर्धज (=केंस)+अंत्रें (=आंतडीं). २५. शरीरें. २६. गळणाऱ्या रक्ताच्या पूरानें. २७. भयंकर. हें 'कलेवरें' याचें विशेषण. २८. कुंडल+निष्क (=पदक)+हार+कटकें (=कडीं). २९. तुटणारे मुकुट व बाहुभूषणें. ३०. लवणासुराचा शत्रू जो शत्रुघ्न त्यासहित अशा (लक्ष्मणाला). ३१. जलद.

बोले वातात्मजातें[1] भरत, निरखुनि क्रूर रक्तापगेला,[2]
'सीताशुद्ध्यर्थ पूर्वी क्रमुनि जलधिला,[3] तुष्ट केलें अजाला,[4] ।
तैसा या सिंधुलाही[5] तर, मज सुखवीं, शोध रामानुजांला.'[6] ॥ ३७

'सिंधूतें तरलों तधीं अभिमुखी[7] होती' म्हणे, '[8]ती सती.
ते झालीच पराङ्मुखी,[9] लघु नदी हे दुस्तरा[10] दीसती. ।
ईतें लंघुनि पाहतों परि बरें आतां त्वदाज्ञेस्तव.'
ऐसें बोलुनियां उडे, करि मुखें सीताधवाचा[11] स्तव. ॥ ३८

सीतात्यागजकोपतापविकळा[12] धात्री,[13] जणों तीप्रती
होते प्रार्थित ते 'क्षमस्व'[14] म्हणुनी दोघेहि बंधू कृती.[15] ।
तेथें जाउनि, त्यांसि पाहुनि, म्हणे 'चित्रा विधीची[16] कृती,'
हातीं घेउनि, मारुती मग उडे स्वर्णक्षमाध्राकृती.[17] ॥ ३९

दोघेही भरतासि नेउनि तदा वातात्मजें दाविले,
ते, दूरस्थित वीरवानर, तिहीं निर्जीवसे भाविले,[18] ।
लंकेशात्मजशक्तिनें[19] हृदय तें जेव्हां रणीं[20] भेदिलें,
तेव्हां मोह असा नसेचि, मरणापासूनिही[21] भें[22] दिलें. ॥ ४०

[23]उद्दंडचंडकुशकांडविखंडितोरा तो रामबंधु धरि आकृति फार [24]घोरा ।
[25]वक्षःक्षतक्षतजसिक्ततनू सशोक लोकव्रजासि[26] करि पंक्तिरथात्मतोक.[27] ॥ ४१

---

१. वायुसुत जो मारुती, त्याला. २. रक्ताच्या नदीला. ३. समुद्राला. ४. जन्मरहित देवांश जो राम त्याला. ५. रक्ताच्या समुद्राला. ६. लक्ष्मणाला व शत्रुघ्नाला. **स्रग्धरावृत्त.** ७. अनुकूळ. 'म्हणे' याचा कर्ता मारुती (अध्याहृत). ८. सीता. ९. प्रतिकूळ. १०. ओलांडण्यास कठिण. **काव्यलिंगालंकार.** ११. रामाचा. **शार्दू० वृत्त.** १२. सीतेच्या त्यागापासून उत्पन्न झालेला जो क्रोधसंताप त्यानें व्याकुळ झालेली. १३. (सीतेची आई) पृथ्वी. १४. क्षमा कर. १५. कुशल, धन्य. येथें भुईवर पडलेले लक्ष्मण व शत्रुघ्न जणूं काय तिची क्षमा मागत होते अशी संभावना केली आहे म्हणून ही **उत्प्रेक्षा** होय. १६. दैवाची करणी. **अर्थांतरन्यास.** १७. मेरुपर्वतासारखी आकृति आहे ज्याची असा. १८. कल्पिले, मानिले. १९. इंद्रजिताच्या शक्तीनें. रावणाबरोबरील युद्धांत एकदा इंद्रजितानें शक्तिप्रहार करून लक्ष्मणाला मूर्च्छित केलें होतें, या गोष्टीवर कवीचा कटाक्ष आहे. २०. येथें काव्ये० सं०चा 'रथीं' असा पाठ आहे. पण तो चूक आहे. २१. मरणापेक्षां जास्ती. २२. भय. **व्यतिरेकालंकार.** २३. अत्यंत प्रखर अशा कुशाच्या बाणांनीं फुटलेलें आहे उर ज्याचें असा. कांड=बाण. २४. भयंकर. **दामयमक.** २५. छातीवरील जखमेच्या रक्तानें माखलें आहे शरीर ज्याचें असा. हें 'पंक्तिरथात्मतोक' याचें विशेषण; क्षतज=रक्त; क्षतांतून वाहणारें. २६. लोकसमूहास. २७. दशरथाचा मुलगा. या श्लोकांतील अंत्यचरणांत 'करि' याच्या ऐवजीं 'परि' असा काव्ये० सं०चा पाठ आहे. **वसंततिलकावृत्त. विषमालंकार.**

त्याच्या संरक्षणार्थ द्रुत भरत तदा स्थापुनीयां चमूला,[1]
कोपावेशें म्हणे, 'हे रघुपतिभजनध्वस्तसंसारमूला![2] ।
रक्षोवृंदैककाला![3] सततगतिसुता![4] बाळकातें[5] विलोकीं;
या काळीं त्या खळाला स्वकृतफळ घडो भानुमत्पुत्रलोकीं.'[6] ॥ ४२

ऐसें वदोनि जेव्हां ताडविला दुंदुभि स्वयें भरतें,
आज्ञाविधूदयीं[7] त्या आलें सेनापयोधिला[8] भरतें. ॥ ४३

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं ।
बारावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ४४

---

## अध्याय तेरावा.

तो पाहुनियां कुशलव म्हणती 'नाहीं रिपू निमाले[9] कीं. ।
निकट विकटकटकभट[10] प्रकट कंटकसेच[11] दुष्ट आले कीं.' ४ १

असें ते बोलोनी, त्वरित मग दोघे उसळले;
वनीं वाय्वग्नीसे भरतकटकांतीं[12] मिसळले. ।
महाकांडव्रातेंकरुनि[13] सुटले मर्दित रणीं,
बुडे अब्धीमध्यें तदिषुशिखिसंतप्त[14] तरणी.[15] ॥ २

सूर्यरश्मिसमुदाय[16] आटला, अंधकार मग फार दाटला. ।
जाहलीं जनविलोचनें[17] वृथा, नासली रणकथा यशःप्रथा.[18] ॥ ३

नेत्रें असूनि उघडीं, तिमिरीं स्वपरासि वीर नोळखिती,[19] ।

---

१. सेनेला. २. रामनामस्मरणानें संसाराचें मूळच ज्यानें नष्ट केलें आहे, अशा! ३. राक्षससमूहांना मारणाऱ्या! ४. वायुपुत्रा! मारुते! सततगति=वायु. ५. कुशातें. ६. यमलोकीं. यम हा सूर्याचा मुलगा. **स्रग्धरावृत्त.** ७. आज्ञारूप चंद्र उगवला असतां. ८. सैन्यरूप समुद्राला. **परंपरितरूपक, गीतिवृत्त.** ९. मेले. १०. भयंकर सैनिक, भयोत्पादक वीर. ११. डोंगराच्या कड्यासारखे. **गीतिवृत्त.** यमक. १२. भरताच्या सैन्यांत. १३. मोठ्या बाणांच्या समूहानें. मर्दित सुटले=झपाट्यानें मर्दन करीत चालले, मारे फन्ना उडवीत निघाले. १४. त्याच्या बाणांच्या अग्नीनें अतिशयित तापलेला. १५. सूर्य. येथें कुशाच्या बाणाग्नीनें (जणुं काय) तप्त होऊनच सूर्य समुद्रांत बुडाला—म्हणजे अस्तास गेला, असें वर्णन आहे म्हणून ही **गम्योत्प्रेक्षा. शिखरिणीवृत्त.** १६. सूर्याच्या किरणांचा समूह. १७. लोकांचे डोळे. १८. यश वाढविणारी. **रथोद्धतावृत्त.** १९. ओळखीत नाहींत. क्रियापदाच्या आरंभीं स्वर असला तर त्या क्रियापदाचा निषेधार्थक 'न-'शीं नित्यसमास होतो; व त्यांमधील संधी नेहमीं 'पररूप' असतो. उ० नुघडणें; नुठणें इ०. **विशेषोक्ति.**

आकस्मिकलब्धश्रीमदांध[1] अकुलीन[2] नर जसे कुमती. ॥ ४

ताडिले गजकरीं[3] करवालें[4], निर्मिलें रण भयंकर बाळें[5]. ।
वाह बहुतर क्षतजा[6] ते, निर्मिलें लवकरें क्षत[7] ज्यांतें[8]. ॥ ५

खड्गघात[9] करितां गजदंतीं[10], शब्द संचरति सर्वदिगंतीं, ।
पावक[11] प्रगट होउनि भाजी, धांवतां चिरडती गजवाजी[12]. ॥ ६

कालसर्परसना[13] तरवारी, तीस[14] कोण जन कातर[15] वारी, ।
स्पर्शतांचि बहु सत्वर मारी, काय ते प्रगटली नरमारी[16]! ॥ ७

'तात! सोदर[17]! सखे! सुत! काका!' यापरी बहुत मारिति हाका. ।
ऊठती कलितशस्त्र[18] कबंधें[19], मारिती निजजनांसचि अंधें[20]. ॥ ८

कित्येक शोणिततटिन्युदरांत[21] मेले, जे कातरांतर[22] तमांत पळोन गेले. ।
एवं तदा क्षितिसुतातनयायुधांनीं[23] एका दिसांत भरिली यमराजधानी. ॥ ९

मांसासि भक्षुनि, निषेवुनि शोणितातें, भूतें 'दिलें' म्हणति, 'भोजन मिष्ट तातें' ।
'याच्या नसे' म्हणति तीं, 'तुलना यशातें.' तें ऐकतां, सुख गमे बहु त्या कुशातें. १०

आसूर्योदय[24] यापरी बळें[25] तिहीं संहारितां पाहिलें,
तेव्हां त्या भरतासि कोपशिखिनें[26] उद्दंडसें[27] दाहिलें; ।

१. एकाएकीं मिळालेल्या संपत्तीनें जे आंधळे झाले आहेत असे. २. हीन कुलांतील, नीच. **उपमा.** येथें 'स्वपर न ओळखणें' हा समानधर्म आहे. **गीतिवृत्त.** ३. हत्तीच्या सोंडेवर. ४. तरवारीनें. ५. कुशानें ६. रक्ताला. हें 'वाहती याचें कर्म. ७. जखम. ८. अन्वय:—ज्यांतें लवकरें क्षत निर्मिलें (ज्यांना लवाच्या हातानें जखमी केलें), ते [वीर] बहुतर क्षतजा वाहती. **स्वागतावृत्त.** ९. तरवारीचा घाव. १०. हत्तींच्या सुळ्यांवर. ११. अग्नि. तरवार व सुळे यांच्या घर्षणानें अग्नी उत्पन्न झाले. १२. हत्ती व घोडे. १३. काळरूप (=मृत्युरूप) सर्पाच्या जिभा. १४. 'तरवारी' हें अनेकवचन आहे. तेव्हां 'त्यांस' असा पाठ अधिक सयुक्तिक झाला असता. १५. भितरा. १६. महामारी, जरीमरी (cholera). **उत्प्रेक्षालंकार.** १७. भाऊ. १८. धरलेलीं आहेत शस्त्रें ज्यांनीं अशीं. १९. मस्तकरहित धेंडें. २०. मस्तकच नसल्यामुळें आंधळीं. हें विशेषण सहेतुक आहे म्हणून **परिकरालंकार** झाला. २१. रक्ताच्या नदीच्या डोहांत. २२. भितरें आहे अंतःकरण ज्यांचें असे, भितऱ्या मनाचे. २३. सीतेच्या मुलांच्या आयुधांनीं. **वसंततिलकावृत्त.** २४. दिवस उगवेपर्यंत. २५. सैन्य. २६. रागरूप अग्नीनें. २७. पुष्कळसें.

संताडी **कुश**हृत्स्थळासि अनळज्वाळाकुळेषुव्रजें,
साधूच्या प्रतिपालनीं मृदु, असत्संक्रंदनीं तीव्र जे. ॥ ११

त्यांचें करुनि निवारण, वारणशत्रुप्रताप **कुश** बोले, ।
'धरुनि वृथा काम रणीं कां मरणीं सिद्ध मूढ हे झाले? ॥ १२

सेनालक्ष्मणशत्रुघ्नपंचतामोहहेतु मी,
पतंगदीपकन्यायें मरतां काय हे तुमी? ॥ १३

म्हणे **भरत**, 'हे शिशो! त्यज खळा! ममाश्वोत्तमा.
न मानिसि जरी, मनीं धरुनि गर्व, लोकाधमा!–।
यमालयपथीं न हो पथिक, मी करूनि क्षमा
न मारिन, असो प्रसू तव न तापसी संभ्रमा. ॥ १४

मदीयबळशोणितेंकरुनि तर्पिली त्वां क्ष्मा,
स्वबंधुहि विमर्दिले जरि, तथापि केली क्षमा. ।
त्यजीं मखहयास या, धरुनि अन्यथा मी तुला,
पुरास मग नेइन क्षण न लागतां, रे मुला! ॥ १५

सोडुनि माझा घोडा, दोघेही हस्त या क्षणीं जोडा. ।

---

१. अग्नीच्या ज्वालांनीं युक्त अशा बाणसमूहानें. आकुळ=युक्त, व्यापलेला. २. दुष्टांना रडवि- ण्यांत. ३. जे बाण. चरम चरणांत **विरोधाभास** आहे. **शार्दूलविक्रीडित वृत्त.** ४. सिंहासारखा आहे प्रताप ज्याचा असा. वारणशत्रु=गजरिपु, सिंह. ५. इच्छा. प्रथम व द्वितीय आणि तृतीय व चतुर्थ चरणांत **दामयमकें** आहेत. **गीतिवृत्त.** ६. से- नेचें मरण व लक्ष्मणशत्रुघ्नांची मूर्च्छा यांचें कारण. पंचता=पंचत्वाला जाणें, मरणें. मोह=मूर्च्छा. **यथासंख्यालंकार.** ७. दीपावर झेंप टाकून मरणाऱ्या पतंगाप्रमाणें. **उपमा. अनुष्टुप्छंद.** ८. येथें 'मदश्वोत्तमा' हा पाठ अधिक शुद्ध झाला असता. ९. जर तूं गर्वानें हें जुमानणार नाहींस, तर मी तुला ठार करीन असें भरत म्हणणार होता. परंतु हें कठोर वचन बरें न वाटून व कदाचित् रामाज्ञा आठवून (मागें पृ० ८८, प० १०-११ पहा) त्यानें तें वाक्य तसेंच अर्धेंच टाकिलें. १०. यमाच्या घराच्या रस्त्यांत प्रवासी होऊं नको, म्ह० माझ्याशीं झगडून मरूं नको. ११. आई. १२. दुःखी. **पृथ्वीछंद.** या श्लोकांत **आद्यंत यमकें** साधिलीं आहे. १३. पृथ्वी. १४. हा 'स्व' शब्दाचा प्रयोग अयोग्य आहे. 'स्व'चा संबंध नेहमीं कर्त्याकडे जात असल्यामुळें 'स्वबंधु' म्ह० कुशाचे बंधु असा अर्थ होतो. परंतु भरताचे बंधु हा उद्दिष्टार्थ आहे. तेव्हां 'स्वबंधु' या ऐवजीं **'मदीयबंधु'** अशा अर्थी शब्द पाहिजे होते. असा 'स्व'चा अयुक्त प्रयोग मोरोपंतांच्या काव्यांत वारंवार आढळतो. १५. नाहींतर. १६. अयोध्येस.

'शरणागत' म्हणवा, रे! याचि उपायें [1]समर्थभय वारे. ॥ १६
'वांचविलें **भ**रतानें' ऐसें जननीस शीघ्र सांगावें, ।
पुनरपि असें न [2]करणें, [3]निजजीवनदातृकीर्तिला गावें.' ॥ १७

**कै**केयीपुत्र बोले खर मृदुल असें जेधवां आत्मतुंडें,
कोपें नेत्रें **कु**शाचीं तंव दिसति, जशीं [4]**खा**दिरांगारकुंडें. ।
सोडी निश्वास [5]पादाहत [6]उरग तसा, दंत[7]वस्त्रासि [8]खंडी,
[9]कोदंडी [10]चंडकांडी **कु**शचि परि गमे [11]पत्र ज्याचें [12]शिखंडी. ॥ १८

ताडी [13]सप्तेषुवृंदें **कु**श कुशल करें शीघ्र **रा**मानुजाला,
पांचां, सातां शरांहीं इतर भट तयां, सत्तरांहीं **न**ळाला, ।
[14]**वा**ताच्या नंदनाला [15]खरविशिखशतें, **अं**गदातें सहस्रें,
**नी**ळातेंही [16]तदर्धे; [17]स्थविर, तिस शतें छिन्न, वाहे महास्त्रें. ॥ १९

ज्यांच्या उरीं स्पर्श केला [18]बलाकृष्टशिलीमुखें, ।
त्यांहीं त्यांहीं भूगतांहीं वीरांहीं वाशिलीं मुखें. ॥ २०

[19]षट्चंडकांडप्रकरें **ल**वानें केलें धनु च्छिन्न तदा [20]लवानें, ।
[21]ससूतवाजी [22]शुभलक्षणानें संचूर्णिला तद्रथहि क्षणानें. ॥ २१

वक्षःस्थळीं बाण तदा **कु**शानें संप्रेरिले [23]युद्धनिरंकुशानें, ।
[24]संमूर्छ होऊनि पडे [25]धडाडां, रक्तप्रवाहासि वमे भडाडां. ॥ २२

---

१. थोरांपासून होणारें भय. यांत पहिला व दुसरा आणि तिसरा व चवथा या चरणांचे अंतीं **यमक** आहेत. **गीतिवृत्त.** द्वितीयार्धांत **काव्यलिंगालंकार** आहे. २. करणें=करावें. येथें 'करणें' या क्रियावाचक नामाचा विध्यर्थी क्रियापदाप्रमाणें प्रयोग केला आहे. ३. आपल्याला जीवदान देणाऱ्याचे यशाला. ४. खैराच्या निखाऱ्यांचीं कुंडें (म्ह० त्यांसारखीं लाल). **उपमा.** ५. पायानें तुडविलेला. ६. साप. ७. ओंठास. ८. चावी. ९. धनुष्य ज्याजवळ आहे असा. १०. तीक्ष्ण बाण ज्याचे आहेत असा. ११. वाहन. १२. मोर. देवांचा सेनापति जो कार्तिकेय, त्याचें वाहन मोर आहे. **स्रग्धरावृत्त.** १३. सात बाणांच्या समूहानें. १४. वायुपुत्राला, मारुतीला. १५. तीक्ष्ण शंभर बाणांनीं. १६. त्याच्या निम्मे म्ह० पांचशें बाणांनीं. १७. जांबवान्. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १८. जोरानें ओढलेल्या बाणानें; जोरानें ओढलेल्या (धनुष्यापासून सुटणाऱ्या) बाणानें. **अनुष्टुप्छंद.** १९. सहा तीक्ष्ण बाणांच्या समूहानें. २०. अल्पकाळांत, क्षणांत. २१. सारथी व घोडे यांसह. हें 'तद्रथा'चें विशेषण. २२. चांगलीं आहेत लक्षणें ज्याचीं अशा लवानें. **उपजातिवृत्त.** २३. युद्धांत ज्याला कसलाच प्रतिबंध नाहीं अशानें. २४. मूर्च्छित. २५. हे **अनुकरणवाचक** शब्द आहेत. **इंद्रवज्रावृत्त.**

जेव्हां मूर्छित देखिला क्षितितळीं भास्वत्कुळाचा टिळा,[1]
क्रोधें पर्वत योजनायत[2] मेरुत्पुत्रें[3] समुत्पाटिला,[4] ।
हुंकारध्वनिकंपितत्रिभुवनें[5] दोघांवरी सोडिला,
त्यांहीं तो त्रसरेणुसंचय[6] वियद्गंगांतरीं[7] पाडिला. ॥ २३
वातोर्द्धूतमहीध्ररेणुगण[8] तो जेव्हां शिरे खांगणीं,[9]
युद्धालोकनकौतुकागतनभःस्थस्वर्वधू[10] तत्क्षणीं ।
वक्रें झांकिति, नेत्र चोळिति, किती त्या फुंकिती, थुंकिती,
कीती खोकति, ओकती, किति धुतस्वालंकृती[11] शिंकती. ॥ २४
ऐसें कौतुक निर्मिलें लवयुतें त्या सद्यशःसंचकें,[12]
वामीं[13] मारुति ताडिला मग कुशें बाणांचिया पंचकें.[14] ।
वज्रच्छिन्ननगेंद्रसा[15] धडधड क्षोणीतळीं[16] आपटे,
कांपे सांद्र [विघट्टिता][17] थरथरां भू, पृष्ठ जीचें फुटे. ॥ २५
ऐसें कुशें कौतुक तेथ केलें, सर्वां भटांचें मग धैर्य गेलें, ।
धाकें पळाली अवशिष्ट सेना, भ्याडांसि[18] कांहींच पुढें दिसेना. ॥ २६
करूनियां ते जन वंदनातें, निवेदिति श्रीरघुनंदनातें. ।
सबाष्पदीनानन[19] खेद मानी, धरी धृतीतें[20] परमाभिमानी. ॥ २७

---

१. सूर्यकुळाचें भूषण; सूर्यवंशश्रेष्ठ भरत. २. चार कोस लांब. ३. मारुतीनें. ४. उपटला. ५. आपल्या 'हुहुः'कारानें ज्यानें त्रिभुवन कांपविलें आहे अशानें. ६. त्रसरेणु म्ह० तीन (किंवा कांहींच्या मतें सहा, अथवा तीस) अदृश्य रेणूंचा (परमाणूंचा Atoms) अत्यंत लहान, पण दृश्य असा समूह. ज्याचे यांत्रिक प्रयोगानें विभाग करितां येत नाहींत, ते परमाणू (Atoms). अशा तीन (किंवा कांहींच्या मतें सहा, अथवा तीस) परमाणूंचा एक त्रसरेणु (molecule; smallest particle). खिडकीच्या किंवा छपराच्या फटींतून एकादा सूर्यकिरण आला म्हणजे त्यांत जे बारीक बारीक कण उडतांना दिसतात, त्यांस आर्य तत्वज्ञ त्रसरेणु ही संज्ञा लावितात:—जालान्तरगते भानौ सूक्ष्मं यद्दृश्यते रजः । प्रथमं तत्प्रमाणानां त्रसरेणुं प्रचक्षते ॥ ७. आकाशगंगेंत. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ८. वायूनें उडालेल्या डोंगराच्या धूलीकणांचा समूह. ९. आकाशांत. १०. युद्धचमत्कार पाहण्यासाठीं येऊन आकाशांत उभ्या राहिलेल्या अप्सरा. ११. आपले अलंकार झाडणाऱ्या. ही उत्तम **स्वभावोक्ति** आहे. १२. उत्तम यश सांचविणाऱ्यानें. हें 'कुशें'चें विशेषण. १३. डाव्या कुशींत. काव्ये०सं०चा 'वामी' असा पाठ आहे व त्यावर 'प्रतिकूळ' ही टीप आहे. १४. पंचकडीनें. १५. वज्रानें फोडलेल्या विशाळ पर्वताप्रमाणें. **उपमा.** १६. पृथ्वीवर. १७. येथें काव्ये० सं० 'विनाकरा' असा पाठ आहे. परंतु त्याचा अर्थ कांहींच होत नाहीं. १८. भित्र्यांच्या डोळ्यांपुढें काळोखी आली. **इंद्रवज्रावृत्त.** १९. अश्रुपूर्ण व म्लान आहे तोंड ज्याचें असा राम. २०. धैर्याला. **उपेंद्रवज्रावृत्त.**

'हा! वत्सा! भरता! मदुक्तिनिरता[1]! हा! सद्गुणा! लक्ष्मणा!,
हा! वत्सा! घननादनाशकुशला[2]! हा! भिन्नरक्षोगणा[3]! ।
हा! शत्रुघ्न! सखे! मरुत्सुत! मम प्राणप्रदा! नील! हा!,
हा! हा! अंगद[4]! जांबवान्नल! कसे निर्वीर्य झालां महा!' ॥ २८

एवं फार तदा विलाप करुनि, श्रीराम तो घे सवें
सुग्रीवासि, बिभीषणाप्रति; रथीं आरूढ झाला जवें[5]. ।
सेनामध्यविराजमान उडुराट्[6] शोभे जसा खांगणीं[7],
पावे जाउनि युद्धभूमिजवळि क्षोणींद्रचूडामणी[8]. ॥ २९

'रामा! मनोज्ञगुणधामा[9]! पलाशजनतामारणैकनिरता[10]!
कामारिचित्तसदना[11]! मारुतिप्रियसुनामा[12]! नशत्रुविजिता[13]! ।
धामाधिपान्वयवरा[14]! मानशौर्यसुभगा[15]! मानिषेव्यचरणा[16]!
वामाकृते[17]! इतरवामापराङ्मुखमना[18]! मानवैकशरणा[19]!' ॥ ३०

एवं शल्यनिपीडितात्मजनतावक्त्रोत्थनामध्वनी[20],
येतां युद्धधरेसमीप, शिरति श्रीरामकर्णाध्वनीं[21], ।
त्यांला देखुनियां दयाकुलमना[22] झाला कृपापांपती[23],
'गेले काय' म्हणे, 'किशोर[24]?' तंव ते आले अकस्मात् कृती[25].॥ ३१

१. माझ्या भाषणाविषयीं ज्याचें अत्यंत प्रेम आहे अशा, माझ्या वचनांत राहणाऱ्या! २. (रावणपुत्र) मेघनाद (=इंद्रजित्) त्याचा नाश करण्यांत कुशला! (लक्ष्मणा!) ३. मारले आहेत राक्षसांचे समुदाय ज्यानें अशा! ४. काव्ये० सं०चा 'ह्यांगद' असा पाठ आहे. परंतु त्यांत **अपसंधी**चा दोष होतो. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ५. त्वरेनें. ६. चंद्र. ७. आकाशांगणांत. **उपमा.** ८. नृपश्रेष्ठ. ९. मनोहर गुणांचें माहेर अशा! १०. राक्षसांस मारण्यांत पूर्णपणें गढलेल्या! पलाश=मांस खाणारे, राक्षस. जनता=जनसमूह. ११. शंकराच्या मनाच्या विश्रामस्थाना! ज्याचें शंकर चिंतन करितो अशा! १२. मारुतीला प्रिय ज्याचें नाम अशा! १३. शत्रूनें ज्याला (कधींही) जिंकलें नाहीं अशा! निषेधार्थक 'न'चा इतर शब्दाशीं समास केला असतां बहुधा त्याचा 'अ' किंवा 'अन्' असा आदेश होतो. १४. सूर्यवंशश्रेष्ठा! धामाधिप=प्रकाशनिधि, सूर्य. अन्वय=वंश. १५. मान व शूरत्व यांनीं शोभणाऱ्या! १६. लक्ष्मीनें सेविले आहेत पाय ज्याचे अशा! १७. सुंदर आहे रूप ज्याचें अशा! १८. इतरांच्या स्त्रियांविषयीं सदा विमुख आहे मन ज्याचें अशा! १९. मनुष्याच्या उत्तम आश्रया! **अश्वधाटीवृत्त.** येथील **यमक**चमत्कार मनोहर आहे. परंतु यांत **यतिभंग** अतिशय आहेत. अश्वधाटीला **अमृतध्वनि** असेंही नांव आहे. २०. बाणांनीं पिडलेल्या आपल्या लोकांच्या तोंडांतून निघणारे नामोच्चार. २१. रामचंद्राच्या कर्णपथीं. २२. दयेनें कळवळलें आहे मन ज्याचें असा. २३. करुणासागर. अपां+पति=जल+पति, समुद्र. २४. मुलगे. २५. ते कर्तृत्ववान् (=करतबगारीचे) कुशलव. **शार्दूलविक्रीडितवृत्त.**

काकपक्षधर[1], कार्मुकपाणी[2], मेघवर्ण[3], सुकुमार, कृपाणी[4], ।
तुल्यलक्षण, समान वयाचे देवसे गणिति मानव यांचे[5]. ॥ ३२

जानकीवदनपद्मसमानें[6] तन्मुखें निरखिलीं बहु मानें, ।
स्वाकृतीधरशिशूंप्रति[7] पाहे, तों[8] सुखासि रघुनंदन लाहे. ॥ ३३

तद्वृत्तश्रवणोत्सुकश्रुति[9], कृती, **श्री**राम त्यांतें पुसे,
'कोणापासुनि सांगचापनिगमीं[10] अभ्यास केला असे? ।
उद्दंडध्वजिनीविनाश[11] करितां कांहींच नाहीं श्रम?
क्षोणीभूषणराजिरत्न[12] तुमचा कोणा स्थळीं आश्रम? ॥ ३४

कोणीं केला उपनय[13]? वदा मातृताताभिधानें.
शब्दब्रह्माभ्यसन[14] घडलें कीं महत्सन्निधानें[15]? ।
निष्प्रत्यूहें[16] सकळ घडती नित्य कीं सद्विधानें[17]?'
**रामें** वाक्येंकरुनि पुशिलें त्यांसि एवंविधानें[18]. ॥ ३५

म्हणे **कुश**, 'नृपा! असो कशितरीहि अस्मत्कथा,
पुसूनि तुज काय गा! फळ? विलंब होतो वृथा. ।
त्यजूनि निज पौरुषाप्रति, अशा न वार्ता रणीं
करीं, स्वविशिखासि घे, त्वरित तूं नियोजीं[19] गुणीं[19].' ॥ ३६

'स्ववृत्त न निवेदितां प्रथम, वीरचूडामणे[20]!
न युद्ध तुजशीं घडे.' रघुपती असें जों म्हणे, ।

---

१. झुलुपें राखलेले. २. हातांत धनुष्यें घेतलेले. ३. मेघांप्रमाणें (निळी) कांति ज्यांची असे. ४. तरवारवाले. ५. अन्वयः—यांचे (=कुशलवांचे) तुल्यलक्षण (=सारख्या लक्षणांचे) [=कुशलवांच्या तोडीचे] मानव समान वयाचे (=एकाच वयाचे) देवसे गणती (=गणले जातात, वाटतात, भासतात). **स्वागतावृत्त.** ६. सीतेच्या मुखकमलासारखीं. ७. आपली आकृति. (=चेहरा) धरणाऱ्या (=आपल्या सारख्या तोंडवळ्याच्या) मुलांना. येथें वृत्तसुखार्थ 'आकृति' शब्दाची अन्त्य 'इ' समासांतही दीर्घ केली आहे. ८. तोंच, तत्काळ. ९. त्यांचा वृत्तांत ऐकण्याला उत्सुक झाले आहेत कान ज्याचे असा. १०. एकंदर धनुर्वेदासंबंधीं; साग्र धनुर्विद्येंत. ११. मोठ्या प्रबळसेनेचा नाश. १२. पृथ्वीच्या अलंकारगणांतील रत्न. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १३. संगोपन किंवा मुंज. काव्ये०सं० चा 'कोणीं केलें उपनयन वदा' असा पाठ आहे. परंतु त्यांत एक अक्षर फाजिल घेऊन छंदोभंग होतो. १४. वेदाध्ययन. १५. थोरांच्या जवळ राहून. १६. निर्विघ्न. १७. उत्तम धर्मक्रिया. १८. अशा प्रकारच्या. हें 'वाक्येंकरुनि' याचें विशेषण. **मंदाक्रान्तावृत्त.** १९. धनुष्याच्या दोरीवर (बाणास) लाव. **पृथ्वीछंद.** २०. वीरश्रेष्ठा!

तदा[1] स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युति-[2]
घ्छटाधवलितांबरक्षिति कथी **कु**श स्वस्थिति. ॥ ३७

'**सी**ता केवळे[3] काननीं प्रसवली; जीं जातकर्मादिकें[4]
कर्में, सोपनयें[5] स्वयेंचि मुनिनें केलीं महत्कौतुकें; ।
सम्यग्[6] वेद सशास्त्रही पढविले, गानादि नानाकळा;
श्रीम**द्रा**मचरित्र चित्र[7] कथिलें, झाली मती सोज्ज्वळा[8]. ॥ ३८

बुद्धिस्वास्थ्य घडे, मनोमळ झडे, स्वर्ग स्वयें सांपडे,
[9]देहीं मोक्ष जडे, करीं जय चढे, **का**ळारि धाकें दडे, ।
**रा**माच्या चरितामृताप्रति पितां, सेनांजयाची[10] कथा
तेथें कांय? कितीकं[11] कौतुक मनीं लोकांसि भासे वृथा! ॥ ३९

**रा**मा! तूझी ममता जायातनयालयादिकीं[12] नाहीं, ।
तस्मान् मृतसेनेची तुजला गणना[13] नसो कांहीं. ॥ ४०

शक्ति[14] नसे तुज संप्रति, ते त्वां कां त्यागिली वनीं? **रा**मा! ।
शक्तिविवर्जित नर जो, तो होइल काय योग्य संग्रामा?' ॥ ४१

'**सी**ता' असा परिसतां **कु**शशब्द कानें, ते पुत्रसे वळखिले **र**घुनायकानें. ।
'धिग् युद्ध हें' म्हणुनियां, मग कश्मळाला[15] पावोनियां, विकळ केवळ तो गळाला. ४२

झाला मुहूर्त्तें मग सावधान **सी**तापती, शौर्ययशोनिधान[16]. ।
तेव्हां जगत्कंटकरावणारी[17] वक्त्रें सुकंठासि[18] असें विचारी. ॥ ४३

'कोणाचे सुत दोघे हे, या शोधासि वालिबंधो[19]! घे, ।

---

१. तों, तेव्हां. २. हंसण्यानें शोभणाऱ्या तोंडांतील (आपल्या) दंतपंक्तीच्या पांढऱ्या प्रभेनें धवळिलें (=पांढरें केलें) आहे आकाश व पृथ्वी ज्यानें असा. द्विज=दांत. ही **अत्युक्ति** आहे. ३. नुसत्या, धडधडीत. ४. पुत्रावण वगैरे संस्कार. ५. मुंजीसह. ६. चांगले. ७. चमत्कारिक. ८. स्वच्छ. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ९. शरीर हयात असतांना मुक्ति मिळते. जीवन्मुक्तत्व येतें. १०. तेथें सैन्य जिंकण्याची ती विशाद काय? **काव्यार्थापत्ति अलंकार.** ११. कितीएक लोकांना मनांत उगीच आश्चर्य वाटतें. १२. बायको, पोरें, घरें वगैरेंवर. १३. पर्वा, क्षिति. **आर्यावृत्त.** आर्येंत प्रथम व तृतीय पादांत प्रत्येकीं बारा मात्रा असून, दुसऱ्यांत १८ व चवथ्यांत १५ असतात. १४. काव्ये०संग्रहांत 'शक्ति' वर 'स्त्री' अशी टीप आहे. ज्या मूळ जैमिनिश्लोकाचें हें भाषांतर आहे, तो असा:—न शक्तिर्विद्यते, राम! सा त्यक्ता किं त्वया वने? । शक्तिहीनो नरः कस्तु युध्येत निशितैः शरैः? ॥ कदाचित् येथें 'शक्ति' शब्द श्लिष्ट असून त्याचे 'सामर्थ्य' व 'स्त्री' हे दोन्ही अर्थ विवक्षित असावे. **गीतिवृत्त.** १५. मूर्च्छेनेला. **वसंततिलकावृत्त.** १६. शूरत्व व सुकीर्ति यांचा ठेवा. १७. विश्वाला कांट्यासारखा झोंबणारा जो रावण त्याचा शत्रू (राम). १८. सुग्रीवास. **इंद्रवज्रावृत्त.** १९. वालीच्या भावा, सुग्रीवा! किष्किंधेचा वानरराज वाली, त्याला मारून रामानें सुग्रीवास किष्किंधेचें राज्य दिलें होतें. **गीतिवृत्त.**

मजशीं करिती दावे जाणत असशील तरि निवेदावे.' ॥ ४४

सुग्रीव वदे तेव्हां **रा**मातें नमुनि पूर्णकामातें, ।
'तूझेचि वनामध्यें दोघे [1]प्रतिबिंब वाटती मातें. ॥ ४५

आज्ञा मला त्वरित दे, **र**घुनायका! मी आहें **दे**[2]शास्यमृतिपासुनि [3]युद्धकामी. ।
हे [4]भक्तकामसुरपादपराज! आजी या बाळकांसह घडो मजलागिं [5]आजी. ॥ ४६

आज्ञा होतां **सु**कंठें तरु उपडुनियां क्षेपिला जो प्रचंडें,
[6]त्यांहीं केलीं द्रुमाचीं [7]स्वविशिखनिकरें तों नभीं कोटि खंडें; ।
तद्वक्षोरक्त जैसें [8]शरततिसि दिलें, देहही त्या क्षितीतें,
आली मूर्च्छाहि [9]याञ्चा धरुनि म्हणुनियां अर्पिले प्राण तीतें. ॥ ४७

होतां **वा**नर[10]राज मूर्च्छित असा, तो **नी**ळही तत्क्षणीं,
क्रोधाला धरुनी मनांत, तरुला हस्तीं, उडे [11]खांगणीं, ।
ताडी त्यासि [12]धरारुहें प्रबळ तो बाहूसि पाणिद्वयें,
हाही सानुज [13]खंडितद्रु **कु**श तद्वक्षासि बाणें स्वयें. ॥ ४८

जेव्हां तद्रक्तबिंदु क्षितिवरि पडले, मूळ**नी**ळाप्रमाणें
त्यांचेही **नी**ळ झाले प्रगट, मग **कु**शें ताडिले तेहि बाणें; ।
तद्रक्ताच्याहि धारा प्रबळतर [14]महाकाय**नी**ळात्ममाता,
झाला ऐसाचि **नी**ळ[15]व्रज [16]सगिरितरु [17]क्ष्मानभोंतीं न [18]माता. ॥ ४९

चित्तीं सम्यग् विचारी कुशल **कु**श, [19]जलौकास्त्र जें, त्यासि योजी.
त्यांच्या देहीं जलौका प्रबळचि जडती, कोण हो! [20]त्यांसि मोजी?।

---

१. प्रतिमा, हुबेहूब तसबिरी. २. रावणाच्या मरणापासून. ३. युद्धाची इच्छा करणारा. ४. भक्ताच्या मनोरथांना (म्ह० त्यांस पुरविण्याला) कल्पवृक्षांच्या राजा! भक्तमनोरथ सिद्धीस नेण्यांत अत्यंत उदारा! ५. युद्ध. **वसंततिलकावृत्त.** ६. कुशलवांनीं. काव्ये० सं०चा. '······जो··· । त्यां ही केलीं···' असा पाठ आहे. ७. आपल्या बाणसमूहानें. ८. बाणसमूहास. या चरणांत दीपक आहे. ९. याचना, प्रार्थना. मूर्च्छा याचना करीत आली म्हणून तिला प्राणदान (=सुग्रीवाच्या प्राणांचें दान) दिलें. येथें **चेतनोक्ति** व **अनुमान** असे अलंकार आहेत. 'प्राण अर्पिणें' या शब्दांवर एक प्रकारची श्लेषच्छाया आहे. येथें काव्ये० सं० चा 'यांच्या' असा पाठ आहे. १०. सुग्रीव. ११. आकाशांत. या चरणांत 'धरुनी' याचा संबंध 'क्रोधाला' व 'तरुला' या दोहोंकडे घ्यावयाचा, म्हणून येथें **दीपक** आहे. १२. वृक्षानें. १३. खंडिला आहे द्रु(=वृक्ष) ज्यानें असा कुश. १४. विशालदेही नीळांच्या जननी. १५. नीळांची गर्दी. १६. डोंगर व वृक्ष यांनीं युक्त. १७. पृथ्वी व आकाश यांत. १८. मावणारा. हें 'नीलव्रजा'चें विशेषण. येथें आधारापेक्षां आधेय मोठें आहे, असें वर्णन असल्यामुळें **अधिका**लंकार. **स्रग्धरावृत्त.** १९. जळवांचें अस्त्र. २०. जळवांना.

होतां नीरक्त[1] पूर्वासहित[2] शरचित[3] क्ष्मातळीं[4] वोळवीले,
कुष्ठाचे[5] चाळवीले कर, **यमसदना** सर्वही बोळवीले. ॥ ५०

गुणग्रहणदक्ष[6] ते म्हणति, 'साधु साधु; क्षमा,
**क्ष्मादुहितृनंदना**[7]! धरु तुझा सदा पक्ष मा[8]. ।
क्षमाबळपराक्रमद्युतियशोनिधी[9] सर्वदा
वदान्यपति[10] हो, सुखी चिर वसें सुहृत्सर्वदा[11]!' ॥ ५१

तदा कुशलवत्रस्त[12] तें शिरे सैन्य काननीं, ।
यशस्तोम[13] जनीं, त्यांचा गुण स्वर्नायिकाननीं[14]. ॥ ५२

एकाकीच तदा रघूद्वह[15] रणीं क्रोधें उभा राहिला;
तद्भीत्याकुल भूमि कांपवि धृतस्वीयात्मभाराहिला[16]; ।
नेलें[17] कीं चिरसंचितोत्तमयशस्तोम स्वयें पाहतां,
'युद्धीं मृत्यु बरा' म्हणे, 'सुख नसे दुष्कीर्तिला वाहतां.' ॥ ५३

कालानलप्रभशरांसि[18] गुणासि[19] जोडी,
आकर्ण चापलतिकेप्रति **राम** ओढी, ।
बालद्वयावर कृपेसह शीघ्र सोडी,
तों त्यांस सानुज **कुश** स्मितवक्त्र[20] तोडी. ॥ ५४

शिशुतें सत्वरतातें[21] समर्पिला जों क्षुरप्र[22] सत्वर तातें, ।
तों तो होय चतुर्धा; बाणांशीं वाढली अशी ते स्पर्द्धा[23]. ॥ ५५

---

१. रक्तहीन. २. मूळनीळासह. ३. बाणांनीं विंधलेले. ४. जमिनीवर लोटले, लोळविले. ५. कोडाच्या हाताला स्फुरण आणिलें. सर्वांचें रक्त शोषण केल्यामुळें, त्यांचे देह पांढरे फटफटित पडले व पांढऱ्या कोडाला स्फुरण चढलें असें भासलें. ६. गुण घेण्यांत तत्पर. ७. सीतेच्या मुला! ८. लक्ष्मी. ९. क्षमा, शक्ति, शौर्य, तेज व यश यांचा समुद्र. १०. उदारश्रेष्ठ. ११. मित्रांना सर्व देणाऱ्या! **पृथ्वीछंद.** येथें **'आशी'**नामक अलंकार आहे. तसेंच येथें **दामयमक**ही आहे. १२. कुशलवांनीं त्रासविलेलें. १३. यशाचा समूह. १४. अप्सरांच्या तोंडांत. 'गुण अप्सरांच्या मुखांत शिरे.' म्हणजे अप्सरा त्यांचे गुण गाऊं लागल्या हें **पर्यायोक्त** आहे. **क्रियादीपक** हा एक दुसरा अलंकार या श्लोकांत आहे. **अनुष्टुप्छंद.** १५. रघुश्रेष्ठ, राम. एकाकी=एकटा. १६. धरला आहे आपला (=पृथ्वीचा) भार ज्या सर्पानें (=शेषानें) त्याला. १७. नेलेला. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** १८. प्रळयाग्नीप्रमाणें तेज ज्यांचें अशा बाणांस. १९. धनुष्याच्या दोरीवर. २०. हंसरें तोंड आहे ज्याचें असा, हंसत हंसत. द्वितीयार्धात **'सहोक्ति'** आहे. **वसंततिलकावृत्त.** २१. सत्त्वपूर्णांतें, शूरातें. २२. बाण. काव्ये० सं० चा 'जो······तो···'असा निरनुस्वार पाठ आहे. २३. झटापट. **आर्यागीतिवृत्त.**

प्रावृण्मेघ जसा नगावरि जळें, वर्षे तसा रामही
बाणांच्या निकरें, तदा थरथरा कांपे असारा मही. ।
तों ते सस्मितवक्त्र कांडततिचे निर्मूनियां तूकडे,
भूमीतें किति अर्पुनी, उडविती व्योमस्थ देवांकडे. ॥ ५६

निर्धनलोकमनोरथकृपणालयशारदांबुदासारे ।
त्यांचि रणीं निष्फळ शर रामाचे जाहले तदा सारे. ॥ ५७

रण जनविस्मयकारक दारकयुग्मासवें असें रामें ।
केलें खरतरशरवरधरकरपद्में गुणाचयारामें. ॥ ५८

स्वबलतुल्य तदीय बळाप्रति स्वहृदयीं समजे धरणीपती. ।
शर तयांसि शिवे नचि आपुला, तदिषुगोचर तो बहु तापला. ॥ ५९

त्या दोघांच्या मुखातें जंव निजनयनें, युद्ध होतांहि, पाहे,
तों तों कांतास्मृतीतें घडिघडि हृदयीं जानकीजानि लाहे. ।
त्या रंध्रीं त्या सतीचा स्मर, अणिक तिचे पुत्रही चापपाणी,
एकामेंचि प्रतापें रघुपतिस उरीं ताडिती क्रूर बाणीं. ॥ ६०

उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह,
प्रमीलिताक्ष तो, जगत्क्षयीं जसा रवि ग्रह. ।

---

१. पावसाळ्यांतील ढग. २. निर्बल, खिळखिळी झालेली. ३. बाणसमुदायाचे. ४. स्वर्गांत राहणाऱ्या. येथें प्रथमचरणांत **उपमा** व द्वितीय आणि तृतीय चरणांत **अत्युक्ति** आहे. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** ५. दरिद्र्याचे बेत, कवडीचुंबकाचें घर व शरदृतूंतील (निर्जल) मेघ यांसारखे. **मालोपमा गीतिवृत्त.** ६. 'त्यांचि' या शब्दानें पूर्वी कधींही रामाचे बाण वायफळ झाले नव्हते, असें सुचविलें आहे. ७. दोन मुलांबरोबर. ८. अत्यंत तीक्ष्ण बाण ज्यानें करकमळांत धरिले आहेत अशानें. ९. गुणसमूहाचा बाग; गुणनिधि. आचय=राशि. काव्येतिहाससंग्रहाचा 'गुणांचियारामें' असा पाठ असून 'गुणांचा बाग यानें' अशी त्यावर टीप आहे. १०. त्यांच्या (=कुशलवांच्या) बाणांच्या टप्प्यांत आलेला. **द्रुतविलंबितवृत्त.** ११. त्या व्यसनप्रसंगीं. १२. आठवण. रामाच्या हृदयांत सीतेची आठवण बाणासारखी खुपूं लागली व तिचे चापधर मुलगेही त्या हृदयांत प्रत्यक्ष बाण मारूं लागले. काव्येतिहाससंग्रहाची 'स्मर' यावर 'मदन' अशी टीप आहे. परंतु या व्यसनसमयीं व रणांगणीं सीतेच्या विलासक्रीडांची आठवण करण्याइतकी रामाच्या मनाची शांत स्थिति होती किंवा तो इतका स्त्रैण होता, हें संभवत नाहीं. १३. धनुष्य आहे हातीं ज्यांच्या असे. १४. एकदम. **स्रग्धरावृत्त.** १५. छातींतील जखमेंतून वाहणाऱ्या पुष्कळ रक्तानें भिजलें आहे शरीर ज्याचें असा. १६. डोळे मिटले आहेत ज्यानें असा.

सुराश्रुबिंदुसंततीसह[1] क्षणें रथीं पडे,
सखेद लेखे[2] देखतां, प्रमोद त्यांसही[3] घडे. ॥ ६१

प्रचंड पंक्तितुंडदंडदक्ष[4] बाहुदंड हा
किशोरकांडखंडितस्वपिंड[5] जाहला अहा! ।
सतोक[6] देवलोकही सशोक तो करी क्ष्मा-
तळीं[7] निजाश्रुवृष्टिला, तृणोद्भवास[8] जे क्षमा. ॥ ६२

ऐसा जेव्हां रघुतिलक तो गुंतला मोहपाशीं, ।
आले हर्षें कुशलव तदा जानकीजानिपाशीं. ।
घेती, त्यातें उतरुनि करें मेदिनीमंडलातें,[10]
केयूरांतें[11] कटकपदकेस्त्रमणीकुंडलातें.[12] ॥ ६३

कैकेयीसूनुमेघध्वनिरिपुलवणद्वेषणाद्यंगभूषा,[13]
त्यांतें घेती करींहीं[14] अभय, हरि जसा दीपकांतीसि पूषा.[15] ।
मूर्च्छाग्रस्त प्रतापी भट, इतरहि जे सैनिक छिन्नकाय,[16]
दोघे तद्भूषणांचें हरण करिति, तद्भारनाशार्थ काय![17] ॥ ६४

'आहे हा रथ हेमरत्नखचित भ्रप्रभापुंजसा,[18]
जावें यावरतें बसोनि,' लव हें बोले स्वतोषें जसा,[19] ।
तेव्हां सानुज तो चढे कुश सुखें श्रीराघवस्यंदनीं,[20]
त्यांची दृष्टि जनांसि त्या निरखितां गेली मरुन्नंदनीं.[21] ६५

---

१. देवांच्या अश्रुप्रवाहासह. २. देव. ३. कुशलवांना. येथें द्वितीय चरणांत **उपमा**, तृतीय चरणांत **सहोक्ति** व अंतिम चरणांत **विभावना** आहे. **पंचचामरवृत्त.** ४. बलाढ्य रावणाचें शासन करण्यास समर्थ. ५. मुलांच्या बाणांनीं तोडलें आहे मांस ज्याचें असा. या अर्धांत **विषमालंकार** आहे. ६. आपल्या मुलांसह. ७. पृथ्वीवर. ८. जी (अश्रुवृष्टि) गवत उगविण्यास पुरेशी होती. येथें कार्य सांगून, 'ती अश्रुवृष्टि फार मोठी होती' हें कारण ध्वनित केलें आहे म्हणून ही एक प्रकारची **अप्रस्तुतप्रशंसा** होय. ९. मूर्च्छेंत. १०. भुईला; भूतळावर. ११. बाहुभूषणांना. १२. कडीं, पदकें, माला व रत्नांचीं कुंडलें. येथें 'मणि' शब्द समासगत असूनही कवीनें वृत्तसुखार्थ दीर्घ केला आहे. **मंदाक्रांतावृत्त.** १३. भरत, इंद्रजिताचा शत्रु लक्ष्मण व लवणासुरास मारणारा शत्रुघ्न इत्यादिकांच्या अंगावरील दागिने. १४. हा शब्द **श्लिष्ट** आहे. कुशलवपक्षीं 'हातांनीं' व रविपक्षीं 'किरणांनीं.' अभय=निर्भयपणें. १५. सूर्य. या चरणांत **उपमा** आहे. १६. जखमी झालेलीं आहेत शरीरें ज्यांचीं असे. १७. जणुं काय त्यांचें ओझें कमी करण्यासाठींच! **हेतूत्प्रेक्षा. स्रग्धरावृत्त.** १८. सूर्यतेजासारखा. **उपमा.** १९. जेव्हां, जों. २०. रामाच्या रथांत. २१. मारुतीकडे. **शार्दूलविक्रीडितवृत्त.**

श्रीमन्मारुति जांबवान् प्लवग[1] हे दोघेंचि तेथें कृती[2]
होते कृत्रिम[3]मूर्च्छित क्षितितळीं अत्यंत रम्याकृती. ।
त्यांतें पाहुनियां म्हणे लव, 'कुशा! या वानरांतें घरा
या नेऊं, अवलोकितांचि जननी होईल हृष्टांतरा[4].' ॥ ६६

ऐसें ऐकोनि कानें पवनसुत म्हणे 'जांबवन्! मृत्यु आला,
तूतें, मातें धरूनि प्रबळबळ लवें नेइल स्वालयाला[5]. ।
मूर्च्छाग्रस्तात्म रामप्रभृति मृततसे[6] पाडिले बाळकांहीं,
झांकावें लोचनांतें दृढ, जयद नसे आपणा काळ कांहीं. ॥ ६७

युद्धातें करितां महाबळ शिशू संहारितील क्षणें,
मच्चित्तीं त्रिजगज्जयार्ह[7]चि असे हे भासती लक्षणें[8]. ।
जातील स्वगृहासि घेउनि, तरी संदिग्ध[9] वाटे जिणें;
आजि क्ष्मा[10]तनयासमीप घडतें पंचत्व[11] शस्त्राविणें.' ॥ ६८

ऐसें बोले उपांशु[12] श्वसन[13]सुत मग क्षिप्र तो स्तब्ध[14] जाला,
दोघांतें न्यावयाला लव लवकरि तो त्या स्थळालागिं आला; ।
स्थापूनि स्यंदनांतीं[15] प्रबळ शिशु सुखें पर्णशाळेसि गेले,
सीतापादांबुजातें नमन करुनियां, प्रांजळी नम्र ठेले. ॥ ६९

पुत्रांतें[16]हि न हृदयीं आनंदातेंहि ते धरी सुमती, ।
करुणामृतासि केवळ न, वर्षली अश्रुवारिलाहि सती. ॥ ७०

चिर[17] आलिंगुनि पुत्रद्वयास सोडी श्रमासही सीता, ।
सुत[18]तनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता. ॥ ७१

---

१. वानर, हा शब्द 'प्लु'='उड्या मारणें' या धातूपासून निघाला आहे. प्लवग=उड्या मारीत जाणारा. जांबवान् हा खरोखर 'अस्वल' होता, 'वानर' नव्हता. २. धन्य, महात्म्ये. ३. मूर्च्छेचें सोंग घेतलेले. ४. आनंदित आहे हृदय जिचें अशी. ५. आपल्या घराला. ६.मृतांप्रमाणें, मृतप्राय. या द्वितीयार्धात **काव्यलिंगालंकार** आहे. ७. विश्वाला जिंकण्यास योग्य. ८. चिन्हांनीं. ९. जीवित संशयस्थित वाटतें, प्राण जाण्याची निशाणी आहेसें वाटतें. १०. सीतेजवळ. ११. शस्त्राशिवाय मरण. अशा तऱ्हेचें मरण क्षत्रियाला अत्यंत लाजिरवाणें वाटलें पाहिजे. 'पंचत्व,' पांच मूळतत्त्वांत मिळणें, मरणें. १२. हळूच. १३.मारुति. श्वसन=वायु. १४. येथें काव्ये०सं०चा 'शब्द' असा पाठ आहे. १५. रथांत. १६. सीतेनें केवळ मुलांनाच हृदयाशीं धरून आलिंगिलें असें नाहीं, तर तिनें हृदयांत आनंदही धरिला. या **गीतींत व्यंग्यसहोक्ति** आहे. १७. या गीतींतही **व्यंग्यसहोक्ति** आहे. १८. मुलांच्या अंगांवर झालेल्या शत्रूंच्या शस्त्रांच्या जखमा पाहून आनंदलेली व भ्यालेली. **विरोधाभास.** हर्ष होण्याचें कारण कुशलवांनीं त्या जखमांना न जुमानतां जय मिळविला हें होय.

सांगे **सी**तेसि तेव्हां **लव**, 'जननि! **कुशें** फारसें युद्ध केलें,
याच्या त्रासें रिपूचें बहु बळ [1]**य**मुनाबंधुगेहासि गेलें. ।
या वीरें **राम** तोही प्रबळ परि रणीं जिंकिला बाणजाळें,
हीं त्यांचीं भूषणें, हा रथवरहि पहा, थोर आश्चर्य झालें !॥ ७२

त्वत्कौतुकार्थ प्लवगद्वयातें मीं आणिलें, तूं अवलोक यांतें. ।
तुझ्या कृपेनेंचि खळ क्षयाला नेऊनि, आलों कुशळ [2]क्षयाला. ॥ ७३

एवं ऐकोनि पाहे, तों वोळखे **मा**रुतीस ती. ।
दुसरा **जां**बवान् वृद्ध हें जाणे [3]सुमती सती. ॥ ७४

**सी**ता म्हणे **लवा**ला, 'रणीं प्लवंगांस सोड जा, बाला ! !
मज पाहुनि हे [4]मानी होतील प्राणहीन, हें मानीं.' ॥ ७५

ऐकोनि ऐसें, मग त्या **लवा**नें रणीं [5]हरींतें त्यजिलें [6]लवानें. ।
झाली सुखी ते बहु **भू**मिकन्या धन्या, [7]वदान्या, जगदेकमान्या. ॥ ७६

अशा काळीं आला [8]वरुणसदनापासुन मुनी,
तयातें हे दोघे कथिति निजवृत्तासि नमुनी. ।
तदा आलिंगूनि **क्षि**तिदुहितृपुत्रांप्रति, करें
शिरीं स्पर्शे हर्षे [9]सुरविटपिगर्वक्षयकरें. ॥ ७७

**गं**[10]गानीरपवित्रनामशमनप्रेमाश्रुनीरव्रजें
वर्षे त्यांवर तो दयाब्धि भगवान् **वा**ल्मीकि नेत्रांबुजें. ।
त्यांतें जे कथिली [11]धनुःश्रुति, तिचें साफल्य जालें खरें,
त्या विप्रें [12]सुतनिर्विशेषचि वनीं तीं पाळिलीं लेंकरें. ॥ ७८

**श्रीरा**मसैन्यहि बळें मथिलें करांहीं, संपादिला जय सुदुर्लभ लेंकरांहीं. ।
आश्चर्ययुक्त मुनि, पावुनियां सुखातें, पाहे [13]अतृप्त हृदयें क्षण तन्मुखातें. ॥ ७९

---

१. यमाच्या घराला. **स्रग्धरावृत्त.** २. घराला. **उपजातिवृत्त.** ३. शुद्ध आहे मन जिचें अशी. **अनुष्टुप्छंद.** ४. अभिमानी, प्रतिष्ठित. **गीतिवृत्त.** ५. वानरांना. ६. क्षणानें. ७. उदार. **उपजातिवृत्त.** ८. समुद्राहून. 'वरुण' हा जळाची अधिदेवता आहे. ९. देवतरूंचा (=कल्पवृक्षांचा) गर्व (आपल्या औदार्यानें) नाहींसा करणाऱ्या हातानें. **प्रतीपालंकार. शिखरिणीवृत्त.** १०. गंगेच्या पाण्याच्या पवित्र नामाला नाहींसें करणाऱ्या अश्रूंच्या जलप्रवाहानें. वाल्मीकीचे प्रेमाश्रु गंगाजलाहूनही पवित्र होते, हा भावार्थ. **प्रतीपालंकार.** ११. धनुर्विद्या. १२. केवळ आपल्या स्वतःच्या मुलांसारखीं. **शार्दूलविक्रीडित.** १३. (किती पाहिलें तरी) ज्याचें समाधान होईना, अशा अंतःकरणानें. **वसंततिलकावृत्त.**

ऐसा शिष्यचरित्रतुष्ट भगवान् **वा**ल्मीकि बोले मुखें,
'या युष्मच्चरितेंकरूनि ह्रदयीं मी पूर्ण झालों सुखें. ।
केला मत्प्रिय **राम** मूर्च्छित तुम्हीं, हें दुःख झालें मला,
दावा तें स्थळ, जेथ सैन्य वधिलें; आतांचि पाहूं, चला. ॥ ८०

राजा **राम** गुणाभिराम, तुमचा तो तात कीं; त्याप्रति
दावा नेउनियां मला, उचित हें केलें नसे संप्रति.' ।
विप्र[1]व्रातसमेत तो मग उठे, बोलोनि ऐसें, मुनी.
**सी**तानंदन दाविती मग तया स्थानासि त्या नेउनी. ॥ ८१

जेव्हां सानुज मूर्छित क्षितितळीं श्री**राम** तो देखिला,
त्रैलोक्या[2]भर बाळविक्रम[3] वनीं **वा**ल्मीकिनें लेखिला[4], ।
तेव्हां तो मुनि मंत्रपूत[5] सलिलें सर्वांसि शिंपी करें
सर्वक्लेशहरें, जनेप्सितकरें[6], पुण्यामृतैकाकरें[7]. ॥ ८२

सुप्तो[8]त्थिताचेपरि सर्व ऊठले, वंदूनि **वा**ल्मीकिपदासि भेटले. ।
कृपाकटाक्षें यमपाश [9]तोडिले, म्हणोनि **रा**में निजहस्त जोडिले. ॥ ८३

तेव्हां **वा**ल्मीकिनामा मुनि धरि ह्रदयीं सानुजाला[10] अजाला[11], ।
आनंदाश्रुप्रवाहें भिजवि, बहु तदा तोष झाला द्विजाला. ।
बोले तो, 'लेख[12]कांताप्रति धिषण[13] जसा, कीं पिता स्वात्मजाला[14],
ऐसाची तूं त्रिलोकीं, गुरु[15], कवि[15], भगवान्, वंदिती सर्व ज्याला. ॥ ८४

**रा**मा! लोकापवादें निजयुवति[16] वनीं त्यागिली त्वां ससत्वा[17],
ते म्यां यूपार्थ[18] रानीं विचरत असतां देखिली शुद्धसत्वा[19], ।

---

१. ब्राह्मणसमुदायासह. **शार्दूलविक्रीडितवृत्त.** २. जगभर, विश्वांत भरलेला. ३. मुलांचा पराक्रम. ४. मानिला. येथें काव्ये० सं०चा 'देखिला' असा पाठ आहे. ५. मंत्रानें पवित्र केलेल्या. ६. लोकांच्या इच्छा पुरविणाऱ्या. ७. पवित्र सुधारसाचें केवळ स्थान अशा. अंत्य चरणांतील सर्व तृतीयांत पदें 'सलिलें' या विशेष्याचीं विशेषणें आहेत. ८. झोंपेंतून उठलेल्या मनुष्यांप्रमाणें. ९. त्यांना कृपादृष्टीनें यमाच्या बंधांतून मोकळे केलें. **इंद्रवंशावृत्त.** १०. लक्ष्मणादि बंधूंसह रामाला. ११. याचा कर्ता 'मुनि' व कर्म 'सानुजाला अजाला'. १२. इंद्राला. लेख=देव. १३. बृहस्पति. १४.आपल्या स्वतःच्या मुलाला. **उपमा.** १५.हीं दोन्हीं सामान्यनामें समजावीं, किंवा विशेषनामें मानून त्यांचे 'बृहस्पति' व 'शुक्राचार्य' असे अर्थ करावे. **स्रग्धरावृत्त.** १६. आपली तरुण स्त्री. १७. गरोदर. १८. यज्ञस्तंभासाठीं. १९. पतिव्रता किंवा शुद्ध सात्विक गुणी.

तूझी कांता प्रशांता, अजतनुजवधू[1], मैथिलाची[2] सुता, हें
जाणूनि, त्राण केलें तनुवचनमनें[3] आजपर्यंत, पाहें ॥ ८५
तीचे हे पुत्र दोघे कुशलव, तुजशीं निर्मिलें युद्ध यांहीं,
पुत्रच्छात्रादिकांहीं[4] जित बुध धरिती दुःख चित्तीं न कांहीं. ।
आतां त्वद्विप्रयोगप्रखरशिखिशिखातप्तदेहा[5] अदोषा[6]
न्यावी हर्षें गृहातें, धरुनि[7] मम वचें, हे सपुत्रा स्वयोषा[8]' ॥ ८६
ऐसें वदोनि, मग शिष्यासि पाठवुनि, सीतेसि आणवि मुनी,
स्वीकारिली सतनया राघवें त्वरित, वाल्मीकिलागीं नमुनी. ।
हर्षें तदा कुसुमवर्षें अमर्त्य[9] जन[10] वर्षे रघूत्तमशिरीं,
प्रेमाश्रुशीकर[11] सुरांचेहि भूमिवरि, नीहारें[12]तेंवि शिशिरीं[13]. ॥ ८७
गाती नभीं मुदित गंधर्व, नाचति तदा अप्सरोगण सुखें,
ब्रह्मेंद्ररुद्रमुख[14] देव प्रहृष्ट रघुनाथासि वर्णिति मुखें. ।
भेरीप्रभृत्यखिलवाद्यस्वनें[15]करुनि भेरीचि[16] होय जगती;
वाहे सुशीत, मृदु, गंधाढ्य[17], वात; बहु लाहे प्रमोद मग ती[18]. ॥ ८८
एवं झाला प्रमोद प्रचुरतर[19] तदा विष्टपीं[20]; अंगनेला[21]
अंगीकारोनि, रामें मग निज नगरा सर्षि[22] वाल्मीकि नेला. ।
भेरीवीणामृदंगप्रभृति बहुविधें वाजलीं मंजु[23] वाद्यें, ।
जेव्हां केलें प्रयाण प्रमुदितहृदयें त्या जगत्संभवाद्यें[24]. ॥ ८९

---

१. रघुवंशीय अजराजाच्या मुलाची (=दशरथाची) सून. २. जनकाची. ३. तनमनधनानें,
सर्वप्रकारें मनःपूर्वक. काव्येतिहाससंग्रहाचा 'तनुजवचनमनें' असा अपपाठ आहे. ४. मुलगे,
शिष्य इत्यादिकांकडून. 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' या प्रसिद्ध वचनाला अनुरोधून हें वाल्मीकीचें
म्हणणें आहे. ५.तुझा विरह हाच अत्यंत तप्त अग्नि त्याच्या ज्वाळांनीं भाजला आहे देह जिचा ती.
६. दोषरहित, निर्मल. ७. माझ्या वचनानें [हिला] धरुनि (=स्वीकारून). कदाचित् 'करुनि मम
वचें' (=माझ्या वचनानें) असा पाठ असावा. ८. पुत्रांसकट आपली बायको. ९. देव. १०. वर्षाव
करी. ११. प्रेमाश्रूंचे बिंदू. याचा संबंध 'पडले' किंवा 'झाले' या अध्याहृत क्रियापदाशीं. १२. दं-
वाप्रमाणें. १३. हिंवाळ्यांत. **अश्वधाटी** किंवा **अमृतध्वनिवृत्त.** अंत्य चरणांत **उपमा.**
१४. ब्रह्मदेव, इंद्र, शंकर, इत्यादि. १५. नगारे वगैरे सर्व प्रकारच्या वाद्यांच्या नादानें. १६. ब-
हिरी. या शब्दाचें 'भेरी' असेंही रूप आढळतें. (मागें अ० ७, श्लो० १ पहा.) १७. (फुलांच्या)
सुवासानें भरलेला. १८. जगती. १९. अतिशय. २०. विश्वांत. २१. स्त्रीला. २२. ऋषींसह.
२३. गोड. २४. जगत्संभवाच्या (=सृष्टीच्या) पूर्वीं जो होता असा राम. 'जगत्संभव' म्हणजे विश्व-
कर्ता ब्रह्मदेव त्याचा आद्य म्ह० बाप असा अर्थ केला तरी चालेल. **स्रग्धरावृत्त.**

साकेतालागिं रामें गमन करुनियां यज्ञ संपूर्ण केला.
झालें स्वांतीं प्रमोदप्रचुर अवभृथस्नान भूकन्यकेला. ।
दासीदासाश्वरत्नक्षितिकनकरथेभेंद्रधेन्वंशुकांहीं
झाले तृप्त द्विजाति, स्वमनिं न गणिती द्रव्यनाथासि कांहीं. ॥९०

---

**उपसंहार.**

एवं रावणपीडितत्रिभुवनक्लेशक्षयाकारणें
ब्रह्मप्रार्थितपादपद्मयुगुलें, देवें, जगत्कारणें, ।
मायामानुषविग्रहें, कृतमहारक्षःसमिन्निग्रहें,
सर्वांतें सदेनुग्रहें सुखविलें निर्दोषलीलागृहें. ॥ ९१

ऐशीं नित्य सुखाकरें, सुचरितें, एनस्तमोहस्करें,
जीं केलीं करुणाकरें, रघुवरें, भक्तापदातस्करें. ।
त्यांमध्यें लव वर्णिला प्रमुदितस्वांतें मयूरेश्वरें
लोकीं नाहिंच आर्य कार्य दुसरें या विग्रहें नश्वरें. ॥ ९२

जैमिनिकृतभारतगतहयमेधीं कुशलवाख्यानीं, ।
तेरावा अध्याय श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं. ॥ ९३

---

१ अयोध्येला. २. मनांत. काव्ये० सं० पाठः—झाला स्वांतीं. ३. अत्यंत हर्षानें पूर्ण. ४. यज्ञसमाप्तीचें स्नान. ५. दासी, दास, घोडे, रत्नें, जमिनी, सोनें, रथ, हत्ती, गाई व वस्त्रें यांनीं. इभेंद्र=मोठमोठे हत्ती. अंशुक=वस्त्र. ६. कुबेरास. ७. रावणानें त्रासविलेल्या विश्वाच्या दुःखांच्या नाशासाठीं. ८. ब्रह्मदेवानें पूजिलीं आहेत दोन्हीं चरणकमलें ज्याचीं अशा. ९. विश्वाच्या जनकानें. १०. लीलेनें (धरलेलें आहे) मनुष्यस्वरूप ज्यानें अशा. ११. केलें आहे मोठमोठ्या राक्षसांचें लढाईंत पारिपत्य ज्यानें. १२. मोठ्या कृपेनें. १३. सत्कृतीचें माहेर अशा. **शार्दूलविक्रीडितवृत्त. पुष्पकयमक.** १४. पापरूप तिमिराचा सूर्य त्यानें. अहस्कर=दिवाकर, दिनकर, सूर्य. १५. भक्तांच्या आपदा (=दुःखें) दूर करणाऱ्या. तस्कर=वस्तू लांबविणारा, चोर. १६. आनंदलें आहे मन ज्याचें अशा. १७. श्रेष्ठ. १८. या नश्वर (=क्षणभंगुर, अशाश्वत) नरदेहानें. यावरून मोरोपंतांनीं आपलें आयुष्य ईश्वरचरित्र गाण्यांतच घालविण्याचा निश्चय या वेळींच केला होतासें दिसतें.

## ३. [1]ब्रह्मोत्तरखंड.

(गीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

**श्री**[2]कंठातें वंदुनि [3]सन्मत मी [4]सदुपदिष्ट [5]सल्लीला ।
गातों, ज्या बहुमान्या [6]साधुसुधासुरभिकल्पवल्लींला. ॥ १
श्री**ब्र**ह्मोत्तरखंडीं श्री**शि**वमाहा[7]त्म्य वर्णिलें आहे, ।
यश **शि**वभक्तांचेंही, [8]ज्याला न **व्या**समुनि [9]तुला पाहे. ॥ २
**पं**[10]चाक्षरमंत्राचें माहात्म्य, **म**हेशभक्तिचें भारी, ।
तैसेंच **शि**वकथेचें, जें [11]जड [12]जीवांसही [13]सुखें तारी. ॥ ३
**म**थुरेंत [14]यदुकुलोत्तम होता **दा**शार्ह भूप, हा धन्या ।
वरिता झाला प्रेमें [15]**का**शीपतिची **क**लावती कन्या. ॥ ४
स्वपुरीं आणुनि राज्ञी, राजा संगार्थ तीस तो [16]बाहे, ।
पाहे **क**लावती न प्रेमें तन्मुख, तया न [17]वपु वाहे. ॥ ५
[18]**का**मातुर **दा**शार्ह [19]क्षितिपति सु**क**लावतीस पाहूनी; ।
जरि वारी [20]सूक्तशतें, तरि आलिंगी बळेंचि [21]बाहूंनीं. ॥ ६
भेटे निवावया पति जों, तों तत्काळ तीव्र कीं [22]पोळे, ।
स्त्रीचे अवयव झाले लोहाचे तापले जसे गोळे. ॥ ७
**दा**शार्ह स्त्रीस म्हणे, '[23]दयिते! पुसतों [24]यथार्थ सांग मला, ।
पल्लव[25]मृदुल तुझा हा देह मला [26]दहनतुल्य कां गमला? ॥ ८

---

१. हें स्कंदपुराणाचें एक खंड आहे. यांतील अध्याय २३ ते ४४ यांवरून पंतांनीं हा भाग घेतला आहे. याच्याच आधारानें श्रीधरानें शिवलीलामृतग्रंथ लिहिला आहे. २. श्री (शोभा) आहे कंठीं ज्याच्या त्यास, श्रीशिवातें. ३. साधूंस मान्य. ४. साधूंनीं उपदेशिलेल्या (सांगितलेल्या). ५. उत्तम चरित्रें. ६. संत, अमृत, कामधेनु आणि कल्पवृक्ष यांस. ज्या लीलांचें औदार्य व महत्व हीं साधुसुधादिकांच्या पेक्षां अधिक आहेत, हा या गीत्यर्धाचा भाव. **व्यतिरेका**लंकार. ७. श्रीशंकराचा महिमा. ८. ज्या यशाला. व्यासांनीं महाभारतांत अनुशासनपर्वांत शंकरमहिमा सविस्तर वर्णिला आहे. (मोरोपंती अनुशासनपर्व, अ० १–६ पहा.) ९. तुलना. १०. 'नमः शिवाय' या मंत्राचें. ११. जड म्हणजे अज्ञान पक्षीं अचेतन किंवा पेलायला कठीण असे अवजड. **श्लेष.** १२. प्राण्यांस. १३. सहज. १४. यदुवंशांत श्रेष्ठ. १५. काशीराजाची. १६. बोलावी. १७. शरीर. तया वपु न वाहे=त्याला शरीर अर्पण करीना, देह त्याच्या स्वाधीन करीना. १८. कामानें पीडित. १९. राजा. २०. शेंकडों चांगल्या भाषणांनीं. २१. हातांनीं. २२. होरपळला. 'तीस कीं पोळे' असा पाठभेद. **विषम.** २३. प्रिये! २४. खरें. २५. पल्लवांसारखा कोमल. २६. अग्नीसारखा. **विरोध.**

राज्ञी स्मित[1] करुनि म्हणे, 'पुसतां तरि सत्य सांगतें परिसा[2]. ।
जो भगवान् दुर्वासा[3] लाजवितो कल्पपादपा[4], परिसा[5]; ॥ ९
श्रीपंचाक्षरविद्या[6] तेणें उपदेशिली असे मजला, ।
कीं हा जीवां[7] शिवसा[8] प्रणतशिव[9] करावया सदा संजला[10]. ॥ १०
विद्यासामर्थ्यें[11] हें शुचि[12] वपु, कैसा शिवेल उद्धत[13] या? ।
जो तप्तायःपिंड[14], स्पर्शाया योग्य होय शुद्ध तया. ॥ ११
ज्या मद्य मांस सेविति गणिका[15], दुष्टा कुबुद्धिच्या वसती[16], ।
असती[17] रजस्वभावें[18], राजा त्वां बहुत सेविल्या असती. ॥ १२
नित्यस्नान, शिवार्चन[19], मंत्र, जप, ध्यान, दान, शिवशील[20] ।
नसतां, असा कसा तूं मज विद्याशुचितनूस[21] शिवशील[22]?' ॥ १३
भूप म्हणे 'ती शैवी[23] विद्या दे तूं, मिळो मला शुचिता[24]; ।
तुजसीं केलि[25] कराया संतत माझी तनू असो उचिता[26].' ॥ १४
राज्ञी म्हणे, 'अयोग्या मी स्त्री उपदेश हा करायास, ।
सद्गुरुसि शरण जा, तो देईल[27] वरदेश[28] हाक रायास. ॥ १५
देईल तुला दाता पुरुषार्थांचा[29] पदानता[30] वर्ग, ।
भर्ग[31] प्रभुवर मजला गमतो ज्ञानें महातपा[32] गर्ग[33]. ॥ १६

---

१. गालांतल्या गालांत हसणें. २. ऐका. ३. दुर्वास ऋषि. हा शिवाच्या अंशानें उत्पन्न झालेला अत्रिऋषीचा पुत्र. ४. कल्पवृक्षास. ५. पाषाणविशेष त्यास. याचा लोखंडास स्पर्श झाला असतां लोखंडाचें सोनें बनतें असा समज आहे. कल्पवृक्ष व परिस या उपमानांचें तुच्छत्व दाखविल्यामुळें **प्रतीप.** ९।१० गीतींचें युग्म आहे. ६. नमःशिवाय या मंत्रासंबंधीं विद्या. ७. प्राण्यांस. ८. शंकरासारखा. ९. नम्रांचें कल्याण. १०. तयार झाला. ११. पंचाक्षरविद्येच्या बळानें. १२. पवित्र. १३. दांडगा. १४. तापलेला लोखंडाचा गोळा. अन्वयार्थः—जो तप्तायःपिंड, तया (=त्या पिंडाला) स्पर्शाया शुद्ध (=पवित्र सदाचरणी मनुष्य) [मात्र] योग्य होय. निष्पाप मनुष्यच जसा तप्त तैलांत हात घालणें, निखाऱ्यांतून चालत जाणें वगैरे दिव्यें करूं शकतो, त्याप्रमाणेंच निर्मळ शीलाचा मनुष्य मात्र माझ्या या देहास शिवूं शकेल; भलतासा शिवूं म्हणेल, तर तत्काळ भस्म होईल, हा कलावतीचा मतलब. **अर्थांतरन्यास.** १५. वेश्या. १६. स्थानें. १७. जारिणी. १८. रजोगुणानें, विषयवासनांनीं. १९. शिवपूजा. २०. शुभस्वभाव. २१. पंचाक्षरविद्येनें पवित्र झाला आहे जिचा देह अशीस. २२. स्पर्श करशील. २३. शिवसंबंधीं. २४. शुद्धता. २५. क्रीडा. २६. योग्य. २७. हाक देणें=साह्य करणें. २८. वर देणारांत श्रेष्ठ. २९. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचा समुदाय. ३०. पायीं नम्र झालेल्यास. ३१. शिव. ३२. मोठा तपस्वी. ३३. यदुकुलोत्पन्न राजांचा गुरु. अन्वयः—महातपा गर्ग मजला ज्ञानें प्रभुवर भर्ग गमतो.

नमुनि म्हणावें त्या, [1]भवजलधीच्या तूंच लाव तीरा या;' ।
ऐसें सांगुनि, घेउनि जाय गुरुकडे कलावती [2]राया. ॥ १७

[3]प्रणता दाशार्हाच्या ठेवुनि [4]करपद्म मस्तकीं [5]विधिनें, ।
[6]यमुनातीरीं शैवी विद्या उपदेशिली [7]दयानिधिनें. ॥ १८

[8]सद्गुरुहस्तस्पर्शें, [9]पंचाक्षरमंत्रधारणें, [10]हांक ।
देत निघाले [11]सहसा [12]नृपदेहांतूनि [13]कोटिशत [14]कांक. ॥ १९

[15]तत्काळ पावले ते झडपोनी [16]दग्धपक्ष मरणातें, ।
रामापुढें [17]निशाचर जैसे, होवूनि [18]अक्षम [19]रणातें. ॥ २०

[20]विस्मित होउनि राजा राज्ञीहि पुसे, '[21]विचित्र हें काय?' ।
गर्ग म्हणे, 'दोषांहीं [22]मनुतेजःपूर्ण सोडिला [23]काय. ॥ २१

[24]पंचमहापापादिक [25]दोषांच्या ज्या अनेकशत कोटी, ।
झाल्या भस्म; श्रीमत्पंचाक्षरमंत्रशक्ति बहु मोटी. ॥ २२

[26]मलिन हृदय जें होतें, शिवमंत्रें परम शुद्ध राया! तें. ।
न समर्थ अन्य ऐसें कांहीं [27]पतितासि [28]उद्धरायातें. ॥ २३

जा झालासि [29]कृतार्थ, स्वस्त्रीला चालवीं स्वधर्मातें, ।
श्रीशिवभजनें भूपा! पावसिल श्रेष्ठ नित्य [30]शर्मातें.' ॥ २४

गुरुतें प्रदक्षिण करुनि, वंदुनि, दाशार्ह जाय [31]गेहातें; ।
स्त्रीस म्हणे, 'गुरुच्या जित [32]सुरतरुपंचक न काय गे! हातें? ॥ २५

---

१. संसारसमुद्राच्या. २. दाशार्हराजास. ३. नम्र झालेल्या–याचें विशेष्य 'दाशार्हाच्या.' ४. हस्तकमल. ५. यथाविधि, शास्त्रोक्त रीतीनें. ६. यमुनानदीच्या कांठीं. ७. दयासागरानें, गर्गानें. ८. सद्गुरूच्या (गर्गाच्या) हाताच्या स्पर्शानें. ९. पंचाक्षर मंत्राचा उपदेश घेतल्यानें. १०. हाक देणें=ओरडणें, काव काव करणें. ११. एकाएकीं. १२. राजाच्या (दाशार्हाच्या) शरीरांतून. १३. शेंकडों कोटी. १४. कावळे. १५. त्याच वेळीं. १६. ज्यांचे पंख जळाले आहेत असे. १७. राक्षस. १८. असमर्थ. १९. युद्ध करण्यास. २०. आश्चर्यचकित. २१. चमत्कारिक. २२. मंत्राच्या तेजानें पूर्ण. २३. देह. २४. पांच महापापें इत्यादि. पंचमहापापें–ब्रह्महत्या, सुरापानं, स्तेयं, गुर्वंगनागमः । महांति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमः ॥ २५. पंचमहापातकांच्या शेंकडों कोटी भस्म झाल्याचें कारण पंचाक्षरमंत्राचें सामर्थ्य; परंतु वाक्यांत कारणर्थी शब्द प्रत्यक्ष नाहीं, म्हणून **काव्यलिंग**. २६. पापयुक्त. २७. पातक्यास. २८. तारण्यास. **असमालंकार.** २९. पूर्णमनोरथ. ३०. सुखातें. ३१. घरास. ३२. पांच स्वर्गीय वृक्ष. त्यांचीं नांवें–पारिजात, मंदार, संतान, कल्पवृक्ष व हरिचंदन. अन्वयः—स्त्रीस म्हणे, 'गे! गुरुच्या हातें सुरतरुपंचक [औदार्याच्या बाबदींत] जित (=पराभविलेलें) न काय?' **व्यतिरेक.**

तव वपु [1]चंदनशीत स्पर्शे मज [4]निववितें, [2]सुदति! [3]शयन ।
हें अमृतरसचि झालें; प्राप्त [4]मदन्या असा [5]मुदतिशय न. ॥ २६

पति [6]पतित तारिला त्वां; [7]त्वत्संगें सति! जसा मला [8]भवनीं, ।
त्या **नं**[9]दनाभिधानीं '[10]हरिस सुखाचा असा न लाभ वेनीं.' ॥ २७

रतला **क**लावतीसीं, तरि तो **[11]वि**षयी न सज्जना गमला. ।
[12]शमला [13]मोहें [14]महामनुतेजें, श्रमला [15]भवांत न भ्रमला. ॥ २८

[16]**पं**चाक्षरप्रभाव श्री[17]**व्यास** मुनींद्र सज्जना कळवी, ।
पळवी मोहातें, तो [18]श्रोतृमन श्री**शि**वाकडे वळवी. ॥ २९

[19]भक्त**मयू**रें लिहिलें [20]श्री**शै**वमनुप्रभाववर्णन हो! ।
या [21]परमामृतपानीं [22]सोलस **शि**व[23]भक्तरसिककर्ण न [24]हो. ॥ ३०

---

## अध्याय दुसरा.

कर्म [25]**म**हेशोद्देशें केलें, तें [26]मुक्ति देतसे [26]सर्व, ।
पर्वांत परम दुर्लभ जें [27]**मा**घासितचतुर्दशीपर्व. ॥ १

या [28]परमपुण्य पर्वी दुर्लभ उपवास वर्णिला आहे, ।
याहुनि रात्रीं जागर दुर्लभ, ऐसें [29]महासुधी पाहे; ॥ २

याहुनि [30]अतीव दुर्लभ म्हणती **शि**वलिंगदर्शन ज्ञानी, ।
[31]यांपरिस [32]सुदुर्लभतर **शि**वपूजन, धरिति हें सुधी [33]ध्यानीं. ॥ ३

१. चंदनासारखें थंड. २. सुंदर आहेत दांत जिचे अशा, शुभरदने! ३. शय्या. ४. माझ्याशिवाय इतरास. ५. फार आनंद. या गीतींत **निरंगरूपक** आणि **असम** हे अलंकार आहेत. ६. पातकी. ७. तुझ्या संगतीनें. ८. घरीं. ९. नंदन नांवाच्या उद्यानांत. येथें 'पति' 'पति [त]' हे **यमक,** 'त' चा **वृत्त्यनुप्रास** व उत्तरार्धांत **व्यतिरेक**. १०. इंद्रास. ११.कामी. कलावतीशीं रतला असून विषयी वाटला नाहीं; असें वर्णिल्यामुळें **विरोध.** १२. शांत झाला. १३. अज्ञान. १४. मोठ्या मंत्राच्या तेजानें. १५. संसारांत. १६. पंचाक्षर मंत्राचें सामर्थ्य. १७. मुनिश्रेष्ठ श्रीव्यास. १८. श्रोत्यांचें मन. १९. भक्त जो मोरोपंत, त्यानें. २०. श्रीशंकराच्या मंत्राच्या सामर्थ्याचें वर्णन. २१. खऱ्या अमृताच्या सेवनाविषयीं. २२. आळशी. २३. शिवभक्त आणि रसिक यांचे कान. २४. होवो. २५. महादेवप्रीत्यर्थ. २६. मुक्ति चार आहेत:-(१) सलोकता, (२) समीपता, (३) स्वरूपता, (४) सायुज्यता. २७. माघकृष्णचतुर्दशीचें पर्व. २८. फार पुण्यकारक. २९. मोठा सुज्ञ. ३०. फार. ३१. ह्यापेक्षां. ३२. मिळण्यास अधिक कठीण. ३३. चित्तांत. गीति २ व ३ यांत **सारा**लंकार आहे.

भवकोटिशतसुसंचित[1] शुभसुकृताच्या[2] महाविपाकबळें[3] ।
श्रीशिवपूजन घडतें जीवांला[4] कोमलाच्छबिल्वदळें[5]. ॥ ४

गंगेंत अयुतवर्षें[6] सज्जन मज्जन[7] करूनि जें[8] लाहे[9], ।
तें, एकदाचि बिल्वें शिव पूजी जो, तयासि फळ आहे. ॥ ५

याविषयीं दिव्य[10] कथा, जीणें संशय नुरेचि[11], असि[12] कांहीं ।
श्रवण करावी प्रेमें श्रीशिवचरणाब्जभक्तिरसिकांहीं[13]. ॥ ६

इक्ष्वाकुकुलज[14] राजा होता विख्यात मित्रसहनामा[15] ।
अतुलप्रताप[16] लोकीं, ज्याच्या साहों शके न रिपु[17] धामा[18]. ॥ ७

त्या मित्रसहें वधिला राक्षस मृगयेंत, तदनुजें[19] द्वेष ।
धरिला मनीं, शरीरीं, शुचिमनुजाचा[20] जसा, तसा वेष[21]. ॥ ८

सूदत्व[22] स्वीकारुनि मित्रसहाच्या गृहांत तो राहे, ।
वाढी मनुष्यमांस श्राद्धीं पात्रीं, वसिष्ठ तें पाहे. ॥ ९

कोपें वसिष्ठ, 'राक्षस हो', ऐसें मित्रसहनृपा शापी; ।
यापरि करुनि निशाचर, होउनि कृतकृत्य[23], जाय तो पापी. ॥ १०

आधीं क्रोधें शापी, मग राक्षसकृत्य मुनि मनीं आणी; ।
दैवें, 'वर्षं बारा बा! राक्षस हो,' असी वदे वाणी. ॥ ११

व्यर्थ दिला शाप, म्हणुनि आपुलिया होय जो यशा पाया[24], ।
कुलगुरुला[25] मित्रसहहि घे अंजलिमाजि[26] तोय[27] शापाया. ॥ १२

मदयंती नृपदयिता[28] पाय धरुनियां असें नृपा याची[29], ।

---

१. शेंकडों कोटि जन्मांत सांचविलेलें. २. पुण्याच्या. ३. मोठ्या दैवाच्या बळानें. ४. प्राण्यांला. ५. कोंवळ्या व निर्मळ बिल्वपत्रानें. ६. दहा हजार वर्षें. ७. स्नान. ८. जें फळ, जें पुण्य. ९. मिळवितो. या गीतींत **व्यतिरेक** अलंकार आहे. १०. उत्तम. ११. न उरे. १२. अशा प्रकारची. १३. श्रीशंकराच्या चरणकमलाच्या भक्तीची गोडी जाणणाऱ्या प्रेमळ भक्तांनीं. १४. इक्ष्वाकु हा मनूच्या वंशांत जन्मलेला एक राजा. याची सूर्यवंशी राजकुलांत फार प्रसिद्धि आहे. १५. मित्रसह नांवाचा. १६. ज्याच्या पराक्रमास तुलना नाहीं असा. १७. शत्रु. १८. तेजास. १९. त्याच्या धाकट्या भावानें. २०. पवित्र मनुष्याचा. २१. रूप. अन्वयः—तदनुजें मनीं द्वेष धरिला [व] शरीरीं, जसा शुचिमनुजाचा, तसा वेष धरिला. **क्रियादीपक.** २२ सैंपाकीपणा. २३. कृतार्थ. २४. आधार. अन्वयः—व्यर्थ शाप दिला, म्हणुनि जो (=जो कुलगुरु वसिष्ठ) आपुलिया (=मित्रसहाच्या) यशा पाया होय, [त्या] कुळगुरुला शापाया इ०. .२५. कुळाच्या गुरूस (वसिष्ठास). २६. ओंजळींत. २७. उदक. २८. राजस्त्री. २९. प्रार्थी.

'नच कुलगुरु शापावा; आम्ही [1]यादें, नदी कृपा [2]याची.' ॥ १३
राजा [3]सूक्त सतीचें, [4]श्रुतिचें जैसें, तसेंचि बहु मानी; ।
[5]जल पायांवरि सोडी; धर्माची न करिती [6]कुलज [7]हानी. ॥ १४
[8]शापोदकें [9]करपले, झाले काळेचि [10]तत्क्षणीं पाय; ।
कल्माषपादनामा होय प्रख्यात म्हणुनि तो राय. ॥ १५
गुरुशापें राक्षसता त्या **मि**त्रसहा नृपाकडे आली, ।
झाली ब्राह्मणहत्या, [11]क्षोभे [12]ब्राह्मणवधू जसी [13]व्याली. ॥ १६
'रे! [14]अंगसंगसमयीं वधिला [15]मत्प्रिय, असा कसा पापी! ।
तूंहि प्रियासमागम करितां मरसिल,' असें [16]सती शापी. ॥ १७
[17]बाळा ब्राह्मणभार्या शापुनि [18]नृपराक्षसा [19]महागहनीं, ।
गेली पतिसह [20]उत्तमलोकातें जळुनि ती [21]चितादहनीं. ॥ १८
[22]द्वादश वर्षें सरतां, [23]राक्षसभाव क्षितीश्वरें [24] सोडी. ।
[25]शापज्ञा **म**दयंती करें [26] निजसंगोद्यता [27] नृपा जोडी. ॥ १९
[28]अनपत्य नृप प्रार्थी, दे त्यास श्री**व**सिष्ठ संततितें. ।
पुत्रवती **म**दयंती झाली, स्तविती समस्त संत तितें. ॥ २०
ती [29]मूर्तिमती ब्राह्मणहत्या पाठीस नृपतिच्या लागे, ।
बहु पुण्य तीर्थयात्रा करितां **क**ल्माषपाद तो [30]भागे. ॥ २१
**मि**थिलेला[31] गेला नृप, तों **गौ**तमही तया स्थळीं आला, ।
**क**ल्माषपाद राजा [32]विनयें त्या मुनिसि वंदिता झाला. ॥ २२
**गौ**तम म्हणे, 'नरेंद्रा[33]! कुशल असे कीं? त्यजूनियां राज्य, ।
कां फिरतोसि असा तूं? वद बा! कां [34]आधि वाहसि [35]प्राज्य? ॥ २३

१. जलचर प्राणी. २. वसिष्ठाची. येथें **परंपरित रूपक** आहे. ३. उत्तम भाषण. ४. वेदाचें. ५. पाणी. ६. कुलीन. ७. नाश. **अर्थांतरन्यास.** ८. शापाच्या पाण्यानें. ९. पोळून गेले. १०. तत्काळ. ११. खवळली. १२. ब्राह्मणस्त्री. १३. सर्पीण. १४. रतीच्या प्रसंगीं. १५. माझा प्रिय (पति). १६. पतिव्रता ब्राह्मणस्त्री. १७. सोळा वर्षांच्या आंतील स्त्री. आषोडशाद्भवेद् **बाला,** त्रिंशता **तरुणी** मता, । पंचपंचाशता **प्रौढा,** भवेद् **वृद्धा** ततः परम् ॥ १८. राक्षस झालेल्या राजास (मित्रसहास). १९. मोठ्या अरण्यांत. २०. स्वर्गलोकास. २१. चितेच्या अग्नींत. २२. बारा. २३. राक्षसपणा. २४. राजास (मित्रसहास). २५. शाप जाणणारी. २६. कर जोडणें=हात जोडणें, प्रार्थना करणें. २७. आपल्या संगाविषयीं उत्सुक झालेल्यास. याचें विशेष्य नृपा. २८. संततिहीन. २९. मूर्तिमंत. ३०. थकला. ३१. जनक राजाच्या राजधानीस. ३२. नम्रतेनें. ३३. राजा. ३४. काळजी. ३५. फार.

भूप म्हणे, 'विप्रेंद्रा! सर्वत्रहि कुशल सर्वदा आहे, ।
राक्षसपणांत केली द्विजहत्या सोडिना मला बा! हे. ॥ २४
सर्वस्वदक्षिणा ज्यां, विधिनें केले असे महायज्ञ, ।
जे शुचि सहाय, झालों मेळविता त्यांसि मी सहायज्ञ. ॥ २५
मंत्र यथाविधि जपलों, यमनियम न लंघितां, तपें तपलों; ।
हत्यादोष न खपला, वित्तें देहेंचि मी बरा खपलों. ॥ २६
होतों उद्विग्न, परे द्विजवर्या! त्वां मला दिली भेट. ।
सत्पुरुषचरणदर्शन होतें बुडतां भवार्णवीं बेट. ॥ २७
शरणागततारक तूं, जरि एकमुख द्विबाहु, शिव सांचा; ।
बा! त्वत्प्रताप हरितो तम सर्वहि, जेविं नाथ दिवसाचा. ॥ २८
दिसतोसि सुविस्मित कां? परम चमत्कार पाहिला काय? ।
तव रोमांचप्रसरें होउनि कां व्याप्त राहिला काय?' ॥ २९
**गौ**तम म्हणे, 'नृपाळा! क्षितिवरि असतां प्रसिद्ध **गो**कर्ण, ।
टाक दुरितभय, फिटतें याच्या स्मरणें समस्त लोकर्ण. ॥ ३०
जैसा श्रीशिव साक्षात् **कै**लासीं **मं**दराचलीं राहे, ।
तैसाचि **म**हाबल या नामें **गो**कर्णमंडळीं आहे. ॥ ३१
शिखिशशिनक्षत्रांहीं जें न, पळे सर्व भास्करें तम तें; ।

१. ब्राह्मणश्रेष्ठा. २. केलेली. ३. ब्राह्मणवध. ४. ही (ब्राह्मणहत्या). ५. सर्व द्रव्याची दक्षिणा. ६. ज्या यज्ञांत. ७. मोठे यज्ञ. विधिनें=यथाविधि. ८. पवित्र, पुण्यशील लोक. ९. सहायांची (=मित्रांची, खऱ्या स्नेह्यांची) पारख ज्यास आहे असा. सहायज्ञ हें विशेषण साभिप्राय आहे, म्हणून **परिकर.** १०. व्रताचरण व चित्तदमन. ११. हत्येचें पातक. १२. द्रव्यानें. १३. शरीरानें केलेल्या इष्ट उपायापासून इष्टप्राप्ति न होतां, उलट अनिष्ट उत्पन्न झालें आहे, म्हणून **विषमा**लंकार. १४. खिन्न. १५. परंतु. १६. ब्राह्मणश्रेष्ठा. १७. साधूंच्या पायांचें दर्शन. १८. संसारसमुद्रांत. १९. आश्रय. **अर्थांतरन्यास** आणि **रूपक.** २०. शरण आलेल्यास तारणारा. २१. एक आहे मुख ज्यास. २२. दोन आहेत हात ज्यास. शिव व गौतम यांचें साधर्म्य दाखवून, वैधर्म्यही दाखविलें आहे म्हणून **व्यतिरेक.** २३. खरोखरींचा, प्रत्यक्ष. २४. तुझा पराक्रम. २५. अज्ञान, पक्षीं अंधार. **श्लेष.** २६. दिवसाचा नाथ=सूर्य. **पर्यायोक्त.** २७. मोठा. २८. रोमांच उभे राहाण्यानें, शहाऱ्यांनीं. २९. पाठभेदः—कीं. ३०. शरीर. ३१. पृथ्वीवर. ३२. पातकाचें भय. ३३. लोकांचें ऋण. हें तीन प्रकारचें आहे, (१) ऋषींचें, (२) देवांचें व (३) पितरांचें. ३४. प्रत्यक्ष. ३५. मंदरपर्वतावर. ३६. अग्नि, चंद्र व नक्षत्रें यांनीं. ३७. सूर्यामुळें.

[1]अघ [2]तीर्थक्षेत्रांहीं नच, **गो**कर्णी [3]अशेषही [4]शमतें. ॥ ३२

श्री**गो**कर्णी जळती [5]ब्रह्मवधाद्यखिलपापपर्वत रे! ।
येथें [6]सकृत्प्रवेशें जन, नमुनि **म**हाबळासि, सर्व तरे. ॥ ३३

[7]**ब्रह्मेंद्रो**पेंद्रादि श्री**गो**कर्णी अशेष [8]सुर तपले, ।
जपले [9]शय्यास्थानीं [10]सिद्धिदं, [11]**घ**टजादि मुनि सदा [12]जपले. ॥ ३४

सर्प, [13]**सु**पर्ण, [14]**द**शवदन, [15]**घ**टकर्ण, **बि**भीषण, [16]त्रिदश, **य**क्ष, ।
दानव, मानव, तपले; झाले कृतकृत्य **सि**द्ध बहुलक्ष. ॥ ३५

तपली [17]**का**ली, जीच्या [18]चरणनखा [19]क्षम न काळ [20]हेरायां, ।
तप करुनि सिद्ध झाले [21]**कं**दर्प [22]**स**नत्कुमार हे राया! ॥ ३६

श्री[23]**वि**ष्णुप्रमुखांहीं, प्राणी संदर्शनें बहु तराया, ।
[24]निर्जनामांकित लिंगें **गो**कर्णी स्थापिलीं बहुत; राया! ॥ ३७

पाहुनि [25]**शि**वरात्र्युत्सव **गो**कर्णी फार बा! नृपा! [26]धालों, ।
झालों कृतार्थ; [27]**ज**नकें बहुत विनविलें म्हणोनि मी आलों. ॥ ३८

येतां मार्गी कांहीं पाहुनि आश्चर्य पावलों हर्ष, ।
[28]**म**रुपथिकांवरि पडला जाणों बापा! बुधा! [29]सुधावर्ष.' ॥ ३९

---

## अध्याय तिसरा.

[30]**क**ल्माषांघ्रि म्हणे, 'बा! तें मज आश्चर्य काय सांगावें. ।
संतचि उदार, [31]सदय; [32]स्वस्तरुसि 'उदार' म्हणुनि कां [33]गावें'? ॥ १

**गौ**तम म्हणे, '[34]सभाग्या! आइक आश्चर्य सांगतों तुज तें; ।

१. पातक. २. तीर्थें व क्षेत्रें यांनीं. ३. सर्वही. ४. शांत होतें, लयास जातें. **दृष्टांत.** ५. ब्राह्मणहत्यादिक सर्व पातकांचे राशि. ६. एकदा प्रवेश करण्यानें. ७. ब्रह्मदेव, इंद्र व विष्णु इत्यादि. गीति ३३।३४।३५।३६ मिळून **उदात्ता**लंकार. ८. देव. ९. शयनाच्या स्थलीं. १०. सिद्धि देणारे. ११. अगस्ति वगैरे. १२. जप करिते झाले. १३. गरुड. १४. रावण. १५. कुंभकर्ण. १६. देव. १७. भवानी. १८. पायांच्या नखास. १९. समर्थ. २०. पहावयास. २१. मदन. २२. ब्रह्मदेवाचे मानसपुत्र. यांनीं लुप्त झालेला आत्मज्ञानाचा मार्ग प्रकट केला. २३. श्रीविष्णु इत्यादिकांनीं. २४. आपल्या नांवांनीं प्रसिद्ध. २५. शिवरात्रीचा उत्सव. २६. तृप्त झालों. २७. मिथिलानगरीच्या राजानें. २८. मारवाड देशांतील प्रवाशावर. २९. अमृताचा वर्षाव. **उत्प्रेक्षा.** ३०. कल्माषपाद. ३१. दयाळु. ३२. कल्पवृक्षास. ३३. वर्णावें, स्तवावें. **व्यतिरेक** अलंकार. ३४. सुदैवी पुरुषा, भाग्यवंता!

गुह्य कथावें सुजनीं, सुक्षेत्रीं बीज पेरिलें रुजतें. ॥ २
गोकर्णाहुनि येतां, मध्यान्हीं तापलों पथीं बा! गा! ।
सुसरीं स्नान करुनि वटमूलीं मी बैसलों महाभागा! ॥ ३
तों जवळचि चांडाली, वृद्धा, अंधा, कृशा, निराहारा, ।
कृमिकुष्ठव्रणपूयव्याप्तांगी देखिली निराधारा. ॥ ४
मरणोन्मुखी तळमळत होती उष्णीं रजांत राहून, ।
मीहि व्याकुळ झालों, तीचा अत्यंत ताप पाहून. ॥ ५
तों दिव्य विमान नृपा! गगनांतुनि उतरलें जसा अर्क, ।
शिवरूप पुरुष पाहुनि, केला शिवदूत हे असा तर्क. ॥ ६
म्यां उठुनि, हस्त जोडुनि, होउनियां स्तवनवंदनप्रवण, ।
पुसिलें, 'वदा प्रयोजन आगमनाचें, किमर्थ ? हो कवण ?'॥ ७
चवघे शिवदूत असें वदले, 'बा! गौतमा! महाप्रज्ञा! ।
घेउनि विमान आलों, केली श्रीत्रिभुवनेश्वरें आज्ञा. ॥ ८
आली करुणा करुणापारावारा महावदान्या, या ।
चांडाळीतें आलों सत्कारुनि उत्तमा पदा न्याया.' ॥ ९
मी अति विस्मित वदलों, 'देहीं तिळही जिच्या नसे शुचिता,।
चांडाली सुविमाना, कैसी मखमंडपा शुनी उचिता ? ॥ १०

---

१. रहस्य, गुप्त गोष्ट, गोप्य. **अर्थांतरन्यास.** २. चांगल्या शेतांत. या ठिकाणीं प्रथम विशेष सिद्धान्त, नंतर तत्समर्थनार्थ सामान्य सिद्धान्त व अखेर पुन्हां विशेष सिद्धान्त आला आहे. असा प्रकार असला म्हणजे त्या अलंकारास **विकस्वर** असें कांहीं साहित्यकार नांव देतात. ३. भर दोनप्रहरीं. ४. मार्गांत. ५. चांगल्या सरोवरांत. ६. वडाच्या झाडाखालीं. ७. क्षीण, फार अशक्त. ८. उपाशी. ९. किडे, कोड, क्षत व पू यांनीं जिचें अंग व्यापिलें आहे अशी. १०. आश्रय नाहीं अशी, आश्रयहीन. वृद्धा, अंधा इत्यादि गुणांचा सहभाव वर्णिल्यामुळें **समुच्चय.** ११. मरण्याच्या बेतांत आलेली. १२. तापलेल्या धूळींत. १३. विव्हळ. १४. पाठभेदः—तीचा. १५. दुःख. १६. सुंदर, तेजस्वी. १७. आकाशांतून. १८. सूर्य. १९. शिवासारखें ज्यांचें रूप असे. २०. शिवाचे दास. २१. कल्पना. **हेत्वलंकार.** २२. स्तुति व नमस्कार यांविषयीं तत्पर. २३. कारण. २४. येण्याचें. २५. कशाकरितां. २६. मोठ्या ज्ञाल्या. २७. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकांच्या स्वामीनें (शिवानें). २८. कृपासागरास. २९. मोठ्या उदारास. **परिकर.** ३०. स्वर्गास किंवा मोक्षास. ३१. न्यावयास. ३२. शरीरीं. ३३. तिळभरही. ३४. शुद्धपणा. ३५. यज्ञमंडपास. ३६. कुत्री. ३७. योग्य. **दृष्टांत.**

जन्मापासुनि अशुचि[1], प्राय[2]: पापानुगामिनी[3], चंडा[4], ।
शिवलोकीं कसि नेतां? चांडाली पात्र[5] होय जी दंडा[6]. ॥ १२

जीस शिवज्ञान नसे जप, तप, उपवास, सत्क्रिया[7] कांहीं, ।
भूतदया[8], शिवपूजन, भक्षाभक्षादिनियमही[9] नाहीं. ॥ १२

शिवलोकीं, सुविमानीं वाहुनि, नेतां कशी कुशीला[10]? हो! ।
प्रभुचर्या[11] [12]अविभाव्या, कीं म्हणतो सुगतितें असी लाहो[13]. ॥ १३

पहिलें पुण्य लव[14] नसे, असतें तरि कां असी दशा[15] असती? ।
सांगा दिव्यविमानीं वाहुनि नेतां तुम्ही कसी असती[16]?' ॥ १४

वदले शिवदूत असें, 'जरि कौतुक गौतमा! तुला गमतें, ।
तरि परिस, सांगतों, कीं शंभुयशीं चित्त साधुचें रमतें. ॥ १५

[17]पूर्वभवांत सुमित्रा हे होती विप्रसंभवा[18] नावें, ।
जीचें सौंदर्य जनें शीत मधुर, जेविं अंभ[19], वानावें. ॥ १६

अनुरूपा[20] विप्रसुता[21] [22]कांता तातें निवेदिली लाहे, ।
कांहीं काल धवासह[23] रतिला पावुनि निवे दिलीला हे. ॥ १७

दारुण[24] रोगें मेला पति, कांहीं काल [25]शील हे रक्षी, ।
होता आत्मा ईचा गुरुगेहीं[26], जेविं पंजरीं[27] पक्षी. ॥ १८

यौवनभरस्मरज्वर[28] होतां, येईल[29] कां मना [30]शील? ।
रक्षक विवेक नसतां पुण्यव्रतकाम[31] काम[32] नाशील. ॥ १९

---

१. अपवित्र. २. बहुतकरून. ३. पातकास अनुसरणारी. ४. उग्र स्त्री. ५. योग्य. ६. शिक्षेस. **विरोध.** ७. चांगलें कृत्य. ८. प्राण्यांवर दया. ९. कोणतें खाणें योग्य व कोणतें अयोग्य इत्यादिकांविषयीं निर्बंधसुद्धां. १०. दुष्ट स्वभाव जीचा अशी. ११. प्रभुची रीती, देवाची करणी, ईश्वराचा हेतु. १२. अगाध. १३. लाभो. गीति १२ व १३ मध्यें शिवलोकीं नेण्याचें कारण नसतां नेली असें वर्णिल्यामुळें **विभावना.** १४. अल्पही. १५. अवस्था. १६. पतिव्रता नव्हे ती. १७. पूर्वजन्मीं. १८. ब्राह्मण कुळांत जन्मलेली. १९. पाणी. येथें शीत=थंड, पक्षीं डोळे निववणारें आणि मधुर=स्वादिष्ट, पक्षीं आनंद देणारें असा **श्लेष.** २०. योग्यास. २१. ब्राह्मणपुत्रास. २२. वरास. २३. पतिसह. या आर्येचा अन्वय—तातें निवेदिली (=विवाहविधीनें दिलेली) हे (=ही) अनुरूपा विप्रसुता कांता लाहे (व) कांहीं काल धवासह दिलीला रतिला (=पतीनें दिलेल्या संगसुखाला) पावुनि निवे (=तृप्त झाली). २४. भयंकर. २५. पातिव्रत्य, शुद्धवृत्ति. २६. वडिलांच्या घरीं, माहेरीं. २७. पिंजऱ्यांत. २८. तारुण्याच्या भरांतील मदनाचा ताप. **प्रश्नालंकार.** २९. मनास येणें=आवडणें, रुचणें. ३०. सद्वर्तन, शुद्ध आचार. ३१. पवित्र आचरणाची इच्छा. ३२. मदन. **अप्रस्तुतप्रशंसा.**

मग गुप्त व्यभिचारप्रारंभ करून लेक्षणें[1] कळली, ।
मळली, स्वजनें[2] विटॅली[3] स्पष्ट घेटस्फोट[4] करुनि कीं त्यजिली. ॥ २०
शूद्रविटांसीं[5] रमतां बहु धनवान् शूद्रपति[6] इला पाहे, ।
बाहे[7], जावुनि राहे गृहिणी[8] होउनि तद्गृहीं[9] बा! हे. ॥ २१
प्रसवे शूद्रापासुनि सुत, सादर[10] मद्य मांस हे भक्षी, ।
झाली अति विषयांधा[11]; बा! हित कांहीं न आपुलें लक्षी[12]. ॥ २२
तो शूद्र गृहीं नसतां, भक्षावें मांस हें मनीं आणी, ।
गोवत्सातें[13] मानुनि मेष[14] तमीं[15], हे महासिनें[16] हाणी[17]. ॥ २३
नेउनि गृहांत, वधिला गोवत्स असें मदाकुला[18] पाहे, ।
कोण्या[19] एका सुकृतें[19] भ्याली, 'शिव! शिव!' तदा वदे बा! हे. ॥ २४
एक मुहूर्त[20] मुनींद्रा[21]! पश्चात्तप्ता[22] उगीच हे राहे, ।
मग अर्ध खाय, कोठें अघभय[23] मदिरारतीं[24] जनीं आहे? ॥ २५
बाहिर गोवत्साचें अर्धशरीर[25] त्यजूनि हे पापा, ।
आक्रोश[26] करी, 'व्याघ्रें[27] वधिला गोवत्स हा, पहा बापा!' ॥ २६
आक्रोश श्रवण करुनि, आले धांवोनि लोक जवळील, ।
कीं वदले, 'हा कोमल[28] गोवत्स व्याघ्र कां न केवळील[29]?' ॥ २७
दुसरे दिवसीं ग्रामांतरगत[30] भर्ता[31] इचा गृहा आला, ।
सांगे, 'व्याघ्रें वधिला गोवत्स' असें मृषाचि[32] हे त्याला. ॥ २८
ऐसें पाप करुनि हे दुर्वृत्ता[33] गौतमा! पुढें मेली, ।
नेली यमदूतांहीं, मग यमधर्में विचारणा[34] केली. ॥ २९
चांडाळी केली, कीं या ऐशा दुष्फळासि हे अर्हा[35], ।
अंतकसभासदांहीं[36], व्हाया अतिदुःख दुर्दशा[37] गर्हा[38]. ॥ ३०

---

१. गरोदरत्वादि बाह्य चिन्हानें. २. आप्तानें. ३. दोषयुक्त झालेली. ४. मृताप्रमाणें उत्तरक्रियादि. ५. शूद्रकुलोत्पन्न जारांसीं. ६. शूद्रश्रेष्ठ. ७. बोलावी. ८. घरधनीन, गृहस्वामिनी. ९. त्याच्या घरीं. १०. आदरानें. ११. विषयानें आंधळी. हित न पाहण्याचें कारण 'विषयांधा' हें असल्यामुळें **काव्यलिंग**. १२. पाही. १३. गाईच्या वासरास. १४. मेंढा. १५. अंधारांत. १६. मोठ्या तरवारीनें. १७. मारी. १८. मद्यादिकांच्या निशेनें व्याप्त झालेली. १९. कांहींतरी पूर्व पुण्याईनें. २०. दोन घटका. २१. मुनिश्रेष्ठा. २२. पस्तावा पावलेली. २३. पातकाचें भय. २४. मद्याविषयीं ज्यास आवड आहे अशाच्या ठायीं. २५. शरीराचें अर्ध. २६. आकांत. २७. वाघानें. २८. कोंवळा. २९. भक्षील. ३०. दुसऱ्या गांवास गेलेला. ३१. पति. ३२. खोटेंच. ३३. दुराचारिणी. ३४. विचार. ३५. योग्य. ३६. यमाच्या सभासदांनीं. ३७. वाईट स्थिति. ३८. निंदा.

जात्यंधा[1] कुष्टव्रणकृमिदुर्गंधाकुला[2], कृशा, काळी[3] ।
झाली, ईस[4] कंदन्नें उच्छिष्टें मायबापही पाळी. ॥ ३१
माता, तातहि मेला, बंधुजनें त्यागिली महापापा[5], ।
वरितो[6] कोण अशा या मूर्ता[7] नरकास? गौतमा! बापा! ॥ ३२
वसनाशनार्थ[8] हिंडे देशोदेशीं, धरूनियां यष्टी[9]. ।
न भरे पोट, न झांके वपु, होय सदा गदाकुला[10] कष्टी[11]. ॥ ३३
श्रीगोकर्णी यात्रा विपुला[12] शिवरात्रिकारणें[13] आली, ।
वसनाशनार्थ तेथें हेही पातकसमृद्धिची[14] आली[15]. ॥ ३४
मार्गाजवळ बसे, जरि शक्ति शरीरीं नसे बसायाची, ।
वसनाशनातिदीना[16] सर्वजना करुनि हे पसा[17] याची[18]. ॥ ३५
"जन हो! दया करावी मज दीनावरि तुम्हीं न कोपावें, ।
झांकाया तनुसि वसन[19], अशन[20] करायासि अन्न, ओपावें[21].' ॥ ३६
ऐसें चतुर्दशीच्या दिवसीं रात्रींहि हे जना मागे; ।
कोणीं कांहीं न दिलें, बा! ग्लानीकरुनि[22] याचितां भागे[23]. ॥ ३७
'द्याहो! द्याहो!' म्हणतां श्रमली बहु; अर्धरात्र जों झाली, ।
तों अंजलिमाजि[24] इच्या कोणी जन बिल्वमंजरी[25] घाली. ॥ ३८
भक्षाया योग्य नव्हे म्हणुनि इणें बिल्वमंजरी हातें ।
दूर दवडिली, दैवें शिवलिंगशिरींच[26] पाडिली वातें[27]. ॥ ३९
रात्रौ[28] जनासि मागत होती, श्रीशिवचतुर्दशींत पण ।
दैवाच्या योगें हे अन्नाचा पावली न एक कण. ॥ ४०
क्षेत्रांत भद्रकाली प्रख्याता भगवती[29], तिच्या मागें ।
क्रमुनि[30] निशीतें, तेथुनि निघती झाली सकाळ[31] हे रागें. ॥ ४१
तेथुनि निघोनि आली या स्थानातें, पथीं[32] बहु श्रमली, ।

---

१. जन्मापासून आंधळी. २. कोड, क्षत, किडे व दुर्गंध यांनीं व्याप्त. ३. कृष्णवर्ण. ४. वाईट अन्नानें. ५. मोठी पातकी. ६. स्वीकारितो. ७. मूर्तिमंत. **रूपकातिशयोक्ति.** ८. वस्त्र व अन्न यांकरितां. ९. काठी. १०. रोगानें व्याकुळ. ११. दुःखी. १२. पुष्कळ. १३. शिवरात्रीसाठीं. १४. पातकाच्या विपुलतेची. १५. सखी, मैत्रीण. १६. वस्त्र व अन्न न मिळाल्यामुळें दीन झालेली. १७. पसा करणें=ओंजळ करणें, हात पसरणें. १८. मागे. १९. वस्त्र. २०. खाणें. २१. द्यावें. २२. श्रमांमुळें. २३. दमली. २४. ओंजळींत. २५. बिल्वपत्र. २६. शिवलिंगाच्या मस्तकीं. २७. वाऱ्यानें. २८. रात्रीं. २९. देवी. ३०. रात्र घालवून. ३१. सकाळीं. ३२. मार्गांत.

भ्रमली क्षुद्रोगार्ते[1], प्रभुसि निजदयेसि[2] पात्र[3] हे गमली. ॥ ४२
आज्ञा करूनि आम्हां प्रभुनें, प्रेषुनि विमान, आणविली; ।
पुससी म्हणुनि तुज मुने! चांडाळीची प्रवृत्ति[4] जाणविली. ॥ ४३
कृपणीं[5] कृपालुता[6] जी प्रभुची, तुज कळविली मुनिवरा[7]! हे; ।
शिवकीर्तिस कर जोडुनि एकिकडे शारदी पुनिव[8] राहे. ॥ ४४
कर्मविपाकगति[9] पहा कैसी अत्यद्भुता[10] मुने! आहे, ।
भगवत्प्रसादभाजन[11] होउनि, सुपदासि[12] अधमही[13] लाहे. ॥ ४५
पूर्वभवीं[14] अन्नोदकदान[15] न घडलें इला कधीं लेशें[16], !
यास्तव महामुने! हे पीडिति उग्र[17] क्षुधातृषाक्लेश[18]. ॥ ४६
प्याली मद्य मदांधा[19], जात्यंधा[20] याचि पातकें झाली; ।
चांडाळी यास्तव कीं, नाहीं गोवत्स[21] भक्षितां भ्याली. ॥ ४७
जारपथरता[22], म्हणवुनि दुर्वृत्ता[23] दुर्भगा[24] असी रंडा[25]; ।
शोभवि वपु मदवेगें, पावलि कुष्ठव्रणा[26] महादंडा[27]. ॥ ४८
हे शूद्रासीं रमली, कृमिपूयक्षतजपीडिता[28] म्हणुनी; ।
भोगविहीना झाली, विषयाहुनि न व्रतें[29] गुणें गणुनी. ॥ ४९
वसतीं मर्त्यशरीरीं[30] अघचिन्हें[31] जाणताति, जे कवि[32], ते. ।
देखति, दाविति अन्या; बुध सर्वार्थप्रकाशिते[33] सविते[34]. ॥ ५०

---

१. क्षुधा व रोग यांनीं पीडिलेली. २. आपल्या कृपेस. ३. योग्य. या गीतींत **कारक-दीपक** अलंकार आहे. ४. वृत्तांत, हकीकत. ५. दीनीं. ६. दयालुपणा. **अनुप्रास.** ७. मुनिश्रेष्ठा! ८. शरदृतूंतील पौर्णिमा. शरदृतूंत आकाश अगदीं निर्मळ व निरभ्र असल्यामुळें, त्या वेळचें पौर्णिमेचें चांदणें अगदीं पिठासारखें पांढरें असतें. परंतु शिवकीर्ति ही त्याहूनही अधिक स्वच्छ व पांढरी असल्यामुळें, शारदी पौर्णिमा शिवकीर्तीला लाजून नम्रपणें बाजूला उभी राहात आहे. येथें **प्रतीप** अलंकार आहे. ९. पूर्व संचिताच्या परिणामाची चाल. १०. अति चमत्कारिक. ११. ईश्वरकृपेचें पात्र. १२. उत्तमपदास. १३. नीचही. ही गीति **सुभाषित** आहे. १४. पूर्वजन्मीं. १५. अन्न व उदक यांचें दान. १६. थोडें. लवमात्र सुद्धां. १७. कडक. १८. भूक तहान यांचे कष्ट, हाल. १९. गर्वानें आंधळी. २०. जन्मांध. २१. गाईचें वासरूं. २२. जारमार्गांत रमलेली. २३. दुराचरणी. २४. दुर्दैवी. २५. विधवा. २६. कोड आणि क्षत यांच्या. २७. मोठ्या शिक्षेस. २८. किडे, पू व रक्त यांनीं गांजलेली. २९. पतिव्रतेचे धर्म. या अर्धाचा अन्वय–व्रतें गुणें (=गुणांनीं, गुणांसंबंधानें) विषयाहुनि (=इंद्रियसुखापेक्षां अधिक) न गणुनी [ही] भोगविहीना झाली. अर्थ–पतिव्रतेचे धर्म विषयापेक्षां अधिक न मानल्यामुळें ही भोगरहित झाली. ३०. मनुष्यशरीरीं. ३१. पापाचीं लक्षणें. ३२. शहाणे. ३३. सर्व पदार्थांस प्रकाश देणारे. ३४. सूर्य. ही गीति **सुभाषित** आहे. **व्यतिरेक.** अन्वयः–जे कवि (शाहणे)

जे बहुरोगी, सुतधनवर्जित[1], याचक[2], कुलक्षण[3], क्लिष्टे[4], ।
निर्विद्य[5], भोगविरहित, विकलांग[6], कुरूप, दुर्गुणाश्लिष्ट[7], ॥ ५१
निर्लज्ज, निंद्य, दुर्भग[8], परसेवक[9], सर्व हे महापापी. ।
जन्मांतरकृत[10] जें जें, तें कर्म शुभाशुभें[11] गुणें व्यापी. ॥ ५२
नरदेहीं[12] शुभ अशुभहि समजुनि, जो जंतु[13] करितसे पाप, ।
तो केवळ आत्मघ्न[14], प्राप्त तया होय सर्वदा ताप[15]. ॥ ५३
अथवा सकलें पापें करितो जो काय सर्वदा, नर तो ।
स्मरतो **शि**वासि, तरि तो, जरिही न रतेल शुभपथीं[16], तरतो.॥ ५४
मुनिशार्दूला[17]! जेव्हां पूर्वभवीं[18] करुनि हे दुरित[19] मेली, ।
**य**मदूतांहीं बांधुनि दृढपाशांहीं यमालयीं[20] नेली. ॥ ५५
तेव्हां वितर्क[21] झाला बहु भासे **य**मसभासदांमाजी, ।
'दंड करावा किंवा न करावा पापिणीस या आजी[22]. ॥ ५६
या जन्मींचेंचि दुरित, पूर्वी हृदयीं[23] इच्या नसे जडलें, ।
होतें प्रथम म्हणावें, ब्रह्मकुळीं[24] जन्म तरि कसें घडलें? ॥ ५७
या जन्मींच अघ[25] इणें बहु केलें, पावली जगीं गर्हा[26], ।
तरिही **ब्रा**ह्मणकुलजा नोहे नरकीं वसावया अर्हा[27]. ॥ ५८
नेणुनि[28] गोवत्सातें आधीं मदिरामदाकुला[29] मारी, ।
भ्याली, जाणुनि वदली '**शिवशिव**!' हें पूर्वपुण्य अति भारी. ॥ ५९
गोवत्सवधें पावे कंपातें मारुतें[30] जसी कदली[31], ।
अघ नाशाया '**शिवशिव**!' ऐसें विस्पष्ट[32] हे मुखें वदली. ॥ ६०

---

[आहेत,] ते मर्त्यशरीरीं वसतीं (राहणारीं) अघचिन्हें जाणताति; सर्वार्थप्रकाशिते सविते बुध [सर्ववस्तुगणांना] देखति [व] अन्या दाविति.

१. पुत्र व द्रव्य यांनीं रहित. २. याचना करणारे. ३. दुर्लक्षणी. ४. पीडलेले. ५. विद्याहीन. ६. ज्यांना कांहीं अवयव कमी आहेत असे, व्यंग. ७. दुर्गुणांनीं व्याप्त. ८. दुर्दैवी. ९. दुसऱ्याचे चाकर. मागील गीति व हें गीत्यर्ध ह्यांत महापापी सांगितले आहेत. १०. अन्यजन्मीं केलेलें. ११. कल्याणकारक व अकल्याणकारक. याचें विशेष्य 'गुणें.' १२. मनुष्यदेहांत. १३. प्राणी. १४. आपला घात करणारा. १५. पीडा. १६. कल्याणकारक मार्गांत. १८ व १९ ह्या गीति **सुभाषित** आहेत. १७. मुनिश्रेष्ठा. १८. पूर्वजन्मीं. १९. पातक. २०. यमगृहीं. २१. ऊहापोह, खल, विचार. २२. आज. २३. चित्तीं. २४. ब्राह्मणकुळांत. २५. पातक. २६. निंदा. २७. योग्य. ही ब्राह्मणकुलजा ह्मणून नरकीं बसावयास योग्य नव्हे असें सूचविल्यामुळें **काव्यलिंग**. २८. न जाणून. २९. दारूच्या निशेनें बेघोष झालेली. ३०. वाऱ्यानें. ३१. केळ. ३२. उघड, साफ.

जरि एकदाहि वदली '**शिवशिव**'! ऐसें, तथापि हें नाम ।
[1]गुरु, [2]मंगलें गणवेलचि या उच्चारेंचि हें [3]परंधाम. ॥ ६१

एका जन्मीं केलें अघ [4]दारुण, तत्फलासि भोगाया ।
व्हावी **चांडाळी** हे, चरित इचें मत कवींस [5]हो गाया. ॥ ६२

[6]क्लेशांहीं परिपीडन जें वारंवार होतसे कांहीं, ।
याहुनि अधिक नरक तो सुज्ञमतें अन्य सर्वथा नाहीं. ॥ ६३

म्हणवी [7]दुर्जन, [8]मम हा व्याधि, दरिद्रत्व, मूर्खता, 'हाय!' ।
एकैकहि नरकच, मग सांगावें, ज्यांत सर्व, तें काय? ॥ ६४

[9]प्राक्तनसुकृतें घेती झाली [10]विवशाहि नाम जें [11]नारी, ।
तेणेंचि अन्यजन्मीं [12]अंतीं बहु पुण्य करिल हे भारी. ॥ ६५

त्याचि महापुण्यानें पावेल, तरोनि [13]यातना, शुचिता; ।
होइल [14]परमपदातें **शंभु**प्रभुच्या [15]अनुग्रहें [16]उचिता. ॥ ६६

श्री**शिव**सेवक येतिल, **शिव**लोकीं [17]गौरवूनि नेतील, ।
देतील परमपद, [18]कविकोटिमुखें स्तुति करोनि घेतील. ॥ ६७

ऐशा प्राण्याचे तों [19]आम्हीं [20]शास्ते नसों स्वयें युक्त, ।
प्रभु [21]हाच [22]विचारें करुनि, तोचि करी जीव बद्ध कीं मुक्त.' ॥ ६८

ऐसा करुनि विचार [23]द्विजवर्या! **चि**[24]त्रगुप्त **य**म यांहीं ।
**हे** सोडिली **सु**मित्रा [25]परिपालितभगवदुक्तसमयांहीं. ॥ ६९

पडली [26]भूवर, झाली चांडाली, प्रथम जें वदे '**शिव**' तें ।
सुकृत इच्या पदरीं, बा! जग या नामेंचि तापलें निवतें. ॥ ७०

श्री**शिव**रात्रीस इला घडला उपवास, जागर स्पष्ट, ।
बिल्वें [27]**शिव**लिंगार्चन; मग कां सरतिल न पातकें, कष्ट? ॥ ७१

१. थोर, मोठें. २. शुभ. ३. मोक्ष. ४. भयंकर. ५. होवो. ६. अत्यंत त्रास. ६३ व ६४ ह्या गीतींत **सुभाषित** आहे. ७. दुष्ट मनुष्य. ८. 'माझें' ह्या शब्दाची पीडा. या गीतीचा अन्वयः— दुर्जन, मम हा व्याधि (अहंकार), दरिद्रत्व व मूर्खता हाय म्हणवी; (हे) एकैकहि नरकच, मग ज्यांत [हे] सर्व, तें [दुःखमय जिणें] काय सांगावें? ९. पूर्वकर्मांच्या पुण्याईनें. १०. उच्छृंखल, बेबंद. ११. स्त्री. १२. मरणसमयीं. १३. पीडा. १४. मोक्षपदास. १५. कृपेनें. १६. योग्य. १७. आदर करून. १८. कोट्यवधि कवींच्या मुखांनीं. १९. यम, चित्रगुप्त व यमदूत. २०. शासन करणारे. २१. शंकरच. २२. विचार केला असतां. २३. ब्राह्मणश्रेष्ठा! गौतमा! २४. प्राण्यांच्या पापपुण्यांचा हिशेब ठेवणारा यमाचा लेखक. २५. पाळिला आहे ईश्वरानें केलेला निर्बंध (=ठराव, नियम) ज्यांनीं. [याचें विशेष्य 'यांहीं'.] २६. भूमीवर. २७. शिवलिंगपूजा.

नामग्रहण[1], उपोषण, बिल्वार्चन[2], जरि जैसेंतसें[3] घडलें, ।
जडलें भक्तत्व, पहा, परमपद बळें इच्या गळां पडलें[4]. ॥ ७२
योग्या परमपदा हे, ऐसा वाहोनि शंकरा बेल, ।
मग सद्भक्तगृहीं[5] कां मोक्ष न, होउनि विशंक[6], रांबेल[7]"? ॥ ७३
ऐसें वदोनि, केली ती दिव्याकृति[8] महेशदूतांनीं[9], ।
बैसविली सुविमानीं भगवच्चरणाब्जभक्तिपूतांनीं[10]. ॥ ७४
प्रथम स्वप्न गमे, मग समजुनियां, ती म्हणे "अहा! देवा! ।
दे वास पदीं साचा, दीनाचा बंधु[11] तूं महादेवा! ॥ ७५
त्वन्नामवर्ण[12] एकहि अघनगशत[13] हरिल गा! महाबाहो[14]! ।
यापरिचि आवराया नतमानसहरि[15] लगाम हा बा! हो. ॥ ७६
बहु विस्मयकर[16] भगवच्चर्यामाहात्म्य[17], या नसे जोडा, ।
म्हणतें कवींस, 'लिहिले असतिल जे इतर सदय, ते खोडा[18].' ॥ ७७
प्रभु[19] बिल्वपत्रमात्रें होउनि संतुष्ट, परमपद देतो; ।
चेतोहरें[20] वरचरित[21] प्रकटुनि[22], विलयासि[23] दुरितभयें[24] नेतो. ॥ ७८
शक्रादि[25] लोकपति[26] जे विस्मित झाले, पहावया आले; ।
त्यांदेखत शिवलोकीं नेली, सुर या यशोमृतें[27] धाले[28]. ॥ ७९
गौतम म्हणे, 'नरेंद्रा[29]! हें अति आश्चर्य देखिलें, येणें ।
मी वेधलों[30], जसा बा! वेधावें मधुरतररवें[31] एणें[32]. ॥ ८०
तूं जा गोकर्णातें, तृण[33] शतहि महाबळापुढें हत्या[34], ।

---

१. नामस्मरण. २. बिल्वपूजा. ३. कसें तरी. ४. गळां पडणें=आपण होऊन आलिंगणें, बिलगणें. ५. चांगल्या भक्ताच्या घरीं. ६. निर्धास्त, शंकारहित. ७. वागेल, सेवामग्न राहील. हेंच यमक पंतांनीं शांतिपर्व७।६७व अनुशासनपर्व४।१या ठिकाणीं योजिलें आहे. **काव्यार्थापत्ति.** ८. जिची आकृति तेजस्वी आहे अशी. ९. शिवसेवकांनीं. १०. ईश्वरचरणकमलाच्या भक्तीनें पावन झालेल्यांनीं. ११. सोयरा. **क्षामयमक.** १२. तुझ्या नांवाचें अक्षर. १३. पातकांच्या पर्वतांचे शेंकडे. १४. आजानुबाहु! १५. नम्राचें मन हाच घोडा. **परंपरितरूपक.** १६. आश्चर्यकारक. १७. ईश्वराच्या करणीचा महिमा. १८. पुसून टाका. **व्यतिरेक.** १९. येथें अल्पबिल्वपत्र घेऊन परमपद देतो असें वर्णिल्यामुळें **न्यूनपरिवृत्ति** अलंकार. २०. चित्त हरण करणारें, मनोहर. २१. उत्तम चरित्र. २२. दाखवून, २३. नाशास. २४. पातकाचें भय. २५. इंद्रप्रमुख. २६. हे आठ आहेत. इंद्र, अग्नि, यम, नैरृत. वरुण, मरुत, कुबेर व ईश्वर. २७. यशरूपी अमृतानें. २८. तृप्त झाले. २९. राजा कल्मषपादा! ३०. मोहून गेलों. ३१. फार गोड गाण्यानें. ३२. हरिणानें. ३३. गवत, क्षुद्रपदार्थ. ३४. शेंकडों मनुष्यवधाचे दोष.

अत्यादर दीनाच्या अवनीं[1], प्रभुकीर्ति हे नृपा! सत्या[2].' ॥ ८१
ऐसें हित कथुनि, पुसुनि, गेला मिथिलेसि तो महाविप्र[3]. ।
गोकर्णी नृपहि तरे शिवरात्रिमहाबलार्चनें क्षिप्र[4]. ॥ ८२
'या पुण्यकथाश्रवणें[5], गानें, तरतात सर्वही प्राणी;' ।
श्रीब्रह्मोत्तरखंडीं श्रीव्यासाची असी असे वाणी. ॥ ८३

---

## अध्याय चवथा.

शिवपूजामाहात्म्यश्रवण[6] करावें सदा परम सार[7], ।
भवसागरांत[8] बुडतां, श्रीशिवपूजाचि होय पैरपार[9]. ॥ १
पूजा स्वयें करावी श्रद्धेनें, दुर्बळें पहावि तरी[10], ।
अवलोकिलीहि[11] ईश्वरपूजा अत्युत्तमा महा[12] वितरी[13]. ॥ २
अश्रद्धेनेंही जो श्रीशिवपूजा विमुक्तिदा[14] करितो, ।
किंवा विलोकितो जो, परमपदातें[15] विनिश्चयें वरितो. ॥ ३
होता किरातदेशीं राजा, नामें विमर्षण ख्यात[16], ।
मिरवी प्रताप[17] लोकीं, लीलेनें[18] मथुनियां[19] अरिव्रात[20]. ॥ ४
शठ[21], सर्वमांसभक्षक[22], मृगयारुचि[23], चपल[24], निर्दय, क्रूर, ।
तो सर्ववर्णवनितारत[25] सोडी धर्मनयपथा[26] दूर. ॥ ५
परि आळस, शिवपूजा करितां, तिळमात्रहि न मनांत धरी; ।
दोहीं चतुर्दशींत[27] प्रेमें उत्सव सदा विशेष करी. ॥ ६
त्या सर्वभक्षकाचें[28] परभार्यासेवनादि[29] जें पाप, ।
तें चिंतुनि[30] तन्महिषी[31] सद्बुद्धि[32] कुमुद्वती धरी ताप[33]. ॥ ७
एकांतीं पतिस पुसे, 'राजा! त्वच्चरित[34] चित्रें[35] मज वाटे. ।

---

१. रक्षणीं. २. खरी. ३. थोर ब्राह्मण, गौतम. ४. त्वरित. ५. पुण्यकारक कथेच्या श्रवणानें. ६. शिवपूजेच्या महिम्याचें श्रवण. ७. तत्व. ८. संसारसमुद्रांत. ९. दुसरें तीर. **परंपरितरूपक.** १०. निदान. ११. पाहिलीही. १२. अत्यंत श्रेष्ठ अशा तेजास किंवा आनंदास. १३. समर्पी. १४. मुक्ति देणारी. १५. मोक्षपदातें. १६. प्रख्यात, प्रसिद्ध. १७. पराक्रम. १८. सहज. १९. नाश करून. २०. शत्रूंचा समुदाय. २१. ठक. या अर्धांत **समुच्चय** अलंकार आहे. २२. सर्वांचें (सर्व प्राण्यांचें) मांस खाणारा. २३. शिकारीची आवड ज्याला आहे असा. २४. चंचल. २५. सर्व वर्णांच्या स्त्रियांच्या ठिकाणीं अनुरक्त. २६. धर्म व नीति यांच्या मार्गास. 'सर्वसंग्रहा' चा 'धर्ममयपथा' असा पाठ आहे. २७. शुक्ल व कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं. २८. सर्व खाणाराचें. २९. परस्त्रीभोगादिक. ३०. मनांत आणून. ३१. त्याची राणी. ३२. चांगली आहे बुद्धि जिची अशी. ३३. खेद. ३४. तुझें चरित्र. ३५. विचित्र, विलक्षण, चमत्कारिक.

दाटे चित्तीं हर्ष[१] क्षण येणें, क्षण समूळ[२] मग आटे[३]. ॥ ८
दुष्टाचरण[४] तुझें हें कोठें, कोठें महेश्वरीं भक्ती ? ।
कीं नित्य सर्वभक्षक तूं तुज परदारसेवनासक्ती[५]. ॥ ९
क्रूर सकलहिंसारत, करिसी शिवभक्ति तूं तथापि कसा ?
तुजपासुनि बुध पावे बहु काकापासुनि[६] व्यथा[७] पिकसा[८].' ॥ १०
ऐसें स्त्रीनें पुसतां, नृप करुनि विचार कौतुकें डोले, ।
सत्कारुनि राज्ञीतें, हांसुनि, तो मधुर आदरें बोले. ॥ ११
'दयिते[९]! पहिल्या जन्मीं मी होतों सारमेय[१०] पापानें, ।
हिंडें अन्नार्थ पुरीं, होउनि बहु विकळ[११] जठरतापानें[१२]. ॥ १२
शिवरात्रिमहापर्वी[१३] श्रीशिवपूजा शिवालयीं[१४] पाहें, ।
अन्नाकरितां द्वारीं, व्याकुळ होऊनि, मी उभा राहें. ॥ १३
दंडधर[१५] क्रुद्ध पुरुष माराया धांवले, तदा प्राण, ।
रक्षायासि पळालों तेथुनि, भय पावुनि; प्रिये ! जाण. ॥ १४
पुनरपि शिवालयातें आलों, करुनि[१६] प्रदक्षिण, द्वारीं; ।
दंडधरांहीं केलीं पिटुनि[१७] पुन्हा विकळें[१८] इंद्रियें सारीं. ॥ १५
तदपि प्रदक्षिण[१९] करुनि शिवमंदिर, मी पुनः पुन्हा द्वारीं, ।
बलिपिंडाद्यतिलोभें[२०] राहें, दुर्विध[२१] जसा विपद्द्वारीं[२२]. ॥ १६
कोपुनि धनुर्धरानें[२३] माझे मर्मींच[२४] हाणिले बाण, ।
गेले तत्काळ शिवद्वारीं, सांडुनि दुर्वपु[२५], प्राण. ॥ १७
शिवसन्निधिप्रभावें[२६] राजकुलीं जन्मलों, पहा जाये[२७]! ।
अत्यद्भुत भगवत्पदमहिमा[२८], वर्णावया न हा यां[२९] ये. ॥ १८
जी श्रीचतुर्दशीशिवपूजादीपावली[३०] प्रिये ! पाहें, ।

---

१. आनंद. २. सर्व. ३. सरतो. ४. **विषमा**लंकार. ५. परस्त्रीच्या उपभोगाची प्रीति. ६. कावळ्यापासून. ७. पीडा. ८. कोकिलासारखा. ९. प्रिये. १०. कुत्रा. ११. व्याकुल. १२. पोटाच्या पीडेनें, पोटाच्या आगीनें, भुकेनें. १३. शिवरात्रीच्या मोठ्या पर्वणींत. १४. शिवमंदिरांत. १५. दंड (काठी) धारण करणारे. १६. देवळाला उजवें घालून. १७. पिटाळून. १८. खिळखिळीं. १९. शिवमंदिराला उजवें घालून, शिवालयाला प्रदक्षिणा करून. २०. बलि, पिंड, इत्यादिकांच्या फार लोभानें. २१. दुर्दैव. २२. विपत्तींच्या समुदायांत. २३. धनुष्य धारण करणारानें. २४. नाजूक ठिकाणावर. २५. किळसवाणें शरीर. २६. शिवसामीप्याच्या सामर्थ्यानें. २७. स्त्रिये. २८. ईश्वरचरणांचें माहात्म्य. २९. मला. ३०. चतुर्दशीच्या दिवशीं शिवपूजेंतील दिव्यांची पंक्ति.

त्या [1]अत्यद्भुतपुण्यें [2]संप्रति [3]कालत्रयज्ञ मी आहें. ॥ १९
मी [4]सर्वभक्ष झालों आहें [5]प्राग्जन्मवासनायोगें, ।
[6]दुर्लंघ्या [7]प्रकृतीतें मोठे ज्ञातेहि मोडिती [8]भोगें. ॥ २०
यास्तव चतुर्दशींत प्रेमें मी पूजितों **शि**वाला, हें ।
जाणुनि, तूं श्रद्धेनें [9]भद्रे! पूजूनि **शि**व, [10]शिवां लाहें." ॥ २१
राज्ञी म्हणे, "नरेंद्रा! धन्यत्व असें नसेल अन्यास, ।
कीं झालासि सुपात्र ज्ञानास **शि**[11]वप्रसादजन्यास. ॥ २२
'[12]पूर्वचरित माझेंही मज, करुणा करुनि, तूं कळिव राजा! ।
त्या [13]सिद्धि तुला, **शि**[14]वपदपद्मींच्या, [15]गुरुमुखा, [16]अळिवरा! ज्या." ॥ २३
भूप म्हणे, "तुज कथितों, होतिस मागिल [17]भवीं कपोती, तें, ।
अत्यद्भुता **म**हेश्वरभक्ति, तुझें मन सदा जपो तीतें. ॥ २४
देवि! तुज कपोतीस [18]क्रव्य मिळालें वनीं, असें लक्षी, ।
त्या मांसास्तव लागे तुजमागें [19]गृध्र [20]दूरंदृक् पक्षी. ॥ २५
**श्री**शैलीं **शि**वमंदिर, त्यातें करुनि प्रदक्षिण, [21]श्रांता ।
बसलीस तूं [22]ध्वजाग्रीं [23]पललपिंडमुखी [24]भयाकुलस्वांता. ॥ २६
गृध्रें [25]खंडतरतुंडें, धांवुनि, गांठुनि, पळांत ताडून, ।
नेलें मांस, तुज तळीं त्या [26]ध्वजशिखरावरून पाडून. ॥ २७

---

१. त्या अलौकिक पुण्यानें. २. आतां. ३. भूत, वर्तमान व भविष्य काळच्या गोष्टी जाणणारा. ४. सर्व खाणारा. ५. पूर्वजन्मींच्या वासनेच्या योगानें. ६. पार जाण्यास कठीण, झिडकारण्यास अवघड. ७. पूर्वकर्मजन्य स्वभावास. ८. [त्या प्रकृतीला योग्य अशा] विषयोपभोगानें. या गीत्यर्धांतीलच कल्पना पुढील गीतावचनांत आहे:—सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ (३।३३.) 'पूर्विल संस्कारानें ज्ञानीही प्रकृतिसारखा वर्ते । भूतें वशें प्रकृतिला; काय करावें सुनिग्रहें ? पार्था !' पंतकृत गीतार्याटीका, ३।३४. ९. कल्याणिनी! हे सुशील दैवशाली स्त्रिये! १०. कल्याणाला, मंगलसुखाला. पाठभेद:—'भद्रे पूजूनि **शिवशि**वा लाहें.' ११. शिवकृपेनें उत्पन्न झालेल्यास. याचें विशेष्य 'ज्ञानास'. या अर्धांत सकाराच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** १२. पूर्वजन्मींचा वृत्तांत. येथें 'क' व 'र' यांच्या आवृत्तीमुळें **छेकानुप्रास.** १३. अपूर्व सामर्थ्यें, अतर्कशानें. १४. शिवचरणकमलींच्या. १५. गुरूच्या मुखास. १६. भृंगश्रेष्ठा! या अर्धांचा अन्वय—शिवपदपद्मींच्या अळिवरा! ज्या सिद्धि गुरुमुखा, त्या तुला (साध्य आहेत). १७. जन्मीं. १८. मांस. १९. गिधाड. २०. ज्याची दृष्टि दूरवर पोंहोचते असा. २१. थकलेली. २२. पताकेच्या टोंकावर. २३. मासाचा घांस जिच्या तोंडांत आहे अशी. २४. भयानें व्याप्त जिचें अंतःकरण आहे अशी. २५. तीक्ष्णतर चोंचींनें. २६. पताकेच्या टोंकावरून.

तूं काय? कपोतशत[1] क्षेम गृध्रासीं करावया न रेण[2][3], । 
पडतांचि शिवद्वारीं, देवि! तुज प्राप्त जाहलें मरण. ॥ २८

झालिस राजस्त्री तूं अभिमुखमरणें[4], प्रदक्षिणाक्रमणें[5]; । 
श्रमणें नको बहु तपें[6], प्रभुच्या स्मरणें चुके भवभ्रमणें[7].' ॥ २९

राज्ञी राजासि म्हणे, 'जरि हरिलें देह कालसरिदोघें[8], । 
वद सर्वज्ञा! आम्ही पावों कोणा गतीस तरि दोघें[9]?' ॥ ३०

भूप म्हणे, 'यावरि मी होइन सैंधव नृपाल, तूं धन्या । 
होसिल माझी भार्या, जो सुयशा सृंजयेश, तत्कन्या. ॥ ३१

तिसऱ्या जन्मीं होइन सौराष्ट्रेश्वर; कलिंगराजसुता । 
होसिल माझी दयिता, साध्वी, सुगुणा, समस्तसाधुनुता[10]. ॥ ३२

होइल चतुर्थ[11], पंचम, तव मम शुभ जन्म षष्ठ[12], सप्तमही[13], । 
जाऊं शिवलोकातें स्वयशें निववुनि वियोगतप्त[14] मही. ॥ ३३

ब्रह्मज्ञान अगस्त्यापासुनि पावेन सप्तमीं[15] नमनें, । 
तुजसह कल्पांतींही[16] होइन शिवभक्त तप्त[17] मी न मनें. ॥ ३४

हे शिवपूजादर्शनपुण्यें[18] सद्गति[19] पहा कुंतरियाची[20], । 
भक्तिच सुतरि[21], तदन्या[22] सुज्ञ म्हणाया न 'हा[23]!' कुंतरि[24] यांची[25].' ॥ ३५

यापरि निजपतिकथित[26] श्रवण करुनि, बहु कुमुद्वती हर्षे, । 
पूजुनि पतितें श्रीपशुपतितें[27] प्रेमाश्रु[28] ती सती वर्षे. ॥ ३६

प्रेमें चतुर्दशींत श्रीशिवपूजन करूनि, तो भूप । 
सप्तमजन्मीं झाला श्रीशिवलोकीं सदार[29] शिवरूप. ॥ ३७

१. कपोतांचा शेंकडा. २. समर्थ. ३. युद्ध. **काव्यार्थापत्ति.** ४. (शिवा)समोर मरण्यानें. ५. प्रदक्षिण जाण्यानें, प्रदक्षिणा घातल्यानें. ६. बहु तपें श्रमणें नको=निरनिराळ्या तपांनीं श्रमावयास नको. (कारण, ती तपाची यातायात केवळ निष्कारण आहे.) पाठभेदः—श्रवणें नको बहु तपें. ७. जन्माचा फेरा. हें अर्ध सुभाषित आहे. **अर्थांतरन्यास.** ८. काळरूप नदीच्या प्रवाहानें, कालक्रमानें. ९. आपण. १०. सर्व साधूंनीं स्तविलेली. ११. चौथा. १२. सहावा. १३. सातवा. मकाराच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** १४. विरहानें तापलेली. १५. सातव्यांत (सातव्या जन्मांत). १६. प्रलयकाळींही. १७. त्रासलेला. १८. शिवपूजेच्या दर्शनाच्या पुण्यानें. १९. उत्तमगति. २०. कुतऱ्याची (अर्थात् माझी). २१. उत्तम नौका. २२. तीहून अन्य. २३. हाय! हाय! २४. फुटकी नौका. २५. मागे. २६. आपल्या पतीनें सांगितलेलें. २७. श्रीशिवातें. २८. आनंदाश्रु. तकार व वकार यांच्या आवृत्तीमुळें **छेकानुप्रास.** २९. स्त्रीसह.

## अध्याय पांचवा.

शिवभक्तिलेशयुत[1] जो, धन्यतर त्रिभुवनांत[2] तो सर्व. ।
शंभुप्रसादभाजन[3] उच्चतर, तदन्य उच्चही खर्व[4]. ॥ १

शिवपूजन ज्यांत घडे, सकला दिवसांत तो दिवस महित[5], ।
संसारीं[6] आप्त दिसति बहु, परि करिती न ते शिवसम हित. ॥ २

'नर, नारी[7], षंढ[8], असो किंवा चांडाल, पुल्कस[9], प्राणी ।
तो शिवभजनें सद्योमुक्त[10];' असी व्यासमुनि वदे वाणी. ॥ ३

काय कुलें, आचारें[11]? शीलादिगुणेंहि[12] होतसे काय? ।
शिवभक्तिलवयुताचे वंद्य[13] समस्तां जनां सदा पाय. ॥ ४

जें अर्पिलें शिवाला भक्तीनें पत्र, पुष्प, फल, तोय[14], ।
श्रीब्रह्मोत्तरखंडीं श्रीव्यास म्हणे अनंत तें होय. ॥ ५

प्रीति कलत्रीं[15], पुत्रीं, वित्तीं, तैसी शिवार्चनीं करितां, ।
पावे जन सिद्धीतें, हें[16] अद्भुत काय हो! मनीं धरितां? ॥ ६

होता उज्जयिनींत क्षितिपाळक[17] चंद्रसेन या नांवें, ।
ज्यातें सुकविजनांहीं दुसरा वासव[18] असेंचि वानावें. ॥ ७

पुरंवर्तिमहाकालप्रभुची[19] पदभक्ति चंद्रसेन वरी, ।
त्यासीं पारिषदोत्तम[20] मणिभद्र बहु प्रसादसख्य[21] करी. ॥ ८

चिंतामणि मणिभद्रें दिधला त्या चंद्रसेनराजाला, ।
कौस्तुभमणिचा[22] महिमा जैसा, तैसा असे बरा ज्याला. ॥ ९

ज्याचा स्पर्श सुवर्णचि[23] उपला[24], ताम्रा[25], अया[26], करि त्रपुस[27], ।

१. शिवभक्तीच्या अल्पशा अंशानेंही युक्त. २. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या लोकांत. ३. शिवकृपेचें पात्र, ज्याला शंकर प्रसन्न झाले आहेत असा. ४. ठेंगणें. **विरोध.** ५. पूज्य. ६. **व्यतिरेक.** ७. स्त्री. ८. नपुंसक. ९. चांडालविशेष. १०. तत्कालमुक्त. ११. सदाचरणानें. १२. सुस्वभावादि गुणानेंही. १३. पूज्य. १४. उदक. १५. स्त्रीच्या ठायीं. हा शब्द स्त्रीवाचक असून नपुंसकालिंगी आहे. १६. या गोष्टीचें तुह्मांस नवल वाटतें काय, ही गोष्ट असंभवनीय समजतां काय? १७. राजा. १८. प्रतिइंद्र. हें **नीरंगरूपक.** १९. पुरांत (उज्जयनींत) असणाऱ्या महाकालेश्वराची. महाकाल हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं आहे. बारा ज्योतिर्लिंगें—सौराष्ट्रे सोमनाथं च श्रीशैले मल्लिकार्जुनं । उज्जयिन्यां महाकालं ओंकारममलेश्वरम्. ॥ १ ॥ केदारं हिमवत्पृष्ठे डाकिन्यां भीमशंकरं । वाराणस्यां तु विश्वेशं त्र्यंबकं गौतमीतटे. ॥ २ ॥ परल्यां वैजनाथं च नागेशं दारुकावने । सेतुबंधे तु रामेशं घुसृणेशं शिवालये. ॥ ३ ॥ २०. सभासदश्रेष्ठ. २१. कृपा व सख्य. २२. श्रीकृष्णाच्या कंठांतील मण्याचा. २३. सोनेंच. २४. पाषाणास. २५. तांब्यास. २६. लोखंडास. २७. कथिलास.

जो अर्थिजनासि म्हणे, 'कल्पतरूचें[2] मला चरित्र[3] पुस.' ॥ १०

परिसुनि अद्भुतगुण, पर[4] नृप, लोभ धरूनि, मागती मणितें; ।
तो हांसे परतेजा[5], भगवज्जनतेज[6] काय हो! गणितें[7]? ॥ ११

यांचीभंगें[8] झाले ते नरनायक[9] समस्तकही क्रुद्ध, ।
वेष्टुनि पुरीस[10] म्हणती, 'दे मणि[11] भेटोनि शीघ्र कीं युद्ध.' ॥ १२

मत्सरिभूपालांहीं[12] स्वपुरी सर्वत्र रोधिली[13] पाहे, ।
जाय महाकालातें शरण, स्थिर चंद्रसेन तो राहे. ॥ १३

नृप निर्विकल्प[14], निर्भय, दृढनिश्चय[15], मूळ[16] सृष्टिचें[16] अर्ची[17], ।
कीं कामाद्यरितूलीं[18] याच्या प्रोद्दाम[19] दृष्टिचे अर्ची[20]. ॥ १४

रात्रिदिन महापूजा प्रारंभी चंद्रसेन सन्महित[21], ।
जीतें विलोकितांही भावें व्हावें समस्तजन्महित[22]. ॥ १५

कोणी विधवा गोपी सहज महाकालदर्शना आली; ।
तद्बालकमति[23], पाहुनि पूजा, तत्काल शिवपरा[24] झाली. ॥ १६

तो पांचां वर्षांचा सुत मातेनें निजस्थळा[25] नेला, ।
तेणें स्वशिबिरनिकट[26] श्लक्ष्णप्रस्तर[27] शिव स्वयें केला. ॥ १७

करि कल्पित शिवपूजा तो बाळक कल्पितोपचारांहीं[28], ।
दिव्यांबरमणिकंकणकुंडलकेयूरमुकुटहारांहीं[29]. ॥ १८

प्राप्त[30] कुसुम[31], तोय, इतर गंधाक्षत, धूप, दीप जे अर्पी, ।
ते कल्पित नैवेद्यहि सत्यप्रेमामृतें[32] शिवा तर्पी[33]. ॥ १९

---

१. याचकांस. २. कल्पवृक्षाचें. ३. चरित्र पुसणें=आचरण पुसणें. कल्पतरूचें चरित्र मला पूस=तें चरित्र मी करून दाखवितों, कल्पतरूप्रमाणें माझें वर्तन उदारपणाचें आहे. **व्यतिरेक** व **लोकोक्ति**. ४. अन्य. ५. अन्यतेजास. ६. भगवद्भक्ताचें सामर्थ्य. ७. मानितें. हा भाग **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यास** आणि **प्रश्न**. ८. याचनेच्या मोडानें. ९. राजे. १०. उज्जयनीस. ११. चिंतामणि. **विकल्प**. १२. द्वेष करणाऱ्या राजांनीं. १३. अडविली, वेढिली. १४. विकाररहित. १५. ज्याचा निश्चय बळकट आहे असा. १६. सृष्टिचें मूळ=सृष्टीचें कारण, ईश्वर. १७. पूजी. १८. कामादिक (सहा) शत्रुरूप कापुसास. १९. फार वेगाचें, जोराचें. २०. तेज. २१. साधूंस मान्य. २२. सर्वांच्या जन्मांचें कल्याण. २३. तिच्या मुलाची बुद्धि. २४. शिवाच्या ठायीं तत्पर. २५. आपल्या घरास. २६. आपल्या झोंपडीच्या जवळ. २७. लहान पाषाण. २८. कल्पिलेल्या साहित्यांनीं. २९. तेजस्वी वस्त्रें, रत्नें, कडीं, कुंडलें, केयूरें, मुकुट व हार यांनीं. ३०. मिळालेलीं. ३१. फूल. ३२. खऱ्या प्रेमरूप अमृतानें. ३३. तृप्त करी. या आर्येचा अन्वय—प्राप्त कुसुम, तोय (व) इतर जे गंधाक्षत, धूप, दीप, [व] ते कल्पित नैवेद्यही अर्पी; (व) सत्यप्रेमामृतें शिवा तर्पी. अर्थः—मिळालेलीं फुलें व उदक आणि दुसरे जे गंध अक्षत, धूप, दीप, व तें मनचे (=मानसिक, कल्पित) नैवेद्यहि अर्पी, व खऱ्या प्रेमरूपी अमृतानें शिवास तृप्त करी.

पूजी पुनःपुन्हा, मग वाचे वंदी किशोरें[1] तो भावें, ।
लोभावें मानस, तें प्रेम बहु प्रेमळांत[2] शोभावें. ॥ २०

यापरि मन परमेश्वरपूजापरमोत्सवांत[3] तो लावी, ।
तों वारंवार तया तन्माता[4] भोजनार्थ बोलावी. ॥ २१

श्रवणचि न करी, यास्तव उत्तरहि नें भक्तबाळ तो ओपी[5], ।
जो पी अमृत, तया 'घे कांजी[6]' म्हणणें, तसें करी गोपी. ॥ २२

जाय न ओढुनि नेतां, कीं मन पूजासुखार्णवीं[7] बुडवी, ।
ताडुनि पूजनसह सुतकल्पित[8] शिवलिंग गोपिका उडवी. ॥ २३

जरि परम प्रेमळ, बहुमत[9], सुत, शिवभक्त, अनघ[10]; रागेली[11]; ।
आलिंगुनि द्रवावी[12], परि कठिन करूनि मन घरा गेली. ॥ २४

शिशु बहु रडे, शिवार्चन तें जेव्हां माय दे विसकटून, ।
हें न करुनि, जरि देती प्याया, म्हणता कदा विष कटू[13] न. ॥ २५

तो एकें मुहूर्तें[14] पडे मूर्च्छित, मग दृष्टि[15] उघडुनी पाहे, ।
तों रत्नप्रासादीं[16] मणिमयें[17] शिवलिंग पूजिलें आहे. ॥ २६

उठला सहसा[18] शिशु[19] तो, तें अत्यद्भुत विलोकितां भ्याला, ।
झाला मग्न बहुसुखीं, पूजामाहात्म्य समजला, धाला[20]. ॥ २७

मग भूवरि[21] दंडेसम[22] प्रभुतें वंदी, म्हणे, 'अगा! धात्या[23]! ।
अपराधा मातेच्या [24]पोटीं घालीं शता अगाधा[25] त्या. ॥ २८

शंभो! गोपी चुकली, हे स्पष्ट नव्हे तवप्रभावज्ञा[26], ।
न जळावी, जेविं जळे करुनि पतंगी दवप्रभावज्ञा[27]. ॥ २९

त्वद्भक्तिभव[28] सुकृत[29] जरि माझ्या पदरीं[30] असेल, तरि देवा! ।
माता प्रसाद पावो, अनुदिनीं[31] भावें करीन मी सेवा.' ॥ ३०

---

१. बालक. २. शुद्ध अंतःकरणी मनुष्यांत. ३. शिवपूजेच्या मोठ्या उत्सवांत. ४. त्याची आई (गोपी). ५. न दे. ६. भाताची पेज. **निदर्शना**. ७. पूजेच्या सुखसमुद्रांत. ८. पुत्रानें कल्पिलेलें. ९. फार मान्य. १०. निर्दोष. **समुच्चय.** ११. रागावली. रागावण्याचें कारण नसतां, रागावली असें वर्णिल्यामुळें **विभावना.** १२. दयेनें विरघळावी, दयेच्या पाझरानें भिजावी. १३. कडू. **अनुज्ञा.** १४. दोन घटका. १५. नेत्र. १६. रत्नांच्या राजवाड्यांत. १७. रत्नांचें. १८. एकदम. १९. बालक. २०. तृप्त झाला. २१. जमिनीवर. २२. दंडवत्, दंडाप्रमाणें, साष्टांग. २३. जग उत्पन्नकर्त्या. २४. पोटीं घालणें=क्षमा करणें. **लोकोक्ति.** २५. अमर्याद. याचें विशेष्य 'अपराधा.' २६. तुझें सामर्थ्य जाणणारी. २७. अग्नीच्या तेजाचा धिक्कार. याचें विशेष्य 'पतंगी.' **उपमा.** २८. तुझ्या भक्तीपासून उत्पत्ति ज्याची असें. २९. पुण्य. ३०. पदरीं असणें=संग्रहीं असणें. ३१. प्रत्येक दिवशीं.

ऐसें विनवुनि भावें, प्रभुतें वंदुनि पुन:पुन्हा, बाळ ।
देवालयांतुनि निघे, अस्ताचा प्राप्त होय तों काळ. ॥ ३१

स्वशिबिर जाउनि पाहे शक्रपुराधिक हिरण्यरत्नमय, ।
तेविं रचाया शकता अष्टशतेंहि न करूनि यत्न मय. ॥ ३२

त्या निज भवनीं दांतीं पर्यंकीं माय निद्रितां पाहे, ।
रत्नालंकारवती रूपें अमरी जसी, तसी आहे. ॥ ३३

तो तीस म्हणे, 'माते! ऊठ, श्रीशंकरें कृपा केली, ।
सुदशादिवस उगवला, ते कुदशातामसीनिशा गेली.' ॥ ३४

गोपी उठोनि पाहे दिव्य स्वाकार शिबिर, सुख लाहे, ।
शंभुपदीं शिर वाहे, स्तवुनि म्हणे, "निर्जजनांत शिरवा हे." ॥ ३५

स्ववपु अपूर्व, अपूर्व स्वसुत, स्वभवन अपूर्व पाहोन, ।
गोपी निमग्न परमानंदसमुद्रीं मुहूर्त राहोन. ॥ ३६

अतिहर्षें कळवी तें सर्व महाश्चर्यवृत्त पुरपतितें; ।
तें श्रवण करुनि, घ्यावें ताडुनि तापें कधीं न उर पतितें. ॥ ३७

नृप पूजानियमांतीं येउनि, मानुनि लघु स्वभावातें, ।
त्या गोपिकासुताच्या पाहे शिवतोषणप्रभावातें. ॥ ३८

मणिकनकप्रासादीं मणिमय शिवलिंग देखतां हर्षें, ।
त्या भक्तवत्सलातें नमुनि, प्रेमाश्रु भूप तो वर्षे. ॥ ३९

---

१. संध्याकाळ. २. इंद्राच्या नगरी(अमरावती)पेक्षां अधिक. **व्यतिरेक.** ३. सोनें व रत्नें यांनीं बनविलेलें. ४. आठशें. याचा संबंध 'यत्न' या शब्दाशीं. ५. मयासुर. हा शिल्पी होता, यानेंच पांडवांची मयसभा निर्मिली. **संबंधाति**शयोक्ति. ६. घरीं. ७. हस्तिदंताच्या. याचें विशेष्य 'पर्यंकीं.' ८. पलंगावर. ९. निजलेली. १०. रत्नांचे अलंकारांनीं युक्त. ११. देवस्त्री. १२. चांगली दशा हाच दिवस. **परंपरितरूपक.** १३. वाईट अवस्था हीच काळोखी रात्र. १४. सु+आकार. चांगला आकार ज्याचा आहे असें. हें शिबिराचें विशेषण. १५. **कारकदीपक.** १६. आपल्या भक्तांस. हे निजजनांत शिरवा=मला आपल्या भक्तांत लेखा. १७. आपलें शरीर. १८. नवीन. १९. आपला पुत्र. २०. आपलें घर. २१. मोठ्या आनंदरूप समुद्रांत. **अनुप्रास.** २२. मोठा आश्चर्यकारक वृत्तांत. २३. चंद्रसेनास. २४. दुःखानें. २५. पाप्यानें. या अर्धाचा अन्वय—तें (महाश्चर्यवृत्त) श्रवण करुनि पतितें कधीं[ही] तापें उर ताडुनी न घ्यावें. भावार्थ–तो मोठा आश्चर्यकारक वृत्तांत ऐकून, पापी मनुष्य पापमुक्त होईल; दुःखानें व पश्चात्तापानें छाती कुटून घेण्याचा कधींही प्रसंग येणार नाहीं. २६. पूजा आटोपल्यावर. २७. आपल्या भक्तीस. २८. शिवाला संतुष्ट करण्याच्या सामर्थ्यास. २९. रत्नें व सोनें यांच्या राजवाड्यांत. ३०. भक्ताविषयीं सदय अशास. ३१. आनंदाश्रु.

आलिंगी त्या गोपीतनुजा[1] कवि **चंद्रसेन** गहिंवरुन, ।
ओवाळुनि बहु सांडी मणिमय रविचंद्रसे[2] नगेंहि[3] वरुन. ॥ ४०
सपुरोहित[4] सामात्य[5] प्रेमें भेटुनि तया निवाला, हो! ।
नृपति म्हणे, 'बापा! तूं प्रिय[6] **गण**पतिहूनि बहु **शि**वाला हो.' ॥ ४१
वेढुनि पुरीस होते जे राजे, मत्सरी[7] तिमिरें[8] वीती, ।
ते साधु**चं**द्रसेनप्रीतिसुरभिवत्सरीति[9] मिरवीती.[10] ॥ ४२
दूतमुखें निर्वैर[11] क्षितिप[12] सकल दर्शनेच्छ[13] जाणविले,
ते साधु **चं**द्रसेनें, व्हाया जन्मुनि कृतार्थ,[14] आणविले. ॥ ४३
न्यस्तायुध[15] सर्व नृपति **श**शिसेनातें[16] करूनियां प्रणती,[17] ।
गोपीचें दिव्यालय[18] पाहुनि, 'बहु धन्य धन्य!' ते म्हणती. ॥ ४४
त्या रत्नप्रासादीं पाहुनि मणिलिंग, भक्तिनें नमुनी, ।
मानिति गोपीतनयाहुनि अधिक ज्ञानशक्तिनें[19] न मुनी. ॥ ४५
गोपसुता अनुसरले सर्व नृप नमुनि संभाजन[20] कराया, ।
**शि**वरत[21] सकळवर,[22] म्हणे अश्रेष्ठ[23] न मुनिसभा **ज**नकराया. ॥ ४६
धन, गोधनें,[24] हयें,[25] गज, रथ, वस्त्रें, रत्नें समर्पुनि प्राज्य,[26] ।
गोपकुमारासि दिलें गोपांचें भूपमंडळें[27] राज्य. ॥ ४७
तेथें **ह**नुमान् प्रगटे, वंदुनि पूजिति तयासि ते राजे, ।
गोपसुतातें प्रेमें आलिंगुनि, तो वरासनीं[28] सांजे.[29] ॥ ४८
सर्वांसि म्हणे, 'परिसा, गति **शि**वपूजेविना भवीं[30] धन्या ।

---

१. गोपीच्या मुलास. २. सूर्यचंद्रांसारखे (तेजस्वी). ३. पर्वतहि, किंवा दागिनेही. ४. उपाध्यायांसह. ५. प्रधानांसह. ६. आवडता. **व्यतिरेक.** ७. द्वेषी. ८. अज्ञान. ९. साधुचंद्रसेनाच्या प्रीतिरूप कामधेनुच्या वासराची रीत. चंद्रसेनाशीं सख्य करून त्यांनीं त्याचें प्रेम संपादिलें, हा भाव. **परं०रूपक.** १०. दाखविती. ११. शत्रुत्वरहित. १२. राजे. १३. दर्शनाची इच्छा करणारे. गीत्यर्धाचा अर्थः—सर्व राजे शत्रुत्वहीन, व चंद्रसेनाच्या भेटीविषयीं उत्सुक आहेत, असें एका दूताकरवीं कळविण्यांत आलें. १४. कृतकृत्य. १५. ज्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं आहेत, असे. १६. चंद्रसेनातें. १७. नमस्कार. १८. तेजस्वी घर. १९. ज्ञानसामर्थ्यानें. मुनींना ज्ञानशक्ति असते; परंतु त्या ज्ञानशक्तीनेंही ते त्या मुलाहून श्रेष्ठ आहेत, असें त्या राजांस वाटलें नाहीं. ज्ञानी मुनींपेक्षांही त्या मुलाचाच प्रभाव थोर होता, हा भाव. पाठभेदः— ज्ञानशक्तितें न मुनी. २०. पूजन. २१. शिवाच्या ठिकाणीं रमलेला. २२. सर्वांत श्रेष्ठ. २३. थोर नव्हे तो, हलका सलका. २४. गोरूप द्रव्य, गाई. २५. घोडे. २६. पुष्कळ. २७. राजसमुदायानें. २८. श्रेष्ठ आसनावर. २९. शोभे, थाटानें बसे. ३०. संसारीं. या गीतीचा अन्वय—(हनुमान्) सर्वांसि म्हणे, 'परिसा, सर्व पातक वारुनि जीवांसि तारावया, शिवपूजेविना भवीं अन्या धन्या गति नसे.'

जीवांसि, सर्व पातक वारुनि, तारावया नसे अन्या. ॥ ४९

पाहुनि शनिप्रदोषीं शिवपूजन, मंत्रहीन या बाळें ।
केलें, त्याचें हें फळ; शिव इतरें होय काय गोबाळें ? ॥ ५०

हा बल्लवसुत नामा श्रीकर याच्या कुळांत जो भावी, ।
तो अष्टम नंदाख्य, त्रिजगीं तत्कीर्ति फार शोभावी. ॥ ५१

कीं या पुण्यें त्याचा, ब्रह्मादिध्येय जो सदानंद, ।
श्रीकृष्ण पुत्र होइल; बहु सुख पावेल तो सदा नंद.' ॥ ५२

ऐसें सांगुनि, झाला श्रीहनुमान् गुप्त, मान्य जो शिवसा, ।
भजकांतें 'भव्यपदीं' म्हणतो ज्याचा प्रसादजोशि, 'वसा.' ॥ ५३

शिवभक्त भूप झाले, भक्तीं प्रभुचा प्रसाद पाहून, ।
गेला कांहीं काल श्रीशिवभक्तांसमीप राहून. ॥ ५४

हनुमत्प्रोक्ताचारें तो श्रीकर चंद्रसेनही युक्त ।
श्रीशिवभजनींच सदा होउनि, दोघेहि जाहले मुक्त. ॥ ५५

श्रीशंभुभक्तिवर्धन अद्भुत आख्यान हें सदा गावें, ।
श्रीरामसुतमयूरें, वंदुनि संतांसि, वर्णिलें भावें. ॥ ५६

---

## अध्याय साहावा.

श्रीशंकरप्रसादप्रणताच्या उरुभवार्णवा सुकवी, ।
सर्वप्रदोषपूजा, महातप असा नसे, वदे सुकवी. ॥ १

भगवान् प्रदोषसमयीं कैलासीं नाचतो; सुरसदात्या ।

---

१. शुभ. २. निरर्थकानें. या गीतीचा अन्वय–या बाळें (शिवपूजन) पाहुनि, मंत्रहीन शिवपूजन शनिप्रदोषीं केलें; त्याचें हें फळ. इतरें गाबाळें काय शिव होय? ३. गवळ्याचा मुलगा. ४. नांवाचा. ५. पुढें होणारा. ६. आठवा नंद नांवाचा. ७. नंदाचा. ८. ब्रह्मादिकांस ध्यान करण्याजोगा. ९. सत्+आनंद=सत्यमय व आनंदमय ब्रह्म, परब्रह्मरूप. अन्वयः–कीं (कारण) जो ब्रह्मादिध्येय सदानंद, [तो] श्रीकृष्ण या पुण्यें त्याचा (अष्टम नंदाचा) पुत्र होईल. १०. उत्तमपदीं, मोक्षपदीं. ११. कृपारूप जोशि (ज्योतिषी). हा समास चिंतनीय आहे. १२. श्रीशंकराच्या भक्तांजवळ, श्रीकर व चंद्रसेन यांजवळ. १३. मारुतीनें सांगितलेल्या आचरणानें. १४. श्रीशंभूची भक्ति वाढविणारें. १५. रामाजीपंत पराडकराचा मुलगा मोरोपंत, यानें, १६. श्रीशंकराच्या कृपेच्या ठायीं नम्र झालेल्याच्या. १७. मोठ्या संसाररूप समुद्रास. १८. आटवी, शोषी, वाळवी. १९. सर्व प्रदोषीं [केलेलें शिवाचें] पूजन. २०. मोठा उन्हाळा. २१. [भक्तांस] निर्मळ आनंद देणाऱ्या, त्या शंकरास.

स्तविति, प्रेमें वर्णिति, योगींद्रें[1] सुरर्षिही[2] सुर[3] सदा त्या. ॥ २

शिवपूजन प्रदोषीं करितां ऋण, रोग, सर्व ताप, सरे; ।
व्यापुनि सेंतां[4] शिवकृपा, जसि भा[5] शशिकांतपर्वता[6], पसरे. ॥ ३

जड[7], मंदभाग्य[8], दुर्मति, नीचहि विपदर्णवीं[9] तरे सर्व, ।
करितां प्रदोषसमयीं पूजन, होतो प्रसन्न बहु शंर्व[10]. ॥ ४

याविषईं इतिहास व्यासकथित[11], सर्व पाप वाराया ।
परम समर्थ, सुकृतनिधि[12], परिसावा आपणासि ताराया. ॥ ५

राजा विदर्भदेशीं होता प्रख्यात सत्यरथनामा[13], ।
ज्याचा गुणगण[14] रुचला[15] पुरराष्ट्रजना[16], मुलां जसा ओमा[17]. ॥ ६

बहुकाल प्रकृतींतें[18] रक्षुनि गुरुसचिवसंमतें[19] धर्में, ।
शर्म[20] देता झाला, श्रुतिविहितें[21] करुनि समुचितें[22] कर्में. ॥ ७

वेढुनि विदर्भनगरी, त्यासि रणीं शाल्व जाहला मथिता[23]. ।
अरिसीं[24] भांडत होती नगरी, परि जाहली बहु व्यथिता[25]. ॥ ८

सत्यरथाची महिषी[26] अंतर्वत्नी[27] भयाकुला[28], पुर तें ।
सोडुनि, रात्रि निघाली, [29]धैर्य तशा संकटीं कसें पुरतें ? ॥ ९

पश्चिमदिशेसि दूर श्रांता[30] साध्वी सरस्तटीं[31] गेली, ।
'हाय!' म्हणत अतितप्ता[32] वृक्षच्छायेंत[33] गर्भिणी ठेली[34]. ॥ १०

त्या स्थानीं पुत्रातें सुमुहूर्तीं[35] प्रसवली अतिश्रांता, ।
प्याया जळ जाय सरीं, कीं होती जाहली तृषाक्रांता[36]. ॥ ११

त्या राज्ञीतें सहसा ओढुनि, ने ग्राह[37] एक कासारीं[38], ।
दुःसह दुःखें आलीं भेटाया राजबाळका[39] सारीं. ॥ १२

---

१. योगिश्रेष्ठ. २. नारदही. ३. देव. ४. साधूंस. ५. प्रभा. ६. चंद्रकांतमण्याच्या पर्वतास. ७. अज्ञान. ८. दुर्दैवी. ९. विपत्तिरूप समुद्रांत. १०. शिव. ११. व्यासांनीं सांगितलेला. १२. पुण्याचा ठेवा. १३. सत्यरथ नांवाचा. १४. गुणांचा समुदाय. १५. आवडला. १६. नगरें व बाकीचा प्रांत यांतील लोकांस, नागरिकांस व जानपदांस. १७. स्तन. १८. प्रजांस. १९. गुरु व प्रधान यांस मान्य अशानें. २०. सुखें. २१. वेदांत सांगितलेलीं. २२. योग्य. २३. कुटिता, मारिता. २४. शत्रूबरोबर. २५. दुःखी. २६. पट्टराणी. २७. गर्भिणी. २८. भयानें व्याप्त. २९. अशा विलक्षण कठिण प्रसंगांत मनुष्याचें धैर्य व काटकपणा हीं कितीशीं पुरीं पडणार, हीं किती तग धरणार ? ३०. थकलेली. ३१. सरोवराच्या कांठीं. ३२. फार तापलेली. ३३. वृक्षाच्या सावलींत. ३४. बसली, टेंकली, राहिली. ३५. उत्तम मुहूर्तावर. ३६. तहानेनें व्याकुळ. ३७. सुसर. ३८. सरोवरांत. ३९. राजपुत्रास. येथें दुःखावर चेतनत्वाचा आरोप केल्यामुळें **चेतनगुणोक्ति.**

तो जातमात्र[1] गतपितृमातृक[2] पावोनि फार आबाळ[3], ।
क्षुद्विकळ[4] रडत होता, सरसतीरीं[5] करूनि 'आ'[6]बाळ. ॥ १३

तों विप्रस्त्री विधवा, वर्षाचा सुत जिचा, असी आली; ।
द्रवली उमाभिधा[7] ती, तो बाळ अनाथ[8] पाहती झाली. ॥ १४

'हा! हा! गतपितृमातृक सुंदर अच्छिन्ननाभिनाल[9] कसा! ।
शुचिकुलज[10] असें कळतें जरि, तरि परिपालितें[11] स्वबाळकसा. ॥ १५

चिंतेंत[12] भिक्षु[13] शिवसा दिवसाधिपसाच[14] ये महातेजा[15], ।
शशिमंडळासि[16] शिवती, निवती डोळे तसे पहाते ज्या. ॥ १६

श्रीभिक्षु उमेसि म्हणे, 'ब्राह्मणि[17]! संशय नसोचि, बाळा या ।
ने स्वगृहासि[18], स्तन्यें[19], अन्नेंहि स्वसुततुल्य[20] पाळाया.' ॥ १७

हित कथुनि जाय भिक्षु, स्वगृहा हर्षोनि ने कुमारा[21] हे, ।
पोषूनि एकचक्रीं[22] भिक्षान्नें[23] बाळयुग[24] उमा राहे. ॥ १८

प्रार्थुनि सद्विप्रांतें[25], समयीं[26] संस्कारें[27] ती उमा करवी. ।
दैव, उपनयन होतां, त्या दोघां भिक्षुवृत्तितें[28] धरवी. ॥ १९

बाळद्वयसहित[29] उमा विप्रा भिक्षा घरोघरीं मागे, ।
भागे बहु परि, भागा[30] आलें जें, तें करावया लागे. ॥ २०

ग्रामीं भिक्षा मागत बाळद्वययुक्त ती उमा फिरली, ।
देवनमस्कारार्थी[31] द्विजसंकीर्णी[32] शिवालयीं शिरली. ॥ २१

---

१. जन्मतांक्षणींच. २. ज्याचीं आई व बाप मरण पावलीं आहेत असा, पोरका. ३. हाल. ४. भुकेनें व्याकुळ. ५. सरोवराच्या कांठीं. ६. आ करणें=तोंड पसरणें, भोंकांड वासणें. ७. उमा नांवाची. ८. ज्याला रक्षणकर्ता नाहीं असा. ९. ज्याच्या नाभीचा नाळ कापला नाहीं असा. १०. शुद्ध कुळांत जन्मलेला. ११. पाळिला असता. १२. या काळजींत किंवा विचारांत ती पडली असतां. १३. संन्यासी. १४. सूर्यासारखाच. १५. मोठा तेजस्वी. १६. चंद्रबिंबास. **अन्वयः**–ज्या (भिक्षूस) तसे पहाते (पहाणारे) डोळे [जणूं काय] शशिमंडळास (चंद्रबिंबास) शिवती [व] निवती (गार व तृप्त होती). त्या भिक्षूचें तेज सूर्यासारखें स्पष्ट, पण चंद्रासारखें सौम्य व थंड होतें, हा गीतीचा भाव. १७. ब्राह्मणस्त्रिये! १८. आपल्या घरास. १९. अंगावरील दुधानें. २०. पोटच्या पुत्रासारखा. २१. पुत्रास. २२. ग्रामविशेषांत. २३. भिक्षेच्या अन्नानें. २४. बालकांची जोडी. २५. उत्तम ब्राह्मणांस. २६. (उपनयनाच्या) काळीं. २७. उपनयनसंस्कार, मुंजीचा विधि. २८. याचकवृत्तीला. **चेतनगुणोक्ति.** २९. बालकांच्या जोडीसह. ३०. दैवास. हा भाग **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यास.** ३१. देवाला नमस्कार करण्याची इच्छा करणारी. ३२. ब्राह्मणांनीं व्याप्त. याचें विशेष्य 'शिवालयीं.'

शांडिल्य महर्षि तया सत्यरथसुता तथाविधा[१] पाहे, ।
वाहे व्यथा[२], म्हणे, 'अति गहना प्राक्कर्मगति[३] खरी आहे. ॥ २२
या ब्राह्मणीस माता मानितसे, बंधु हा इच्या तनया; ।
म्हणतो स्ववृत्ति भिक्षा, नुमजे[४] अत्यंतदुर्गता[५] जन या.' ॥ २३
तें श्रवण करूनि, उमा शांडिल्यातें म्हणे, 'अहो! स्वामी! ।
हा बाळ भिक्षुवचनें[६] म्यां अविदितकुळहि[७] पोषिला धामीं[८]. ॥ २४
कोणे वंशीं झाला हा बाळक? कोण तात, वद, याचा? ।
याची माय कवण? बा! धीरें[९] होतो कृतार्थ सदयाचा[१०]'. ॥ २५
शांडिल्य म्हणे, 'याचा सत्यरथ विदर्भराज तो तात, ।
वधिला समरीं अरिंनीं, स्मरुनि जया साधु साश्रु[११] होतात. ॥ २६
याची सरांत[१२] माता नेली ओढूनि यमसमा[१३] ग्राहें. ।
याचें दुःख श्रोत्यां दाविल सर्वत्र तम[१४] समग्रा[१५] हें.' ॥ २७
वंदुनि उमा म्हणे, 'बा! कां मेला भोग भोगितां राजा? ।
त्याची जल पीतां कां नक्रें[१६] नेली सरोवरीं भाजा[१७]? ॥ २८
या राजसुता आली, जन्मा येतांचि, कां दशा[१८] पापा[१९]? ।
तापा[२०] या निववाया, सदुपायहि सांग वत्सला[२१]! बापा!' ॥ २९
मुनिवर्य म्हणे, 'होता पूर्वभवीं[२२] पांड्यनृप विदर्भपती, ।
करितां प्रदोषपूजन, कोलाहल[२३] ऐकिला पुरांतीं[२४]. ॥ ३०
त्यजुनि शिवार्चन नगरक्षोभाची[२५] धरुनियां मनीं शंका, ।
गेला उठोनि पांड्य क्षितिपति जोडोनियां महापंका[२६]. ॥ ३१
मंत्री[२७], धरूनि घेवुनि दारुणसामंतशत्रुला[२८], आला; ।
ऐसें समजुनि पांड्य प्रमुदित[२९] निजविजयवैभवें[३०] झाला. ॥ ३२
शत्रुशिरश्छेदातें[३१] करवुनि, शिवपूजनिं स्मृती[३२] ठेवी.

---

१. त्या प्रकारच्या (भिक्षुकवृत्तीस अनुसरलेल्या). २. खेद. ३. पूर्वकर्मांचा परिणाम. **अर्थांतरन्यास.** ४. न ओळखी. ५. फार दरिद्याला. गीति २२ व २३ मिळून **विषम.** ६. संन्याशाच्या सांगण्यावरून. ७. जातकुळी माहीत नसतांही. ८. घरीं. ९. धैर्यानें. **अर्थांतरन्यास.** १०. सकृपाच्या. हा चरण **सुभाषित** आहे. ११. अश्रुसह, दुःखी. **अनुप्रास.** १२. सरोवरांत. १३. यमासारख्या (भयंकर) मगरानें. १४. तम दाविल=मूर्च्छित करील. १५. सर्वांस. याचें विशेष्य 'श्रोत्यां.' १६. मगरानें. १७. स्त्री. १८. अवस्था. १९. वाईट. २०. दुःखास. २१. दयाळा! २२. पूर्वजन्मीं. २३. कलकलाट. २४. नगरासमीप. २५. पुरी खवळून जाण्याची. २६. मोठ्या पातकास. २७. प्रधान. २८. भयंकर मांडलिक शत्रूस. २९. आनंदित. ३०. आपल्या जयाच्या ऐश्वर्यानें. ३१. शत्रूचें शिर उडविण्याच्या कृत्याला. ३२. स्मरण.

नेमसमाप्ति न करितां, दैवें रात्रिं [१]भ्रमोनि तो जेवी. ॥ ३३

तसाचि **पां**ड्यसुतही, न करुनि पूजासमाप्ति करि, [२]भुक्ती; ।
[३]उक्ति ब्राह्मणि! [४]सत्या, 'नाहीं, केलें न भोगितां, [५]मुक्ती.' ॥ ३४

जो **पां**ड्य पूर्वजन्मीं, या जन्मीं तोचि **स**त्यरथ [६]जाला ।
अरिंनीं वधिला, नाहीं कांहीं भोगोनि भोग जों [७]धाला. ॥ ३५

[८]**पां**ड्यत्वीं होता जो, [९]**स**त्यरथत्वींच तोचि हा [१०]तनय. ।
झाला दरिद्र यापरि, [११]पूजाविघ्नेंकरून [१२]हीतनय. ॥ ३६

याची माता [१३]छद्में पूर्वभवीं [१४]निजसपत्निला मारी, ।
यास्तव नर्कें नेली या जन्मीं, [१५]दुरित तें तिचें भारी. ॥ ३७

कथिली **वि**दर्भराजप्रमुखांची म्यां [१६]प्रवृत्ति हे सर्वा; ।
प्राणी दरिद्र होती ते, जे प्रेमें न पूजिती [१७]**श**र्वा. ॥ ३८

सत्य [१८]परलोकहित जें, सार [१९]उपनिषद्रहस्य जें, वदतों. ।
**शि**वभजन [२०]असारभवीं [२१]सार, मिळे सहज मुक्तिचें पद तों. ॥ ३९

पूजिति न जे प्रदोषीं [२२]**शि**वपदपद्में, न वंदिती भावें, ।
श्रवण कथाहि न करिती, [२३]सुदरिद्र तिहीं [२४]भवीं न कां व्हावें? ॥ ४०

मर्त्य प्रदोषसमयीं पूजिति [२५]अत्यादरें **शि**वाला जे, ।
[२६]तद्विभवा अन्यविभव, बहु जेविं [२७]दिवाकरा दिवा, लाजे. ॥ ४१

[२८]**कै**लासीं निजभवनीं बसवुनि **दे**वी [२९]वरासनीं, [३०]नृत्य ।
करितो **शि**व प्रदोषीं, [३१]पार्श्वीं [३२]सुर [३३]**श**तमखादि जे [३४]भृत्य. ॥ ४२

[३५]**वा**णी [३६]वीणा, [३७]**श**तमख [३८]वेणु, [३९]**च**तुर्वदन ताल वाजवितो, ।

---

१. विसरून, चुकून. २. भोजन. ३. भाषण. ४. खरी. याचें विशेष्य 'उक्ति'. ५. मोक्ष, सुटका. **हें** अर्ध **सुभाषित** आहे. याचा अन्वय–ब्राह्मणि! केलें (कर्म) न भोगितां मुक्ति नाहीं, (ही) उक्ति सत्या आहे. ६. झालेला. 'ज्याला अरिंनीं वधिला' हा पाठभेद. ७. तृप्त झाला. ८. पांड्यपणीं. ९. सत्यरथराज असतां. १०. मुलगा. ११. पूजेच्या विघ्नामुळें. १२. नीति टाकिली आहे असा. १३. कपटानें. १४. आपल्या सवतीला. १५. पातक. १६. वृत्तांत. १७. शिवास. १८. स्वर्गलोकीं हितकारक. १९. उपनिषदाचें तात्पर्य. २०. निःसत्व संसारांत. **अर्थांतरन्यास.** २१. तत्व. २२. शिवचरणकमलें. २३. अत्यंत दरिद्री. २४. संसारांत. **प्रश्नालंकार.** २५. मोठ्या आदरानें. २६. त्यांच्या ऐश्वर्यास. २७. सूर्यास. **वाक्योपमा**. २८. कैलास पर्वतावर. २९. श्रेष्ठ आसनावर. ३०. नाचणें. ३१. बाजूस. ३२. देव. ३३. इंद्रादिक. ३४. सेवक. ३५. सरस्वती. ३६. सरस्वतीच्या वीणेचें नांव **क**च्छपी आहे. शिवस्य वीणा नालंबी, सरस्वत्यास्तु कच्छपी ॥ २८८. नारदस्य तु महती, गणानां तु प्रभावती । विश्वावसोस्तु बृहती, तुंबरोस्तु कलावती ॥ २८९. (अभिधानचिंतामणि पृ० १६). ३७. इन्द्र. ३८. पांवा. ३९. ब्रह्मदेव,

श्रीपति[1] मृदंग, गाती[2] श्री[3], रस[4] तो मुक्तितेंहि लाजवितो. ॥ ४३
गंधर्व, यक्ष, खग[5], फणि[6], विद्याधर[7], सिद्ध[7] साध्य[7], देववर[8], ।
सर्व प्रदोषकाळीं श्रीशिवपार्श्वस्थ[9] नम्र बद्धकर[10]. ॥ ४४
यास्तव शिव प्रदोषीं पूजावा हाचि आदरें एक, ।
सर्व प्रसन्न होती तरुमूलिं[11] दिला जलादिकें सेकें[12]. ॥ ४५
तव सुतहि पूर्वजन्मीं नेता झाला प्रतिग्रहेंचि[13] वयां[14], ।
उपजत[15] दरिद्र यास्तव, तारिल करितांचि भक्ति तो शिव या." ॥ ४६

---

## अध्याय सातवा.

श्रीशिवपूजाविधितें नमुनि पुसे ती उमा, तितें विप्र ।
शांडिल्य कथी[16], जेणें व्हावा शिव सुप्रसन्नधी[17] क्षिप्र[18]. ॥ १
ब्राह्मणहत्याशतही श्रीशिवपूजा अशेष[19] वारील[20]; ।
पापी शिवस्वहर्ता[21], त्या एकालाचि हें[22] न तारील. ॥ २
दोघां शिशूंसि[23] पूजाविधि तो कारुण्यतोयराशि[24] कवी, ।
व्हाया प्रसन्न सकला दीनांचा मुख्य सोयरा[25], शिकवी. ॥ ३
नमुनि उमा त्यासि म्हणे, "बा ! आले शरण हे तुला बाळ, ।
माझा पुत्र शुचिव्रत, नृपसुत हा धर्मगुप्त, यां पाळ." ॥ ४
शिवभजनमंत्रविद्या[26] त्या दोघांतें मुनींद्र[27] तो सांगे, ।
सांत्वुनि म्हणे उमेतें, 'प्रभु न करिल सेवकीं कृपा कां गे ? ॥' ५
नमुनि, प्रदक्षिण करुनि मुनिस, सबाला[28] उमा सती गेली, ।
त्यांपासुनि[29] प्रदोषीं शिवपूजा भक्तिनें तिहीं केली. ॥ ६

१. श्रीविष्णु. २. गाते. ३. लक्ष्मी. ४. भक्तिरस. **प्रतीप.** ५. पक्षी. ६. सर्प. ७. एक प्रकारचे खालच्या प्रतीचे देव. ८. देवश्रेष्ठ. ९. श्रीशंकराच्या बाजूला असणारे. १०. ज्यांनीं हात जोडले आहेत असे, सेवक. ११. वृक्षमूळावर. १२. सिंचन. मूळाला पाणी लाविलें म्हणजे सर्व झाड जसें टवटवीत होतें, तद्वत् शिवास पूजिलें असतां सर्व देव प्रसन्न होतात, हा भाव. **दृष्टांत.** १३. दान घेण्यानें. १४.आयुष्यास. १५.जन्मतांच. १६.सांगे. १७.ज्याची बुद्धि प्रसन्न आहे असा. १८. त्वरित. १९. सर्व. २०. निवारील. २१. शिवद्रव्य हरणारा. २२.शिवपूजा. २३. बालकांस. (शुचिव्रत व धर्मगुप्त यांस.) २४. दयासागर. २५. आप्त. **पर्यायोक्त.** २६. शिवभजनमंत्राची विद्या. २७. मुनिश्रेष्ठ. २८. बाळांसह. २९. तेव्हांपासून, त्या वेळेपासून.

करितां प्रदोषपूजा मास[1]चतुष्टय स[2]नष्टचर्य स[3]रे, ।
दोघांच्याहि मनांत प्रतिदि[4]वसाधिक महेशभक्ति [5]भरे. ॥ ७
द्विजसुत एके दिवशीं स्नान कराया [6]सरित्तटीं गेला, ।
तों त्या [7]आप्तधनावरी [8]भक्तधनानें प्रसाद हा केला. ॥ ८
ढांसळल्या [9]वप्राच्या [10]गर्भीं पावे नि[11]धानकुंभाला, ।
प्रभुची दृष्टि [12]क्लेशों नुरवी, [13]महिषी जशीच शुं[14]भोला. ॥ ९
आणुनि निधानपात्र स्वगृहीं, मातेसि तें निवे[15]दूनें, ।
बाळ शुचिव्रत केल्या भगवद्भजनेंहि तो निवे [16]दूनें. ॥ १०
माय म्हणे, "घ्या दोघे वांटुन [17]समभाग दे[18]वदत्तधन." ।
[19]तत्सुत म्हणे 'बरें', परि न नृपसुताचें म्हणे 'अवश्य' मन. ॥ ११
विटली उमा न [20]नृपसुतसाधुत्वें, जरिहि लं[21]घिलें शब्द; ।
[22]त्योउपरि करित असतां शिवपूजन, एक लोटला [23]अब्द. ॥ १२
द्वि[24]जनृपपुत्र वसंतीं क्रीडत होते वनांत, तों धन्या ।
दूरुनि विलोकिल्या बहु गंधर्वांच्या [25]मनोरमा कन्या. ॥ १३
विप्रसुत म्हणे, "फिरतों [26]स्त्रीसंदर्शन नव्हे उचित मातें, ।
पळविति विवेक[27], वळविति, [28]भ्रमविति यो[29] तत्क्षणीं शुचि[30]तमातें. ॥ १४
मज मुख्य होय, न मळों द्यावें [31]स्वब्रह्मचर्य, हें कार्य, ।
दर्शन परस्त्रियांचें [32]परिहरिती, जाण, धर्म हे आर्य." ॥ १५
ऐसें बोलुनि विप्र क्षिप्रचि परतोनि दूर तो राहे, ।
[33]कुतुकें जाय पुढें नृपसुत, मुख्या [34]कन्यका तया पाहे. ॥ १६
[35]पुष्पावचयच्छद्में ती सखियांतें [36]वनांतरीं धाडी; ।
एकांतीं गांठि [37]पुरुषरत्नासीं अतिवि[38]चक्षणा पाडी. ॥ १७

---

१. चार महिने. २. दुर्दैवासह. ३. संपे. **सहोक्ति.** ४. प्रत्येक दिवशीं अधिकाधिक. ५. बाणे, दृढ होई किंवा वाढे. ६. नदीतीरीं. ७. आप्त (हित करणारा जो शंकर) हेंच ज्याचें द्रव्य त्यावर. ८. भक्त हेंच द्रव्य ज्याचें त्या शंकरानें. ९. बांधाच्या किंवा भिंतीच्या. १०. पोटीं. ११. द्रव्याच्या घागरीला. १२. दुःखास. १३. म्हैस. १४. सुंभाला, दाव्याला. (?) **विभावना.** १५. सांगून. १६. संतप्त. १७. सारखें, अर्धें अर्धें. १८. देवानें दिलेलें द्रव्य. १९. उमेचा पुत्र, शुचिव्रत. २०. राजपुत्राच्या (धर्मगुप्ताच्या) चांगुलपणानें. २१. अवमानिला. २२. त्यानंतर. २३. वर्ष. २४. ब्राह्मणपुत्र व राजपुत्र. २५. मनोहर. २६. स्त्रीचें दर्शन. २७. विचार. २८. भ्रमिष्ट करितात. 'व' व 'त' यांच्या आवृत्तीमुळें **छेकानुप्रास.** २९. स्त्रिया. ३०. अत्यंत पवित्राला. हें अर्ध **सुभाषित** आहे. ३१. माझा ब्रह्मचारीपणा. ३२. टाळतात. हें अर्ध **सुभाषित** आहे. ३३. कौतुकानें. ३४. कन्या. ३५. फुलें वेंचण्याच्या मिषानें. ३६. वनांत. ३७. पुरुषश्रेष्ठाबरोबर. ३८. अतिशहाणी.

राजसुत [1]निकट येतां, दे उठुनि तयासि [2]पल्लवासन ती, ।<br>
चित्तें करी तयाला, राधा त्या जेंवि [3]बल्लवास, [4]नती. ॥ १८

आधीं कुशल, मग पुसे वृत्त तिला सर्व [5]सुज्ञराय कवी. ।<br>
[6]स्वल्पाक्षर [7]बह्वर्थ [8]स्वसकलवृत्तांत तीस आयकवी. ॥ १९

मग धर्मगुप्तहि पुसे, सांगे निजवृत्त ती असें त्या कीं, ।<br>
"द्रविडकनामा आहे गंधर्वश्रेष्ठ मत्पिता [9]नाकीं. ॥ २०

मज 'अंशुमती' म्हणती, तुजसीं, दवडूनि [10]आलि, बोलाया ।<br>
बसलें, मी [11]निजहृदया निववाया [12]त्वत्सुरूपलोला या. ॥ २१

मी [13]संगीतसुविद्या जाणतसें [14]मन्मुखाकडे [15]अमरी ।<br>
देखति [16]बहुमानी [17]गुणनिरता, [18]सौगंधिका जशा [19]भ्रमरी. ॥ २२

[20]सकळकळानिपुणा मी, [21]सर्वजनेंगित सदा मला कळतें, ।<br>
दैवें तुजसीं मजसीं [22]संगति. [23]सत्प्रेम जें, न तळमळ तें." ॥ २३

ऐसें वदे, [24]स्तनांतरवर्ती [25]मणिहार त्यासि दे हातें, ।<br>
कळवी [26]कृतसंकल्पा अंशुमती द्यावया [27]स्वदेहातें. ॥ २४

नृपपुत्र म्हणे, "झालिस सुदति ! मुद[28]तिशयवती, परि स्पष्ट ।<br>
[29]कष्टग्रस्त असें मी, [30]गतपितृमातृक, [31]नृपासनभ्रष्ट. ॥ २५

ऐसा हा [32]विगतविभव तुज योग्य वरावयासि कां गमला ? ।<br>
[33]तप्तजनें सेवावा [34]निष्पत्रच्छाय काय ? सांग मला. ॥ २६

---

१. जवळ. २. पानांचें आसन. ३. गोपास (श्रीकृष्णास). ४. नमस्कार. ५. सुज्ञश्रेष्ठ. ६. ज्यांत थोडीं अक्षरें आहेत असा. ७. ज्यांत अर्थ फार आहे असा. ८. आपलें सर्व वर्तमान. 'स्वसकलवृत्तांत तूर्ण आयकवी' असाही पाठ आहे. ९. स्वर्गांत. १०. सख्या. ११. आपल्या मनास. १२. तुझ्या सुंदर स्वरूपाविषयीं आसक्त अशा (हृदया). 'त्वत्सुरूपवोला' असा पाठभेद. १३. गाण्याची उत्तम कळा. १४. माझ्या मुखाकडे. १५. देवस्त्रिया. १६. मोठ्या अभिमानी. १७. गुणाच्या ठिकाणीं रमलेल्या. १८. या नांवाच्या सुवासिक कमळाला. १९. भ्रमरस्त्रिया. २०. सर्व कळांत प्रवीण. २१. सर्व लोकांचा आशय. २२. गांठ. २३. खरी प्रीति. 'जें खरें प्रेम, तें तळमळ (=अस्वस्थता, असमाधानाची स्थिति) न' ही प्रेमाची व्याख्या किती सुरेख आहे. **अर्थांतरन्यास.** २४. स्तनांच्या मध्यभागीं असणारा (लोंबणारा). २५. रत्नांचा हार. २६. केलेल्या निश्चयास. २७. आपल्या शरीरास. २८. अतिशय आनंदी. **यमक.** २९. दुःखांनीं व्याप्त. ३०. ज्याचीं आईबापें मरण पावलीं आहेत असा. ३१. सिंहासनास मुकलेला. **सारालंकार** व **विरुद्धगुणन्यासालंकार.** ३२. नष्टवैभव. ३३. (उन्हानें) तापलेल्या मनुष्यानें. **दृष्टांत.** ३४. ज्याची पानांची सावली नाहींशी झाली आहे असा (वृक्ष).

पितृशासन लंघाया तूं बाला पितृमती कसी उचिता ? ।
स्वच्छंदाचरणानें राहेना कुलजकीर्तिची शुचिता." ॥ २७
अंशुमती त्यासि म्हणे, "कौतुक होतें पहा कसें, आर्य ।
प्रमुदित होतिल, सत्वर सिद्धिस पावेल चिंतिलें कार्य. ॥ २८
प्रातःकाळीं येथें यावें त्वां म्यांहि विहितसंकेतें, ।
स्वछंदाचरणाच्या चित्तांतुनि दूर करुनि शंकेतें." ॥ २९
ऐसें सांगुनि गेली गंधर्वसुता स्वतातसदनातें; ।
नृपसुत शुचिव्रतातें कळवी वृत्त प्रसन्नवदनातें. ॥ ३०
त्या वृत्तें धात्रीतें सुखवुनि, दुसरे दिनीं तया स्थानीं ।
नृपसुत शुचिव्रतासह जाय, धरुनि ती वरांगना ध्यानीं. ॥ ३१
गंधर्वेश्वरसहिता अंशुमती तेथ देखिली हो ! ती, ।
जी व्यक्त हृदयफलकीं प्रथम पहातांचि रेखिली होती. ॥ ३२
गंधर्वेश्वर सुखवुनि दोघांतें उत्तमासनीं स्थापी, ।
राजसुतासि म्हणे, "त्रा ! कर्णाहीं वाक्सुधारसा या पी. ॥ ३३
नृपपुत्रा ! कैलासीं पूर्वदिनीं शंभुदास हों गेला, ।
केला प्रसादपात्र प्रभुनें, वंदन करूनि, जों ठेला. ॥ ३४
'गंधर्वेंद्रा ! क्षितिवरि नृपनंदन धर्मगुप्त या नांवें, ।
मद्भजनीं तत्प्रेम, ध्रुवशिशुचें जेविं, तेविं वानावें. ॥ ३५
गतपितृमातृक, अरिहृतराज्य, अकिंचन सदा मला भजतो, ।
तत्पितर मुक्त झाले, परिपाल्य प्रियतनूजसा मज तो. ॥ ३६
तत्साहाय्य करीं, तो मर्दुनि सकला अरींस हो राजा, ।

---

१. वडिलांचा अधिकार. २. तरुणी. ३. वडिलांनीं युक्त. ४. स्वैरवर्तनानें. ५. कुलीन मनुष्याच्या कीर्तीची. ६. पवित्रपणा. **अर्थांतरन्यास.** हें अर्ध **सुभाषित** आहे. ७. वडील. ८. ठरलेल्या बेताप्रमाणें. ९. अंशुमती. १०. आपल्या बापाच्या घरास. ११. वृत्तांत. १२. ज्याचें तोंड आनंदी आहे अशातें. याचें विशेष्य 'शुचिव्रतातें.' १३. दाईस (उमेस). १४. दिवशीं. १५. उत्तम स्त्री. १६. चित्तीं. १७. गंधर्वराजा(द्रविडका)सहित. १८. स्पष्ट, ठसठशीत. १९. हृदयरूपी फळ्यावर. २०. चितारली. २१. बसवी. २२. वाणीरूप अमृतरसास. **निरंगरूपक.** २३. मी. २४. कृपेस योग्य. २५. पृथ्वीवर. २६. उत्तानपादराजाचा मुलगा ध्रुव. याचें चित्त परमेश्वराचे ठिकाणीं इतकें जडलें होतें, कीं त्याच्या आईबापांसहि त्यापासून तें परावृत्त करितां आलें नाहीं. २७. शत्रूंनीं ज्याचें राज्य जिंकिलें असा. २८. दरिद्री. २९. पाळण्यास योग्य. ३०. आवडत्या पुत्रासारखा. ३१. नाशून. ३२. होवो.

जयदा[1] माझी आज्ञा, अधिक नसे या परीस होरो[2], जा.' ॥ ३७
ऐसी आज्ञा होतां, मी नमुनि त्रिपुरकामकदनातें[3], ।
कैलासाहुनि आलों त्वत्कार्योत्कंठित[4] स्वसदनातें. ॥ ३८
तों या कन्येनेंही केली मत्प्रार्थना पुरुषरत्ना[5] ! ।
देतों मी हे[6] आधीं, मग राज्यश्री[7] तुला करुनि यत्ना. ॥ ३९
स्वपुरीं अंशुमतीसीं वर्षायुत[8] भोग भोगुनि प्राज्य[9], ।
श्रीशिवलोकीं वससी[10] धर्मन्यायें करूनि तूं राज्य." ॥ ४०
यापरि बोलुनि विधिनें दे हा गंधर्वराज कन्या या, ।
धन्या यागादि महाधर्म जसा चित्तशुद्धि[11] सन्याया[12]. ॥ ४१
चंद्रप्रभ[13] चूडामणि[13], मुक्तामणिहार[14], वरें अलंकार[15] ।
सारस्वर्णपरिच्छद[16], दे दिव्यें[17] अंबरें[18] तया फार. ॥ ४२
गज अयुत[19], नियुत[20] वाजी[21], कांचनरथ[22] बहु सहस्र दे त्यातें, ।
दिव्य स्यंदनहि[23] दिला; पात्रार्पित[24] बहु गमे न देत्यातें[25]. ॥ ४३
शक्रायुधसम[26] कार्मुक[27], शस्त्रास्त्रें बहु सहस्र, जे भाते ।
पूर्ण, शराभेद्यकवच[28] दे, शक्तिहि जे धरी महेभातें[29]. ॥ ४४
दिधल्या सहस्र कन्या निजदुहितेची[30] करावया सेवा, ।
देउनि विविध[31] धन म्हणे तो, "पावो हें महेश्वरा देवा." ॥ ४५
तत्साहित्य[32] कराया दिधलें गंधर्वसैन्य चतुरंग[33]; ।

---

१. जय देणारी. २. मुहूर्त. ३. त्रिपुरें व मदन यांच्या नाशकर्त्यास (शंकरास). ४. तुझ्या कार्याविषयीं उत्सुक. ५. पुरुषश्रेष्ठा. ६. ही कन्या. ७. राज्यलक्ष्मी. ८. हजार वर्षें. ९. पुष्कळ. १०. वसशील. वर्तमानकाळी रूप भविष्यकाळीं योजिलें आहे. ११. चित्ताची पावनता. १२. न्यायासह. याचें विशेष्य 'चित्तशुद्धि.' अन्वय:—यापरि बोलुनि हा गंधर्वराज या [मुलाला] विधिनें (यथाविधीनें, विवाहसंस्कारानें) कन्या दे, जसा यज्ञयागादि महाधर्म धन्या [मनुष्याला] सन्याया चित्तशुद्धि [दे=देतो]. १३. चंद्रासारखी कांति आहे ज्याची असा शिरोमणि. १४. मोत्यें व रत्नें यांचे हार. १५. उत्तम अलंकार. १६. चोख सोन्याचें ज्यांला कोंदण आहे असे. १७. सुंदर. १८. वस्त्रें. १९. दहा हजार. २०. दहा लक्ष. २१. घोडे. २२. सोन्याचे रथ. २३. रथ. २४. योग्य मनुष्यास दिलेलें. २५. देणाराला. हा चरण **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यास.** २६. इंद्रधनुष्यासारखें. २७. धनुष्य. २८. शरांनीं न फाटणारें चिलखत. २९. महा+इभातें=मोठ्या हत्तीस. पाठभेद:—महें भातें. ३०. आपल्या कन्येची. ३१. पुष्कळ प्रकारचें. ३२. राजपुत्राचें साह्य. ३३. चार प्रकारचें. गजदळ, घोडदळ, रथदळ व पायदळ. याचें विशेष्य 'गंधर्वसैन्य.'

[1]वश असतां [2]वेगळिता तो [3]सागरज [4]ने महेभ, [5]ने तुरंग. ॥ ४६

शिवभक्तनृपसुतासीं लावुनि [6]सुखकीर्तिकारि नव नातें, ।
बसुनि विमानीं गेला तो **गंधर्वेश्वर** [7]स्वभवनातें. ॥ ४७

प्रमुदित **शिवप्रसादें** झाला तो **धर्मगुप्त**, मग अरिला ।
मारुनि [8]निजपद साधी, जो [9]कीर्तिश्री तिहीं [10]सुचिर वरिला. ॥ ४८

करितां राज्य स्वपुरीं, स्वसमचि केला **शुचिव्रत** भ्राता. ।
मातासीच **उमा** ती हर्षविली, जी हरि [11]श्रमव्राता. ॥ ४९

श्री**शंभु**तें प्रदोषीं [12]आराधुनि, **धर्मगुप्त** तो तरला; ।
अन्यहि तरेल यापरि, **शिव**भजनीं पळहि मति न हो [13]तरला. ॥ ५०

आराधिला प्रदोषीं श्री**शिव** होऊनि सादर जनांहीं, ।
त्याचें [14]करितें स्पर्शुनि [15]जगदघ तत्काळ [16]पादरज नाहीं. ॥ ५१

हे सत्कथा [17]यथामति **रामसुतें** लिहुनि, वाहिली देवा; ।
**प्रभुचा** प्रसाद व्हाया बुध म्हणती, 'हेचि बहु बरी सेवा.' ॥ ५२

---

## अध्याय आठवा.

श्री**शिव**पूजा नियमें [18]संतत जी **सोम**वासरीं केली, ।
ती तप्त जीवातें निवविति, जैसी [19]सुधारसीं [20]भेली. ॥ १

[21]वटु, कीं गृहस्थ, [22]नारी, [23]सधवा, विधवा, [24]कुमारिका तरती; ।
[25]संसारताप सर्वहि [26]**सो**शिवासरकृत **शिवा**र्चनें सरती. ॥ २

[27]**आर्या**वर्तीं होता [28]श्री**हरिहर**भक्त, साधु, [29]भूभर्ता, ।

१. स्वाधीन. २.न वगळता, देता. ३. समुद्रमंथनसमयीं समुद्रापासून उत्पन्न झालेला. ४. मोठा हत्ती, ऐरावत. ५. उच्चैःश्रवा नांवाचा घोडा. हा सात मुखांचा होता. समुद्रमंथनाच्या वेळीं चौदा रत्नें निघालीं तीं—लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चंद्रमाः । गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवांगनाः ॥ अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधेः । रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्वन्तु वो मंगलम् ॥ १ ॥ **अनुमान.** ६. सुख व कीर्ति करणारें. ७. आपल्या **गृहास.** ८. आपलें स्थान, राज्यपद. ९. कीर्ति व लक्ष्मी. येथें कीर्ति व श्री ह्यांवर चेतनत्वाचा आरोप केल्यामुळें **चेतनगुणोक्ति.** १०. फार काळ, निरंतर. ११. श्रमांच्या समूहास. १२. **पूजून.** १३. चंचल. १४.नाहीं करितें=नाशितें. १५.जगाचें पातक. १६. पायधूळ. या अर्धाचा **अन्वय**—त्याचें पादरज स्पर्शुनि जगदघ तत्काळ नाहीं करितें. १७. बुद्ध्यनुरूप. १८. सदैव. १९. **अमृतांत.** २०. गुळाचा खडा. २१. ब्रह्मचारी. २२. स्त्री. २३. सुवासिनी. २४. कन्या. २५. संसारदुःख. २६. सोमवारीं केलेल्या शिवपूजेनें. २७. हिमालय व विंध्य यांच्या मधील **प्रदेशीं.** २८. श्रीविष्णु व शिव यांचा भक्त. २९. पृथ्वीपति, राजा.

प्रख्यांत 'चित्रवर्मा' या नामें [१]शत्रुसंपदाहर्ता. ॥ ३
[२]सुतरत्नातें पावे, परि तो संतत म्हणे, 'मला धन्या, ।
कन्या व्हावी, देवा! या संसारीं [३]स्पृहा नसे अन्या.' ॥ ४

श्रीहरिहरप्रसादें झाली [४]चिरचिंतिता, [५]अपातनया, ।
[६]ब्राह्मणपूजनसक्ता, [७]हरिहरभक्ता, तया नृपा तनया. ॥ ५

[८]हिमगिरि जसा उमेतें, हर्षे पावोनि भूप मुलगीतें; ।
कन्यारत्नेंहि निवे, [९]साधु यशें जेविं [१०]साधुकुलगीतें. ॥ ६
[११]संस्कार करुनि, ठेवी तीचें सीमंतिनी असें नाम, ।
त्याच्या होता कन्यादानाचा मानसीं महाकाम. ॥ ७
एके दिवशीं राजा द्विज [१२]जातकलक्षणज्ञ आणून, ।
त्यातें पुसे, 'मुलीचें सांगा स्वामी! भविष्य [१३]जाणून'. ॥ ८
एक [१४]बहुज्ञ मुनि म्हणे, 'नामें सीमंतिनी तुझी कन्या, ।
[१५]मंगलवती उमाजसि, दमयंतीतेविं [१६]रूपिणी धन्या. ॥ ९
होइल [१७]सुकलाभिज्ञा हे [१८]साक्षात् [१९]भारतीतसी [२०]दुहिता, ।
लक्ष्मीतसी [२१]महागुणगणसंपन्ना [२२]कुलद्वयेंदुहिता. ॥ १०
अदितितसि [२३]सुप्रजा हे, [२४]संततेंहि [२५]धृतव्रता जसी सीता, ।
[२६]रविरुचितसि प्रकाशें [२७]चित्तहरी, [२८]चंद्रिकातसी [२९]सीतां. ॥ ११
नांदेल अयुतवर्षें पतिसह, होतील सुत इला [३०]अष्ट, ।
कष्ट [३१]प्रेक्षील न हे कन्या, पावेल बहु सुख स्पष्ट.' ॥ १२
ऐसें ऐकुनि राजा, दे वस्त्रें, भूषणें, [३२]विपुल [३३]वित्तें, ।
पूजी सद्विप्रातें वंदुनि अत्यादरें [३४]मुदितचित्तें. ॥ १३

---

१. शत्रूची संपत्ति हरण करणारा. २. उत्तम पुत्रातें. ३. इच्छा. ४. पुष्कळ काळ इच्छिलेली. ५. जिनें नीति टाकिली नाहीं अशी. ६. ब्राह्मणपूजेच्या ठायीं आसक्त. ७. विष्णु व शिव यांची दासी. ८. हिमालय पर्वत. ९. सज्जन. १०. साधूंच्या समूहानें स्तविलेलें. याचें विशेष्य 'यशें.' ११. (जन्माचा) विधि. १२. ज्योतिर्गणितानें लक्षण जाणणारा. १३. विचार करून. १४. मोठा ज्ञाता. १५. कल्याणी, शुभलक्षणा. १६. रूपवती. १७. चांगल्या कला जाणणारी. १८. मूर्तिमंत. १९. सरस्वती-सारखी. २०. कन्या. २१. मोठ्या गुणांच्या समुदायानें युक्त. २२. आपलें व बापाचें कुळ हाच चंद्र त्यांचें हित करणारी. २३. चांगली संतति आहे जिची अशी. २४. सदैव. २५. जिनें [पतिसेवेचें] व्रत धारण केलें आहे अशी. २६. सूर्याच्या कांतीसारखी. २७. मनोहर. २८. चांदण्याप्रमाणें. २९. थंड. गीति ९।१०।११ यांत अनेक सुंदर **उपमा** आहेत. ३०. आठ. ३१. पाहील. ३२. फार. ३३. द्रव्यें. ३४. आनंदित मनानें.

अन्य मुनि म्हणे, 'राजा! न्हाया कर्णासि हर्षच, वदावें; ।
परि विधवा होइल हे, होतांचि प्राप्त वर्ष चवदावें.' ॥ १४
तें ऐकुनि नृप झाला चिंताव्याकुल[1] मुहूर्त[2], तो भ्याला. ।
त्या मोही[3] कन्येचा घात, श्रीचा[4] जसाचि लोभ्याला. ॥ १५
विप्रातें विप्रानुग[5] तो राजा नमुनि दे निरोपातें[6], ।
ते वदले, 'हा ब्राह्मणभक्त न[7] चिंतार्णवीं[9] विरो[8] पातें[10].' ॥ १६
सर्वहि दैववश[11], असें मानुनि निश्चित[12] भूप तो होय. ।
तापे बहुत, परि निवे सुज्ञाचें हृदय तें, जसें तोय[13]. ॥ १७
परिसुनि निजवैधव्य स्वसखीवदनें[14], विशैशवा[15] बाला[16] ।
बोलाया लागे ती, लावी तो दोष आपुल्या भाला[17]. ॥ १८
पावुनि निर्वेद[18] तिणें, जावुनियां शरण विनविली आर्या[19] ।
श्रीयाज्ञवल्क्य मुनिची श्रीमैत्रेयी महासती[20] भार्या[21]. ॥ १९
"माते! सांगावें मज, जेणें सौभाग्यवृद्धि, तें कर्म; ।
धर्मज्ञे! उपदेशुनि हित या निजकन्यकेसि[22] दे शर्म[23]." ॥ २०
**सी**मंतिनी असें जों, चरणीं घालुनियां मिठी, वदली; ।
पदलीनेवरि[24] करुणाकर्पूराची[25] द्रवे सती कदली[26]. ॥ २१
**मैत्रेयी** तीस म्हणे, "जा **शिवयुक्तां**बिकेसि[27] तूं शरण, ।
श्री**गौरी**हर[28]पूजा **श**शिवारीं[29], नित्य करित जा स्मरण. ॥ २२
प्रातःस्नान उपोषण करुनि, पुन्हा स्नान विरज[30] वस्त्र धरीं, ।
मौन वरीं[31], **शिव**पूजा, होउनि निश्चलविशुद्धबुद्धि[32], करीं. ॥ २३
करुनि **ब्राह्मण**भोजन, मग आपण शेष[33] अन्न भक्षावें, ।

---

१. चिंतेनें व्याकुल. २. दोन घटका. ३. मूर्च्छित करी. ४. संपत्तीचा. ५. ब्राह्मणांचा सेवक. ६. निरोप देणें=जाण्यास मोकळीक देणें. ७. चित्रवर्मा. ८. न विरो=नाश न पावो. ९. चिंतारूप समुद्रांत. १०. पतनानें. ११. दैवाचे आधीन. **अर्थांतरन्यास**. स० सं०चा 'दैवयश' असा पाठ आहे. १२. निष्काळजी. १३. उदक. हें उत्तरार्ध **सुभाषित** आहे. १४. आपल्या मैत्रिणीच्या मुखानें. १५. जिचें बाळपण सरलें आहे अशी. १६. तरुणी. १७. कपाळास, दैवास. १८. खेद. १९. श्रेष्ठा. २०. मोठी पतिव्रता. २१. स्त्री. २२. आपल्या मुलीस. २३. सुख. २४. पायीं नम्र झालेलीवर. २५. दयारूप कापराची. २६. केळ. या गीतींत पूर्वार्धांत 'सीमंतिनी असें जें' असा स० सं० चा पाठ आहे. २७. शिवयुक्त पार्वतीस. २८. श्रीपार्वती व शिव यांची पूजा. २९. सोमवारीं. ३०. स्वच्छ. ३१. स्वीकार. ३२. स्थिर व पवित्र बुद्धि आहे जिची अशी. ३३. उरलेलें.

सांब प्रसन्न होइल, सुव्रत हें बहु जपोनि रक्षावें. ॥ २४

पापक्षय[1] अभिषेकें, साम्राज्यहि पीठपूजनें[2] लाहे[3], ।
सौभाग्य सर्व सौख्यहि गंधाक्षतमाल्य[4] अर्पितां आहे. ॥ २५

धूपें सौगंध्य[5] मिळे, दीपानें कांति, जे महाभोग[6], ।
ते नैवेद्यें मिळती; श्रीशिवपूजाअसा नसे योग. ॥ २६

तांबूलार्चनदानें[7], लक्ष्मीधर्मार्थमोक्ष[8] जे काय, ।
त्यांचें साधन; वत्से ! वंदावे सांबमूर्तिचे[9] पाय. ॥ २७

पंचाक्षरजप साधक[10], अष्टैश्वर्यादि[11] सिद्धि ज्या, यांचा; ।
होय मनोहर[12] भर्ता[12], त्या कामसमृद्धिरूप[13] जायांचा. ॥ २८

वत्से[14] ! सर्वसुरांतें[15] होतो बहु विप्रभोजनें तोष[16]; ।
नासेचि सोमवारीं सर्व श्रीसोमपूजनें[17] दोष. ॥ २९

शिवपूजनप्रभावें[18] तरसिल भवसिंधु[19], शक्य[20] जें मुलिनीं[20], ।
तें कथिलें[20], सिद्धि सदा लोळति भवभक्तिसुरसरित्पुलिनीं[21]." ॥ ३०

यापरि सत्युपदेशें[22] नृपजा[23] करि सांबपूजनारंभा[24], ।
ज्याची[25] स्मृतिहि[26] अलभ्या[27] दुर्दैवां[28], भूजनां[29] जसी रंभा[30]. ॥ ३१

पुण्यश्लोकनळाचा[31] सुत[32], नामें इंद्रसेन, तत्तनय[33] ।
चंद्रांगद आल्हादप्रद[34] जो सर्वांसि, जेविं दत्तनय[35]. ॥ ३२

---

१. पातकाचा नाश. २. आसनाच्या पूजनानें. ३. मिळतें. ४. गंध, अक्षता व पुष्प. ५. सुगंध. ६. मोठे ऐषआरामाचे विषय. ७. तांबूलपूजा अर्पिण्यानें. ८. संपत्ति, धर्म, इष्ट वस्तू व मुक्ति. ९. शिवमूर्तीचे. १०. पंचाक्षर मंत्राचा जप करणारा. ११. आठ ऐश्वर्यादि (सिद्धि). यांचीं नांवें:—अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा । प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्टसिद्धयः ॥ १ ॥ १२. पति. स० सं० चा '**ह्रोम** मनोहर भर्ता' असा पाठ आहे. १३. मनोरथांच्या पूर्ति याच स्त्रिया त्यांचा. १४. मुली. १५. सर्व देवांस. १६. संतोष. १७. श्रीशिवाच्या पूजेनें. १८. शिवपूजेच्या सामर्थ्यानें. १९. संसारसमुद्र. २०. मुलींनीं जें शक्य तें कथिलें म्हणजे मुलींना जें कांहीं करितां येण्याजोगें तें मीं तुला सांगितलें. २१. शिवभक्तिरूप गंगानदीच्या वाळवंटांत. **निरंगरूपक.** २२. पतिव्रतेच्या (मैत्रेयीच्या) उपदेशानें. २३. राजकन्या, सीमंतिनी. २४. शिवपूजेच्या आरंभास. २५. ज्या सांबपूजाप्रारंभाची. २६. स्मरणहि. २७. दुर्लभ. २८. हतभाग्यांस. २९. पृथ्वीवरील लोकांस. ३०. रंभा नांवाची अप्सरा. उर्वशी, मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा इत्यादि प्रमुख अप्सरा आहेत. ३१. पुण्य आहे श्लोक (कीर्ति) ज्याचा, असा नळ त्याचा. पुण्यश्लोक राजे पुढील श्लोकांत सांगितले आहेत—पुण्यश्लोको नलो राजा, पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोकश्च वैदेहिः, पुण्यश्लोको जनार्दनः ॥ १ ॥ ३२. पुत्र. ३३. त्याचा मुलगा. ३४. आनंद देणारा. ३५. दत्ताची नीति.

तो भूप **चित्र**वर्मा दे ती **सी**मंतिनी निजा तनया[1] ।
अनयाधर्मपराङ्मुखचित्ता[2] बहु मानिती महाजन[3] या. ॥ ३३
त्या उत्सवांत झालें सुख बहुतचि सर्वभूपसमवाया[4], ।
कवि म्हणति, '**रति**स्मर[5] ते अवतरले[6] लोकदृष्टि[7] रमवाया.' ॥ ३४
तो **चंद्रां**गद कांहीं काळ निजश्वशुरमंदिरीं[8] राहे, ।
आधी[9] विश्वासहि ती बाळा **सी**मंतिनी मनीं वाहे. ॥ ३५
तरिवरि[10] चढुनि क्रीडे[11] **य**मुनेंत, सजुनि मित्रवर्गातें[12], ।
नौकेसहित बुडे तो, निंदाया जडजनांत[13] भगतें[14]. ॥ ३६
असुगणचि[15] तो बुडाला सहसा सहचित्रवर्मलोकांचा[16], ।
कवि म्हणति, 'सार्वभौमचि झाला हा शोक सर्व क्लेशांचा[17].' ॥ ३७
त्या वार्तेनें[18] मूर्च्छित पडली **सी**मंतिनी, जसी कदली[19]. ।
माता, सखियाहि तिच्या, किंबहुना 'हां[20]' असें पुरी वदली. ॥ ३८
तो **इंद्र**सेन ऐकुनि पुत्राची परमदुःसहा[21] वार्ता, ।
रडला, मूर्च्छित पडला; बहुशोकें होय तत्पुरी आर्ता[22]. ॥ ३९
कन्येसि **चित्र**वर्मा नानायत्नेंकरूनि समजावी, ।
गुरुसंकोचें[23] न रडे, कैसी लंघूनि शोकतम[24] जावी. ॥ ४०
राजा जामाताची[25] प्रार्थुनि तद्बांधव[26], क्रिया करवी, ।

---

१. मुलगी. २. अनीति व अधर्म यांपासून परावृत्त झालें आहे मन ज्याचें त्यास. ३. मोठे लोक, शिष्ट. ४. सर्व राजांच्या समुदायास. ५. रतिमदन. ६. जन्मले. **रूपकातिशयोक्ति.** ७. लोकांचे डोळे. ८. आपल्या सासऱ्याच्या वाड्यांत, सासुरवाडीस. ९. काळजी. या अर्धाचा अन्वयार्थ—ती बाळा सीमंतिनी मनीं आधी (व) विश्वासहि वाहे. अर्थ—त्या तरुण सीमंतिनीला (आपल्या सौभाग्याविषयीं) काळजी वाटत होती व (शिवयुक्त अंबिकेचें व्रत करीत असल्यामुळें आपलें सौभाग्य चिरकाल टिकेल) असा विश्वासही वाटत होता. म्हणजे काळजीनें व विश्वासानें तिचें चित्त अस्थिर झालें होतें. १०. नौकेवर. ११. क्रीडा करिता झाला. १२. मित्रमंडळीतें. १३. अज्ञान लोकांत. १४. शिवास. १५. प्राणांचा समुदायच. **व्यंग्यापह्नुति.** १६. चित्रवर्म्यासह लोकांचा. १७. सर्व दुःखांचा. अन्वयः—हा [पुत्रमरणाचा] शोक सर्व क्लेशांचा (दुःखांचा) सार्वभौमचि (राजाच) झाला. हा शोक अत्यंत जहाल व दुःखकर होय, हा भाव. येथें 'र्व' ह्या अक्षरापुढें 'क्ले' हें जोडाक्षर आल्यामुळें 'र्व' ह्यास दीर्घत्व येतें, यामुळें येथें **छंदोभंग** झाला आहे. १८. वृत्तांतानें. १९ केळ. २०. हाय! पुरी 'हा' असें वदली म्हणजे चित्रवर्म्याच्या राजधानींतील लोकांस दुःख झालें. २१ फार असह्य. २२. दुःखी. २३. वडिलांच्या भिडेनें. २४. शोकरूप अंधार. २५. जांवयाची (चंद्रांगदाची). २६. त्याचे आप्त.

सीमंतिनी शिवार्चा[1] तैशा शोकींहि चालवी बरवी. ॥ ४१
त्या दुःसहसुतशोकें[2] सर्वहि होता प्रताप[3] तो हरिला, ।
नृप इंद्रसेन सहसा दायादांनीं[4] सदारही[5] धरिला. ॥ ४२
त्यातें देते झाले[6] दायाद, करूनि बंध, कारातें[6], ।
वदले साधु, 'उपेक्षा[7] कैसी करितोसि ? अंधकारातें[8]!' ॥ ४३
यमुनाजळीं बुडाला चंद्रांगद जो, तयासि पाहून, ।
घेउनि गेल्या उरगी[9] पाताळीं हारतेविं वाहून. ॥ ४४
देवेश्वरमंदिरसें[10] कांचनमणिरचित[11] नागपुर[12] पाहे, ।
तो जोडुनि हस्त उभा सर्पेश्वरतक्षकापुढें[13] राहे. ॥ ४५
'आला कुमार कोठुनि ? कोणाचा कोण हा?' असें भर्ता[14] ।
सर्पांचा[14] तक्षक तो पुसता झाला स्वयें कृपाकर्ता[15]. ॥ ४६
उरगी वदल्या, 'निजपदपदकापासूनि[16] सुमणि[17] हा ढळला[18], ।
क्रीडा करितां आम्हां कालिंदीच्या[19] जळांत आंढळला[20].' ॥ ४७
'कुळनाम[21] सांग', ऐसें अभयद[22] फणिपाळ[23] तक्षक विचारी; ।
त्यातें स्ववृत्त[24], मौक्तिकें[25] जैसें हंसासि, दक्ष[26] कवि चोरी[27]. ॥ ४८
"पुण्यश्लोक[28] निषधपति[29] नळ, तत्सुत इंद्रसेन या नांवें, ।
तत्सुत चंद्रांगद मी, त्वांही धर्में तसेंचि मानावें[30]. ॥ ४९
क्रीडा करितां झालों[31] यमुनानीरांत[32] मग्न, परि[33] साचें ।
आलें धन्यत्व, तुझें देणें लोहासि[34] जेविं परिसाचें. ॥ ५०
पुसिलें मद्वृत्त[35] मज, श्रवणहि तें सांग[36] तों स्वयें केलें, ।
झालों धन्यचि; दुःख न कोणाचें महदनुग्रहें[37] गेलें?" ॥ ५१

---

१. शिवपूजा. २. असह्य पुत्रशोकानें. ३. पराक्रम. ४. भाऊबंदांनीं. ५. स्त्रीसह. ६. कारातें देते झाले म्हणजे बंदिशाळेंत टाकिते झाले. ७. हयगय. ८. अंधकासुराच्या शत्रो ! शिवा ! ९. नागस्त्रिया. १०. इंद्राच्या वाड्यासारखें. ११. सोनें व रत्नें यांनीं बांधलेलें. १२. सर्पांचें नगर. १३. सर्पांचा स्वामी तक्षक, त्यापुढें. १४. सापांचा राजा. १५. कृपा करणारा. १६. आपलें स्थान जें पदक त्यापासून. १७. उत्तम रत्न. १८. गळलेला, सुटलेला. याचें विशेष्य 'सुमणि.' **रूपकातिशयोक्ति.** १९. यमुनेच्या. २०. सांपडला. २१. वंशाचें नांव. २२. धीर देणारा. २३. सर्पांचा राजा. २४. आपला वृत्तांत. २५. मोतीं. २६. चतुर. २७. भरवी. २८. पुण्य आहे श्लोक (कीर्ति) ज्याची तो. २९. निषधराज. ३०. त्वांही धर्में तसेंच मानावें म्हणजे तूंही धर्मानें पुत्रासारखेंच मानावें. ३१. मग्न झालों=बुडालों. ३२. यमुनेच्या जळांत. ३३. परंतु. ३४. लोखंडास. ३५. माझा वृत्तांत. ३६. यथास्थित. ३७. मोठ्यांच्या कृपेनें. **अर्थांतरन्यास** आणि **प्रश्न.**

त्या सूक्तें[1] धैर्यगुणें होवुनि परम प्रसन्न, तो डोले, ।
तक्षक आराध्य[2] पुसे, चंद्रांगद तेधवां[3] असें बोले. ॥ ५२

“नागेंद्रा[4]! मद्वंशीं[5] आराध्य श्रीसदाशिव स्वामी, ।
बा! मी बहु काय वदों? जिव्हा[6] प्रभुच्याचि रंगली[7] नामीं.” ॥ ५३

तक्षक म्हणे, “सुकुलजा! जाणसि पर[8] शैवें[9] तत्व तूं धन्य, ।
झालों प्रसन्न पाहुनि तुज, तुजसम नर न देखिला अन्य. ॥ ५४

रविसम[10] मणि[11] या लोकीं, मणिकांचनमंदिरें[12], सुधावापी[13], ।
येथें हे कल्पद्रुम[14], सुकृती[15] येथें वसे, नसे पापी. ॥ ५५

येथें मृत्युभय[16] नसे, रोगजरास्पर्श[17] या नसे लोकीं[18], ।
येथें स्त्रिया सुरुचिरा[19], न बुडे स्वप्नींहि या स्थळीं शोकीं. ॥ ५६

या रत्नमयस्थानीं[20] भोगित सुखभोग[21], जेविं देव, रहा; ।
झालों परम तव सखा, जाण शचीचा[22] सभाग्य[23] देवर[24] हा.” ॥ ५७

नृपसुत म्हणे, “अहींद्रा[25]! शिवभक्ता वंशजा[26] वधू[27] आहे, ।
साहे विरहा[28] न सती, कांतरहित[29] विश्व शून्य कीं पाहे. ॥ ५८

प्रिय एकचि मी झालों, प्राणादि पदार्थ नावडे इतर, ।
समजुनि मृत पुत्र, कसे मजवांचुनि वांचतील ते पितर[30]? ॥ ५९

ठेउनि माथां[31] सदया! फिरवुनि करपद्म पाठिवर[32], हा या ।
लोकाहुनि नरलोकीं[33], आप्तांचे प्राण, पाठिव, रहाया.” ॥ ६०

१. उत्तम भाषणानें. २. कुळांतील पूज्य दैवत. ३. तेव्हां. ४. सर्पश्रेष्ठा. ५. माझ्या कुळांत. ६. जीभ. ७. दंग झाली, गढून गेली. ८. मोठें. ९. शिवसंबंधीं, शिवाचें. १०. सूर्यासारखे. ११. रत्नें. १२. रत्नें व सोनें यांचीं घरें. १३. अमृताच्या विहिरी. १४. कल्पवृक्ष. १५. पुण्यवान्. १६. मरणाचें भय. १७. रोग व म्हातारपण यांचा स्पर्श. १८. पाताळांत. १९. मनोहर. २०. रत्नखचित ठिकाणीं. २१. सुखाचे विषय. २२. इंद्राणीचा. २३. भाग्यासह, भाग्यवान्, दैवशाली. २४. दीर. इंद्राची सापत्न माता कद्रू व तक्षक तिचा पुत्र म्हणून शचीचा दीर होय. या आर्येचा अन्वय–जेविं देव (सुखभोग भोगितात) तेविं ह्या रत्नमयस्थानीं सुखभोग भोगित रहा. शचीचा सभाग्य देवर हा (मी) तव परम सखा झालों जाण. अर्थः–तक्षक म्हणाला, हे चंद्रांगदा! देवाप्रमाणें ह्या रत्नखचित स्थलीं सुखाचे विषय भोगीत रहा. इंद्राणीचा भाग्यवान् दीर हा मी तुझा मोठा मित्र झालों आहें, असें तूं समज. २५. सर्पश्रेष्ठा! २६. कुलीन. २७. स्त्री. २८. वियोगास. २९. पतीवेगळें. **अर्थांतरन्यास**. ३०. आईबाप. ३१. माथां करपद्म (हात) ठेवणें=कृपा करणें. ३२. पाठीवर करपद्म फिरविणें=धीर देणें. ३३. मनुष्यलोकीं, मृत्युलोकीं. या आर्येचा अन्वयः– सदया! करपद्म (माझे) माथां ठेवुनि आणि पाठीवर फिरवुनि, हा (चंद्रांगद) या लोकाहुनि (पाताळाहून) नरलोकीं आप्तांचे प्राण रहाया पाठिव.

द्रवला तक्षक, आज्ञा करि सत्कारावयास कन्यांतें, ।
त्याचें पूजन केलें, स्वर्गी जें प्राप्त होय धन्या, तें. ॥ ६१

न्हाणुनि, सागररागें[1] चर्चुनि, कल्पद्रुमोद्भवें[2] सुरसें[3] ।
अन्नें सुतृप्त[4] केला, त्या अहिपुर[5] होय विष्णुचें पुरसें[6]. ॥ ६२

उत्तम वस्त्रें, उत्तम रत्नालंकार[7] यास दे हातें, ।
तक्षक लक्षकविस्तुत[8]; तो शोभवि शिवचि दासदेहातें[9]. ॥ ६३

कामग[10] तुरंग[11] दे, वरवस्त्रांचा[12] राशि[13], अष्ट[14] मणिभार[15], ।
वाहकरक्षक[16] संगें[17] एक फणिकुमार[18] चतुर जो फार. ॥ ६४

'स्मरतां भेटेन,' असा वर देवुनि, दे निरोप[19] मग यातें, ।
नमुनि निघे चंद्रांगद; यश मिरवी शंभुभक्ति, न गया[20] तें. ॥ ६५

यमुनाजळांत[21] जेथें झाला होता निमग्न[22] तो वीर[23], ।
चंद्रांगद तेथूनचि बाहेर निघोनि, पावला तीर[24]. ॥ ६६

हय[25] फेरित[26] होता जो, तो घेवुनियां समागमें आली[27], ।
तीं[28] वर्षांनीं स्नानाकरितां सीमंतिनी सती आली. ॥ ६७

सीमंतिनी अकस्मात् दिव्यालंकारगंधधर[29] पाहे, ।
राहे चकित, म्हणे, "हा कोण परम रुचिर[30] पुरुषवर[31] आहे?" ॥ ६८

ओळखिली नळपौत्रें[32], जरिही सौभाग्यभूषणें[33] हीना[34]. ।
ती नाथा[35] परि नेणे, अतिरोदनमंददृक्प्रभा[36] दीना[37]. ॥ ६९

---

१. चंदनाच्या उटीनें. २. कल्पवृक्षापासून उत्पन्न झालेल्या. याचें विशेष्य 'अन्नें.' ३. ज्यांत उत्तम रस आहे असें. याचें विशेष्य 'अन्नें.' ४. फार संतुष्ट. ५. नागपुर. ६. वैकुंठनगरासारखें. ७. रत्नांचीं भूषणें. ८. लाखों सज्जनांनीं स्तविलेला. ९. भक्ताच्या शरीरास. १०. [बसणाऱ्याच्या] इच्छेस वाटेल तिकडे जाणारा. ११. घोडा. १२. उत्तम वस्त्रांचा. १३. रास. हा शब्द संस्कृत भाषेप्रमाणें पुल्लिंगी योजिला आहे. १४. आठ. १५. रत्नांचीं ओझीं. १६. वाहून नेणारा व रक्षण करणारा. १७. बरोबर. १८. सर्पाचा पुत्र. १९. निरोप देणें=जावयास मोकळीक देणें. २०. क्षेत्रविशेष. **व्यतिरेक.** २१. यमुनेच्या पाण्यांत. २२. निमग्न होणें=बुडणें. २३. शूर चंद्रांगद. २४. तट. २५. घोडा. २६. फिरवीत. २७. सखी. २८. तीन. २९. उत्तम भूषणें व सुवासिक द्रव्यें धारण करणारा. ३०. सुंदर. ३१. पुरुषश्रेष्ठ. ३२. नळाच्या नातवानें, चंद्रांगदानें. ३३. सौभाग्याच्या अलंकारानें. ३४. रहित. सौभाग्यभूषणहीन असतांही ओळखण्याचें कार्य झालें म्हणून **विभावना.** ३५. पतीस. ३६. फार रडण्यानें जिची दृष्टि मंद झाली आहे अशी. ३७. येथें स० सं०चा 'हीना' असा पाठ आहे.

**सी**मंतिनीनिकट तो येउनि, हॅरिवरुनि उतरला पुलिनीं, ।
बसुनि जवळ, बसवि तिला, सचकित होऊनि पाहिला मुलिनीं. ॥ ७०
तीस पुसे, 'कोणाची स्त्री? कन्या? नाम काय? शोकाचें ।
लक्षण बाळपणीं कां? हें गॅरळचि होय आप्तलोकाचें.' ॥ ७१
ऐसें स्नेहें पुसतां, सॉश्रुमुखी लाजली कथायाला; ।
सांगे, न करुनि विस्तर, सुमति तिची प्रियसखी कथा याला. ॥ ७२
दुःख तिचें, श्वशुराचें, केवळ दुःसह अशेष आयकवी. ।
न उरायाचें जरि तें, तरि तेव्हां तो म्हणेचि 'हाय' कवी. ॥ ७३
आयकिलें '**शि**वपूजाव्रत न त्यजिलें', असें तिचें उक्त, ।
चित्तांत, 'मृत्युपाशापासुनि केलें इणें' म्हणे, 'मुक्त.' ॥ ७४
**सी**मंतिनी म्हणे, 'प्रियदर्शन तूं कोण? मनुज, कीं देही ।
स्मर? मज गमसी साधो! पुरुषवरा! 'पूर्वदृष्ट हा स्नेही.' ॥ ७५
इतुकें बोलोनि सुचिर शोकार्ता राजनंदिनी रडली, ।
सांवरिली सखियांनीं, मोहभरें सुतनु जेधवां पडली. ॥ ७६
सांत्वन अतिनिपुणपणें करुनि म्हणे, 'न वद सर्वदा साहें. ।
पुससी 'कोण?' म्हणुनि जरि, तरि कॅामग **सि**द्ध देव मी आहें.'॥ ७७
कर धरुनि बळें ओढी, तों पाणिग्रहणशंकिता झाली, ।
त्याली रोमांचातें, हस्तस्पर्शामृतें सती धाली. ॥ ७८
कर्णी सांगे, 'त्वत्पति **चं**द्रांगद देखिला, सखा मम तो, ।
गतकांति त्वद्विरहें रात्रिवियोगें शशीतसा गमतो. ॥ ७९
भेटेल क्षिप्र तुला, तेणें तव उग्र दुःख आठविलें, ।

---

१. घोड्यावरून. २. वाळवंटांत. ३. आश्चर्ययुक्त. ४. चिन्ह. ५. विष. **निरंगरूपक.** ६. जिच्या मुखावर आसवें आहेत अशी. ७. सासऱ्याचें. ८. नुसतें, अत्यंत. ९. असह्य. १०. सर्व. ११. दुःख. १२. यमाच्या फांसापासून. १३. ज्याचें दर्शन गोड वाटतें असा. १४. मूर्तिमंत. १५. मदन. १६. पुरुषश्रेष्ठा. १७. पूर्वी पाहिलेला. १८. पुष्कळ काळ. १९. शोकानें पीडलेली. २०. राजकन्या (सीमंतिनी). २१. मूर्च्छेच्या भरानें. २२. सुंदरी. २३. मोठ्या कौशल्यानें. उत्तरार्धाचा भावार्थ–अतिचातुर्यानें सीमंतिनीचें सांत्वन करून चंद्रांगद (परका पुरुष) म्हणाला, आतां बोलूं नको, सदोदित असेंच सहनशीलत्व दाखीव. २४. इच्छागामी, इच्छेस वाटेल तिकडे जाणारा. २५. एक प्रकारचा उपदेव. २६. आपलें यानें पाणिग्रहण केलें कीं काय, असा तिला भीतियुक्त भास झाला. २७. रोमांचातें त्याली=तिच्या आंगावर रोमांच उभे राहिले. २८. हस्तस्पर्शरूप अमृतानें. २९. माझा. ३०. निस्तेज, तेजोहीन. ३१. तुझ्या वियोगानें. ३२. रात्रीच्या विरहानें, दिवसां. ३३. चंद्रासारखा. ३४. सत्वर. ३५. तीव्र.

देवि! तुजकडे मातें त्वत्तापनिवारणार्थ[1] पाठविलें. ॥ ८०

येथें संदेह[2] तुवां न धरावा, सत्य हें, न पथकरितों ।
लटिकें[3], सति! मी श्रीशिवचरणाचाही पहा शपथ[4] करितों. ॥ ८१

तोंवरि न प्रकटावें, मद्वाक्य[5] मनींच तूं असों दे हें. ।
विश्वांत यशोरूपें, कोठुनि आम्ही तुम्ही वसों देहें[6]?' ॥ ८२

वाक्य सुधावर्षाहुनि[7] समधिक[8] सीमंतिनीस तें वाटे, ।
आटे शोक समग्र[9], ब्रह्मांडीं हर्ष तत्क्षणीं दाटे. ॥ ८३

वारंवार प्रेमें पाहे चंद्रांगदाकडेचि सती, ।
तीस तसिं पूर्वदृष्टें[10] सिद्धशरीरांत लक्षणें[11] दिसती. ॥ ८४

वय तेंचि, वर्ण तोचि, स्वर तोची, सुरेतिही[12] पहाण्याची, ।
हाचि तिला स्वपति गमे; जाणे मति[13] परिचिता[14] शहाण्याची. ॥ ८५

स्वमनांत म्हणे, 'माझें या नररत्नींच[15] लागलें चक्षू[16], ।
मज वाटतसे, प्रेमें सादर ऐसेंचि यास हें[17] लक्षू[18]. ॥ ८६

धरुनि स्वरूप आला परलोकाहूनि[19] काय हा कांत[20]? ।
परि दुर्भगेसि[21] ऐसा झालाच कधीं नसेल शोकांत[22]. ॥ ८७

स्वप्न नव्हे, भ्रमहि नव्हे, गंधर्वादिक असेल हा धूर्त[23]. ।
आला मज ताराया मैत्रेयीचा प्रसाद कीं मूर्त[24]! । ८८

तो सत्य काय वदला, द्विज जातकलक्षणज्ञ[25] जो पहिला? ।
न कळे प्रभुचरित[26], करी लीलेनें[27] रत्नहार तो[28] अहिला[29]. ॥ ८९

१. तुझें दुःख निवारण्याकरितां. २. संशय. ३. खोटें. ४. हा शब्द पुल्लिंगी आहे. ५. माझें भाषण. ६. शरीरानें. उत्तरार्धाचा भावार्थ—चंद्रांगद सीमंतिनीस म्हणतो, जगांत यशाच्या (कीर्तीच्या) रूपानें आम्ही तुम्ही [चिरकाळ] राहूं, शरीरानें कोठून राहूं? म्हणजे शरीर नाशवंत आहे व कीर्ति शाश्वत आहे. ७. अमृताच्या वर्षावापेक्षां. ८. फार अधिक. ९. सगळा. १०. पूर्वीं पाहिलेलीं. याचें विशेष्य 'लक्षणें'. ११. चिन्हें. १२. तऱ्हाही. १३. बुद्धि. १४. परिचयाच्या मनुष्यास. हा चरण **सुभाषित** आहे. **अर्थांतरन्यास.** १५. पुरुषश्रेष्ठाच्या ठायीं. १६. नेत्र. हा शब्द नपुंसकलिंगी योजिला आहे. १७. चक्षू. १८. पाहो. १९. दुसऱ्या लोकाहून. २०. पति. २१. दुर्दैवेला. २२. शोकाचा शेवट. या गीतींत **आक्षेपा**लंकार आहे. लक्षण:—जेव्हां एकाद्या गोष्टीचें विधान करून, पुनः आपणच त्याचा विचारानें निषेध करितों, तेव्हां आक्षेप अलंकार होतो. २३. ठक. २४. मूर्तिमंत. **संदेहालंकार.** २५. ज्योतिर्गणितावरून लक्षण जाणणारा. २६. ईश्वराची करणी. २७. सहज. २८. प्रभु. २९. सर्पाला. **विरोधाभास.**

बहु वामबाहुनेत्रस्फुरणादिक[1] विविध[2] दिनिंदिनिं[3] स्पष्ट ।
मंगलनिमित्त[4] दिसतें, याच्या जावेचि दर्शनीं कष्ट. ॥ ९०

**शं**भु प्रसन्न होतां, प्राण्यास असाध्य[5] मुक्तिही नाहीं, ।
मग नवल काय बहु, जरि अनुभविली भुक्ति[6] मुक्ति हीनांहीं[7].' ॥ ९१

ऐसें बहुधा चिंतुनि, सुमति पुन्हा मुक्तसंशया[8] झाली. ।
लज्जाभरनम्रमुखी[9] पडुनि सुखामाजि आलिही[10] धाली. ॥ ९२

तो तत्कर्णांत[11] पुन्हा सांगे, 'शोकार्त पितर जिववाया[12] ।
जातों, साध्वि ! तुज तुजा शीघ्रचि[13] भेटेल कांत निववाया. ॥ ९३

यापरि भेटुनि, बोलुनि, गेला अश्वीं[14] बसोनि कामगमीं[15]; ।
तोचि बहु विनोद[16] करी, अजि कां न म्हणों असो निका मग मी.॥९४

स्वपुरोपवनीं[17] उतरे **चं**द्रांगद, नत[18] करावया द्वेषी[19]; ।
त्या नागकुमारातें, कळवाया स्वप्रताप[20], तो प्रेषी[21]. ॥ ९५

फणिपुत्र[22] म्हणे, "जोडा कर[23], आधीं **इं**द्रसेन नृप सोडा, ।
आला **चं**द्रांगद, या विनवा, अपराध हा नव्हे थोडा[24]. ॥ ९६

**य**मुनेमाजि बुडाला तो आला **त**क्षकालयाहून[25], ।
हा **शि**वभक्त, म्हणा न क्षम[26] संहृतिदक्ष[27] **काल** याहून." ॥ ९७

**चं**द्रांगद आला, हें कळवी फणिपुत्र **इं**द्रसेनातें, ।
जे नातें **सां**बपदीं लाविति, त्यां काय काय[28] देना तें[29]? ॥ ९८

बहु 'साधु साधु'[30] वदले; भ्याले, जरि परम दुष्टही अरि ते; ।
न रिते[31] पडतील कसे ? **शि**वभक्तस्वापहार[32] जे करिते[33]. ॥ ९९

---

१. डावा हात व डोळा यांचें स्फुरण इत्यादि. २. पुष्कळ. ३. प्रत्येक दिवशीं. ४. शुभसूचक. ५. अलभ्य. ६. भोग. ७. नीचांनीं. **काव्यार्थापत्ति.** ८. निःसंशय. ९. लज्जेच्या भारानें जिचें मुख खालीं वांकलें आहे अशी. १०. सखीही. ११. तिच्या कानांत. १२. जगविण्याकरितां, भेट देऊन त्यांच्या जीवांत जीव आणण्यासाठीं. १३. लवकरच. १४. घोड्यावर. १५. (बसणाऱ्याच्या) इच्छेस वाटेल तिकडे जाणाऱ्या. याचें विशेष्य 'अश्वीं'. १६. थट्टा. १७. आपल्या नगराजवळील बागेंत. १८. नत करणें=गर्वहीन करणें, जिंकणें. १९. शत्रू. २०. आपलें सामर्थ्य. २१. पाठवी. २२. नागपुत्र. २३. कर जोडणें=शरण येणें. २४. लहान. २५. तक्षकाच्या घरून. २६. समर्थ. **व्यतिरेक.** २७. संहार करण्याविषयीं चतुर. २८. कोणतें, कोणतें; कोणत्या वस्तू. २९. नातें. जे शिवचरणाचे सेवक होतात, त्यांस सर्व कांहीं प्राप्त होतें, हा उत्तरार्धाचा भाव. ३०. भलें, भलें. ३१. रितें पडणें=तेजोहीन होणें. ३२. शिवदासाच्या द्रव्याचें हरण. ३३. करणारे. **प्रश्न.**

पौरें[1], प्रधान गेले सपुरोहित[2] उपवनासि[3] आणाया; ।
**चं**द्रांगदासि भेटति निजशोकद्रुम[4] समूळ[5] खाणाया[6]. ॥ १००
सत्कारुनि हर्षभरें बहुतचि निववीत[7] जलधिवसनेला[8], ।
तो **चं**द्रांगद नगरीं जाणों धृतमूर्ति[9] अमृतरस नेलें[10]. ॥ १०१
बहु **इं**द्रसेन हर्षे, न शके तनयासि ओळखायाला, ।
मायहि, जीस, उरक्षत[11] जाया, लागे न बोळ[12] खायाला. ॥ १०२
राजा म्हणे, "सुनेच्या सुकृतें[13] तरलों, नसे दुजा हेतू[14], ।
जें भव्य **सो**मवारव्रत, तें या शोकसागरीं[15] सेतू[16]." ॥ १०३
हें वार्तामृत[17] धाडी, त्याला होता[18] करून 'आं' व्याही, ।
जो भूप **चि**त्रवर्मा मानी स्वाधिक[19] न तप्त[20] आव्याही[21]. ॥ १०४
**सी**[22]मंतिनीपिता दे स्वसभालंकारराशि[23] जासूदा, ।
स्वमुखें म्हणे, "मम कनकपात्रांतचि[24] वाढ यासि, जा सूदा[25] !" ॥ १०५
सर्वहि सुकविजन, तया वर्णुनि, निःसीम[26] उद्धवास[27] वदे[28], ।
कोणी म्हणति, "प्रकटुनि आनंद असाचि शुद्ध **वा**सव[29] दे." ॥ १०६
मातांचा, सखियांचा, पुरवनितांचा[30] प्रमोद[31] अर्णव[32] तो, ।
मग त्या राजसुतेचा[33] मजऐशा[34] कविस काय वर्णवतो? ॥ १०७

१. नागरिक. २. उपाध्यायासह. ३. बागेस. ४. आपला शोकरूप वृक्ष. ५. मूळांसह. ६. खणून टाकण्यास. ७. सुखवीत. स० सं० चा 'विनवीत' असा पाठ आहे. ८. समुद्र आहे वस्त्र जीचें तीस, पृथ्वीस. ९. मूर्तिमंत. १०. याचा कर्ता 'पौरप्रधानांनीं' हा अध्याहृत. **उत्प्रेक्षा.** ११. उरांतील व्रण. १२. औषधविशेष. जीस उरक्षत जाया बोळ खायाला न लागे म्हणजे चंद्रांगदाच्या मातेला पुत्रशोकापासून झालेला उरांतील व्रण बरा होण्यास चंद्रांगदाच्या येण्यानें कोणतेंही औषध घ्यावें लागलें नाहीं, तो तसाच बरा झाला, हा भाव. १३. पुण्यानें. १४. कारण. १५. शोकरूप समुद्रांत. १६. पूल. **परंपरितरूपक.** १७. वार्तारूप अमृत. १८. आ करून होता=(पिण्यासाठीं) अगदीं तोंड पसरून तयार होता. १९. आपल्याहून अधिक. २०. तापलेला. २१. आवा=मडकीं भाजण्याची भट्टी. **व्यतिरेक.** २२. चित्रवर्मा. २३. आपल्या सभेंतील भूषणांच्या राशी. २४. सुवर्णपात्रांत. २५. सैंपाक्या. उत्तरार्धान्वयः–(आणि) स्वमुखें म्हणे 'सूदा ! जा (व) यासि मम कनकपात्रांतचि (भोजन) वाढ'. २६. अमर्याद. २७. हर्षास. २८. हें एकवचनी रूप आहे व 'कविजन' हा कर्ताही समुदायवाचक व म्हणून एकवचनीच आहे. २९. इंद्र. ३०. पुरस्त्रियांचा. ३१. आनंद. ३२. समुद्र. ३३. सीमंतिनीचा. **काव्यार्थापत्ति.** ३४. माझ्या-सारख्या. सीमंतिनीच्या मातांचा, मैत्रिणींचा व पुरस्त्रियांचा आनंद म्हणजे एक समुद्रच होता; मग जिचा प्रत्यक्ष सौभाग्यालंकार पतीच परत लाभला, त्या सीमंतिनीचा आनंद माझ्यासारख्या (मंद) कवीला वर्णवेल काय ? असा पंतांचा भाव.

सीमंतिनीस लाविति कुंकुम, घाली प्रियालि नथ नाकीं, ।
कोणी वेणी कज्जल; गाती देवर्षि चित्ररथ नाकीं. ॥ १०८

तो नृपति चित्रवर्मा स्वपुरातें आणवुनि, तया धन्या, ।
चंद्रांगदासि देता झाला विधिनें महोत्सवें कन्या. ॥ १०९

चंद्रांगदें सुवस्त्रें, देवद्रुमपुष्पभूषणें भव्यें ।
अम्लानें बहुवर्णें, नानाश्चर्यप्रदें, सदाभव्यें; ॥ ११०

रत्नालंकारशतें तक्षकदत्तें स्वयेंचि शोभविली ।
दयितो, महांगरागें दशयोजनगेंहि फार लोभविली. ॥ १११

दे भूप चित्रवर्मा जाया स्वपुरा सदार आज्ञा त्या, ।
निववुनि सर्वांसि निघे, प्रेमें वंदुनि पुसोनियां ज्ञात्या. ॥ ११२

पुत्रासि राज्य देउनि, गिरिशातें इंद्रसेन तो भावें ।
मुक्त भजुनि होय, प्रभुभजमें विश्रांत सुयश शोभावें. ॥ ११३

अष्ट सुत प्रसवे, सुख भोगी सीमंतिनी अयुतवर्षें, ।
शिवलोकीं जाय भजुनि पतिसह परमेश्वरासि बहु हर्षें. ॥ ११४

लिहिली कथा यथामति हे श्रीरामात्मजें, अंध सराया, ।
अत्युच्चपदापासुनि गाता जनही कधीं न वसराया. ॥ ११५

---

## अध्याय नववा.

श्रीशिवकीर्त्यमृतरसीं वाढाया सर्वदा रुचि, तेंगाया, ।
बहु हाहि सोमवारव्रतमहिमा कविजना उचित गाया. ॥ १

होते विदर्भदेशीं सारस्वत, वेदमित्र या नांवें, ।
ज्यां श्रुतिशास्त्रज्ञातें 'बहु धन्य' असें सभेंत वानावें. ॥ २

१. प्रिय मैत्रीण. २. स्वर्गांत. ३. आपल्या राजधानीस. ४. मोठ्या आनंदानें. ५. चांगल्या वस्त्रांनीं. ६. कल्पवृक्षाच्या पुष्पांचे अलंकारांनीं. ७. तेजस्वी. ८. सदा टवटवीत. ९. रंगीबेरंगी. १०. नाना प्रकारें नवल उत्पन्न करणाऱ्या. ११. नेहमीं कल्याणदायक. १२. रत्नांच्या शेंकडों भूषणांनीं. १३. तक्षकानें दिलेल्या. १४. स्त्री. १५. उत्तम उटीनें. १६. चाळीस कोस ज्याचा वास जात होता अशा. याचें विशेष्य 'महांगरागें'. १७. लुब्ध केली. गीति ११० व १११ यांचें युग्म. १८. स्त्रीसह. १९. शिवातें. २०. पातक. २१. अति उंच स्थानापासून. २२. गाणारा. पाठभेद:–गातां. २३. पडाया. २४. श्रीशिवाच्या कीर्तिरूप अमृताच्या ठायीं. २५. आवड. २६. टिकावयास. २७. योग्य. २८. गावयास. २९. वेद आणि शास्त्र जाणणाऱ्यांतें.

ते परम सखे दोघे, झाले दोघांसि आत्मभव[1] दोन, ।
हेहि सखे, प्रकटिति गुण वृत्तेंचि[2], मुखें स्वरूप न वदोन. ॥ ३

**श्रु**तिमित्रसुत[3] **सु**मेधा, **सा**रस्वतपुत्र **सा**मवान् सुकवी, ।
षोडशवर्षांचे[4], परि वेदीं शास्त्रीं न पर[5] जयां चुकवी. ॥ ४

वदले तात तयांतें, 'सुखवूनि **वि**दर्भराजचित्तातें[6], ।
जा स्वविवाहाकरितां संपादा तूर्ण[7] पूर्ण वित्तातें[8].' ॥ ५

तातातें वंदुनि, ते वित्तार्थी[9] त्या **वि**दर्भभूपातें ।
जाउनि भेटति दोघे, ते पांथीं[10] पांथ[11] जेविं कूपातें[12]. ॥ ६

तोषउनि स्वगुणांहीं, 'धन नाहीं संग्रहीं विवाहातें' ।
स्वाशय[13] दाविति शब्दें, अर्थ[14] जसा धरुनियां दिवा हातें. ॥ ७

स्मित[15] करुनि वदे राजा, 'जाणावें लोकतत्व[16], या भावें,।
बुधहो! कथितों, ऐका युक्ति, जिणें वित्त विपुल[17] लाभावें. ॥ ८

एकें वेष धरावा स्त्रीचा, होऊनि दंपती[18] जावें, ।
**सी**मंतिनी करितसे मिथुनार्चा[19] **सो**मवासरीं भावें. ॥ ९

**नि**षधेश्वर[20] **चं**द्रांगद, त्याची **सी**मंतिनी भली भार्या[21], ।
करिती दंपत्यर्चन[22], रत्नालंकार वाहती आर्या.' ॥ १०

विप्र म्हणति, 'अनुचित[23] हें, शुद्धांसचि[24] सेव्य नृपतिचें सद्म[25], ।
कुष्ट जसें रूपातें, प्रकटुनि दूषील सद्यशा[26] छद्म[27]. ॥ ११

भयपापवैरनिंदापात्र[28], छद्मे प्रवर्तता, होतो. ।

---

१. पुत्र. २. आचरणानें. ह्याहि दोघां मित्रांनीं आपलें [गुण] स्वरूप मुखानें न सांगतां [म्हणजे आपले गुण आपल्या तोंडानें वर्णन न करितां] आचरणानें गुण दाखविले—हा भाव. ३. वेदमित्राचा मुलगा. ४. सोळा वर्षांचे. ५. अन्य. ६. विदर्भदेशच्या राजाच्या मनास. ७. त्वरित. ८. (विवाहास) पुरेशा द्रव्यास. ९. द्रव्याची याचना करणारे. १०. उन्हांत. ११. प्रवासी. १२. विहिरीस. १३. आपली इच्छा. १४. पदार्थ. १५. किंचित् (गालांतल्या गालांत) हंसून. १६. लोकांचा खरेपणा. १७. पुष्कळ. १८. जायापती, मेहूण. १९. दांपत्यपूजा. २०. निषधदेशचा राजा. २१. पत्नी. २२. मिथुनपूजा. २३. अयोग्य. २४. पवित्रांस. २५. घर. २६. उत्तम कीर्तीस. २७. कपट. या आर्येचा अन्वय—विप्र म्हणति हें अनुचित, नृपतीचें सद्म शुद्धांसचि सेव्य; जसें कुष्ट प्रकटुनि (=दिसून, बाहेर पडून,) रूपातें [दूषी] (तसें) छद्म प्रकटुनि सद्यशा दूषील. अर्थः—ते सुमेधा व सामवान् ब्राह्मण म्हणाले, 'हें अयोग्य आहे. राजाचें घर पवित्रांसच वास करण्यास योग्य. जसें कोड शरीरावर उठून रूपाची हानी करितें, तसें कपट उघडकीस येऊन उत्तम यशाला कलंकित करितें.' २८. भीति, पातक, द्वेष व निंदा यांस योग्य.

जो धूर्तश्लाघ्य[1] कुपथ[2], कुलजा[3] होईल मान्य कां हो! तो'? ॥ १२

भूप म्हणे, 'देव पितर, गुरु, पृथ्वीपति[4], समर्थ हे चवघे. ।
लोकीं अलंघ्यशासन[5], भय देती उक्त[6] न करितां अवघे[7]. ॥ १३

अविलंबित[8] कथित[9] करा, प्राप्त असे अन्यथा[10] भय व्यक्त[11]. ।
शुभ[12] अशुभहि[13] ऐकावें, आम्ही राजे, प्रजा तुम्ही भक्त[14]. ॥ १४

या नृपवचनें झाले ते साधुंस मान्य बालकवि[15] यीला[16] ।
म्हणती, 'आवश्यक कीं, सत्यचि[17] सम भूमिपालक[18] वियोला[19].' ॥ १५

स्त्रीवेष भूप दे, जो **सा**रस्वतपुत्र **सा**मवान्, यातें, ।
स्तन केश करी कृत्रिम, लावी कज्जलहि[20] वृद्धमान्या[21] तें. ॥ १६

द्विजसुत[22] सुंदर होता, स्त्रीवेष दिला विचक्षणें[23] भूपें[23], ।
प्रौढांगनाहि[24] त्याच्या त्या भव्यें[25] मोहे[26] पावल्या रूपें. ॥ १७

'या मजकडेचि आधीं' ऐसें शिकवुनि **वि**दर्भभूपानें, ।
**सी**मंतिनीकडे ते पाठविले दंपतिस्वरूपानें[27]. ॥ १८

'होयिल तें हो[28]' ऐसें चिंतुनि[29] ते **नि**षधपतिपुरा[30] गेले; ।
यापरि **वि**दर्भपतिनें, वश **वि**धिनें[31] विप्रसुत सुकवि केले[32]. ॥ १९

सस्त्रीक[33] **ब्रा**ह्मण जे, त्यांसह शिरले नृपालयीं[34] क्षिप्र. ।
**सी**मंतिनी समर्ची[35] सद्विधिनें[36] **सो**मवासरीं विप्रं[37]. ॥ २०

---

१. ठकांस आवडणारा, रुचणारा. २. कुमार्ग. ३. कुलीनास. ही व पुढील गीति **सुभाषितरूप** आहे. ४. राजा. ५. ज्यांची आज्ञा मोडतां येत नाहीं असे. ६. सांगितलेलें, आज्ञा. ७. सर्व. ८. त्वरित. ९. सांगितलेलें. १०. नाहीं तर, न केलें तर. ११. उघड. १२. मंगल. १३. अमंगल. १४. सेवक. पहिले तीन चरण व चतुर्थ चरण यांत कार्यकारणभाव आहे, म्हणून **काव्यलिंग.** १५. अल्पवयी ज्ञाते. १६. राजाला. अन्वय–या नृपवचनें ते साधूंस मान्य झाले (=झालेले) बालकवि याला म्हणती, आवश्यक कीं भूमिपालक वियालासम (हें)सत्यचि. येथें 'ते साधुहि मान्य' असा पाठ अधिक सुबोध झाला असता. १७. सत्य, खरेंच. १८. राजा. १९. वियालासम=पित्यासारखा. २०. काजळहि. २१. वयोवृद्धांनाही मोहविणाऱ्यास. २२. ब्राह्मणपुत्र. आधीं ब्राह्मणपुत्र सुंदर होता, त्यांत चतुर राजानें स्त्रीवेष दिला म्हणून तो अधिक सुरूप दिसूं लागला, असें वर्णिल्यामुळें **समाधि.** २३. चतुर राजानें. २४. प्रौढ स्त्रिया. २५. सुंदर. याचें विशेष्य 'रूपें'. २६. मोह पावल्या=भुलून गेल्या. २७. मेहुणाच्या रूपानें. २८. होवो. आज्ञार्थी तृतीयपुरुषी एकवचनी रूप. २९. मनांत आणून. ३०. निषधराजधानीस. ३१. दैवानें. ३२. करविले. अन्वय–यापरि विधिनें विदर्भपतिनें सुकवि विप्रसुत वश केले. अर्थ–याप्रमाणें दैवानें विदर्भराजाकरवीं सुज्ञ ब्राह्मणपुत्र स्वाधीन करून घेतले. ३३. स्त्रीसह. ३४. राजवाड्यांत. ३५. पूजी. ३६. उत्तम विधीनें. ३७. द्विज.

बहु मेहुणें[1] खरीं जीं, त्यांतचि ते दंपती स्वयें पाहे, ।
स्मित करुनि सांबशिव[2] या भावें शिरीं[3] तत्पदांबुजीं[4] वाहे. ॥ २१

त्या मिथुनीं[5] आवाहन[6] सांबशिवाचें करूनियां भावें, ।
पूजन विध्युक्त[7] करी, जें बहु अद्यापि साधुनीं गावें. ॥ २२
विप्रीं करी शिवाचें आवाहन, पूजनीं तसेंचि सती[8], ।
त्याच्या स्त्रींत शिवेचें[9], तद्रूपचि[10] तीस दंपती दिसती. ॥ २३
पूजन करितां प्रेमें, सद्वस्त्रें[11], भूषणेंहि[12] लेवविलीं, ।
मिथुनें, कांचनपात्रीं[13] विविधान्नें[14] ओगरूनि[15], जेवविलीं. ॥ २४
तांबूल[16], दक्षिणा मग देउनि, करुनि प्रदक्षिणा, नमुनी, ।
मिथुनें विसर्जिलीं तीं गेलीं तद्भक्तिसद्गुणीं[17] रमुनी. ॥ २५
तो होय सामवान् स्त्री, राज्ञी जेथें शिवेसि आवाही[18], ।
आवाहती[19] शिवातें, तरि होती दिव्य[20] पुरुष आवाही[21]. ॥ २६
पूर्व पुरुषपण[22] विसरे, तो सत्य स्त्रीच आपणा समजे, ।
संगार्थ सुमेध्यासीं मार्गवनामधिं[23] करी बहुत गमजे[24]. ॥ २७
यापरि बोले, "नाथा[25] ! कामार्ता[26] बहु तव प्रिया हे मी, ।
तव अधरामृतपानें[27] वांचेनचि, वृद्धि बहु असो प्रेमीं. ॥ २८
भर्त्या ! रहा, पहा वन रम्य, करीं यांत मजसह क्रीडा, ।
एकांतीं दयितेसीं[28] रमति सुखें दयित[29], सोडुनी व्रीडा[30]." ॥ २९
हें ऐकोनि सुमेधा चित्तांत म्हणे, "विनोद ऐसा या ।
कां रुचला[31] ? योग्य नव्हे हा परिहासस्थळींहि[32] बैसाया." ॥ ३०
अश्रुतपूर्व[33] सुमेधा श्रवण करुनि, तो पथीं उभा राहे, ।

---

१. पतिपत्नींचीं जोडपीं. २. पार्वतीसह शिव. ३. मस्तक. ४. त्याच्या (दंपत्याच्या) चरणकमलीं. ५. दंपत्याच्या ठायीं. ६. बोलावणें, आमंत्रण. ७. यथाविधि. ८. सीमंतिनी. ९. पार्वतीचें. १०. शिवपार्वतीरूप. ११. उत्तम वस्त्रें. १२. अलंकार. १३. सुवर्णपात्रांत. १४. नाना प्रकारचीं अन्नें. १५. वाढून. १६. विडा. १७. तिची भक्ति व चांगले गुण यांच्या ठायीं. १८. आवाहन करी, आमंत्री. १९. जर आमंत्रण देती. २०. सुंदर. २१. विधवा स्त्रीसुद्धां. २२. पुरुषत्व. २३. रस्त्यावरील अरण्यांत. येथें स० सं० चा 'भार्गवनामा' असा पाठ आहे. २४. चेष्टा. २५. स्वामी. २६. कामपीडित. २७. ओंठांतील अमृतप्राशनानें, गोड चुंबनानें. २८. स्त्रीसह. **अर्थांतरन्यास.** २९. पति. ३०. लज्जा. ३१. आवडला. ३२. थट्टेच्या स्थानींसुद्धां. गीतीचा अर्थः–हें ऐकूनि सुमेधा मनांत म्हणाला जेथें थट्टा चालली आहे, अशा स्थानींही न बसणारा असा हा सामवान् असतां, यास आज विनोद कसा आवडला ! ३३. पूर्वीं न ऐकिलेलें.

पाहे, तों सारस्वतपुत्र स्त्री स्पष्ट जाहला आहे. ॥ ३१
विस्मय[1] पावोनि पुसे, "रूपगुणांहीं अपूर्वसा[2] मित्रा ! ।
दिससी, वदसी वाणी मदविकळा[3] कामिनीतशा[4] चित्रा[5]. ॥ ३२
तूं सामवान् मम सखा पंडित[6], वदसी असें कसें भलतें ? ।
माझ्या हृदयांत तुझें बहुतचि हें आजि बोलणें सलतें." ॥ ३३
ती "बोले, पुरुष नव्हे, सामवती स्त्री रतिप्रदा आहें, ।
संशय असेल, तरि तूं माझीं आंगें प्रिया ! स्वयें पाहें." ॥ ३४
ऐकुनि असें अकृत्रिमकेशस्तनजघनशोभिनी[7] पाहे, ।
वाहे विकार[8] पळ, परि साधु[9] सुमेधा स्वसत्पथीं[10] राहे. ॥ ३५
सामवती त्यासि म्हणे, "गेला कीं, संशय ? प्रभो ! वद, या ।
स्वस्त्रीतें रमिव, शमिव[11] कामज्वर[12] वर वनीं[13], प्रिया ! सदया !" ॥ ३६
पुनरपि म्हणे सुमेधा, "मोडिसि रीतीस, जेविं मत्त[14] महा[15], ।
मर्यादेसि बुडवितां, म्हणतात कुलीन साधुसत्तम[16] 'हा[17]'. ॥ ३७
आम्ही शास्त्रनिपुण[18] कीं, वदतोसि असा कसा महादोषा[19] ? ।
रे ! समज आपणातें आपण, कीं पुरुष बुध, न तूं योषा[20]. ॥ ३८
न धरावा अपथ[21] असा, साधूंच्या नायकोन[22] हाकेला[23], ।
आम्ही स्वयेंचि, होउनि धूर्त[24] नृपा वश, अनर्थ हा केला. ॥ ३९
सद्गुणमंडित[25] पंडित बहुमत होतासि नाकपाळाला[26], ।
ऐशाहि तुझ्या आला निंद्य स्त्रीभाव[27] हा कपाळाला[28] ! ॥ ४०

---

१. आश्चर्य. २. नवीन असा. ३. कामवासनेच्या उन्मादानें व्याकुळ. ४. स्त्रियेसारख्या. ५. विचित्र, भलत्या, चमत्कारिक. याचें विशेष्य 'वाणी'. ६. विद्वान्. पंडितत्वासंबंधानें पंतांच्या पुढील आर्या वाचण्यालायक आहेत–विदुर म्हणे, जो आस्तिक गुरुवेदोक्तीं जयास विश्वास, । मीपण ज्यासि न शिवलें, तो **पंडित** मान्य होय विश्वास.॥ दुर्लभ वस्तु न वांछी, न करी जो दुष्ट वस्तुचा शोक, । आपत्तींत न मोहे त्या **पंडित** म्हणति जाणते लोक ॥ (मोरोपंतकृत–उद्योगपर्व.) ७. स्वाभाविक केंस, स्तन व मांड्या यांनीं शोभणारी अशी सुंदरी. ८. कामविकार. ९. हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें **परिकर.** १०. आपल्या सन्मार्गांत. उत्तरार्धाचा अर्थ–त्या साधु सुमेधाला पळभर कामाची पीडा झाली पण त्यानें आपला सन्मार्ग (सदाचरण) सोडिला नाहीं. ११. शांत कर. १२. मदनपीडा. १३. सुंदर वनांत. १४. दांडगा. १५. मोठा. १६. साधुश्रेष्ठ. १७. हाय. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. १८. शास्त्रांत प्रवीण. १९. मोठ्या पातकास. २०. स्त्री. या अर्धाचा अन्वय–रे ! आपण आपणातें समज कीं, तूं बुध पुरुष, योषा न. २१. कुमार्ग. २२. न ऐकून. २३. बोधाला. २४. ठक, लुच्चा. २५. चांगल्या गुणांनीं भूषित. २६. इंद्राला. २७. स्त्रीत्व. २८. दैवाला, नशिबीं. **विषम**.

त्यजुनि पंथ, वनीं शिरतां सांपडतो स्पष्ट हा दैवा, खातो ।
कीं व्याघ्रादिक, पावे कीं कंटकविद्धपाद वाखा तो. ॥ ४१
धरुनि विवेकें स्वगृहा तूं चाल, उगाचि न धरितां तांप, ।
देवद्विजप्रसादें जायिल विलयासि हें तुझें पाप. ॥ ४२
अथवा **वि**धिच्यां योगें होउनि जरि राहसील तूं नारी, ।
तरि **मा**याबल मोठें, त्या राज्ञीचा प्रभावही भारी." ॥ ४३
बहु वारी, परि त्यातें ती आलिंगुनि बळेंचि मुख चुंबी, ।
मानी मनीं **सु**मेधा अमृतलतासी तथापि कटु तुंबी. ॥ ४४
ऐसें धर्षण केलें, तरि न **सु**मेधा सुधीर तो चळला, ।
कळला अनर्थ भारी, न तिला रंभेसि शुकतसा वळला. ॥ ४५
यत्नें गृहासि घेवुनि गेला नूतन वधू **सु**मेधा ती, ॥
हृदयीं म्हणे, "तव यशें सुब्राह्मण वत्सले! **उ**मे! धाती." ॥ ४६
नमुनि, **सु**मेधा ताता, तातसखा सर्व वृत्त आयकवी. ।
ससुत **वि**दर्भपतिकडे ते गेले क्रोधतप्तकाय कवी. ॥ ४७
**सा**रस्वत विप्र म्हणे, "राया! मद्धात कार्य कां गमला? ।
एकचि सुत, तद्गति हे, मज न सुचे, तूं विचार सांग मला. ॥ ४८
त्वन्मंत्रें पुत्राचें झालें श्लाघ्यहि वपु त्रपाकारी, ।
राजा! म्हणेलचि सदा 'हा हा!', होतां अपुत्र, पाकारी. ॥ ४९
राजा! स्वरूप जातां, पितृमन, चिंतुनि मुलांस, कळकळतें, !
परहितचि किमपि न कळे, स्वहितचि कैसें तुला सकळ कळतें? ॥ ५०

---

१. मार्ग (सुमार्ग). २. वणव्यास. ३. वाघ इत्यादि वनपशू. ४. कंटकांनीं आहेत विद्ध पाय ज्याचे, ज्याच्या पायांस कांटे बोंचले आहेत असा. ५. वाखा पावे= मरे. ही गीति **सुभाषित**रूप आहे. अन्वय–पथ त्यजुनि वनीं शिरतां हा स्पष्ट दवा सांपडतो कीं, (ह्या) व्याघ्रादिक खातो, कीं तो कंटकविद्धपाद वाखा पावे. ६. विचार. ७. खेद. ८. देवब्राह्मणांच्या कृपेनें. ९. नाशास. १०. दैवाच्या. ११. स्त्री. १२. निवारण करी. १३. अमृताच्या वेलीसारखी. १४. कडु भोंपळी. **विरोध**. १५. अंगलोट, अतिप्रसंग. १६. मोठा धीराचा, दमदार. १७. चंचळ झाला. १८. व्यासपुत्र शुकाचार्यासारखा. १९. वश झाला, बधला. २०. नवीन. २१. स्त्री. २२. दयाशीले! २३. तृप्त होती. २४. बापाच्या मित्राला, सारस्वताला. २५. पुत्रासह. २६. कोपानें तापले आहेत देह ज्यांचे असे. २७. माझा नाश. २८. त्याचा परिणाम. २९. तुझ्या मसलतीनें. ३०. स्तुति करण्याजोगें, वाखाणण्यासारिखें. ३१. शरीर. ३२. लज्जाकारी. ३३. निपुत्रिक. ३४. इंद्र. ३५. बापाचें मन. ३६. आठवून. ३७. दुसऱ्याचें हित. ३८. थोडेंही.

एकचि पुत्र तयाची [1]गति हे, मत्सम दुजा नसे [2]कष्टी; ।
वैदर्भा! अंधाची मोडावी काय डोळसें [3]यष्टी ?" ॥ ५१

ब्राह्मण पुत्रविनाशें [4]कडकडला, भूप संकटीं पडला, ।
'घडला अपराध', म्हणे, '[5]अयशाचा [6]डाग आपणा [7]जडला.' ॥ ५२

[8]सीमंतिनीप्रभावें भूप [9]परम विस्मयासि तो पावे, ।
मेळवि महर्षि, ज्यांहीं सद्वर [10]शरणागतासि [11]ओपावे. ॥ ५३

पूजुनि, नमुनि, नृप म्हणे, '[12]पदर पसरितों, महर्षि हो! तारा. ।
वारा या सारस्वतपुत्राचें स्त्रीत्व, मज तुम्ही [13]धारा.' ॥ ५४

ते वदले, '[14]शिवदुर्गा, तद्भक्तहि अति समर्थ बा! राया! ।
यांच्या [15]संकल्पातें [16]क्षम कोण [17]त्रिभुवनांत वाराया ?' ॥ ५५

मग [18]नरवरें प्रयत्नें सुमुनि भरद्वाज नमुनि आणविला, ।
त्याला प्रार्थुनि तेणें आपण [19]केलो अनर्थ जाणविला. ॥ ५६

द्रवुनि भरद्वाज महामुनि शिकवी संकटांत [20]सारा [21]धी, ।
त्या [22]सात्मजविप्रासह नृप भावें [23]भगवतीस [24]आराधी. ॥ ५७

[25]ध्यानजपार्चननमनस्तवनरत, त्यजुनि [26]भुक्ति, तो भावें ।
नृप तोषवी [27]त्रिरात्र श्रीदुर्गेतें, म्हणे, 'मला पावें.' ॥ ५८

[28]तीव्रनियमसंतुष्टा [29]शशिकोटिसमप्रभ स्वरूप नृपा ।
दावी श्रीजगदंबा [30]शरणागतवत्सला, करूनि कृपा. ॥ ५९

दर्शन देवुनि देवी त्यासि म्हणे, '[12]पसरितोसि [12]पदरा, ज्या ।
हृदयीं धरुनि, मजपुढें, त्या [31]आत्मसमीहितासि वद राजा!' ॥ ६०

स्तवुनि, नमुनि, भूप म्हणे, 'भगवति! [32]भवसागरांत तारावें, ।
सारावें अपयश, या विप्रसुताचें [33]वैधूत्व वारावें.' ॥ ६१

---

१. परिणाम. २. दुःखी. **असमालंकार.** ३. दंड. **दृष्टांत.** ४. रागानें बोलला, तडफडला. ५. अपकीर्तीचा. ६. कलंक. ७. लागला. ८. सीमंतिनीच्या तेजानें. ९. फार आश्चर्यास. १०. शरण आलेल्यास. ११. अर्पावे. १२. पदर पसरणें=प्रार्थना करणें. **लोकोक्ति.** १३. आधार. १४. शंकरपार्वती. १५. इच्छेला. १६. समर्थ. १७. स्वर्ग, मृत्यु व पाताळ यांत. **प्रश्न.** १८. राजानें, विदर्भपतीनें. १९. केलेला. २०. श्रेष्ठ. २१. बुद्धि, मसलत. २२. ब्राह्मण व त्याचा पुत्र यांसह. २३. जगदंबेस. २४. पूजी. २५. ध्यान, जप, पूजा, नमस्कार व स्तुति यांत गढलेला. २६. खाणेपिणें, अन्नपाणी. २७. तीन रात्री. २८. कडक नेमानें (=व्रतानें) संतुष्ट झालेली. २९. कोटी चंद्रांसारखें आहे तेज जिचें. ३०. शरण आलेल्याविषयीं दयाशील. ३१. आपल्या इच्छेस. ३२. संसाररूप समुद्रांत. ३३. स्त्रीत्व.

**ज**[1]गदीश्वरी म्हणे, 'मम भक्तांहीं कर्म जें नृपा! केलें, ।
तें [2]अन्यथा कराया शक्य नव्हे, [3]वर्षलक्ष जरि गेलें. ॥ ६२
मम भक्ताचें केलें कर्म जगीं मोडिलें कधीं नाहीं, ।
आतां काय करावें बा! आम्हीं [4]भक्तवागधीनांहीं?' ॥ ६३
भूप म्हणे, "[5]एकात्मज हा द्विज झालाचि [6]नष्टसंतान, ।
**वि**श्वेश्वरि! तुज नमितां, बाधे कोणाहि कष्ट [7]संता न. ॥ ६४
झाला [8]अपुत्र दैवें, **दे**वि! कसा स्वर्ग यासि साधेल? ।
या नष्टसंततिमुनिस संसारीं ताप नित्य बाधेल. ॥ ६५
वर्णिति **वे**दमुनि तुतें [9]वरदे! [10]परदेवते! [11]सदाधारे! ।
शरणागतासि म्हणती [12]त्वत्पदपद्में, 'सुखें सदा [13]धा रे!'" ॥ ६६
**दे**वी म्हणे, 'प्रसादें माझ्या होइल सुपुत्र या एक, ।
निवविल बहु तो, राया! [14]दैवदहनार्ता जसा [15]सुधासेक. ॥ ६७
हे याची **सा**मवती कन्या द्यावी सुखें **सु**मेध्यातें, ।
बुध भजति सदुक्तातें, जेविं स्त्री लाधल्या [16]सुमेध्यातें.' । ६८
ऐसी करूनि आज्ञा, झाली [17]अंतर्हिता **भ**वानी ती, ।
भक्तयश करावें हे [18]पहिलीच जिची, [19]नव्हे नवा नीती. ॥ ६९
[20]सविधि **सु**मेध्यासि दिली **सा**मवती, बहुसुखें निवालिहि ती, ।
ज्ञाते म्हणति [21]कपाळीं, पहिलें मोडुनि, नवें **शि**वा लिहिती. ॥ ७०
**सा**रस्वतासि झाला [22]सद्गुणसंपन्न पुत्र, सज्जन! हो! ।
या **शि**[23]वभक्तयशोमृतपारावारीं सदैव मज्जन हो. ॥ ७१
[24]**रा**मात्मजें **म**यूरें लिहिली हे सत्कथा यथाबुद्धी, ।
जी सेविली कसी तरि देती श्री[25]**जा**न्हवीतसी [26]शुद्धी. ॥ ७२

१. जगाची स्वामिनी. २. बदलण्याला. ३. लाखों वर्षें. ४. भक्तांच्या वाणीच्या स्वाधीन अशांनीं. याचें विशेष्य 'आम्हीं'. ५. एक पुत्र ज्याला आहे असा. ६. संतति नाश पावली आहे ज्याची असा. ७. साधूस. ८. निपुत्रिक. ९. वर देणारे. १०. श्रेष्ठ देवि. **यमक** व **अनुप्रास.** ११. साधूंना आहे आधार जिचा अशा. याचें विशेष्य 'परदेवते'. १२. तुझीं चरणकमलें. १३. तृप्त व्हा. १४. वणव्यानें पीडिलेल्यास. १५. अमृताचा वर्षाव. १६. शान्यातें. **अर्थांतरन्यास. सुभाषित.** १७. गुप्त. १८. पूर्वींचीच, मूळचीच. १९. **वृत्त्यनुप्रास**. २०. विधीनें. २१. दैवीं. **अर्थांतरन्यास**. २२. सद्गुणांनीं युक्त. २३. शिवभक्ताच्या यशोरूप अमृतसागरांत. २४. रामसुतानें. २५. श्रीगंगेसारखी. २६. पवित्रता.

## अध्याय दहावा.

श्रीमत्सांबशिवाचें, तद्भक्तांचेंहि चरित सेव्य जना.।
हें अमृत स्रवत्याही,[1] ताप हरुनि, तुच्छ करितसे व्यजना.[2] ॥ १
होता अवंतिदेशीं ब्राह्मण नामेंकरूनि मंदर तो, ।
त्या तद्दैव म्हणे,[3] 'हा विषयांतें प्रेम धरुनि मंदें[4] रतो'. ॥ २
सर्व स्वधर्म सोडुनि, तो वेश्या पिंगलेसिं हो रमला. ।
भ्रमला मंदर गणिकागेहीं,[5] अलि[6] सारसीं[7] तसा गमला. ॥ ३
अति सदय ऋषभनामा शिवयोगी सहज मंदिरा[8] आला, ।
झाला प्रमुदित[9] मंदर, पूजी गणिकासह स्वयें त्याला. ॥ ४
परमाद्भुत[10] योगिचरण सन्मणि[11] करणार विगळाला[12] हे, ।
पूजुनि सुकृत[13] विपुल तो द्विज मंदर, तीहि पिंगळा, लाहे. ॥ ५
निजचरणरजें[14] लज्जित बहु चिंतास्पर्शपूर्वमणि[15] केला, ।
ऋषभें रात्रि वसुनि शुचि[16] विप्राला करुनि, त्याहि गणिकेला. ॥ ६
त्यांउपरि[17] आयु[18] सरतां ब्राह्मण, वेश्याहि पावली मरण, ।
परिसा, मंदर कैसा तरला पूजूनि साधुचे चरण. ॥ ७
होता दशार्णभूपति तो नामें वज्रबाहु, तज्जाया[19] ।
सुमति, तिच्या गर्भीं ये, कर्में असुखीं सुखींहि मज्जाया.[20] ॥ ८
त्या सुमतिस सवतींनीं, न धरुनि कोपीं,[21] दिलें विष मराया, ।
कर्म न कळे प्रियहि, तें, जें बहु संपादिलें विषम[22] राया. ॥ ९
ती घोरहि[23] विष भक्षुनि महिषी[24] मेली न दैवयोगानें, ।
परि पावे मरणाहुनि अतिदुःसह दुःख विषजरोगानें.[25] ॥ १०
कष्टें[26] पुत्र प्रसवे ज्येष्ठस्त्री वज्रबाहुची काळीं,[27] ।
विषयोगें व्रण[28] झाले देहीं, तैसेचि त्या तिच्या बाळीं.[29] ॥ ११
रात्रिदिवस बाळ रडे, ती सुमतिहि उग्र[30] दुःख साहेना, ।

---

१. अमृत स्रवणाऱ्यालाही. याचें विशेष्य 'व्यजना'. २. पंख्यास. **प्रतीप.** ३. **चेतनगुणोक्ति.** ४ जड, अज्ञान. ५. वेश्येच्या घरीं. ६. भ्रमर. ७. कमळामध्यें. ८. घरास. ९. आनंदित. १०. फार आश्चर्यकारक. ११. चांगलें रत्न. करणार=करणारे, कर्ते. १२. निखाऱ्यास, कोळशास. १३.पुण्य.१४. आपल्या पायधुळीनें.१५. चिंता किंवा स्पर्श हे पूर्वी ज्यांच्या आहेत असा (मणि). म्हणजे चिंतामणि व स्पर्शमणि (परिस).अशा शब्दांवरील कोट्या पंतांच्या काव्यांत बऱ्याच आहेत. **प्रतीप.**१६.शुद्ध. १७. त्यानंतर. १८. आयुष्य. १९. त्याची पत्नी. २०.बुडायास. २१. भयास. २२. प्रतिकूळ. २३. तीव्र. २४. राज्ञी. २५. विषापासून उत्पन्न झालेल्या रोगानें. २६. दुःखानें, संकटानें. २७. योग्य वेळीं. २८. क्षत. २९ मुलाच्या आंगावर. ३०. तीव्र.

राहेना क्षण पीडा, [1]वैद्यशतहि [2]यशउपाय [3]पाहेना. ॥ १२

राजा म्हणे, "न वांचति, न मरतिही, रात्रिदिवस आरडती, ।
न निजों देती कोणा. स्त्री, [4]शिशुहुनि, बहु म्हणोनि '[5]हा' रडती. ॥ १३

मज दुःख पहावेना, आरडणें क्षणहि हें [6]सहावेना, ।
[7]सदनांत रहावेना, [8]उद्वेगें [9]राज्यभर वहावेना. ॥ १४

मी या [10]प्रजावनार्थचि केवल [11]पादपसमान सत्य [12]जितों, ।
[13]अस्वस्थ न होतां, स्त्रीसुत, कठिन करूनि [14]मानस, त्यजितों. ॥ १५

[15]सूता ! वाहोनि रथीं, टाक वनीं मज सुचेचि न [16]परा [17]धी, ।
स्त्रीपुत्रत्यागास्तव [18]धर्मज्ञ सुखें म्हणोत 'अपराधी'". ॥ १६

भर्त्याच्या आज्ञेनें त्यजिली ती [19]सात्मजा वनीं सूतें, ।
[20]भू तें कर्म न साहे, [21]कांपे वदलीच 'हा' असीं [22]भूतें. ॥ १७

त्या राजस्त्रीचें तें दुःख [23]सुदारुण वदेल काय कवी ? ।
नायक विप्रांचा जो शौनक, त्या कठिण सूत आयकवी. ॥ १८

[24]व्याघ्रवृकव्यालांला पाहुनि भ्याली, 'पिशाच' आरडली, ।
[25]निजपूर्वकर्म निंदुनि मूर्छित पडली, म्हणोनि 'हा' रडली. ॥ १९

झाली [26]क्षुधातृषार्ता, [27]क्षतचरणा, अश्रुनीं सती न्हाली, ।
'आली कां न [28]मृति ?' म्हणे, 'माता मज पापिणीस कां [29]व्याली?' २०

[30]भ्रमतां भ्रमतां पावे [31]पद्माकरवैश्यराजनगरातें, ।
तद्दासीनें कथिलें, जें [32]राजकलत्र [33]भाजन [34]गरा, तें. ॥ २१

---

१. शेंकडों वैद्य. २. [रोग्याला बरें करण्यासंबंधीं] यशाची युक्ति. ३. न जाणे. वैद्यशतहि यशउपाय पाहेना म्हणजे शेंकडों वैद्य उपाय करून करून थकले, पण यश मिळण्याचा उपाय त्यांस सांपडला नाहीं. ४. बाळापेक्षां. ५. हाय. ६. सहन करवत नाहीं. ७. घरांत. ८. त्रासामुळें, दगदगीनें. ९. राज्याचें ओझें. १०. प्रजेच्या रक्षणाकरितांच. ११. वृक्षासारखा. १२. जगलों आहें. १३. चिंताग्रस्त, व्याकुळ, दुःखी. १४. मन. १५. सारथ्या ! १६. दुसरी. १७. बुद्धि, मसलत, युक्ति. १८. धर्म जाणणारे. **अनुज्ञा.** १९. पुत्रासह. २०. पृथ्वी. **चेतनोक्तिगर्भोऽत्युक्ति.** २१. भयानें. २२. प्राणी. २३. फार तीव्र. २४. वाघ, लांडगा व सर्प यांस. या अर्धाचा अन्वयः—व्याघ्रवृकव्यालांला पाहुनि भ्याली [व] 'पिशाच' [असें] आरडली. २५. आपलें पूर्वीचें (पूर्वजन्मींचें) कृत्य, प्राक्तन. २६. भूक व तहान यांनीं पिडलेली. २७. पायांस व्रण पडले आहेत अशी. २८. मरण. २९. प्रसवली. ३०. फिरतां फिरतां. ३१. पद्माकर नांवाच्या वैश्यराजाच्या पुरास. ३२. राजस्त्री. कलत्र हा शब्द स्त्रीवाचक असून नपुंसकी आहे. ३३. पात्र. ३४. विषास,

वैश्यवरें[1] वृत्त[2] पुसुनि तोषविली, कन्यका जसी तातें, ।
वाल्मीकि[3] वैश्यसम, परि[4] हे पावे दुःख जें, न सीता तें. ॥ २२
त्या वैश्यगृहीं[5] नृपसुत, सारुनि[6] भोगें कृता[7] अघा[8], मेला; ।
भोगवितां कर्माचें फल, सदयहि विधि[9] कधीं न घांमेला[10]. ॥ २३
सुतशोकें राज्ञीच्या झाला अत्यंत भर विलोपाला[11], ।
पतिस म्हणे 'अजि मज कां विषवेल्लीचा[12] न भरविला पाला ?' ॥ २४
पुत्रासि म्हणे 'त्वांही परदेशीं टाकिली कसी बा ! हे ? ।
आहे युक्तचि[13] तुज हें, पुत्र पित्याच्याचि रीतितें वाहे[14] ! ॥ २५
तोंचि ऋषभ शिवयोगी ताराया शोकसागरीं[15] आला; ।
त्याला तो वैश्येश्वरें[16], शिव समजुनि, सविधि पूजिता झाला. ॥ २६
सुमतिसमीप प्रभु तो बैसोनि करि स्वयें तिला बोध, ।
जेणें भ्रम न टिकावा, लागावा आत्मवस्तुचा[17] शोध. ॥ २७
वत्से ! सत्सेव्य[18] तुज ज्ञानामृत[19] ओपितों, भ्रमीं न टिकें[20], ।
एकचि शाश्वत[21] आत्मा; जन्म, मरण, देह, जाण हें लटिकें[22].' ॥ २८
अध्यात्मरूप[23] ओखद तोखंद[24] तो खदखदां हसायाला ।

---

विषाचें. अन्वयः—जें राजकलत्र गरा भाजन, तें तद्दासीनें कथिलें. अर्थः—ज्या राणीला विष घालण्यांत आलें होतें, तिचें वर्तमान पद्माकर वैश्याच्या दासीनें सांगितलें.

१. वैश्यश्रेष्ठानें. २. वृत्तांत. ३. ऋषिविशेष. श्रीराम वनवासाहून आल्यानंतर, रावणगृहीं सीता राहिली असतांही तिचा त्यानें स्वीकार केला म्हणून अयोध्येंतील लोक दोष देऊं लागले. तो अपवाद टळावा म्हणून रामानें दोहद पुरविण्याच्या निमित्तानें सीतेला वनांत धाडून, तिचा त्याग केला. पुढें ती वाल्मीकीच्या आश्रमांत जाऊन राहिली. तो ऋषि तिच्यावर पित्याप्रमाणें प्रेम करी. या कथेस उद्देशून हें लिहिलें आहे. हाच ऋषि रामायणाचा कर्ता होय. ४. सुमति. **व्यतिरेक.** ५. पद्माकराच्या घरीं. ६ संपवून, पूर्णपणें भोगून. ७. केलेल्या. ८. पातकास. ९. दैव. १०. भ्रमी झाला, कंटाळला. **अर्थांतरन्यास.** हें अर्ध **सुभाषित** आहे. ११. शोकाला. १२. विषाच्या वेलीचा. १३. योग्यच. १४. अनुसरतो. हा चरण **सुभाषित**रूप आहे. सुमतीनें शंका काढून आपणच समाधान केल्यामुळें **आक्षेप.** शिवाय चतुर्थ चरणांत पूर्वीच्या तीन चरणांचें कारण असल्यामुळें **काव्यलिंग.** १५. शोकसमुद्रांत. १६. वैश्यराजा पद्माकर. १७. ब्रह्माचा, आत्मतत्वाचा. १८. साधूंस सेवण्यास योग्य. १९. ज्ञानरूप अमृत. २०. राहूं नको. २१. अक्षय, चिरस्थायी. २२. मिथ्या. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. २३. आत्मज्ञानरूप. २४. आनंदणारा. **अश्वधाटीयमक.**

देता झाला योगी, स्वस्थ प्रळयांतही[1] वसायाला. ॥ २९
परि ती सुमति म्हणे, 'बा! सत्य वदसि सत्सभामत[2] स्वामी! ।
रोगार्ता[3], शोकार्ता[4], स्त्री कीं केवळ जडा[5], गतस्वा[6], मी. ॥ ३०
पतिनें त्यजिली रुग्णा[7] म्हणवुनि, मी न करितांहि अत्याग[8]. ।
पुत्रें सोडविलें. बा! माझा तुज योग्य होय अत्याग[9]. ॥ ३१
द्रवला श्रीशिवयोगी भस्मलव[10] मृतार्भकाननीं[11] घाली, ।
तत्काल तत्प्रभावें[12] गेली[13] ती फिरुनि चेतना[14] आली. ॥ ३२
तो मृत बालक भस्में [15]श्रीशिवमंत्राभिमंत्रितें जीला[16], ।
सेवा घडली होती पूर्वी या ऋषभयोगिची ज्याला. ॥ ३३
नेत्रें[17] उघडुनि सहसा, पाहे प्राशावया शिशु[18] स्तन्य[19]. ।
पाहुनि विस्मित झाला वैश्येश्वर, जन तसाचि जो अन्य. ॥ ३४
बाळातें आलिंगुनि राज्ञी आनंदली, म्हणे, 'धन्या ।
अन्या[20] मत्सम नाहीं, बापा! त्वां तारिली भली कन्या. ॥ ३५
पुनरपि भस्म सुमतिच्या, तत्पुत्राच्या तनूशि[21] तो लावी. ।
दिव्ये[22] तनु पळांत करी, देवीसीं जी विशंक[23] तोलावी. ॥ ३६
जें दिव्यें सुख[24] शचीचें[25], त्याहुनि सुख अधिक शत गुणें[26] लाहे[27], ।
ऋषभाचे पाय धरी, प्रत्युपकृतितें[28] न ती सती पाहे. ॥ ३७
ऋषभ सुमतितें उठवुनि, आश्वासन करुनियां[29], म्हणे हर्षें, ।
'वत्से! वांचसिल सुखें, न जरा[30] स्पर्शेल शाश्वतें[31] वर्षें. ॥ ३८
विश्वीं विख्यात[32] तुझा होइल भद्रायुनाम हा तनय[33], ।
जे शत्रु, तयांकरवीं सति! याचा जोडवील हात[34] नय[35]. ॥ ३९

---

१. कल्पांतींही. २. साधूंच्या सभेस मान्य. 'स' व 'त' च्या आवृत्तीमुळें **छेकानुप्रास.** ३. रोगानें पिडलेली. ४. शोकानें पिडलेली. ५. अज्ञान. ६. जिचें द्रव्य गेलें आहे अशी. ७. रोगी. ८. मोठा अपराध. ९. न टाकणें, स्वीकार. १०. भस्माचा कण. ११. मेलेल्या मुलाच्या तोंडांत. १२. भस्माच्या सामर्थ्यानें. १३. गेलेली. १४. जीवनकला, प्राण. १५. श्रीशिवाच्या मंत्रानें मंत्रिलेल्या. याचें विशेष्य 'भस्म'. १६. वांचला. १७. डोळे. १८. बालक. १९ दुग्ध. २०. दुसरी. २१. देहास. २२. तेजस्वी. २३. बेलाशक, निःसंशय. २४. स्वर्गीचें सुख. २५. इंद्राणीचें. २६ शत पटीनें. २७. लाभे. २८. उपकार फेडण्याच्या उपायाला. २९. धीर देऊन. ३०. म्हातारपण. ३१. अनंत काळ. ३२. प्रसिद्ध. ३३. पुत्र. ३४. हात जोडवणें=शरण आणणें. ३५. नीति. शत्रूंचा हा राजनीतीनें पराभव करील असें न म्हणतां याचा नय शत्रूंकडून हात जोडवील असें वर्णिल्यामुळें **पर्यायोक्त** आणि नयावर सचेतनत्वाचा आरोप केल्यामुळें **चेतनगुणोक्ति.**

हा निज राज्यातें, तव हृदय[1] करायासि थंड, पावेल; ।
पावे जैसा सेकें[2], लाहुनि[3] बहु वृद्धि, मंडपा वेल. ॥ ४०
सद्गुरुक्तोपदेशें[4] जों होय प्राप्तविद्य[5] हा तनय, ।
याचि पुरीं वस वत्से! **पद्माकर वैश्यवर** न हीतनय[6].' ॥ ४१
वांचवुनि भस्मवीर्यें[7] यापरि तो **ऋषभदेव** दोघांतें, ।
तेथुनि, पुसोनि त्यातें, जाय करुनियां यशा[8] अमोघातें[9]. ॥ ४२
लिहिली कथा यथामति[10] श्रीरामसुतें नमूनि साधूंतें; ।
कवि म्हणति, 'सुपद[11] जें, या वर्णुनि **शिवशिव**[12]जनासि, साधूं[13] तें.' ॥ ४३

---

## अध्याय अकरावा.

**चंद्रांगद**[14]नरपतिची पत्नी **सीमंतिनी**, तिची कन्या, ।
जी **पिंगलाभिधाना**, झाली ती **कीर्तिमालिनी** धन्या. ॥ १
**भद्रायु** राजनंदन[15] वाढे **वैश्येश्वरा**[16]चिया गेहीं[17]; ।
सितपक्षीं[18] **चंद्र** जसा; सद्गुणगण[19]ही तयाचिया देहीं[20]. ॥ २
**भद्रायु**चा सखा, जो **वैश्याधिपपुत्र सुनय**नामा, तो. ।
तद्रूप[21]मधु म्हणे, 'मज सेवुनि रंभादि[22] सुनयना मातो[23]'. ॥ ३
**भद्रायु, सुनय**, दोघे **वैश्यवराचे** बहिश्वर[24] प्राण, ।
राजस्त्री धात्री[25] बहु करि तेव्हां योग्य तत्परित्राण[26]. ॥ ४

---

१. चित्त. २. उदकासिंचनानें. ३. पावुनि. या गीतीचा अन्वय—जैसा सेकें बहु वृद्धि **लाहुनि वेल मंडपा पावे, तैसा हा** तव हृदय थंड करायासि निज राज्यातें पावेल. ४. सद्गुरूनें **केलेल्या उपदेशानें**. ५. ज्याला विद्या प्राप्त झाली आहे असा, विद्वान्. ६. त्यक्तनय, अनीतिमान्. ७. भस्माच्या सामर्थ्यानें. ८. कीर्तीस. ९. सफळातें. याचें विशेष्य 'यशा'. १० येथें **छंदोभंग** आहे. 'लिहिली यथामति कथा श्रीरामसुतें,' असा पाठ निर्दोष झाला असता. ११. चांगलें स्थान, मोक्ष. १२. शिवास व शिवभक्तास. १३. मिळवूं. अन्वयः—कवि म्हणति या शिवशिवजनासि वर्णुनि जें सुपद तें साधूं. १४. चंद्रांगदराजाची. १५. राजपुत्र. १६. पद्माकर वैश्यराजाच्या. १७. घरीं. १८. शुद्धपक्षांत. १९. सद्गुणांचा समुदाय. 'वाढे' या क्रियापदाचे कर्ते भद्रायु, चंद्र व सद्गुणगण हे असल्यामुळें **दीपकालंकार.** २०. शरीरीं. २१. त्याचें रूप हेंच मद्य. **रूपक, चेतनगुणोक्ति** आणि **पर्यायोक्त.** २२. रंभादि सुंदर स्त्रिया. २३. माजो. अर्थ—सुनयाचें रूप हेंच मद्य म्हणे कीं रंभाप्रमुख स्त्रिया मला प्राशन करून (=पाहून) उन्मत्त होवोत. म्हणजे रंभादि स्त्रियांसही त्याच्या स्वरूपानें मोहून टाकावें असें तें दिव्य होतें. २४. बाहेर चालणारे. २५. दाई. २६. त्यांचें (भद्रायु व सुनय यांचें) परिपालन.

ते [1]रत्नकनकबंधनमंडित दोघे [2]कुमार [3]नवसांचे, ।
जों जों वाढति, तों तों वैश्यपतिमनीं [4]प्रमोद नव [5]सांचे. ॥ ५

भद्रायुचें [6]उपनयन विनवुनि विप्रांसि वैश्य तो करवी, ।
स्वसुताचेंहि मग करी, त्या [7]पद्मा होय [8]सुमतितोक [9]रवी. ॥ ६

वि[10]नयान्वित [11]गुरुसेवासादर विद्याकळा सुखें शिकले, ।
[12]पिक [13]लेखिले सकल गुण सत्कविंनीं, [14]आम्रवृक्ष ते [15]पिकले. ॥ ७

[16]शिवयोगी सोळाव्या वर्षी ये [17]नृपसुता पहायाला, ।
[18]तच्चरणीं शिर वाहे राज्ञी, पुत्रासि कथि वहायाला. ॥ ८

त्या मातापुत्रांहीं शिवयोगी पूजिला सदाशिवसा, ।
बहु धन्य मानिलें हो ! [19]प्राणप्रदगुरुसमागमें दि[20]वसा. ॥ ९

भद्रायुतें [21]दयार्णव शिवयोगी ऋषभ तो पुसे, 'बापा ! ।
[22]कुशल असे कीं? पावत नाहीं कीं माय हे तुझी [23]तापा ? ॥ १०

शिकलासि कीं सुविद्या? गुरुसेवा करिसि कीं सदा भावें ? ।
स्मरतोसि कीं मला [24]स्वप्राणसख्या गुरुसि ऐकिल्या नांवें?' ॥ ११

ऐसें वदतां गुरुच्या [25]पायांवरि घालुनि स्वतनयातें, ।
सुमति म्हणे, 'गुरुवर्या ! [26]त्वदधिक नाहींच [27]आत्मजन यातें. ॥ १२

हा तव [28]वत्स, स्वामी ! [29]प्राणप्रद तूं पिता खरा याचा ।
या शिष्यातें बोधीं, उपदेश तुझाचि हित करायाचा. ॥ १३

त्यजिला [30]स्वबंधुंनीं हा, झाला केवळ [31]अनाथ, बाळा या ।
पाळाया तूंचि [32]क्षम, याचें [33]दुरदृष्टदुःख [34]टाळाया. ॥ १४

---

१. रत्नें व सोनें यांच्या भूषणांनीं शोभित. २. मुलगे. ३. नवस करून प्राप्त झालेले. ४. आनंद. ५. सांठे. ६ मुंज. ७. कमलास. ८. सुमतीचा मुलगा, भद्रायु. ९. सूर्य. **परंपरितरूपक.** १०. नम्रतेनें युक्त. ११. गुरूच्या सेवेविषयीं आदरयुक्त. १२. कोकिल. १३. मानिले. १४. आंब्याचे वृक्ष. १५. पिकलेले. अन्वयः—सत्कविंनीं ते पिकले आम्रवृक्ष व सकल गुण पिक लेखिले. अर्थ—कवींनीं भद्रायु व सुनय यांस पिकलेले आम्रवृक्ष व त्यांच्या सर्व गुणांस कोकिलत्व मानिलें. **रूपक** व **उत्प्रेक्षा** यांचा संकर. १६. ऋषभ. १७. भद्रायूला. १८. ऋषभाच्या पायीं. १९. प्राणदान देणाऱ्या गुरूच्या सहवासानें. २०. दिवसास. २१. दयासागर. २२. खुशाली, बरें. २३. दुःखास. २४. आपल्या प्राणांच्या मित्राला. २५. पायांवरि घालुनि=नमस्कार करवून. २६. तुझ्याहून अधिक. २७. आप्त. २८. सुत. २९. प्राणदान देणारा. ३०. आप्तांनीं. 'स्वबंधूंनीं त्यजिला' हें अनाथ झाला याचें कारण असल्यामुळें **काव्यलिंग.** ३१. आश्रयरहित. ३२. समर्थ. ३३. दुर्दैवाचें दुःख. **अनुप्रास.** अदृष्ट=दैव. ३४. निवारण करण्यास.

यापरि नमुनि सुमतिनें निजपुत्रहितार्थ[1] विनविला योगी, ।
सांगे सन्मार्ग तया, सुजना या श्रुतिपथासि[2] ती यो[3] गी[4]. ॥ १५
'वत्सा! शाश्वत[5] होय श्रुतितज्ज्ञपुराणकथित[6] जो धर्म, ।
तो सेव्य[7] उभयलोकीं[8], प्राणी तेणेंचि पावतो शर्म[9]. ॥ १६
भज सन्मार्गातें तूं, दैवज्ञांची[10] करूं नको गर्हा[11], ।
स्वप्नींहि देवहेलन[12] न करावें, रीति हे तुला अर्हा[13]. ॥ १७
गोदेवगुरुब्राह्मण यांची तूं भक्ति सर्वकाळ धरीं, ।
चांडाळाहि अतिथिचें पूजन, मानुनि मनांत शंभु, करीं. ॥ १८
त्वां सत्य न त्यजावें, मानावें प्राणसंकटहि[14] फोल[15], ।
गोब्राम्हण रक्षाया वत्सा! केव्हां असत्यही बोल. ॥ १९
देवद्विजपरवनिता[16], परधन[17], तैसेंचि वस्तु[18] दुर्लभ जें, ।
याची तृष्णा[19] न धरीं, पुण्ययशस्कर[20] असेल, तेंचि भज[21]. ॥ २०
जी सत्कथा, सदागम[22], सद्व्रत[23], सद्धर्म, जें सदाचरण, ।
बा! याची तृष्णा धर, भावें स्मर शंभुचे सदा चरण. ॥ २१
गोविप्रातिथिपूजन[24], स्वाध्याय[25], स्नान, होम, मंत्र, जप, ।
पितृतर्पण, देवार्चन[26], यांतें तूं, आळस त्यजूनि, जप[27]. ॥ २२
बा! कोप, लोभ, शठता[28], असदाग्रह[29], पिशुनता[30], कुटिल[31] भाव, ।
उद्वेग[32], दंभ[33], यत्नें सोडीं; जोडीं महाजनीं[34] ठाव[35]. ॥ २३
तूं क्षत्रधर्मरत[36] जरि, तरि बा! हिंसा[37] करूं नको स्वैर[38], ।
बहु भाषण, परनिंदा, वत्सा! तैसेंचि शुष्क[39] जें वैर. ॥ २४

---

१. आपल्या पुत्राच्या हिताकरितां. २. कर्णमार्गास म्हणजे कर्णी. ३. येवो. ४. वाणी. ५. सनातन, सदोदित टिकणारा. ६. वेद, वेद जाणणारे, व पुराणें यांनीं सांगितलेला. या गीतीपासून ६१ व्या गीतीपर्यंत जो उपदेश केलेला आहे, तो प्रत्येक मनुष्यानें मनन करण्यासारखा आहे. ७. सेवन करण्यास योग्य. ८. स्वर्गी व मृत्युलोकीं. ९. सुख. १०. ज्योतिषाची. ११. निंदा. १२. देवाचा अनादर. १३. योग्य. १४. प्राणावरचें संकट. १५. तुच्छ. १६. देव, ब्राह्मण व परस्त्री. १७. दुसऱ्याचें द्रव्य. १८. पदार्थ. १९. हांव. २०. पुण्यकारक व कीर्तिकारक. २१. स्वीकार, घे. २२. सच्छास्त्र. २३. चांगलें व्रत. **अनुप्रास.** २४. गाय, ब्राह्मण व अतिथि यांचें पूजन. येथें **छंदोभंग** आहे. '°पूजा' हा पाठ निर्दोष झाला असता. २५ अभ्यास. २६. देवपूजा. २७. पाळ, जपत जा. २८. लुच्चेपणा. २९. दुराग्रह. ३०. दुष्टपणा. ३१. वांकडेपणा. ३२. खिन्नता. ३३. ढोंग. ३४. मोठ्या लोकांत. ३५. स्थान. ३६. क्षत्रियांच्या धर्मांत गुंतलेला. ३७. घात. ३८. स्वच्छंदानें. ३९. निष्कारण किंवा वायफळ.

हें न तुवां विसरावें; [1]स्त्रीमृगयाद्यूतपान यांत सदा ।
[2]अत्यासक्ति नसावी, [3]स्त्रीजित [4]अविनीत जे, तशांत कदा. ॥ २५

[5]सुखसंपन्नीं मैत्री, नित्य दया दुःखितीं जनींहि करीं, ।
संतोष पुण्यवंतीं; बा ! [6]औदासीन्य, दुर्मती न धरीं. ॥ २६

[7]अतिपूर्व अतिक्रोध [8]श्रमनिद्राहारभाषणक्रीडा, ।
हे [9]षट्पदार्थ [10]वर्जीं, होयिल यांतें न वर्जितां पीडा. ॥ २७

[11]विद्योत्साह, [12]श्रद्धा, [13]स्मृति, पुण्य, [14]ख्याति, धैर्य हे आधीं, !
[15]अनघा ! [16]मन घालुनियां, [17]अतिपूर्वक षट्पदार्थ तूं [18]साधीं. ॥ २८

[19]सक्रोध हो [20]अरिजनीं, [21]स्वकलत्रीं हो सकाम तूं, बापा ! ।
[22]सुकृप [23]सलोभहि चित्तीं हो, [24]स्वजनाच्या हरावया [25]तापा. ॥ २९

हो [26]द्वेषी [27]पाखंडीं, साधुजनीं हो [28]सराग तूं, बा ! गा ! ।
[29]दुर्मंत्रीं [30]केवलजड, पिशुनोक्तीं [31]बधिर हो [32]महाभागा ! ॥ ३०

[33]नास्तिक, [34]धूर्त, [35]पतित, शठ, [36]षंढ , [37]कितव, [38]चपल, [39]खल, [40]जड, [41]क्रूर, ।
[42]निजकल्याणाकरितां वत्सा ! सोडूनि यांसि दे दूर. ॥ ३१

न करीं [43]निजप्रशंसा, [44]विज्ञातेंगित [45]परां नको होवूं, ।
पुत्रीं, धनीं, कुटुंबीं, बा ! केवल चित्त तूं नको [46]गोवूं. ॥ ३२

जननी, जनक, सती, स्त्री, गुरु, सज्जन, यांचिया [47]वचा साधो ! ।
[48]विश्वासपदाहि धरीं, न अविश्वासें [49]व्यथा तुला बाधो. ॥ ३३

१. स्त्री, शिकार, जुगार व मद्यपान. २. फाजील प्रीति. ३. स्त्रीलंपट. ४. उद्धट. ५. सुखी मनुष्याच्या ठायीं. ६. उदासीनपणा. ७. अति हा शब्द ज्यांच्या पूर्वी आहे असा. ८. श्रम, झोंप, अन्न, भाषण, व खेळ. ९. सहा पदार्थ. १०. सोडून दे. ११. विद्येची हौस. १२. विश्वास. १३. स्मरण. १४. प्रसिद्धि. १५. पवित्रा. १६. मन घालुनियां=मनःपूर्वक. १७. अति आहे पूर्वी ज्यांच्या. १८. मिळव. १९. क्रोधयुक्त. २०. शत्रूच्या ठिकाणीं. २१. आपल्या स्त्रीच्या ठायीं. २२. मोठा दयाळू. २३. लोभी. २४. आप्तांच्या. २५. दुःखास. २६. वैरी. २७. नास्तिक मताच्या ठायीं. २८. प्रीतियुक्त. २९. वाईट मसलतींत. ३०. अगदीं अज्ञान, निर्बुद्ध. ३१. बहिरा. ३२. हे दैवशाली मुला ! ३३. ईश्वर नाहीं असें मानणारा. ३४. लुच्चा. ३५. पापी. ३६. नपुंसक. ३७. कपटी. ३८. चंचल. ३९. दुष्ट. ४०. अज्ञान. ४१. निर्दय. ४२. आपल्या कल्याणाकरितां. ४३. आत्मस्तुति. ४४. आपला अभिप्राय दुसऱ्यास कळला आहे असा. ४५. शत्रूंस. ४६. गुंतवूं. ४७. वचनास. ४८. विश्वासस्थान समज. ४९. पीडा.

सावध[1] सदा असावें संसारीं स्वहितकृत्य[2] लक्षावें[3]. ।
पुरुषार्थाचें[4] साधन बा! धनसें हें शरीर रक्षावें. ॥ ३४
वत्सा! भृत्याचाही[5] तूं निजहृदयीं[6] धरीं न विश्वास. ।
समज मनीं, 'गुरुकथितन्यायें[7] वश[8] मी करीन विश्वास[9].' ॥ ३५
निर्दोष[10] जे तयांची चित्तांत कधीं धरूं नको शंका[11], ।
प्राणहि वेंचुनि रक्षीं वृद्धा, बाळा, सुदुर्बळा[12], रंकां[13]. ॥ ३६
वध्ययोग्यहि[14] अरि[15] येतां शरण, तयातें वधूं नको जाण. ।
शरणागत[16] जो, त्याचे बा! रक्षावेचि सर्वथा[17] प्राण. ॥ ३७
बा! पात्र[18], अपात्र[19] असो; नीचें[20], महत्तम[21] कसाहि हो; पावें; ।
जो याचना[22] करील, स्वशिरहि हर्षें तयासि ओपावें. ॥ ३८
यत्नें कीर्तिच जोडीं, बा! होय पदार्थ हाचि बहु धन्य; ।
राजे, पंडित, यांचें भूषण नाहींच कीर्तिहुनि अन्य. ॥ ३९
सत्कीर्तिप्रभवा[23] श्री[24], पुण्यहि सत्कीर्तिचेंचि बा! तोक[25]; ।
ज्योत्स्नेनें[26] चंद्र जसा शोभे सत्कीर्तिनेंचि हा लोक[27]. ॥ ४०
धन मेळविलें जें हय[28], गज, कांचन[29], रत्नराशि, सत्वरतें; ।
त्या बा! अकीर्ति[30] होतां सोडावें तृणतसेंचि[31] सत्वर तें. ॥ ४१
ताताच्या मातेच्या गुरुच्या नित्य क्षमा करीं रागा[32], ।
आगा[33] निजपुत्राच्या, भूदेवकृतानयाहि[34] तूं बा! गा! ॥ ४२
जेणें, प्रसन्न होइल विप्र, तसें तूं करीं हित तयांचें, ।
हे बुडतां उद्धरिती, बा! गाती यश जगीं वितत[35] यांचें. ॥ ४३
आयुष्य, कीर्ति, यश, बल, पुण्य, द्रव्य, प्रजोन्नति[36] प्राज्य[37], ।
जेणें, तें कर्म करीं. धर्मन्यायेंचि[38] चालतें राज्य. ॥ ४४
अत्वर[39] निद्रे, सत्वर अशनीं[40] हो, शिवयशोमृतें[41] बा! धी[42]. ।

---

१. दक्ष. २. आपल्या हिताचें कृत्य. ३. पहावें. ४. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचें. ५. चाकराचा. ६. आपल्या मनांत. ७. गुरूनें सांगितलेल्या नीतीनें. ८. स्वाधीन. ९. जगास. १०. निष्कलंक. ११. संशय. १२. फार अशक्तांस. १३. गरिबांस. १४. मारण्यास योग्य. १५. शत्रु. १६. शरण आलेला. १७. सर्व प्रकारें. १८. योग्य. १९. अयोग्य. २०. हलका. २१. फार मोठा. २२. प्रार्थना. २३. चांगल्या कीर्तीपासून आहे उत्पत्ति जिची. २४. लक्ष्मी. २५. मूल. २६. चांदण्यानें. २७. मृत्युलोक. २८. घोडे. २९. सोनें. ३०. अपकीर्ति. ३१. गवतासारिखें. ३२. कोपास. ३३. अपराधास. ३४. ब्राह्मणानें केलेल्या अन्यायासहि. ३५. विस्तारलेलें. ३६. प्रजेची भरभराट. ३७. फार. ३८. धर्मनीतीनेंच. **अर्थान्तरन्यास.** ३९. त्वरारहित. ४०. भोजनीं. ४१. शिवकीर्तिरूप अमृतानें. ४२. तृप्त हो.

कोणालाहि न पीडीं, शीघ्र[१] पेराची[२] स्वयें हरीं बाधा. ॥ ४५
बह्वर्थ[३], जनमनोहर[४], स्वल्पाक्षर[५], मधुर, सत्य बोलावें; ।
ज्या सद्वाक्यश्रवणें[६] बुधश्रोत्याचेंचि[७] शिरहि डोलावें. ॥ ४६
संपत्तींत, विपत्तिंत[८] वत्सा! होवूं नको कधीं भ्रांत[९], ।
पापीं, गुरुबहुबोलीं[१०], ब्रह्मकुलीं[११] सर्वकाल हो भीत. ॥ ४७
ज्ञातिसुतबंधुमित्रीं[१२], भार्याजनपंक्ति[१३] यांत समभावें[१४] ।
वर्तावें नित्य तुवां, कीं सर्वांहीं तुझेंचि यश गावें. ॥ ४८
संतांचे अतिहितकर उपदेश, तशाचि पुण्यधर्मकथा[१५], ।
यांतें विमुख[१६] न हो तूं; वत्सा! सोडूं नकोचि भव्यपथा[१७]. ॥ ४९
ब्राह्मणसंकुल[१८], शिवमय, जो तीर्थक्षेत्रपुण्यदेश बरा; ।
त्यांत वसावें कीं **यम** सुस्थानींच्या न भीति दे शबरा[१९]. ॥ ५०
कुलटा, गणिका, कामुक[२०] जेथें बहु नीच जन, तशा स्थानीं ।
राहूं नको क्षणहि, कीं दुर्देशीं[२१] न प्रवर्तती[२२] ज्ञानी. ॥ ५१
ऐकत्रिभुवनपति**शिव**चरणाश्रित[२३] तूं, तथापि सुरें[२४] समज ।
**शं**भुविभूति[२५], भजतया[२६] जाण **ऋ**षभ देतसे स्वसुरस[२७] मज. ॥ ५२
हो[२८] तूं सदा स्थिर, सदा दक्ष, विजित[२९], शांत, विजितषड्वर्ग[३०], ।
**भर्ग**ध्यानरत[३१] सदा; अपवर्ग[३२] मिळेल, मग किति **स्वर्ग**? ॥ ५३

---

१. सत्वर. २. दुसऱ्याची. ३. ज्यांत अर्थ विपुल व खोल आहे असें. ४ लोकांचें मन हरण करणारें. ५. ज्यांत मेजकीं अक्षरें आहेत असें. ६. चांगलें वाक्य ऐकण्यानें. ७. ज्ञाता जो ऐकणारा त्याचें. पुढें जोडाक्षर आल्यामुळें 'ध'स दीर्घत्व आलें पाहिजे होतें, परंतु तेणेंकरून छंदाला एक मात्रा फाजील येत असल्यामुळें, येथें **छंदोभंग** झाला आहे. ८. दारिद्र्यांत. ९. चंचल. १०. गुरु फार बोलले असतां. ११. ब्राह्मणकुलाच्या ठिकाणीं. यमकावरून विचार केला असतां व 'गुरुबहुबोलीं' हा बेडौल शब्द लक्ष्यांत घेतला असतां, या गीतींत कांहीं तरी अपपाठ आहे असा सहज अदमास होतो. मूल श्लोक:—अभीतो भव सर्वत्र संपत्सु च विपत्सु च। भीतो भव ब्रह्मकुले पापे च गुरुशासने ॥. १२. जाति, पुत्र, आप्त व मित्र यांच्या ठिकाणीं. १३. स्त्रियांची पंक्ति. १४. समबुद्धीनें. १५. पुण्यकारक धर्मांच्या कथा. १६. प्रतिकूळ. १७. कल्याणकारक मार्गास. १८. ब्राह्मणांनीं व्याप्त. १९. भिल्लाला, रानवटाला. उत्तरार्धाचा अन्वयार्थ:—त्यांत (=पुण्य देशांत) वसावें कीं (=कारण) यम सुस्थानींच्या (=पुण्यठिकाणीं राहणाऱ्या) शबरा[ही] भीति न दे. २०. कामी. २१. वाईट देशांत. २२. राहतात. २३. एकटा त्रिलोकाचा स्वामी शिव त्याच्या चरणाचा आश्रय केलेला. २४. देव. २५. शंभुमूर्ति. २६. भक्ताला. २७. आपला उत्तम रस. २८. 'तो' असा पाठभेद. २९. जितेंद्रिय (?). ३०. जिंकले आहेत (कामादिक)सहा शत्रू ज्यानें. ३१. शिवध्यानाच्या ठायीं रमलेला. ३२. मोक्ष. **काव्यार्थापत्ति.**

यति[1], विप्र, पुण्य तरु[2], वृष[3], धेनु[4], महत्सर[5], नदी, सतीरत्न[6], ।
निजकुलदैवत[7], गुरुजन, यांच्या नमनीं करीं सदा यत्न. ॥ ५४

आचमन करुनि शुद्ध, ब्राह्ममुहूर्ती[8] उठोनियां, न्हावें; ।
भावें गुरुचरणातें नमुनि, **शि**वातें सदा तुवां ध्यावें. ॥ ५५

**वि**ष्णु, **च**तुर्मुख[9], **ल**क्ष्मी, स्कंद[10], विनायक[11], **उ**मा सती[12], वाणी[13], ।
शक्रादि[14] लोकपति[15], ऋषिवर[16], मेरुप्रमुख[17] नग[18] मनीं आणीं. ॥ ५६

त्वां उदयातें येतां श्रीरविचे[19] किरणचरण[20] वंदावे, ।
दारिद्र्य, दुःख, दुरितध्वंसें[21] प्रारब्धभोग[22] मंदावे ॥ ५७

बा! गंध, पुष्प, फल कीं तांबूल, प्रिय पदार्थ नव[23] सर्व, ।
शर्वनिवेदित[24] सेवीं, बहुमानीं सकल **शं**भुचें पर्व[25]. ॥ ५८

स्नान, जप, ध्यान, तप, स्मृति, होम असें घडेल जें कर्म, ।
सर्व **शि**वासि निवेदीं[26], किंबहुना स्वापजन्यही[27] शर्म[28]. ॥ ५९

पर्यटणभुक्तिभाषणशयनक्रीडेंत[29] सर्वदा साचा ।
प्रेमा[30] **शि**वीं असावा, हाचि महाधर्म[31] सर्व दासाचा. ॥ ६०

रुद्राक्षभस्मधारण[32], **शि**वनामस्मरण, साधुसंग[33], दया, ।
हे भूपविते, म्हणती कवि, 'मणिमय हार[34], मुकुट[34], अंगद[34], या.' ॥ ६१

ऐसा तुज संक्षेपें धर्माचा संग्रह स्वयें युक्त ।
कथिला, अन्य पुराणांमध्यें जो विस्तरें असे उक्त[35]. ॥ ६२

---

## अध्याय बारावा.

'कथितों **शि**वकवच तुला, बा! जेणें सर्व ताप हरपावे[36], ।
ज्यातें देहीं धरितां, विश्वाचा मायबाप **ह**र पावे.' ॥ १

---

१. संन्यासी. २. पवित्र वृक्ष. ३. बैल. ४. गाय. ५. मोठें सरोवर. ६. पतिव्रताश्रेष्ठ. ७. आपल्या कुळाचें दैवत. ८. पहांटेच्या दोन घटका रात्रीं. ९. ब्रह्मदेव. १०. कार्तिकस्वामी. ११. गणपति. १२ पतिव्रता. १३. सरस्वती. १४. इंद्रादिक. १५. लोकपाल. हे आठ आहेत– इंद्रो वन्हिः पितृपतिर्नैऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥ १ ॥ १६. ऋषिश्रेष्ठ. १७. मेरु ज्यांत मुख्य आहेत असे. १८. पर्वत. १९ श्रीसूर्याचे. २०. किरणरूप चरण. २१. पातकाच्या नाशानें. २२. प्राक्तनाचा (=पूर्वजन्मीं केलेल्या कर्माचा) परिणाम. २३. नवीन. २४. शिवास अर्पण केलेले. २५. पर्वणी. २६. अर्पण कर. २७. निद्रेपासून झालेलें. २८. सुख. २९. प्रवास, भोजन, भाषण, झोंप व क्रीडा यांत. ३०. प्रेम. ३१. मोठें कर्तव्य. ३२. रुद्राक्ष व भस्म यांचें धारण. ३३. साधूंची संगति. ३४ रत्नांचे हार, मुगुट व बाहुभूषणें. ३५. सांगितलेला. ३६. नष्ट व्हावे.

भद्रायुला शिवकवच उपदेशुनि ऋषभ मुनि म्हणे, 'बा! हें, ।
वाहें नित्य शरीरीं, शिववर्मे[1] भद्र[2] सर्वदा पाहें.' ॥ २

ऐसें सांगुनि भगवान् दिव्य[3] महानाद[4] शंख दे हातें, ।
तैसाचि खड्ग[5], ज्याचें दर्शन करि भस्म[6] शत्रुदेहातें[7]. ॥ ३

अभिमंत्रुनि भस्म पुन्हा लावी भद्रायुच्या शरीरास, ।
द्वादशसहस्रकुंजरशक्ति[8] तयामाजि तो करी रास[9]. ॥ ४

भस्में पावे तो बल, ऐश्वर्य, धृति[10], स्मृति; क्षणीं[11] शोभे, ।
तेजें शरदर्कतसा[12], त्या पाहुनि दृष्टि सुमतिची लोभे[13]. ॥ ५

अंजलि भद्रायु करी[14], त्यासि म्हणे ऋषभ; "पुत्रका[15]! परिस[16], ।
तूं जिंकिसील समरीं[17] मृत्युसमाही[18] महाबळा[19] अरिस[20]. ॥ ६

मंत्रजपें सिद्धि; महातेजस्वी खड्गराज[21] हा हातीं ।
देखतिल रिपुबळें[22] जीं, भस्मचि होतिल[23] म्हणोनि 'हा[24]! हा!' तीं. ॥ ७

या शंखाच्या ध्वनितें जे श्रवण तुझे अराति[25] करितील, ।
ते त्यजुनि आयुधातें[26], मूर्छित पडतिल, न धैर्य धरितील. ॥ ८

हे दिव्यखड्ग[27], दरवर[28], करितिल परसैन्यघात[29] तत्काळ[30]; ।
स्वबळस्वसहायाचें[31] वाढवितिल शौर्यतेज[32] तत्काळ[33]. ॥ ९

यांच्या तेजें, शैवें[34] कवचें, द्वादशसहस्रहस्तिबळें[35], ।
भस्माच्या सामर्थ्यें, अहितांचें[36] सैन्य जिंकिसील पळें[37]. ॥ १०

१. शिवकवचानें. २. कल्याण. ३. तेजस्वी. ४. मोठ नाद ज्याचा आहे असा. ५. तलवार. हा शब्द पुल्लिंगी आहे. ६. भस्म करि=नष्ट करी. ७. शत्रूंच्या शरीरास. ८. बारा हजार हत्तींची शक्ति. ९. रास करी=सांठवी. १०. धैर्य. ११. क्षणांत. १२. शरदृतूंतील सूर्यासारखा. १३. लुब्ध झाली. १४. अंजलि करी=हात जोडी. १५. पुत्रा. १६. ऐक. १७. युद्धांत. १८. मृत्युसारख्याही. याचें विशेष्य 'अरिस'. १९. मोठ्या बळवानास. २०. शत्रूस. २१. उत्तम खड्ग. २२. शत्रूंचीं सैन्यें. २३. नाश पावतील. २४. हाय हाय. **अतिशयोक्ति.** २५. शत्रू. २६. शस्त्रातें. २७. तेजस्वी तरवार. २८. उत्तम शंख. २९. शत्रूंच्या सैन्याचा घात. ३०. त्याचा मृत्यु. ३१. आपल्या सैन्याचें व मित्राचें. ३२. शूरपणाचें तेज. ३३. तत्क्षणीं. अन्वय–तत्काळ (शत्रूंचे काळच) हे दिव्यखड्ग, दरवर परसैन्यघात करितिल व स्वबळस्वसहायाचें शौर्यतेज वाढवितिल. ३४. शिवाच्या. ३५. बारा हत्तींच्या सामर्थ्यानें. ३६. शत्रूंचें. ३७. पळानें. या गीतींत खड्ग व शंख यांचें तेज, शिवाचें कवच, बारा हजार हत्तींचें बळ व भस्माचें सामर्थ्य, अशा प्रत्येकीं इष्टकार्यसिद्धीस नेण्यास समर्थ असणाऱ्या चारी कारणांचा सद्भाव वर्णिल्यामुळें **समुच्चय.**

षड्वर्गातेंहि भयद होसिल, पक्षींद्र तो जसा अहितें, ।
स्वपित्याचें सिंहासन पावुनि, तूं पाळिसील या महितें." ॥ ११

करुनि प्रसाद यापरि, सिकवी भद्रायुतें ससुमतीतें, ।
तत्पूजित ऋषभ निघे, करि भुवनें यश पिवूनि घुमती तें. ॥ १२

लिहिलें सुयश मयूरें, या हेतु सदाशिवाख्य गोसावी, ।
कीं सद्रसिक हरिजनें स्वपरयशें बहु जगांत पोसावीं. ॥ १३

## अध्याय तेरावा.

भद्रायुचा पिता जो नरनायक वज्रबाहु या नांवें, ।
याचें भाग्य सुकविनीं, शक्राचें जेविं, तेविं वानावें. ॥ १

त्याचा शत्रु मगधपति हेमरथ प्रबळ बहुचमूसहित, ।
वेढुनि, लुटिता झाला सुसमृद्ध दशार्णदेश तो महित. ॥ २

नगरीतें मग वेढी तो मागध हेमरथ, असें पाहे; ।
साहे न वज्रबाहू नृप, सबळ निघे सुधनु करीं वाहे. ॥ ३

बहु मागधदल मर्दी आठउनि मनीं स्वदेश लुटिला तें; ।
वधिताचि धर्मयुद्धीं तेजस्वी वज्रबाहु कुटिलातें. ॥ ४

परि वेढिला परांच्या समरीं तो वज्रबाहु सेनांहीं, ।
त्या रविसमा कराया वांछिति बहु शत्रु राहुसे नाहीं. ॥ ५

कितिकांहीं बळ मथिलें, कोणी हय, सूत मारिला, चाप ।
कोणी खंडी, कोणी खड्ग च्छेदी, न आठवी पाप. ॥ ६

---

१. काम, क्रोध, इत्यादिकांस. २. भय देणारा. याचें विशेष्य 'तूं' (अध्याहृत). ३. गरुड. ४. सर्पास. ५. पृथ्वीते. ६. सुमतीसह. याचें विशेष्य भद्रायुतें. ७. त्यांनी पूजिलेला. ८. विश्वें. ९. गाजती किंवा मोहित होती. १०. सदाशिव नांवाचा. सदाशिव केशव (ऊर्फ बाबूराव) पाध्ये, पन्हाळगडकर, हा पंतांचा गुरुबंधु होय. पुढें अ० २२, गी० ७६ पहा. ११. चांगला रसिक. १२. हरिदासानें. १३. आपलीं व दुसऱ्याचीं यशें. १४. वाढवावी. १५. राजा. १६. इंद्राचें. १७. मगध देशचा राजा. १८. मोठ्या सैन्यासह. १९. सुसंपन्न, भरभराटीस आलेला. २०. प्रसिद्ध. २१. चांगलें धनुष्य. २२. हेमरथाचें सैन्य. २३. नष्ट करी. २४. कुढ्या मार्गानें जाणाऱ्या मागधाला. २५. शत्रूंच्या. २६. युद्धीं. २७. सूर्यासारखे. २८. राहूसारखे. अन्वय—त्या रविसमा शत्रु राहुसे नाहीं कराया वांछिति. अर्थ—त्या सूर्यासारख्या वज्रबाहूला शत्रू राहूसारखे नाशावयास इच्छीत होते. २९. नष्ट. ३०. सैन्य. ३१. सारथी. ३२. धनुष्य. ३३. तोडी. ३४. एकाला अनेकांनीं गांठून मारणें हा अधर्म.

बहुतांहीं विरथ[1] करुनि, धरुनि, हरुनि तेज, बांधिला; दैन्य[2] ।
बहु **वज्रबाहु** पावे[3], **हेमरथा**चें जयें फुगे सैन्य. ॥ ७
जयमत्तें[4] **हेमरथें** अमात्य[5], हतशेष[6] सैन्यही लुटिलें, ।
पुर अंतःपुरहि तसें; धर्म न कांहींच रक्षिला कुटिलें[7]. ॥ ८
चालविला भूप रथीं घालुनि, सर्वस्व[8] हरुनि, देशाला. ।
जन विधिच्या[9], वाताच्या कैसा लंघील तरु[10], निदेशीला[11]? ॥ ९
हें ऐकुनि **भद्रायु** क्षिप्र हयावरि चढे, कढे क्रोधें, ।
**सु**नयसह[12] निघे असिदरकर[13], जो परिपूर्ण गुरुकृतें[14] बोधें. ॥ १०
**भ**द्रायु बहु क्षोभे निःश्रीक[15] **द**शार्णदेश पाहूनी, ।
**मा**गधकटकांत[16] शिरे, मारितचि सुटे परांसि[17] बाहूंनीं[18]. ॥ ११
**शि**ववर्मरक्षिता[19] त्या परशस्त्रांची[20] न ताप दे वृष्टी[21], ।
जेविं सवैरागियातें[22] स्त्रीरत्नाची[23] रसप्लुता[24] दृष्टी. ॥ १२
एक नृप वधुनि समरीं, **भद्रायु** तयाचिया रथीं चढला; ।
**सु**नय तयाचा सारथि झाला, विद्या जपोनि जो पढला. ॥ १३
जैसा सिंह मृगकुलीं[25], शत्रुकुलीं[26] तो तसे करी दणगे[27], ।
ते त्यापुढें टिकावे झटुनि सभाग्यापुढें[28] कसे भणगे[29]? ॥ १४
पुनरपि **हेमरथाचा** खवळुनि बळपतिसमूह[30] करि लगट[31], ।
वाटे सिंधुचि[32] तो त्या राजसुतातें रणांत करिल गट[33]. ॥ १५
तेव्हां कार्मुक[34] ठेवुनि, कोशांतुनि[35] दिव्य खड्ग आकर्षी[36], ।

१. रथरहित. येथें 'रुनि' याच्या आवृत्तीमुळें **अश्वधाटी यमक.** २. दीनता. ३. चढून गेलें. ४. जय मिळाल्यामुळें माजलेल्या. ५. प्रधान. ६. मारून शिल्लक राहिलेलें. ७. वांकड्यानें, अधर्म्यानें. ८. सर्व द्रव्य. ९. दैवाच्या. १०. वृक्ष. ११. आज्ञेला. हें अर्ध **सुभाषित**-रूप आहे. **अर्थान्तरन्यास** व **दीपक.** १२. वैश्यपुत्रासह. १३. तरवार व शंख ज्याच्या हातांत आहे असा. १४. गुरूनें केलेल्या. १५. संपत्तिहीन. १६. मागधराजाच्या सैन्यांत. १७. शत्रूंस. १८. हातांनीं. १९. शिवकवचानें ज्याचें रक्षण केलें आहे अशा. पाठभेदः—शिववर्म रक्षितां. २०. शत्रूंच्या शस्त्रांची. २१. वर्षाव. २२. विरक्ताला. २३. उत्तम स्त्रीची. २४. शृंगाररसयुक्त. २५. हरिणसमुदायांत. २६. शत्रूंच्या समूहांत. २७. दणदणाट. पाठभेदः—तसें करी दणगें. २८. भाग्यवानापुढें. २९. भिकारी. पाठभेदः—कसें भणगें. या गीतींत **उपमा, प्रश्न** आणि **अर्थान्तरन्यास** हे अलंकार आहेत. ३०. सेनापतींचा समुदाय. ३१. लगट करि=भिडला. ३२. समुद्रच. **उत्प्रेक्षा.** ३३. गट करिल=गिळून टाकील. ३४. धनुष्य. ३५. म्यानांतून. ३६. बाहेर काढी.

त्या पाहुनि अरि मेले, तें देखुनि हृष्ट[1] होय नाकर्षी[2]. ॥ १६
जें तेज रुद्रनयनीं[3], तेंचि धरी तो कराल[4] करवाल[5]. ।
जाणों[6] हांसोनि म्हणे, 'काय मजपुढें कराल, करवाल?' ॥ १७
जे जे शत्रु पहाती रणरंगीं[7] झळकल्या तया असितें[8], ।
ते ते क्षणांत मरती, सर्वांचीं जाहलीं मुखें असितें[9]. ॥ १८
जैसे पतंग पावुनि सहसा प्रज्वलितवन्हितें[10] मरती, ।
परवीर[11] तसेचि रणीं; कोणी न तया महासितें[12] तरती. ॥ १९
मग सर्व शत्रुसैन्यें नाशाया दिव्य शंख वाजविला, ।
मूर्च्छित करुनि सकल रिपु, तेणें कल्पांतमेघ[13] लाजविला. ॥ २०
अश्वगजरथारूढ[14] प्रबलासि[15] समग्र[16] दररवें[17] खचले[18]. ।
गरुडापुढें फणीचें[19], शत्रूचें बल तयापुढें न चले. ॥ २१
न वधी, मृत मानुनि अरिसैन्या[20] मूढा, निरायुधा[21], त्यातें. ।
पाहुनि सत्व[22], विनविती मुनि हा व्हाया चिरायु[23] धात्यातें[24]. ॥ २२
तातातें मुक्त करी, पौरसचिवदारसहित[25] मातांतें, ।
ससचिव[26] हेमरथातें धरि, यश निववी कवींस गातां तें. ॥ २३
सर्वस्व स्वपित्याचें, हेमरथाचेंहि रत्नमात्र[27] हरी. ।
स्वयश श्रवण करित तो निजजनकपुरीं[28] सुखें प्रवेश करी. ॥ २४
सचिव, चमूपति[29], पुरंजन[30] गेले होते पळोनि जे भग्न[31], ।
येउनि, कुमारविक्रम[32] पाहुनि, झाले महासुखीं मग्न[33]. ॥ २५
वज्रभुजादिक म्हणती, 'हा देव स्पष्ट पावला गावा, ।
आम्ही मृत वांचविले; याच्या चरणींच भाव लागावा. ॥ २६

---

१. आनंदित. २. नारद. ३. शिवाच्या नेत्रांत. ४. भयंकर. ५. तरवार. ६. **उत्प्रेक्षा.** ७. युद्धभूमीवर. ८. तरवारीस. ९. काळीं. १०. भडकलेल्या अग्नीतें. ११. शत्रूचे वीर. १२. मोठ्या तरवारीस. चतुर्थ चरणाचा अन्वय—तया महासितें कोणी न तरती. अर्थ—त्या मोठ्या तरवारीच्या तडाक्यांतून कोणीही वांचलें नाहीं. १३. प्रळयकाळचा मेघ. **प्रतीप.** १४. घोडे, हत्ती व रथ यांवर बसलेले. १५. बळकट आहे तरवार ज्यांची ते. १६. सर्व. १७. शंखाच्या नादानें. १८. हातपाय गाळून पडले, भिऊन गेले. १९. सर्पाचें. २०. शत्रूच्या सैन्यास. २१. शस्त्ररहितास. याचें विशेष्य 'अरिसैन्या.' २२. खरेंपण, चांगुलपण. २३. चिरंजीव. २४. ब्रह्मदेवातें. २५. नागरिक, प्रधान व स्त्रिया यांसह. २६. प्रधानासह. २७. सर्व उत्तम वस्तू. पहा:—जातौ जातौ यद् उत्कृष्टं तद् **रत्नम्** अभिधीयते ॥ मल्लिनाथ. **अनुप्रास.** २८. आपल्या बापाच्या नगरांत. २९. सेनापति. ३०. नागरिक. ३१. पराजय पावलेले. ३२. मुलाचा पराक्रम. ३३. गढून गेलेले.

हा होय **सिद्ध** कोणी, किंवा करुणासमुद्र हा [1]अमर, ।  
याचें कर्म [2]अमानुष; [3]अत्यद्भुतरूप होय हा [4]समर. ॥ २७

बहुधा याची माता **गौरी**, श्रीशंभु तात, हा [5]**स्वामी**; ।  
[6]याच्या मग्ना झाल्या [7]दश कीं [8]अक्षौहिणी [6]महाधामीं. ॥ २८

करुनि असें [9]**ऋषभवरें** [10]आत्मजनाच्या विपत्तिचें [11]शमन, ।  
तो **भद्रायु** मग करी त्या स्वपित्या **वज्रबाहु**तें नमन. ॥ २९

पुत्र असें [12]नेणे, परि आलिंगुनि सुदृढ [13]महिवरें [14]शतदा, ।  
होउनि [15]उपकारार्णवमग्न, पुसे त्यासि [16]महिवरेश [17]तदा. ॥ ३०

'गंधर्व, देव, कीं तूं योगी[18]श्वर, कोण ? सत्य सांग मला, ।  
[19]हरिला **ग**[20]**ं**जवरसा [21]हो तुज तारायासि योग्य कां गमला? ॥ ३१

बापा! तव [22]साधुत्वें धालों, झालोंचि आजि वेडा, या ।  
उपकारातें [23]अक्षम [24]जन्मसहस्रेंकरूनि फेडाया. ॥ ३२

माता, तात, स्वकुल, स्थान मला सांग, हें तुझें राज्य, ।  
त्वां अमृत [25]शवीं किंवा विझतां [26]दहनांत सिंचिलें [27]आज्य. ॥ ३३

ध्यावें **ह**रिचें तैसें भव्य तुझें नाम, काय ? बा! सांग, ।  
[28]द्विषदर्णवांत आम्हां कोणालाही न [29]लागतां [30]थांग.' ॥ ३४

त्यासि [31]कुमार म्हणे, 'हा [32]वैश्याधिप पुत्र **सुनय** या नांवें, ।  
माझा परम सखा, या [33]स्वप्राणाहूनि अधिक मानावें. ॥ ३५

या **सुनयाच्या** [34]सदनीं मातेसह बहुतकाल मी वसतों, ।  
[35]प्रेमरसचि अधिक असे, न असा [36]बहुमत बुधा [37]सुधारस तो. ॥ ३६

---

१. देव. **संदेहालंकार.** २. मनुष्याचें नव्हे तें, अलौकिक. ३. फार आश्चर्यकारक ज्याचें रूप असा. याचें विशेष्य 'समर'. ४. युद्ध. येथें हा शब्द पुल्लिंगी आहे. ५. कार्तिकस्वामी. ६. याच्या अंगच्या विलक्षण तेजांत. ७. दहा. ८. रथ २१८७०, हत्ती २१८७०, घोडे ६५६१० व पायदळ १०९३५०. एवढ्या सैन्यास अक्षौहिणी म्हणतात. ९. ऋषभ ऋषीच्या आशीवार्दानें. १०. आपल्या लोकांच्या. ११. निरसन. १२. न जाणे. १३. वज्रबाहु राजानें. १४. शंभरदा. १५. उपकाररूप समुद्रांत बुडालेला. १६. राजश्रेष्ठ वज्रबाहु. १७. तेव्हां. १८. योगिश्रेष्ठ. १९. श्रीविष्णूला. २०. गजेंद्रासारखा. मागें पृष्ठ ७, टीप २१ पहा. **वाक्योपमा.** २१.वज्रबाहु. २२.चांगुलपणानें. २३.असमर्थ. २४. हजार जन्मांनीं.२५. प्रेतीं. २६. अग्नींत. २७.तूप. **निदर्शना.**२८. शत्रुरूप समुद्रांत. २९. लागला नसेल तर. ३०. शोध. ३१. मुलगा, भद्रायु. ३२. वैश्यराज पद्माकर याचा मुलगा. ३३. **व्यतिरेक.** ३४. घरीं. ३५. प्रेमरूप रस. ३६. फार मान्य. ३७. अमृत. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. **अर्थान्तरन्यास** व **व्यतिरेक.**

**भ**द्रायु नाम माझें, वरकड [1]मद्वृत्त मी पुढें कथिन, ।
निर्भय वस निजनगरीं, जरि अरि उठतिल पुन्हा, तयां मथिन. ॥ ३७

यां शत्रूंतें, माझें येणें जों होय, तों न सोडावें, ।
मोडावें न [2]मन, करुनि पोषण, [3]सद्यश, सुपुण्य जोडावें. ॥ ३८

राया ! प्रेम असों दे, जातों मातेकडेचि [4]तन्नमना, ।
व्हावें गुरुदर्शन मज, [5]सुक्षुधिताच्या जसेंचि अन्न [6]मना.' ॥ ३९

ऐसें वदुनि पित्यातें, पुसुनि **सु**नयसह, निघोनि जाय कवी, ।
**भ**द्रायु वैश्यनगरीं; मातेतें नमुनि सर्व आयकवी. ॥ ४०

आलिंगी पुत्रातें [7]सुचिर **सु**मति [8]साश्रुलोचना माता, ।
तो वैश्यपतिहि भेटे, पूजी, **भ**द्रायुच्या स्तवी ताता. ॥ ४१

[9]स्त्रीपुत्रामात्यसहित **व**ज्रभुज [10]स्वालयीं सुखें राहे, ।
पाहे [11]प्रत्युपकार न, **भ**द्रायुस्मरण [12]घडिघडी वाहे. ॥ ४२

त्या काळीं **शि**वयोगी भेटे **चं**द्रांगदासि, तो याची ।
प्रेमें करि बहुपूजा, जेविं [13]तृषित [14]पांथ [15]तीर्थतोयांची. ॥ ४३

एकांतीं जन्मकथा सांगे **भ**द्रायुची तया धन्या, ।
कर्म अमानुष वर्णी, घडलें नाहींच जें कधीं अन्या. ॥ ४४

**ऋ**षभ म्हणे, '[16]समुचित हा [17]वरें, दे या **की**र्तिमालिनी [18]दुहिता, ।
[19]सुहिता कीर्ति मिळविता पावे, तैसा न [20]सुरभिचा [21]दुहिता.' ॥ ४५

**चं**द्रांगद मान्य करी, 'दिधली **सी**मंतिनी' म्हणे 'तनया, ।
मन या [22]आज्ञाश्रुतिला स्वामी ! लंघुनि, करील कां [23]अनया ?' ॥ ४६

जो [24]सत्पात्रीं कन्यारत्नार्पणभव्यबोध, तो घांस ।
[25]पीयूषाचा भरवुनि, जाय **ऋ**षभमुनि पुसोनि दोघांस. ॥ ४७

१. माझा वृत्तांत. २. मन मोडावें=अंतःकरण दुखवावें. ३. सत्कीर्ति. ४. तिला नमस्कार करण्यास. ५. फार भुकेलेल्याच्या. ६. मनास. ७. फार वेळ. ८. अश्रुयुक्त जिचे डोळे अशी. ९. स्त्री, पुत्र व प्रधान यांसह. १०. आपल्या घरीं. ११. उपकाराची फेड. १२. वारंवार. १३. तान्हेलेला. **वाक्योपमा**. १४. प्रवासी. १५. तीर्थांच्या पाण्याची. १६. योग्य. १७. पति. १८. कन्या. १९. लौकिक संपादन करणारा. २०. कामधेनूचा. **व्यतिरेक**. २१. दोहन करणारा. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. याचा अन्वय–कीर्ति मिळविता सुहिता (खऱ्या हितास) पावे, तैसा सुरभिचा दुहिता न (पावे). २२. आज्ञारूप वेदाला. **निरंगरूपक.** २३. अन्यायास. २४. योग्य वराला उत्तम कन्या देण्याविषयींचा चांगला उपदेश. **निरंगरूपक.** २५. अमृताचा. या गीतीचा अन्वय–जो सत्पात्रीं कन्यारत्नार्पणभव्यबोध तो पीयूषाचा घांस भरवुनि व दोघांस (चंद्रांगद व सीमंतिनी यांस) पुसुनि ऋषभमुनि जाय.

प्रेषुनि[1] सचिवपुरोहित[2], आणुनि नगरीं महोत्सवें[3] धन्या ।
भद्रायुला, दिली ती निषधेंद्रें[4] कीर्तिमालिनी कन्या. ॥ ४८
मग वज्रबाहु नेला नळपौत्रें[5] सचिवयुक्त बाहूनी[6], ।
जावुनि पुढें, उरासीं धरिला आजानुदीर्घ बाहूनीं[7]. ॥ ४९
चंद्रांगदनृपसदनीं[8] वज्रभुज करी प्रवेश, तों पाहे ।
सिंहासनीं समोरचि भद्रायु सदार[9] बैसला आहे. ॥ ५०

तातातें अवलोकुनि[10] भद्रायु सदार ये, धरी पाय, ।
उठवी वज्रभुज, म्हणे, 'बा ! त्वत्साधुत्व[11] मी वदों काय?' ॥ ५१
ऐसें वदत प्रेमें भेटे भद्रायुला न कळल्याला, ।
रोमांचकंचुकातें[12] परि वपु[13] झांकूनि तो सकळ त्याला. । ५२
नळपौत्रासि[14] म्हणे, 'हा सेतु[15] विपत्सागरांत[16] ताराया, ।
या वीरशिरोमणिनें[17] मज दिधलें प्राणदान[18] बा ! राया॥ ५३
याच्या प्रसूसि[19] गातिल त्या, व्याल्या वीर अन्य ज्या माता, ।
चंद्रांगदा! तुझा हा जनकाचातेवि[20] धन्य जामाता. ॥ ५४
कोणा वंशींचा हा, सांगावा मज तुवां, कुमाररमणी[21]? ।
झाली वरदा[22] याच्या मातेला शंभुची उमा रमणी[23].' । ५५

चंद्रांगद एकांतीं वज्रभुजातें म्हणे, 'परिस राया ! ।
कथितों सत्य तुज, तुझा न सरावा भ्रम[24] कधीं, परि सराया[25]. ॥ ५६
टाकविली रोगार्ता[26], ससुता[27], जी त्वां महावनीं[28] भार्या[29], ।
ती पद्माकरवैश्यें स्वसुतासी[30] पाळिली गृहीं आर्या. ॥ ५७

१. पाठवून. २. प्रधान व उपाध्याय. ३. मोठ्या थाटानें. ४. निषध देशचा राजा जो चंद्रांगद त्यानें. ५. नळराजाच्या नातवानें, चंद्रांगदानें. ६. बोलावून. ७. गुडघ्यांपर्यंत लांब अशा हातांनीं. ८. चंद्रांगद राजाच्या वाड्यांत. ९. स्त्रीसह. १०. पाहून. ११. तुझें साधुपण. १२. रोमांचरूप वस्त्रातें. **निरंगरूपक**. १३. शरीर. १४. चंद्रांगदास. १५. पूल. **परंपरितरूपक**. १६. संकटरूप समुद्रांत. १७. वीरश्रेष्ठानें. १८. जीवाचें दान. १९. मातेस. या अर्धाचा अर्थः–ज्या दुसऱ्या वीरांच्या माता असतील, त्या ह्या भद्रायूच्या मातेस गातील. म्हणजे दुसऱ्या वीरपुरुषांच्या आईपेक्षां याची आई श्रेष्ठ होय. २०. जनक राजाच्या [जांवया] सारखा. २१. बालकश्रेष्ठ. २२. वर देणारी. २३. स्त्री. २४. भ्रांति. २५. संपायास. २६. रोगानें पिडलेली. २७. पुत्रासह. २८. घनघोर अरण्यांत. २९. स्त्री. ३०. आपल्या कन्येसारखी.

तेथें [1]दारुणरोगग्रस्त त्वत्पुत्र पावला मरण, ।
तेव्हां [2]पूर्वभवार्चित शिवयोगी ऋषभ [3]दाखवी चरण. ॥ ५८
तेणें मृत वांचविला, प्रेमें भद्रायु ठेविलें नाम, ।
सुमति तुझी [4]महिषी ही केली [5]आरोग्यसद्गुणा [6]धाम. ॥ ५९
[7]द्वादशसहस्रगजबळ, [8]अहितांच्या [9]खड्गदर दिले शमना, ।
भद्रायुच्या न व्हावा श्रम [10]अमरपराभवींहि [11]लेशें मना. ॥ ६०
मथिल [12]शिवकवचरक्षित तव सुत भद्रायु [13]अहितकोटींतें. ।
जें [14]गिरिशीं [15]ऋषभार्पित भस्माच्या [16]दिव्यें तेज पोटीं तें. ॥ ६१
हा झाला प्राप्त मला [17]बहुभाग्यें [18]पुण्यकीर्ति [19]जामाता, ।
न्यावा भद्रायु गृहीं, त्वां याची सुमति [20]सुव्रता माता.' ॥ ६२
ऐसें सांगुनि राजा [21]नैषध [22]अंतर्गृहांत जी होती, ।
सुमति [23]शचीसी [24]भव्या आणवुनि तयासि दाखवी तो ती. ॥ ६३
तेव्हां निजकर्मातें निंदी बहु वज्रबाहु तो, लाजे; ।
स्वमनीं म्हणे, 'खरे ते, [25]अविवेका म्हणति राहु तोला जे.' ॥ ६४
आलिंगी पुत्रातें भूप [26]भुजंग जेविं [27]चंदनागातें. ।
[28]कविशत [29]तापहरत्वें तैसेंचि [30]गुणाढ्य नंदना गातें. ॥ ६५
हर्षे दशार्णपति बहु, वर्षे [31]प्रेमाश्रु; [32]रसिकें [33]सत्कृतितें, ।
तेविं दृढ धरी हृदयीं! [34]महिषीतें, करि [35]यथार्थ सत्कृतितें. ॥ ६६

---

१. भयंकर रोगानें ग्रासलेला. २. पूर्वजन्मीं पूजिलेला. ३. चरण दाखवी=प्राप्त झाला, दर्शन देता झाला. ४. राणी. ५. निरोगीपणा व सद्गुण यांना. ६. स्थान. ७. बाराहजार हत्तींचें सामर्थ्य. ८. शत्रूंच्या. ९. तरवार व शंख. १०. देवांचा पराभव करितांनाही. ११. किंचित्. १२. शिवकवचानें रक्षिलेला. १३. कोटी शत्रूंस. १४. शंकराच्या ठायीं. १५. ऋषभानें दिलेल्या. १६. भव्य, स्वर्गीचें. या अर्धाचा अन्वय–जें दिव्य तेज गिरिशीं (शंकराच्या ठिकाणीं) तें ऋषभार्पित भस्माच्या पोटीं (आहे). १७. मोठ्या दैवानें. १८. पुण्यकारक आहे कीर्ति ज्याची. याचें विशेष्य 'जामाता'. १९. जांवई. २०. पतिव्रता. २१. चंद्रांगद. २२. अंतःपुरांत. २३. इंद्राणी सारखी. २४. सुंदर. २५. अविचाराला. या अर्धाचा अन्वय–(वज्रबाहु) स्वमनीं म्हणे जे अविवेक राहु तोला म्हणति ते खरे. अर्थः–वज्रबाहु मनांत म्हणाला, 'जे अविचाराबरोबर राहूची तुलना करा असें म्हणतात ते खरे.' **उपमा.** २६. सर्प. २७. चंदनवृक्षातें. २८. शेंकडों कवी. २९ दुःख हरण करण्याच्या गुणानें. ३०. गुणी पुत्रास. ३१. आनंदाश्रु. ३२. मर्म जाणणारे, दर्दी, सत्हृदय. ३३. चगल्या ग्रंथास. ३४. राणीस. ३५. योग्य सत्कारास. या गीतीचा अन्वय–दशार्णपति बहु हर्षे प्रेमाश्रु वर्षे. जेविं रसिक सत्कृतितें, तेविं (तो) महिषीतें हृदयीं दृढ धरी व यथार्थ सत्कृतितें करी

चंद्रांगद सचिवांसह सत्कारी[1] वज्रबाहुभूपातें, ।
तत्परिवारातें[2]ही पूर्ण करी, मेघ जेविं कूपातें[3]. ॥ ६७
बहु निवुनि म्हणति, 'लोकीं न मिळाला मदितरा[4] असा व्याही.' ।
वाटे सुविरक्तजना[5] संपत्ति अशा सदा असाव्याही. ॥ ६८
पाहुनि आदर नव नव, बहुदिन सत्संगलाभ[6] राहुनि घे; ।
सात्मज[7], सदार[8], सस्नुष[9] पुसुनि निषधपतिस वज्रबाहु निघे. ॥ ६९
आला स्वपुरास नृपति, उत्सव निःसीम[10] तत्पुरीं झाला, ।
प्याला हें सुचरित जो, अमृतेंहि न शक्रही तसा धाला[11]. ॥ ७०
वज्रभुज स्वर्गातें गेल्यावरि, धर्मसन्नयें[12] राज्य ।
भद्रायु नृपाल करी, संपादी गुरुवरें[13] यश प्राज्य[14]. ॥ ७१
शिवभक्ताची पूजा करुनि असा धन्य जाहला लोकीं; ।
तोकीं[15] तातसा शिव दासीं, हें चरित सज्जना! घोकीं[16]. ॥ ७२
अद्भुत कथा यथामति लिहिली ही रामनंदनें भावें, ।
शिवभक्त म्हणोत, 'शिवा! करुणाब्धे[17]! या स्वसेवका[18] पावें.' ॥ ७३

## अध्याय चवदावा.

भद्रायु नृप वसंतीं, रम्यवनीं[19] कीर्तिमालिनीसहित ।
क्रीडाया गेला, जो ऋषभवरें भूपमंडळीं[20] मुदित[21]; ॥ १
तेथें दूर व्याघ्रें कांपविले[22] विप्रदंपती[23] पाहे, ।
ते आरडती, म्हणती, 'रक्ष नृपा! व्रतचि[24] हें तुझें आहे.' ॥ २
ऐसें विप्र प्रार्थी, तों व्याघ्र ब्राह्मणीस[25] झडपून, ।

१. आदरी. २. त्याच्या (वज्रबाहूच्या) लवाजम्यास. ३. विहिरीस. ४. माझ्याशिवाय दुसऱ्यास. ५. संसारास विटलेल्या लोकांस. **विभावना.** ६. साधुसंगतीचा लाभ. ७. पुत्रासह. ८. स्त्रीसह. ९. सुनेसह. **अनुप्रास.** या गीतीचा अन्वय–नव नव आदर पाहुनि, बहुदिन राहुनि सत्संगलाभ घे आणि सात्मज, सदार, सस्नुष वज्रबाहु निषधपतिस पुसुनि (स्वपुरीस जाया) निघे. १०. अमर्याद. ११. तृप्त झाला. या अर्धाचा अन्वय–हें सुचरित जो प्याला, तसा (त्यासारखा) अमृतेंहि शक्रही न धाला. ह्या सुकथेचें ज्यानें सेवन केलें तोच खरोखर तृप्त झाला. तसा अमृत पिऊन इंद्रसुद्धां तृप्त झाला नाहीं. **व्यतिरेक.** १२. धर्म व उत्तम नीति यांनीं. १३. गुरूच्या–ऋषभाच्या–आशीर्वादानें. १४. पुष्कळ. १५. मुलावर. १६. पाठ कर. १७. कृपासागरा. १८. आपल्या दासास. १९. सुंदर अरण्यांत. २०. राजांच्या मंडळींत. २१. आनंदित. २२. कांपविलें–असा पाठभेद. २३. ब्राह्मणाचें मेहूण. २४. नेम. २५. ब्राह्मणस्त्रीस.

२४ मो० एफु० भा० ति०

धरिता झाला सहसा तत्कंठ[१] स्वाननांत[२] दडपून[३]. ॥ ३
'हां[४]! नाथ! हां! महेश्वर! हां! शंकर! हां! उमेश! हां! कांत!'
ऐसा, व्याघ्रें धरितां, विप्रस्त्री करि उदंड आक्रांत[५]. ॥ ४
भद्रायु अभय[६] देवुनि शार्दूळीं[७] विशिखवृष्टितें[८] सोडी; ।
बहुतांतुनि एकहि शर[९] न तयाचें एक लोमही[१०] तोडी. ॥ ५
अत्युग्र[११] व्याघ्र हरी, नाशुनियां जोडिलें यश, स्त्रीतें; ।
झटला, परि रक्षाया क्षमला[१२] भद्रायु तो न शस्त्री[१३] तें[१४]. ॥ ६
शार्दूळें स्त्री नेतां विप्र क्षोभे[१५], म्हणे, "कशाला हो! ।
धनु धरिलें? जें न म्हणे, 'शरणागतरक्षणें[१६] यशा[१७] लाहो[१८].' ॥ ७
तव दिव्य खड्ग, शंख, व्यर्थ द्वादशसहस्रगजशक्ती, ।
शिवकवचमंत्रविद्या, शस्त्रास्त्रें, निष्फळचि[१९] शिवभक्ती. ॥ ८
कैसा रे! क्षत्रिय[२०] तूं? तुज न वनांतील वारवे जंतू[२१], ।
धर्मभ्रंश[२२] न घडतां, मृत्यु बरा, हा नव्हे बरा मंतू[२३]. ॥ ९
करिसील काय देहा पोषुनि बहुमांसमेदमज्जा[२४] या? ।
मज्जायावन[२५] न करुनि, वांचसि कां अपयशांत[२६] मज्जाया[२७]? ॥ १०
आर्तत्राणविहीना[२८] मरण बरें जीवितोहुनि[२९] स्पष्ट[३०]." ।
इत्यादि बहु वदे द्विज, पावे भद्रायु ऐकतां कष्ट[३१]. ॥ ११

---

१. तिचा गळा. २. आपल्या तोंडांत. ३. दाबून. ४. खेदार्थी अव्यय. ५. उदंड आक्रांत करि=मोठा आक्रोश करिती झाली. ६. धीर. ७. वाघावर. ८. बाणांच्या वर्षावातें. ९. बाण. १०. केश. ११. फार भयंकर. १२. समर्थ झाला. १३. शस्त्रयुक्त. १४. यश. अन्वय–अत्युग्र व्याघ्र (भद्रायूनें) जोडिलें यश नाशुनियां (ब्राह्मणाच्या) स्त्रीतें हरी. तो शस्त्री भद्रायु झटला, परि तें रक्षाया न क्षमला. १५. कोपला. १६. शरण आलेल्याच्या रक्षणानें. १७. यशास. १८. मिळवो. या गीतीचा अन्वय–शार्दूळें स्त्री नेतां विप्र क्षोभे (व) म्हणे, "जें 'शरणागतरक्षणें यशा लाहो' (असें) न म्हणे (तें) धनु कशाला हो! धरिलें!" १९. व्यर्थ. खड्ग इत्यादिकांचा उत्तरोत्तर उत्कर्ष असल्यामुळें **सारालंकार.** २०. क्षत्रियाची व्याख्या:–क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः ॥ रघुवंश अ० २, श्लोक ५३. २१. जीव, जनावर. २२. कर्तव्यलोप. २३. अपराध. या अर्धाचा भावार्थ:–धर्मभ्रष्ट न होतां मरणें बरें. आणि तूं तर धर्मास मुकला असून जीवंत आहेस, म्हणून हा अपराध बरा नव्हे. **लेशालंकार.** २४. ज्यांत पुष्कळ मास, चरबी व मज्जा आहेत अशा. २५. माझ्या स्त्रीचें रक्षण. **दामयमक.** २६. दुष्कीर्तींत. २७. बुडायास. २८. पीडिलेल्यांचें रक्षण न करणाराला. २९. जगण्याहून. ३०. उघड. ३१. दुःख.

स्वमनांत म्हणे, 'झाला मत्पौरुषकीर्तिनाश कीं सहसा, ।
शोकचि भासेन पुढें, होतों लोकांत मूर्तिमन्महसा. ॥ १२

होतां दैवविपर्यय समयोचित धर्म जाहला नष्ट, ।
कष्ट ज्ञाता भंगें पावे जो, तो न पन्नगें दष्ट. ॥ १३

पुण्य कराया झटतां, उत्कट पातक बळें गळां पडलें, ।
संपद्राज्यायुःक्षय होणार, तरीच हें असें घडलें. ॥ १४

आयुष्य, भाग्य, भोग, स्त्री, पुत्र, द्रव्य हे पदार्थ जसे ।
दैवें पावति उदया, विलयाही पावती क्षणांत तसे. ॥ १५

यास्तव अंतीं संतीं गाया, साधावयासि शुभ लोक, ।
या विप्रातें, प्रियहि प्राण समर्पुनि, करीन गतशोक.' ॥ १६

ऐसा निश्चय करुनि, ब्राह्मणचरणावरि क्षितीश पडे, ।
प्रार्थी बहुदीनपणें; तनुमानस देवुनि प्रसाद घडे. ॥ १७

'विप्रवरा! व्याघ्रहृत स्त्रीच्या आतां शिरों नको शोकीं; ।
या दासीं सकरुण हो असमर्थींही, पिता जसा तोकीं. ॥ १८

देतों इष्टार्थ तुझा, चित्तीं हें वाक्य सत्य आणावें, ।
राज्य, कलत्र, कलेवर, माझें त्वदधीन सर्व जाणावें.' ॥ १९

ब्राह्मण म्हणे, 'भिकारी जो, त्याला कार्य बा! गृहीं काय? ।
मूढास काय पुस्तक? तैसा निस्त्रीक जो म्हणे, 'हाय,' ॥ २०

१. माझा पराक्रम व कीर्ति यांचा नाश. २ एकाएकीं. ३. मूर्तिमंत आनंदासारखा. या अर्धाचा भावार्थ–मी आजपर्यंत लोकांस मूर्तिमंत आनंदासारखा वाटत होतों, परंतु आतां पुढें शोकच भासेन. **विषमालंकार.** ४. दैवाचा व्युत्क्रम, दैवाची उलट, नशीबाची विपरीत गति. ५. प्रसंगास योग्य. ६. (सत्वाच्या) भंगानें. ७. सर्पानें. ८. चावलेला. उत्तरार्धान्वयः–ज्ञाता भंगें जो कष्ट पावे, तो पन्नगें दष्ट [मनुष्य] न पावे. हें अर्ध **सुभाषितरूप** आहे. ९. मोठें. १०. गळां पडणें=पाठीस लागणें. 'धर्म करतां कर्म पाठीशीं लागलें' या म्हणीशीं समानार्थक हें गीत्यर्ध आहे. **विषमालंकार.** ११. संपत्ति, राज्य व आयुष्य यांचा नाश. १२. नाशास. ही गीति **सुभाषित** आहे. १३. साधूंनीं. १४. कल्याणकारक. १५. शोकरहित. या गीतींत **अनुप्रास** आहे. १६. राजा भद्रायु. १७. शरीर व मन. १८. कृपा. **काव्यलिंग.** १९. ब्राह्मणश्रेष्ठा. २०. वाघानें हरण केलेल्या स्त्रीच्या. २१. शोकीं शिरों नको=शोकांत निमग्न होऊं नको. २२. अशक्ताच्या ठायीं. २३. मुलावर. २४. इच्छित पदार्थ. २५. स्त्री. २६. शरीर. २७. तुझ्या ताब्यांत. **सारालंकार.** २८. मूर्खास. २९. ज्याला स्त्री नाहीं असा.

त्यास धनें काय? नृपा! माग म्हणसि, तरि अभुक्तभोगा या।
हतदारा विप्रास स्वस्त्री दे, त्वत्सुकीर्ति हो गाया.॥ २१

भद्रायु म्हणे, 'बा! हा धर्म तुझा काय? उचित मागावें,।
यश जोडावें त्वां, म्यां, ज्या कविंनीं नित्य शुचितमा गावें.॥ २२

देतों मणिकनकातें, राज्यपदातें, क्वचित् स्वदेहातें;।
परदारस्पर्शदुरित ऐसें कोणी न घे, न दे हातें.'॥ २३

'दे स्त्री, समर्थ आहें ब्रह्मवधाद्यखिल पाप वाराया,।
सुतपा मी, ठावें मज, गाधिसुता, त्याहि आपवा राया!॥ २४

उडवीन महापापहि सुतपें, मी सर्वतापसां मान्य;।
मग किति हें परदारस्वीकारोत्पन्न पाप सामान्य?॥ २५

यास्तव दे निजभार्या, धर्माधर्मज्ञ, कुलज तूं नर कीं,।
नाहीं तरि बुडसीलचि, भीतांचें त्राण नें करितां, नरकीं.'॥ २६

भ्याला द्विजवचनें नृप, कीं सत्य, अरक्षणें महादोष,।
चित्तांत म्हणे, 'पत्नीदान बरें, ब्राह्मणासि हो तोष;॥ २७

पत्नीतें पावोनि ब्राह्मण हा फार हर्ष पावेल,।
आपण जळोनि जावें ज्वलनीं, लोकांत कीर्ति राहेल.'॥ २८

भद्रायुमहीपति तो दृढतर निश्चय असा मनीं आणी,।
ज्वलन प्रज्वलित करी, पाणी सोडूनि, दे द्विजा राणी.॥ २९

---

१. द्रव्याचा काय उपयोग. २. ज्यानें विषय भोगले नाहीं अशास. ३. मेली आहे स्त्री ज्याची अशास. ४. आपली स्त्री. ५. तुझी चांगली कीर्ति. २०,२१ या गीतींचें युग्म आहे. यासंबंधानें पुढील श्लोक पाहण्यास योग्य आहे. द्वाभ्यां **युग्म**मिति प्रोक्तं, त्रिभिः श्लोकै**र्विशेषकं । कलापकं** चतुर्भिः, स्यात् तदूर्ध्वं **कुलकं** स्मृतम्॥ ६. अत्यंत पवित्रास. ७. रत्नें व सोनें यांतें. ८. किंबहुना. ९. आपल्या शरीरास. १०. दुसऱ्याच्या स्त्रीस स्पर्श केल्यानें उत्पन्न झालेलें पातक. **अर्थांतरन्यास**. ११. ब्राम्हणवध इत्यादि सर्व. १२. मोठा तपस्वी. १३. विश्वामित्रास. १४. वसिष्ठास. या अर्धाचा अन्वय–राया! मी सुतपा; [हें पापनिवारण] मज, गाधिसुता, त्याहि आपवा, ठावें (आहे). अर्थ–तो ब्राह्मण म्हणाला, 'हे राजा मी मोठा तपस्वी आहें आणि हें पाप कसें वारावें, हें मला, विश्वामित्राला व त्या वसिष्ठालासुद्धां माहीत आहे. मी मोठा तपस्वी आहें हें सांगण्याचा हेतु परस्त्रीस्पर्शापासून मला मुळींच पातक लागणार नाहीं, हा होय. वसिष्ठविश्वामित्र परदारगमनपाप तपोबळानें दूर करिते झाले, हें पुराणप्रसिद्ध आहे. १५. मोठें पातक. १६. सर्व तपस्व्यांस. १७. दुसऱ्याच्या स्त्रीच्या स्वीकारापासून उत्पन्न झालेलें. १८. साधारण, क्षुल्लक, हलकें. **काव्यार्थापत्ति.** १९. आपली पत्नी. २०. धर्म व अधर्म जाणणारा. **काव्यलिंग.** २१. कुलीन. २२. भ्यालेल्याचें. २३. रक्षण. २४. न केल्यामुळें. २५. रक्षण न केल्यानें. २६. मोठें पातक. २७. पाठभेदः– पत्नीदानवरें. २८. अग्नींत. २९. भद्रायुराजा. ३०. प्रदीप्त. **छेकानुप्रास.**

स्नान करुनि, शुचि[1] होउनि, वंदुनि विबुधेश्वरासि[2] तो भावें, ।
पावक[3] उजवा घाली, कीं आपण पात्र सुगतिला व्हावें. ॥ ३०

प्रभातें स्मरुनि[4], नमुनि, **सांबशिव**[5]ध्यान धरुनि, जो इद्ध[6] ।
पावक केला होता, त्यांत शिरायासि जाहला सिद्ध[7]. ॥ ३१

तों प्रकटे भगवान्[8] **शिव**, भक्ता **भ**द्रायुतें करी मुदित[9], ।
जेविं चकोरखगातें[10] पूर्ण शरत्कालचंद्रमा[11] उदित[12]. ॥ ३२

शक्रादि[13] लोकपाळक[14] बहु आले, **नार**दादि नाकर्षी; ।
चुंबक[15] लोहासि[16] तसा स्वजनासि[17] **शिव**प्रसाद[18] ओकर्षी[19]. ॥ ३३

सुर वर्षति पुष्पांतें, गाती गंधर्व, अप्सरा नटती[20]. ।
**भ**द्रायु स्तुति करि जी, **प्र**भुनें सप्रेम[21] ऐकिली चेट[22] ती. ॥ ३४

करितां स्तवन, प्रकट **प्र**भुच्या हृदयांबुजांत[23] होय दया, ।
ऐसें प्रसन्न होउनि बोले सेवककमयूरतोयद[24] या. ॥ ३५

'राजा! भजनें, स्तवनें झालों परितुष्ट[25] मी **म**हेश मनीं, ।
भक्तभवाच्या[26] सालस[27] मच्चरण[28] कधींहि बा! न हो शमनीं[29]. ॥ ३६

भावपरीक्षेकरितां[30] केला छळ, परि कसीं[31] उतरलास; ।
मी भक्तास स्वपदीं[32] करितों सुस्थिर सदा सुतरलास[33]. ॥ ३७

ब्राह्मण तो मीच नृपा! हे **गौ**री ब्राह्मणी, खरें जाण, ।
मायामय[34] शार्दूल, व्यर्थ तुझे म्हणुनि जाहले बाण. ॥ ३८

मागीतली तव स्त्री राया! म्यां धीरता[35] पहायाला, ।
चिर[36] **की**र्तिमालिनीची कीर्ति, तुझी, त्रिभुवनीं[37] रहायाला. ॥ ३९

---

१. शुद्ध. २. देवेश्वरास. ३. अग्नि. ४. 'नि'च्या आवृत्तीमुळें **अनुप्रास**. ५. पार्वतीसह शिवाचें ध्यान. ६. प्रदीप्त. ७. तयार. ८. **भगवान्** याची व्याख्या पुढील श्लोकांत दिली आहे—
उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥ १ ॥
९. आनंदित. १०. चकोरपक्ष्यातें. ११. शरदृतूंतील चंद्र. १२. उगवलेला. १३. इंद्रादिक. १४. हे आठ आहेत. मागें पृ० १७६, टी० १८ पहा. १५. लोहचुंबक. **उपमा.** १६. लोखंडास. १७. आपल्या भक्तास. १८. शिवकृपा. १९. ओढितो. २०. नाचती. २१. प्रेमासह, प्रेमानें. २२. बिनतक्रार, आढेवेढे न घेतां, निमूट. २३. चित्तकमलांत. २४. सेवकरूप मोराचा मेघ. **निरंगरूप.** २५. संतुष्ट. २६. भक्ताच्या संसाराच्या. २७. आळशी. २८. माझे चरण. २९. निरसन करण्याविषयीं. ३०. भक्तीच्या परीक्षेकरितां. ३१. कसीं उतरणें=परीक्षेंत टिकणें, पसंत ठरणें. ही **लोकोक्ति.** ३२. आपल्या स्थानीं. ३३. अत्यंत चंचलास. ३४. मायेचा. ३५. धैर्य. ३६. निरंतर. ३७. तिन्ही लोकांत.

भक्ति तुम्हां दोघांची भव्या[1], झालों प्रसन्न, वर माग, ।
परमाग[2] प्रणताचा[3] मी प्रभु पूर्वाग[4] करिन चरमाग[5].' ॥ ४०
भद्रायु म्हणे, 'दर्शन दिधलें केला प्रसाद हाच वर, ।
शक्राचेंहि, मम यशें पावुनि परिभव, म्हणेल 'हा !' चवर[6]. ॥ ४१
मी, हे राज्ञी, साध्वी मम माता, तात वैश्य पद्मकर, ।
तत्पुत्र सुनय, यांतें देवा ! निजपार्श्वभाग सद्म कर[7].' ॥ ४२
त्या कीर्तिमालिनीतें प्रभु 'माग' म्हणे, 'मनांत जें इष्ट.' ।
जनकातें, जननीतें मागे सान्निध्य[8]; हर्षवी शिष्ट[9]. ॥ ४३
राजातें, राज्ञीतें वरद[10] प्रेमें अधीन होय, मग ।
गुप्तहि[11], कीर्ति करी, कीं गातां श्रोता कधीं न हो यमग[12]. ॥ ४४
भद्रायु, अयुत[13] वर्षें राज्य करुनि, दे पदें[14] स्वतनयातें[15], ।
शिवसन्निधान[16] पावे, गाती व्यासादि साधुजन यातें. ॥ ४५
चंद्रांगद, तज्जाया[17] देवी सीमंतिनीहि, तनुजातें[18] ।
देवुनि पद, शिवलोका पावति, पावोनि धन्यतनु[19] ज्यातें. ॥ ४६
लिहिली कथा यथामति भक्तमयूरें[20] जपोनि आर्यांहीं[21]; ।
गावी, श्रवण करावी, पावाया भुक्ति[22], मुक्ति, आर्यांहीं[23]. ॥ ४७

---

## अध्याय पंधरावा.

ऋषभप्रभाव[24] कथिला. शिवयोगी वामदेव या नांवें, ।
त्याचें भस्माचेंही माहात्म्य अपार[25] किमपि[26] वानावें. ॥ १

---

१. मोठी. २. परम+अग=श्रेष्ठ वृक्ष, कल्पवृक्ष. ३. नम्राचा. ४. पूर्वीचें पातक. ५. शेवटचें पातक. 'पूर्वाग चरमाग करीन' म्हणजे तूं पूर्वी केलेलें पातक शेवटचें करीन. म्हणजे ह्यापुढें तुझ्या हातून पातक घडणार नाहीं. ६. चवरी. यश व चवर हीं पांढरीं मानलीं आहेत. या चरणाचा भावार्थ—माझ्या यशाच्या पांढरेपणापुढें इंद्राच्या चवरीचा पांढरेपणा फिका पडेल. **प्रतीप.** ७. आपल्या सन्निध ठेव. पार्श्व=बाजू. सद्म=घर. ८. सहवास, सामीप्य. 'सामीप्य' किंवा 'समीपता' ही चार मुक्तींपैकीं एक आहे. चार मुक्तीः—सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता. ९. सभ्यांना, शाहण्यांना. १०. वर देणारा. ११. गुप्त होय=अंतर्धान पावे. १२. यमाकडे जाणारा, यमाला अधीन. १३. दहाहजार. १४. राज्यपद. १५. आपल्या पुत्रास. १६. शिवाचा सहवास. १७. त्याची पत्नी. १८. पुत्रातें. १९. धन्य आहे शरीर ज्याचें. २०. भक्त जो मोरोपंत त्यानें. २१. आर्या छंदांनीं. २२. भोग. २३. श्रेष्ठांहीं. २४. ऋषभाचें सामर्थ्य. २५. अनंत. २६. थोडें.

आत्माराम[1], सुनिस्पृह[2], समदर्शन[3], मुनि, दयाकुलस्वांत[4], ।
भस्मोद्धूलितविग्रह[5], वल्कलधर[6], जटिल[7], भैक्षभुक्[8], शांत, ॥ २

साक्षात् **शि**वसा होता, **शि**वयोगी, **वा**मदेव, शिवशील[9]; ।
यत्कीर्ति[10] म्हणे, 'चंद्रा! तशा लोकां किती निवविशील?' ॥ ३

**क्रौं**चारण्यांत तयाप्रति पाहे ब्रह्मराक्षस क्रूर, ।
धावे भक्षाया, परि न चळे योगींद्र तो महाशूर[11]. ॥ ४

भुजदंडांहीं[12] रगडुनि **शि**वयोगी ब्रह्मराक्षसें धरिला, ।
अंगस्पर्शें त्याचा तत्कालचि दोष[13] सर्वही हरिला. ॥ ५

त्या ब्रह्मराक्षसाच्या नाशी योगींद्र पापमोहातें[14], ।
चिंतामणि[15] भव्य[16] करी स्पर्शुनि तत्काळ जेविं [17]लोहातें. ॥ ६

[18]**जं**बूतटिनीसंगें जेविं कनक[19] होय मृत्तिका[20] काची[21], ।
**मा**नसवासें[22] होती हंसाचीतेविं[23] वृत्ति[24] काकाची[25], ॥ ७

[26]कीं अमृताच्या पानें नर होतो देव, हें तसें झालें; ।
**शि**वभक्तांगस्पर्शें[27] शांतत्व[28] ब्रह्मराक्षसा आलें. ॥ ८

सुचिर[29] क्षुधित[30], तृषित[31] जो, तो झाला परम तृप्त, शिवें[32] ल्याला[33], ।
पूर्णानंदत्व[34] तशा मग कां न शिरे पदासि[35] शिवेल्याला? ॥ ९

**शि**वयोगिदेहचर्चितभस्मकणप्राप्त[36] पूत[37] तो स्मरण ।
बहुजन्मांचें पावे, विज्ञप्ति[38] बरी करी, [39]धरी चरण. ॥ १०

---

१. आत्मज्ञानानें ज्यास समाधान झालें आहे असा, स्वानंदमय. २. फार निर्लोभ. ३. समदृष्टि. ४. दयेनें व्याप्त अंतःकरण ज्याचें. ५. ज्याच्या शरीरावर भस्म उधळलें आहे असा. ६. झाडाच्या साली धारण करणारा. ७. जटायुक्त. ८. भिक्षा मागून निर्वाह करणारा. ९. कल्याणकारक ज्याचा स्वभाव आहे असा. २,३ या गीतींचें युग्म आहे. १०. **व्यतिरेकध्वनि.** ११. मोठा पराक्रमी. १२. हाताच्या दंडांनीं. १३. पातक. १४. पाप व अज्ञान यांतें. १५. परीस. १६. बहुमोल. १७. लोखंडास. १८. जंबूनदीच्या संगतीनें. १९. सोनें. २०. माती. २१. कच्ची. २२. मानससरोवरावर वास केल्यानें. २३. हंसाच्या वृत्तीप्रमाणें. २४. वर्तन. २५. कावळ्याची. २६. ७,८ या गीतींचें युग्म आहे. २७. शिवभक्ताच्या अंगाच्या स्पर्शानें. २८. शांतपणा. २९. फार वेळ. ३०. भुकेलेला. ३१. तान्हेलेला. ३२. कल्याण. ३३. स्वीकारता झाला. ३४. पूर्णानंदपण. ३५. पायांस शरण आलेल्याला. ३६. शिवयोग्याच्या शरीरावर लावलेल्या भस्मकणाप्रत पावलेला. ३७. पवित्र झालेला. ३८. विनंति. ३९. शरण गेला.

'बा! करुणामृतसिंधो! शरणागत दीन जाण, तारि मला; ।
प्रणतोद्धारींच सदा, व्हाया यश पीन, जाणता रमला.' ॥ ११

शिवयोगी त्यासि पुसे, 'बा! तूं होतासि कोण? कां गा! या ।
दुर्गतिस पावलास? न संकोचें करीं स्ववृत्त सांगाया.' ॥ १२

राक्षस सांगे, "पूर्वी पंचविसाव्या भवीं कुमति, कामी, ।
क्रोधी, लोभी, 'दुर्जय' या नामें यवनराष्ट्रपति बा! मी. ॥ १३

वर्तत होतों निर्दय, निर्लज्ज, स्वप्रजघ्न मी स्वैर; ।
करिता झालों देवब्राह्मणसर्वस्वहर सदा वैर. ॥ १४

हरिल्या निजराष्ट्रींच्या परराष्ट्रींच्याहि बहु बळें योषा, ।
होते स्वदार बहु, परि तत्संगें पावलों न मी तोषा. ॥ १५

त्रिशत ब्राह्मणभार्या, क्षत्रियदारा चतुःशत, स्वामी! ।
षट्शत वैश्यवधूही हरिल्या, न त्रासलों परस्वा मी. ॥ १६

शूद्रांगनासहस्रक, चांडाली त्रिशत, म्यां त्रपारहितें, ।
पुल्कसवनिता दशशत, शैलूषवधूहि पंचशत, अहितें, ॥ १७

वारांगना असंख्या, सधवा, विधवा, रजस्वला नारी, ।
बहु भोगिल्या बळें म्यां, पातक संपादिलें असें भारी. ॥ १८

नित्य नवी आणावी, जी भुक्ता स्त्री, कधीं न ती मुक्ता; ।
न पुन्हा मजसीं होयिल, इतरांसीं भोगिली कसी युक्ता? १९

---

१. कृपारूप अमृताच्या समुद्रा. २. उद्धर. ३. नम्राच्या उद्धाराविषयींच. ४. पुष्ट. ५. ज्ञाता. **अर्थांतरन्यास.** ६. वाईट अवस्थेस. ७. भीड. ८. जन्मीं. ९. दुष्टबुद्धि. कुमति, कामी इत्यादि विशेपणांच्या सहभावामुळें **समुच्चय.** १०. विषयी. ११. यवनराजा. १२. आपल्या प्रजेची हत्या करणारा. १३. स्वच्छंदानें. १४. देवब्राह्मणांचें सर्व द्रव्य हरणारा. १५. द्वेष. १६. आपल्या राष्ट्रांतल्या. १७. अन्य राष्ट्रांतल्याही. १८. स्त्रिया. १९. आपल्या स्त्रिया. हा शब्द स्त्रीवाचक असून पुल्लिंगी बहुवचनी असतो. २०. संतोष. २१. तीनशें. २२. ब्राह्मणस्त्रिया. २३. क्षत्रियस्त्रिया. २४. चारशें. २५. सहाशें. २६. वैश्यस्त्रिया. २७. कंटाळलों. २८. दुसऱ्याच्या द्रव्यास, परस्त्रींस. २९. हजार शूद्रस्त्रिया. ३०. मांगिणी. ३१. निर्लज्जानें. ३२. पुल्कस हा एक चांडालांतील भेद आहे. ३३. हजार. ३४. नटस्त्रिया. ३५. पांचशें. ३६. दुष्टानें. ३७. वेश्या. ३८. पुष्कळ. ३९. सुवासिनी. ४०. ऋतुमती. ४१. स्त्रिया. १७,१८ या गीतींचें युग्म आहे. ४२. भोगिली. ४३. सोडिली. या गीतीचा अन्वय—(म्यां) नित्य नवी (स्त्री) आणावी. जी स्त्री भुक्ता ती कधीं मुक्ता न. (जी मीं) भोगिली (ती) पुन्हा मजसीं युक्ता न होयिल, (मग) इतरांसीं (युक्ता) कसी होईल?

यापरि करिता झालों तरुणपणीं सत्यधर्मअत्याग, ।
ब्राह्मण पळोनि गेले, केला आप्तें जनेंहि मत्त्याग. ॥ २०

तरुणहि, अनपत्य मग क्षयरोगें फार पीडलों, मेलों, ।
पूर्वज पाडुनि नरकीं, यमधर्माज्ञप्त पाप मी गेलों. ॥ २१

रेतःकुंडीं पचलों अयुतत्रय, मग पिशाच मी झालों, ।
निजपापशेष घेउनि जेव्हां या कर्मभूवरी आलों. ॥ २२

दिव्यशरच्छत निर्जलदेशीं होउनि पिशाच मी भ्रमलों, ।
व्याघ्र, अजगरहि पापें झालों वृक, विड्वराह मी श्रमलों. ॥ २३

मग सरठ, सारमेयहि होउनि, झालों सृगाल बा! नवमीं ।
जन्मीं गवयहि, दशमीं मृग, मर्कट, गृध्र, नकुल हे भव मी ॥ २४

तेरा पावुनि, झालों वायस, मग अच्छभल्ल पापानें, ।
वनकुक्कुट, खर, होउनि मार्जारहि नित्य आर्त तापानें, ॥ २५

मंडूक, कूर्म झालों, मीन, तथा आखु, मी उलूकखग, ।
वनगज, पंचविसाव्या जन्मीं हें ब्रह्मराक्षसत्व मग. ॥ २६

भक्षाया तुज आलों व्याघ्र जसा गांठितो रुरुस खाया, ।
तारक झालासि मला, देता न महासुखा गुरु सखा या. ॥ २७

या ब्रह्मराक्षसत्वीं नित्य निराहारता, क्षुधा भारी, ।
कैंचें अन्न? स्वामी! प्याया शुचि नच कधीं मिळे वारी. ॥ २८

मत्स्मृति वाढविली त्वां, जसि वाढविजे शिखिप्रभा वातें. ।
बा! पावलासि कोणा योगें या अद्भुतप्रभावातें?' ॥ २९

---

१ खऱ्या धर्माविरुद्ध मोठें पातक. येथें संधि अवश्य असून तो केला नाहीं, हा **'संसारहीनत्व'** दोष आहे. 'त्यक्तधर्म अत्याग' असा खरा पाठ असावा. २. माझा त्याग. ३. संततिहीन. ४. यमधर्मानें आज्ञापिलेला. ५. पापी. ६. कढलों. ७. तीस हजार. ८. सर्व कर्मांचा आधार जी पृथ्वी तीवर. ९. देवांचीं शंभर वर्षें. मानवी ३६० वर्षें ह्मणजे १ दिव्य वर्ष. १०. उदकहीन देशांत. ११. लांडगा. १२. गांवडुकर. १३. सरडा. गीति २४, २५ व २६ यांचें **विषेशाक** आहे. मागें, अध्याय १४, गीति २१, येथील टीप पहा. १४. कुत्रा. १५. कोल्हा. १६. गवा. १७. हरिण. १८. माकड. १९. गिधाड. २०. मुंगुस. २१. जन्म. २२. कावळा. २३. अस्वल. २४. रानकोंबडा. २५. गर्दभ. २६. मांजर. २७. पीडित. २८. दुःखानें. २९. बेडूक. ३०. कांसव. ३१. मासा. ३२. त्याप्रमाणें. ३३. उंदीर. ३४. घुबड. ३५. रानहत्ती. ३६. हरिणास. ३७. मोठ्या सुखास. ३८. उपासमार, निरशनता. ३९. भूक. ४०. फार. ४१. स्वच्छ. ४२. पाणी. **काव्यार्थापत्ति**. ४३. माझें स्मरण. ४४. अग्नीचें तेज. ४५. वाऱ्यानें. **उपमा**. ४६. अलौकिक सामर्थ्यास.

शिवभक्त म्हणे, 'जैसा शंभुप्रभुच्या प्रसाद हँसिताचा, ।
समज, प्रभाव अद्भुत जो हा, मद्गात्रलग्न भसिताचा. ॥ ३०
कोण शिवाहून इतर भस्माचें तत्व जाणतो भारी? ।
माहात्म्य जसें प्रभुचें, भसिताचेंही तसेंचि बा! तारी. ॥ ३१
पूर्वी त्वत्सम होता विप्र द्रविडांत सत्पथभ्रष्ट, ।
शठ, तस्कर, वृषलीपति, पापाचा राशि तनुधर स्पष्ट. ॥ ३२
तो दुष्कर्मी रात्रौ शूद्रानें मारिला, असें घडलें, ।
ग्रामबहिर्देशीं त्या पाप्याचें शव तसेंचि तें पडलें. ॥ ३३
भस्मीं लोळुनि, घेउनि वपु गेला त्या शवावरुनि कुतरा, ।
इतुक्यानेंचि सुघोरा संसृति झाली तशासही सुतरा. ॥ ३४
श्रीशिवदूत तयाला न्याया आले विमान आणून, ।
यमदूतातें पिटिती त्याचें अन्यायकर्म जाणून. ॥ ३५
त्यासि यम पुसे, 'याणें केले अतिपातकां न पाहून, ।
नेतां कसे, विमानीं ऐशा नरकोचितासि वाहून?' ॥ ३६
वदले शिवदूत, 'यमा! भस्म पहा या शवाचिया निटिलीं, ।
वक्षीं, भुजयुगमूळीं; याणें निःशेषें पातकें पिटिलीं. ॥ ३७
शंभुनिदेशें आलों, त्या भव्यपदास हा यमा! न्याया, ।
भस्मप्रभाव झाला शिवसाचि सदा सहाय मान्या या.' ॥ ३८
यापरि यमधर्मासीं बोलोनि, शिवस्वरूप शिवदूत ।
विप्र अनामयलोकीं गेले घेऊनि, जो भसितपूत. ॥ ३९
भस्मप्रभाव ऐसा, जेणें अतिपातकीहि नवदे हो; ।

---

१. हास्याचा. २. माझ्या शरिरास चिकटलेल्या भस्माचा. ३. द्रविडदेशांत. ४. सन्मार्गापासून पतन पावलेला. ५. ठक. ६. चोर. ७. चांडालीपति. ८. शरीर धारण करणारा, मूर्तिमंत. ९. रात्रीं. ही 'रात्रि' या शब्दाची संकृतांतील सप्तमी आहे. हें रूप अद्यापही प्रचारांत आहे. १०. गांवाच्या बाहेरच्या भागीं. ११. प्रेत. तसेंचि=दहन किंवा दफन न होतां. १२. शरीर. १३. फार भयंकर. १४. संसार. १५. तरून जाण्यास सोपी. १६. हाकलून देती. १७. केलेल्या. याचें विशेष्य 'अतिपातका'. १८ नरकांत जाण्यास योग्य अशास. १९. कपाळीं. २०. उरःस्थळीं. २१. हात व खांदे यांच्या सांध्यांच्या ठिकाणीं. २२. साफ. २३. शिवाच्या आज्ञेनें. २४. उत्तमस्थानास. २५. शिवासारखें ज्यांचें रूप ते. २६. शिवाचे दास. २७. रोगरहित लोकांत, अखंड आनंदमय अशा शिवलोकीं. २८. भस्मानें पवित्र झालेला. २९. हाय.

बा! स्पर्शलें अकस्मात् तें हें मद्गात्रलग्न तव देहा. ॥ ४०
भस्में त्वेद्भ्रम गेला, जातिस्मर जाहलासि वा समज. ।
मी नित्य चर्चितों हें, याचाचि प्रिय सदैव वास मज. ॥ ४१
तस्मात् सर्वाघांचें संशोधन परम भस्म जाणावें, ।
हें श्रीशंभुविभूषण शिवचि असें त्वन्मनांत बाणावें. ॥ ४२
शिवपूजनांत होतो भस्मातें धरुनि जलजनाभ सितें, ।
बा! चर्चितां शरीरीं, हें करितें साधु खलजना भसित'. ॥ ४३
तो ब्रह्मराक्षस म्हणे, 'वर्णूं कैसें तुतें शिवसमातें? ।
भूदानसुकृत होतें, तेणें हा उगवला दिवस मातें. ॥ ४४
त्या नृपजन्मीं भूमि ब्राह्मणमुख्यास जी दिली होती, ।
झाली सिद्ध कपाटप्रोद्घाटनपटुतरा किली हो! ती. ॥ ४५
वदला यम, 'भूदानें जें, त्या पुण्येंचि साधुसीं युक्त ।
पंचविसाव्या जन्मीं होउनि, होईल हा पुढें मुक्त.' ॥ ४६
होतें पूर्वभवार्जित सुकृत किमपि, तेंचि या फळें फळलें. ।
कळलें, सत्संगेंचि स्वच्छ हृदय होय, जें अघें मळलें. ॥ ४७
भस्म समंत्रक दे मज, विधि याचा सर्व सांग मज बापा! ।
पापापासुनि सोडिव, तव शरणागत न सांपडो तापा. ॥ ४८
त्वादृश सत्पुरुष सकळलोकहितीं रत सदा महामहित, ।
कल्पद्रुमसे दाते श्रितहित इच्छिति, कधींहि न स्वहित.' ॥ ४९
हे सत्कथा यथामति लिहिली रामात्मजें भव तराया, ।
सद्भावें श्रोत्यांत स्वमनांतहि सद्यशें अवतराया. ॥ ५०

---

१. माझ्या शरीरास चिकटलेलें (भस्म). २. तुझी भ्रांति. ३. पूर्वजन्मींची आठवण ज्यास आहे, असा. ४. वा=(१) अथवा, किंबहुना; (२) बा! पाठभेदः—'जाहला शिवा'. ५. लावितों. ६. म्हणून. ७. सर्व पातकांचें. ८. नाश करणारें. ९. श्रीशिवाचें भूषण. १०. ज्याच्या नाभींत कमल आहे तो, श्रीविष्णु. ११. शुभ्र. १२. शिवासारख्यातें. १३. भूमिदान केल्याचें पुण्य. १४. प्राप्त झाला. १५. दार उघडण्याविषयीं अतिशय कुशल. याचें विशेष्य 'किली'. १६. किली. १७. भूमिदानानें. १८. पूर्वजन्मीं संपादिलेलें. १९. थोडें. २०. साधुसंगतीनेंच. २१. पातकानें. **अर्थान्तरन्यास.** हें अर्ध **सुभाषितरूप** आहे. २२. मंत्रासह. २३. संस्कार, नियम. २४. तुझ्यासारखा. २५. सगळ्या लोकांच्या हिताविषयीं. २६. फार प्रसिद्ध. २७. कल्पवृक्षासारखे. २८. सेवकांचें कल्याण. २९. आपलें हित. ३०. संसार. ३१. पाठभेदः—श्रोत्यांतें. ३२. साधूंचीं यशें. ३३. उतरावीं म्हणून, बिंबण्यास्तव.

## अध्याय सोळावा.

श्रीवामदेव सांगे, 'पूर्वी मंदर[1]नगोत्तमीं धामीं[2] ।
होता सुरवरमुनिवरनुत[3] जो कालाग्निरुद्र तो स्वामी. ॥ १

न विसंबति[4] नारदवै[5]श्रवणादि सुभक्तिमाजि[6] रमते[7] ज्या, ।
तक्षकवासुकिकुंडलधर[8] शोभे सूर्यकोटिसमतेजा[9]. ॥ २

प्रभुसि पुसे, मोक्षाचा जो हेतु[10], सनत्कुमार तो धर्म. ।
सांगे भगवान्, पावे श्रवण करुनि सर्व संतसभा[11] शर्म[12]. ॥ ३

अल्पायास[13], महाफल[14] सर्वांचे सर्व दोष हरपावे[15], ।
ऐसें रहस्य[16] पुसतां सांगे, दे त्यासि, दोषहर[17] पावे. ॥ ४

परमेश्वर रुद्र म्हणे, 'मोक्षद[18] धर्मांत धर्म हा भारी, ।
वारी त्रिपुंड्र[19] पापें; सर्वां जीवांसि निश्चयें तारी. ॥ ५

मज नमुनि दग्धगोमयसंभवभस्में[20] त्रिपुंड्र रेखावा[21], ।
बहु अभ्यास न करितां, पुरुषार्थ[22] स्ववश सर्व देखावा. ॥ ६

भस्मत्रिपुंड्रधारण[23] दुस्तरसंसारसागरीं[24] सेतू[25], ।
वत्सा! सनत्कुमारा! सर्वांच्या भुक्तिमुक्तिला[26] हेतू[27]. ॥ ७

भाळीं[28] त्रिपुंड्र ज्याच्या, रुद्राक्ष शिरीं, करीं, गळां काय[29], ।
तो चांडालहि उत्तम, पूज्य, तया मोक्ष सर्वथा होय. ॥ ८

---

१. मंदर नांवाच्या पर्वतश्रेष्ठावर. २. आश्रमांत. ३. देवश्रेष्ठ व ऋषिश्रेष्ठ यांनीं स्तविलेला. ४. विसरति. ५. नारद, कुबेर इत्यादि. येथें **'यतिभंग'** दोष आहे. ६. चांगल्या भक्तींत. ७. रमणारे. ८. तक्षक व वासुकि हींच कुंडलें धारण करणारा, सर्परूप भूषणांनीं अलंकृत. ९. कोटी सूर्यांसारखा तेजस्वी. १०. कारण. ११. साधुमंडळी. १२. सुख. १३. थोडे श्रम ज्यांत असें. १४. मोठें फळ ज्याचें असें. १५. नष्ट व्हावे. १६. गुप्त गोष्ट. १७. पाप नष्ट करणारा. या गीतीचा अन्वय–(जें) अल्पायास, महाफल [व ज्यानें] सर्वांचे सर्व दोष हरपावे, ऐसें रहस्य (कालाग्निरुद्रास) पुसतां, दोषहर त्यासि पावे, सांगे, [व] दे. अर्थ–ज्यापासून थोडे श्रम होतील व मोठें फळ मिळेल व सर्व लोकांचे सर्व दोष नाहींसे होतील अशी गुप्त गोष्ट सनत्कुमारानें त्या कालाग्निरुद्रास विचारिली असतां त्या पापनाशकानें सांगितली व उपदेशिलीहि. १८. मुक्ति देणारा. १९. भस्माचे तीन पट्टे. २०. जळलेल्या गोमयापासून उत्पन्न झालेल्या भस्मानें. २१. लावावा. २२. धर्म, अर्थ, काम व मोक्ष; हे चार पुरुषार्थ. या अर्धाचा भावार्थ–अल्पायासें सर्व पुरुषार्थ साध्य होतील. २३. भस्माचा त्रिपुंड्र धारण करणें. २४. तरून जाण्यास कठीण अशा संसाररूप समुद्रांत. **परंपरितरूपक.** २५. पूल. २६. भोग व मुक्ति यांस. २७. कारण. २८. कपाळीं. २९. येथें कांहींतरी अपपाठ आहे. येथें कदाचित् 'तोय'=(तीर्थ) असा पाठ असावा.

प्राणी त्रिपुंड्रधर जो, यमनियमातें[1] सदैवही जपला, ।
तेपला[2], तीर्थी न्हाला, सप्त[3] महामंत्रकोटिही जपला. ॥ ९
धरिल समंत्र[4] अमंत्रक[5] जो जन भाळीं त्रिपुंड्र, तो धन्य. ।
उद्धरिल सहस्र कुलज[6] झाले[7], भावीहि[8] जे पुढें अन्य. ॥ १०
कोणी[9] त्रिपुंड्रधारी पावेल न देहें[10] सोडितां कष्ट, ।
विधिलोकीं[11], हरिलोकीं[12] राहेल सुखें, न होइल भ्रष्ट. ॥ ११
मग येउनि मल्लोकीं[13], नद जलधिस[14] तेविं, पावणार मला. ।
मद्भक्त इतरलोकीं[15], मित्रगृहीं[16] जेविं पावणा, रमला. ॥ १२
कथिला परमरहस्य, श्रुतिशतसार[17], त्रिपुंड्र बा ! सुघडा[18], ।
श्रद्धाहीनजनीं[19] त्वां न करावा सर्वथैव हा उघडा.' ॥ १३
ऐसें सांगुनि गुप्त प्रभु झाला; त्या दयासुधानिधिचा[20] ।
गात अनुग्रह[21], गेला विधिलोकातें[22] सुपुत्र तो विधिचा[23]. ॥ १४
भस्माच्या संपर्कें[24] झालासि स्वच्छबुद्धि[25], या भाळीं ।
तुझिया त्रिपुंड्र शोभे, जैसा पूर्णामृतांशु[26] आभाळीं[27].' ॥ १५
श्रीशिवयोगी ऐसें बोलुनियां, ब्रह्मराक्षसास बरें[28] ।
अभिमंत्रुनि दे भस्म, स्तविलें तें दान सत्सभेंत बरें[29]. ॥ १६
स्वललाटीं[30] त्या भस्में राक्षस भव्य त्रिपुंड्र तो लावी, ।

१. व्रताचरण व इंद्रियदम यांस. २. तप केलें. ३. सात. या गीतीचा अन्वय—जो त्रिपुंड्रधर प्राणी (तो) यमनियमातें सदैवही जपला, तपला, तीर्थीं न्हाला (व) सप्तमहामंत्रकोटिहि जपला. अर्थ—जो त्रिपुंड्रधारण करणारा प्राणी तो यमनियमांस सदोदित जपला, त्यानें तप केलें, तीर्थांत स्नान केलें व सातकोटी महामंत्राचा जपही केला, म्हणजे त्याला हें सर्व केल्याचें पुण्य लाभलें. ४. मंत्रयुक्त. ५. मंत्ररहित. ६. वंशज. ७. पूर्वीं होऊन गेलेले. ८. पुढें होणारे. ९. या अर्धात **विरोधाभास** आहे. १०. देह सोडितां=मरण पावतां. ११. ब्रह्मलोकीं. १२. विष्णुलोकीं. पाठभेदः—हरलोकीं. १३. माझ्या लोकीं (शिवलोकीं). १४. समुद्रास. **उपमा.** १५. अन्यलोकीं. १६. स्नेह्याच्या घरीं. या अर्धाचा अर्थ—मित्राच्या घरीं रमलेला पावणा ज्याप्रमाणें त्याचे घरीं थोडे दिवस राहतो, त्याप्रमाणें माझा भक्त इतर लोकीं गेला, तरी तेथें तो थोडे दिवस राहतो व माझ्या लोकीं (शिवलोकीं) येऊन अक्षय राहातो. **उपमा.** १७. शंभर वेदांचें तत्व. १८. सोपा. १९. अभाविक लोकांत, अभक्तांत, नास्तिकांत. या अर्धाचा भावार्थ—हा त्रिपुंड्र अभाविक लोकांस तूं अगदीं सांगूं नको. २०. दयारूप अमृताच्या सागराचा. २१. कृपा. २२. ब्रह्मलोकास. २३. विधिचा सुपुत्र=सनत्कुमार. २४. स्पर्शानें. २५. निर्मल आहे बुद्धि ज्याची असा. २६. पूर्ण चंद्र. २७. आकाशांत. २८. हितकर. २९. चांगलें. ३०. आपल्या कपाळीं.

दिव्य द्युतितें पावे, जी रविरुचिशीं विशंक तोलावी. ॥ १७

धरितां **त्रिपुंड्** भाळीं तत्काळ ब्रह्मराक्षसत्व सरे, ।
तो दिव्यमूर्ति होय, द्युति सर्व दिशांत कीर्तिही पसरे. ॥ १८

त्या सद्गुरुतें वंदुनि, दिव्य विमानीं बसोनि हर्षानें, ।
श्री**शिव**लोकीं गेला, पूजित होऊनि पुष्पवर्षानें.' ॥ १९

लिहिली कथा यथामति अतिभव्या **रामनंदनें** रसिकें, ।
कीं हरिहरभक्त म्हणति, 'हेंचि बरें **क**लियुगीं, दुजें न शिकें.' ॥ २०

---

## अध्याय सतरावा.

श्रद्धाचि करितसे हित धर्माचें, जेविं माय तनयाचें; ।
जप, तप, मख, गुरुपूजा, मुख्य श्रद्धाचि आयतन यांचें. ॥ १

श्रद्धेनें भजत्यातें पाषाणहि फलद होय, जो अज्ञ, ।
तोही सद्गुरु होतो; अश्रद्धेनें वृथा महायज्ञ. ॥ २

**स्पष्ट अबद्धहि मंत्र श्रद्धेनें** जपतया जना फळतो; ।
'जैसी श्रद्धा, तैसी सिद्धि,' सुपरमार्थ हा बुधा कळतो. ॥ ३

**पां**चालभूमिपतिचा सुत होता **सिंह**केतु या नांवें; ।
**श**क्राचा **वि**जय जसा, ज्याचें कविनीं गुणत्व वानावें. ॥ ४

तो **सिंह**केतु आत्मज गेला मृगया करावयास वनीं; ।
नानाजातितरुलताबहुपक्षिश्वापदांचिया भवनीं. ॥ ५

१. तेजास. २. सूर्यतेजाशीं. **उपमा.** ३. निःशंक. ४. उत्तमदेहधारी. ५. कांति, चतुर्थचरणाचा अर्थ—त्या ब्रह्मराक्षसाची कांति व कीर्ति सर्व दिशांकडे पसरली. **तुल्ययोगिता.** ६. फुलांच्या वृष्टीनें. ७. या अर्धाचा अर्थ—कारण विष्णु व शिव यांचे भक्त म्हणतात कीं, 'या कलियुगांत हें कथा लिहिणेंच बरें, म्हणून तें शिक दुसरें शिकूं नको'. पाठभेदः—हरिहरभक्ति. ८. निष्ठा, भाव. ९. पुत्राचें. १,२,३ ह्या गीति **सुभाषित**रूप आहेत. १०. यज्ञ. ११. स्थान. १२. जपतप इत्यादिकांचें. १३. भजणाऱ्यास. १४. धोंडाही. १५. फळ देणारे. १६. अज्ञान. १७. व्यर्थ. १८. मोठे यज्ञ. १९. जपणाऱ्यास. २०. फळ देतो. २१. मोठा अर्थ, मोठें तत्त्व. २२. ज्ञात्यास. २३. पांचालराजाचा. २४. अर्जुन. पुढील श्लोकांत अर्जुनाचीं नांवें गोंविलीं आहेत—अर्जुनः फाल्गुनो जिष्णुः किरीटी श्वेतवाहनः । बीभत्सुर्विजयः कृष्णः सव्यसाची धनंजयः ॥ १ ॥ पांडुपुत्र अर्जुन हा कुंतीच्या पोटीं आलेला इंद्राचा अंश होय. इंद्राचा स्वपत्नीच्या ठायीं जन्मास आलेला मुलगा **जयन्त** होय. २५. गुणीपणा. २६. पुत्र. २७. शिकार. २८. पुष्कळजातींचे वृक्ष, वेली, पुष्कळ पक्षी, व श्वापदें यांच्या. २९. घरीं.

त्याचा शंकरनामा भृत्य[1] शबर[2] एक काननीं[3] शिरला, ।
फिरला, तों दिसला बहु जीर्ण[4] प्रासाद[5] भग्न[6] जो चिरला. ॥ ६
तेथें, पीठ[7] जयाचें भग्न, असें लिंग[8] देखिलें पडलें. ।
मूर्त[9]स्वभाग्यदर्शन जाणों सुकृतें[10] पुराकृतें[11] घडलें. ॥ ७
ऋजु[12], सूक्ष्म[13] शंभुलिंग स्वग्रहणप्रेमसार[14] दे शबरा, ।
वाटे, त्याला झाला चिंतामणिलाभ[15], फार देश बरा. ॥ ८
संप्रेरिलीं[16] पुराकृतसुकृतांशोद्भववशें[17] शबर वातें, ।
त्या नृपसुतासि दावी, जें दे हृदयासि[18] तोष[19] बरवा[20], तें. ॥ ९
नमुनि म्हणे, 'प्रभुजी! हें रुचिरें[21] श्रीशंभुलिंग सांपडलें, ।
न कळे, वनांत भग्नप्रासादीं[22] भिन्नपीठ[23] कां पडलें. ॥ १०
सांगा विधि, पूजावें शिवलिंग असें मनांत वाटतसे; ।
मार्गज्ञें[24] उक्त[25] जैसें, पथिकजन[26] धरिति वनांत वाट तसे.' ॥ ११
भूप म्हणे, 'संकल्प[27] प्रथम करावा सदा, मग ध्यान, ।
पाद्याचमनार्घ्यांतीं[28] घालावें निर्मलोदकें[29] स्नान. ॥ १२
गंधाक्षत, नानाविध[30] पुष्पें[31] तरुंचीं[32], तसींच वेलाचीं, ।
घेउनि नाम, वहावीं त्रिदळें निवडूनि रम्य बेलाचीं. ॥ १३
मग धूप, दीप, भावें नैवेद्य, प्रभुसि नमुनि, अर्पावा; ।
शंभु चिताभस्माच्या उपहारें[33]करुनि नित्य तर्पावा[34], ॥ १४

---

१. सेवक. २. भिल्ल. ३. रानांत. ४. जुना. ५. राजवाडा. ६. मोडलेला. ७. आसन. ८. शिवलिंग. ९. मूर्तिमंत आपल्या सुदैवाचें दर्शन. १०. पुण्यें. ११. पूर्वी केलेल्या. याचें विशेष्य 'सुकृतें'. **उत्प्रेक्षा**. १२. सरळ. १३. लहान. १४. आपला स्वीकार करण्याविषयीं अत्यंत आवड. १५. परिसाचा लाभ. या अर्धाचा अन्वय–त्याला (शबराला) चिंतामणिलाभ झाला (म्हणून हा) देश फार बरा वाटे. १६. प्रेरणेनें युक्त केला, स्फुरण पावला, क्रियास्फूर्तीनें भरला. १७. पूर्वी केलेल्या पुण्यांशाच्या उत्पत्तीच्या स्वाधीन अशा. याचें विशेष्य 'वातें'. १८. चित्तास. १९. संतोष. २०. चांगला. २१. मनोहर. २२. मोडलेल्या राजवाड्यांत. २३. ज्याचें आसन फुटलें आहे असें. २४. मार्ग जाणणारानें. २५. ज्याप्रमाणें सांगितलें असेल. २६. प्रवासी लोक. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. २७. कोणतेंही धार्मिक कृत्य करण्यास आरंभ करितांना 'मी अमुक कृत्य करितों,' अशा अर्थाचीं जीं वाक्यें उच्चारितात, त्यांस संकल्प म्हणतात. २८. पाद्य (पाय धुण्यास जें पाणी देतात तें)+आचमन+अर्घ्य (गंध, अक्षत व पुष्प यांनीं युक्त उदक) यांच्या शेवटीं. २९. स्वच्छ पाण्यानें. ३०. पुष्कळ प्रकारचीं. ३१. फुलें. ३२. वृक्षांचीं. ३३. समर्पणानें, नजराण्यानें, भेटीनें. ३४. तृप्त करावा.

प्रीतिकर[1] पदार्थ शिवा न चिताभस्मोपहारसा[2] अन्य[3], ।
प्रेमें पूजन करितां, सर्व प्रभुमुक्त[4] होतसे धन्य. ॥ १५
स्तवन करावें गावें, नाचावें प्रभुपुढें, न लाजावें, ।
स्पष्ट म्हणावें, 'जाइल सोडुनि सर्वस्व[6] जरि मला, जावें'. ॥ १६
सर्वाघाचा[7] होतो, प्रभुची होतां दया, विनाश[8] बरा; ।
मुख्य चिताभस्म, नको अन्य प्रभुला तयाविना[9] शबरा! ॥ १७
रे! शबरा! किंबहुना[10] अंतर[11] पडतां, स्वदेह सोडावा[12]; ।
मोडावा न नियम, दृढ भजनें भगवत्प्रसाद[13] जोडावा'. ॥ १८
ऐसें नृपसुत सांगे परिहासरसें[14], परंतु तें उक्त[15] ।
स्वीकारी; वंदुनि मग जाय गृहीं, होय अर्चनीं[16] युक्त. ॥ १९
स्त्रीसह साधु शबर तो स्वीकृत[17] नियमें, सदा परमहर्षे[18], ।
त्या नृपसुतोक्तविधिनें[19] पूजी श्रीशंभुतें बहुतवर्षे. ॥ २०
एके दिवसीं उघडुनि पाहे जों शैव शबरवर पात्र[20], ।
त्यांत चिताभस्म नसे प्रभुतें अर्पावयास अणुमात्र[21]. ॥ २१
शबर चिताभस्मातें शोधाया दूरवर बहु भ्रमला[22], ।
कोठेंही न मिळालें, आला स्वगृहासि, अतितर श्रमला. ॥ २२
प्राप्तविषाद[23] निर्भोद[24] क्षण निजकर्मासि[25] दोष तो लावी, ।
युक्ति पुसायाकरितां स्वसमीप स्वप्रियेसि बोलावी. ॥ २३
तीतें म्हणे, 'हुडकिली[26], जी नित्य प्रेतैपरिचिता[27], भू[28] ती, ।
आजि[29] माझ्या दुष्कर्मे[30] न मिळाली लेश[31] परि चिताभूती[32]. ॥ २४
काय करावें आतां? श्रीशिवपूजेसि विघ्न[33] कीं झाला, ।
पूजेविना प्रिये! मी वांचेना, मृत्यु सर्वथा आला. ॥ २५

---

१. आवडता. २. चिताभस्माच्या नजराण्यासारखा. ३. पाठभेदः—मान्य. ४. प्रभूनें (शंकरानें) ज्यांस [जन्ममरण दुःखापासून] सोडविलें आहे असे. ५. **अनुप्रास**. ६. सर्वद्रव्य, वैभव, मान इ०. ७. सर्व पातकाचा. ८. नाश. ९. भस्माशिवाय. १०. फार काय सांगावें? ११. न्यून. १२. मरणसुद्धां पत्करावें. १३. ईशकृपा. १४. थट्टेनें. १५. भाषण. १६. पूजनांत निमग्न. १७. स्वीकारलेल्या. १८. मोठ्या आनंदानें. १९. राजपुत्रानें सांगितलेल्या रीतीनें. २०. (भस्माचें) ठाण किंवा भांडें. २१. तिळभर. २२. पाठभेद—श्रमला. २३. खेद प्राप्त झाला आहे ज्यास असा. २४. भिल. **अनुप्रास**. २५. आपल्या दैवास. २६. शोधिली. २७. जींत प्रेतें असतात अशी. परिचिता=भरलेली, खचलेली. २८. भूमि. २९. आज. ३०. दुर्दैवानें. ३१. थोडीही. ३२. चिताभस्म. ३३. संस्कृत संप्रदायानुसार हा शब्द पुल्लिंगी योजिला आहे.

मुख्य चिताभस्मचि कीं, दयिते! तत्प्राप्तिचा उपाय नसे, ।
गृहिणि[1]! **प्र**भुशि वहातों मी पंचप्राण[2] हे उपायनसे[3]. ॥ २६

श्रीगुरुशासन[4]लंघन करणें अपराध सर्वथा खोटा, ।
आगस[5] लक्ष वरकडहि एकिकडे, एक होय हा 'मोटा[6]'. ॥ २७

तेव्हां प्रसन्नचित्तें[7] ऐसें सांगे तयास ती **श**बरी, ।
"मत्तनुभस्म[8] वहावें, करिल तुम्हांवरि दया **स**तीश[9] बरी. ॥ २८

दीप्त[10] करुनि गृह जळत्यें, न चिताभस्मोपहार[11] लोपावा, ।
कोपावा न स्वगुरु; स्वामी! सत्वर म्हणाचि '[12]हो,' पावा[13]". ॥ २९

**श**बर म्हणे, 'गृहिणि! विषय[14] सेवुनि झाली न कामनापूर्ती[15], ।
तरुणी, अनपत्या[16] तूं त्यजिसी सर्वार्थदा[17] कसी 'मूर्ती[18]?' ॥ ३०

स्त्री त्यासि म्हणे, 'यांतचि [19]जीवितसाफल्य, हेंचि जोडावें, ।
इतरार्थ त्यागावें देहें[20], मग[21] **शि**वार्थ कां न सोडावें? ॥ ३१

तुमचें, माझें, तुमच्या, माझ्याहि प्राप्त पुण्य पितरांचें[22]; ।
**शि**वपूजन करित्यांचें सार्थक्य, विलोकित्यांहि[23] इतरांचें'. ॥ ३२

त्या दृढसंकल्पें[24] तो संकल्पा सत्य **श**बर वाखाणी[25], ।
आज्ञा[26] दे वेंचाया[27], समयीं[28] निधि[29] काय न बरवा[30] खाणी. ॥ ३३

स्नाता[31], अलंकृता[32] ती पतितें वंदूनि, पेटवी गेहीं[33]; ।
मग आपणा म्हणे, 'हित[34] दहनें[35], **शि**वातेंच भेटवी गे! हा'. ॥ ३४

---

१. गृहस्वामिणि. २. प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पंचप्राण. ३. नजराण्यासारखे. ४. श्रीगुरूच्या आज्ञेचें उल्लंघन. ५. अपराध. ६. मोठा. ७. आनंदित मनानें. ८. माझ्या शरीराचें भस्म. ९. पार्वतीपति, शिव. १०. प्रज्वलित. ११. चिताभस्माचें समर्पण. अन्वय—(मी) गृह दीप्त करुनि जळत्यें (परंतु) चिताभस्मोपहार न लोपावा व स्वगुरु न कोपावा. स्वामी! पावा व सत्वर हो म्हणाचि. १२. हो म्हणाचि=अनुमोदन द्याच. १३. प्रसन्न व्हा, कृपा करा. १४. भोग. १५. इच्छेची पूर्णता. १६. संततिहीन. १७. सर्व पुरुषार्थ देणारी. १८. देह. १९. जीवाचें सार्थक. २०. शरीर. हा शब्द नपुंसकलिंगी योजिला आहे. २१. **प्रश्नालंकार.** २२. वडिलांचें. २३. पाहत्याहि. २४. दृढनिश्चयानें. २५. स्तवी, वर्णी. २६. परवानगी. २७. [स्वदेह] खर्चीं घालण्याला. २८. योग्य वेळीं. २९. पुरून ठेवलेली धनाची ठेव. ३०. सुज्ञ. **अर्थांतरन्यास** आणि **प्रश्न.** हा चरण **सुभाषित**रूप आहे. ३१. स्नान केलेली. 'त' काराच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** ३२. भूषणें घातलेली. ३३. घरास. ३४. हितकारक, **लेश** व **काव्यलिंग.** ३५. अग्नि. अन्वय—मग (ती शवरी) आपणा म्हणे गे! दहन हित [असे, कीं] हा शिवातेंच भेटवी.

नमुनि, प्रदक्षिण करुनि, दहनातें प्रार्थुनी, विषा[1] दीनें[2]। 
विश्वें जो आठविला, धरिलें तद्ध्यान[3] त्या निषादीनें[4]. ॥ ३५

अनलीं[5] प्रवेश करितां, कर जोडुनि ती म्हणे, 'घडो सेवा, ।
मम इंद्रियें प्रसूनें[6] होउत तुजकारणें महादेवा! ॥ ३६

वपु[7] अगरुधूपकरणें[8], अक्षतहृदयप्रदीप[9] बा! शर्वा[10]! ।
पावो हा[11] जीव विभो! तुझिया पूजेचिया फला सर्वा. ॥ ३७

मज सार्वभौमपद[12], कीं शक्रपद, ब्रह्मपदहि लगेना[13], ।
भागेना[14] सेवेतें दासी ही, अन्य[15] अर्थ मागेना. ॥ ३८

जन्म घडेल पुन्हा, तरि हे[16] हो[17] त्वत्पादसारसीं[18] अलिनी[19], ।
तव भजनेंच असावी हृष्टा[20], रविदर्शनें[21] जसी नलिनी[22]. ॥ ३९

चालो, चालत आला तसाचि, पुढेंहि जन्मनाशपथ[23], ।
शंभो! बा! हे माया न स्पर्शो द्यावि मन्मना[24], शपथ. ॥ ४०

वपुसार्थक[25] हो, राहो न चिताभस्मोपहार, अन्न मनें ।
ध्यावें तेवि तुज, शिवा! त्वच्चरणा[26] शत असोत मन्नमनें[27]'. ॥ ४१

ऐसें प्रभुतें प्रार्थुनि, शबरी दृढनिश्चया शिरे दहनीं[28], ।

१. विषानें. २. याचें विशेष्य 'विश्वें'. ३. त्याची मूर्ति. **पर्यायोक्त.** ४. शबरीनें. या गीतीचा अन्वय–दहनातें नमुनि, प्रदक्षिण करुनि, प्रार्थुनी, विषा दीनें विश्वें जो आठविला तद्ध्यान त्या निषादीनें धरिलें. अर्थ–त्या चिताग्नीला नमस्कार करून, प्रदक्षिणा करून व प्रार्थना करून समुद्रमंथनाच्या वेळीं विषाच्या मुळें दीन झालेल्या विश्वानें (सर्व देवदैत्यांनीं) ज्याचें स्मरण केलें, त्या शिवाचें ध्यान त्या शबरीनें केलें. ५. अग्नींत. ६. पुष्पें. ७. देह. ८. चंदनाचें धूपावणें. ९. अखंड हृदयरूप दिवा. १०. शिवा! ११. प्राणी. १२. साम्राट्पद. १३. नलगे. १४. न श्रमे. १५. पदार्थ. १६. मी शबरी. १७. होवो. १८. तुझ्या चरणरूप कमलीं. १९. भ्रमरी. २०. आनंदी. २१. सूर्यदर्शनानें. २२. कमलिनी. येथील ३८ व ३९ या गीती वाचून, अनुशासनपर्वांतील इंद्रवेषधारी शंकराबरोबरील भाषणांतील उपमन्यूच्या पुढील गीतींची आठवण होते:–क्षणहि नको देवांचें राज्य, नको ब्रम्हपद, नको मुक्ती । शिवदासत्वचि बहुमत मज, शक्रा! जाण सत्य हे उक्ती. ॥ २७. म्हणतों जरि जन्म पुन्हा मम दोषांहीं असे, असो भावी; । त्या त्या जन्मीं माझी शिवचरणीं नित्य भक्ति शोभावी. ॥ २८. (मोरोपंती अनुशासनपर्व, अ० ३.) २३. जन्ममरणाचा मार्ग. २४. माझ्या मनास. २५. देहाची सफलता. २६. तुझ्या पदास. २७. माझे नमस्कार. २८. अग्नींत.

भस्म क्षणांत होय, ज्वलन[1] व्यापी, मृगी[2] जसी गहनीं[3]. ॥ ४२
शबरहि यत्नें घेउनि भस्म, भय धरोनि न स्फुलिंगाचें[4], ।
स्वस्थमनें पूजन करि दग्धगृहसमीप[5] शंभुलिंगाचें. ॥ ४३
पूजांतीं दयितेतें[6] शबर स्मरला मनांत, कीं राहे ।
पार्श्वीं, सदा प्रसादा घ्याया जी समय सविनया[7] पाहे. ॥ ४४
शबरें प्रिया प्रसादग्रहणरता[8] जों मनांत आठविली, ।
तोंचि प्रभुनें, शबरी पहिली जी, ती तसीच पाठविली. ॥ ४५
शबरी शबरासि दिली, तैसीच प्रसूनवृष्टि[9] युक्त बरी, ।
जाणों सच्छळरीति[10] प्रभुलाहि मनांत वाटली न बरी[11]. ॥ ४६
दयितेतें अवलोकी तो शबर, समक्ष भस्म जी झाली, ।
आली तीच नवतसी[12], श्रीसीतेची कसी नव्हे आली[13]? ॥ ४७
भस्मावशेष[14] गृह जें, तेंहि यथापूर्व[15] शबर तो पाहे, ।
विस्मित तटस्थ[16] राहे, माया कीं स्वप्नभाव[17] हा वाहे. ॥ ४८
तो स्त्रीस पुसे, 'दयिते! मज देखत पावकीं[18] गळालीस[19], ।
आलीस कसी? पेंडी[20] शुष्ककुशांची[21] तसी जळालीस. ॥ ४९
गृहहि जळालें असतां, पुनरपि पहिलेंतसें कसें झालें? ।
धालें अग्निजठर[22]? कीं भ्यालें? हें फिरुनि जड[23] कसें आलें?' ॥ ५०
शबरी सांगे, 'स्वामी! केला ज्वलनीं प्रवेश हा मात्र, ।
स्मरतें कांहीं, मग मी जाणें न, दहन न आपुलें गात्र[24]. ॥ ५१
निजलीशि[25] असें, अवयव जाणतसें स्वस्थ आपले, शमला ।
श्रम लाभें अमृताच्या, तैसा नाहींच तापलेश[26] मला. ॥ ५२

---

१. अग्नि. २. हरिणी. ३. अरण्यांत. ४. अग्नीच्या ठिणग्यांचें. ५. जळलेल्या घराजवळ. ६. स्त्रियेतें. ७. नम्र. ८. प्रसाद घेण्यास उत्सुक. ९. पुष्पवृष्टि. १०. साधूंच्या छळाचा प्रकार. पाठभेद:—सच्छळकरिती. ११. चांगली. **हेतूत्प्रेक्षा.** १२. नवीसारखी. १३. सखी. या चरणाचा अर्थ—पहिली शबरी जणूं काय पुन्हां नवीन रूप धरून आली, मग ती श्रीसीतेची सखी कशी नव्हे? रावणगृहांतून सीतेस आणल्यावर तिनें अग्नींत दिव्य केलें, या प्रसंगास उद्देशून हें वर्णन आहे. १४. भस्म हाच अवशेष ज्याचा असें, भस्मीभूत, जळून खाक झालेलें. १५. पूर्वीसारखें. १६. स्थिर. १७. स्वप्नाची चेष्टा. **ससंदेह.** १८. अग्नींत. १९. पडलीस. २०. गुंडी, जुडी. **उपमा.** २१. वाळलेल्या दर्भांची. २२. अग्नीचें उदर. २३. शरीर. २४. शरीर. २५. निजलेलीसारखी. २६. दुःखाचा अंश. या गीतीचा अन्वय-(मी) निजलीशि असें, आपले अवयव स्वस्थ जाणतसें, अमृताच्या लाभें श्रम शमला तैसा तापलेश मला नाहींच. तैसा=त्याअर्थीं, तेव्हां. **व्यतिरेक.**

निजलें होतें जाणों, जागी झालें प्रसाद मागाया, ।
शिवपूजांतीं[1] आलें मी स्वामीच्या पदासि लागाया.[2]' ॥ ५३
इत्यादि शबर शबरी विस्मित होऊनि वदति, तों आलें ।
सहसा विमान, भास्करमंडलसें[3] भव्य उतरलें खालें.[4] ॥ ५४
दूत शिवाचे चवघे, अवघे[5] शिवरूप,[6] ते वरें विमानें[7] ।
घेउनि आले, ज्यांतें पाहुनि न धरील देव रवि[8] मानें.[9] ॥ ५५
शबरातें शबरीतें धरुनि करीं बसविती मग विमानीं; ।
तों त्यांच्या दीप्तिपुढें कांहीं निजदीप्तितें[10] न रवि मानी. ॥ ५६
शिवदूतकरस्पर्शें,[11] न त्यजितां देह, दिव्यता[12] आली, ।
शबर सखा शक्राचा, शबरी इंद्राणिची गमे आली.[13] ॥ ५७
शिवदूत प्रभुचे जे, यापरि बहुदिव्य रूप देऊन, ।
सानंद[14] शबर शबरी गेले श्रीशिवपदासि घेऊन. ॥ ५८

## अध्याय अठरावा.

आतां उमामहेश्वरनामव्रतसत्प्रभाव[15] वानावा,[16] ।
काना वातहि यांचा लागलिया जीव धन्य मानावा.[17] ॥ १
होता देवरथ द्विज आनर्ती बहुभला, तया तनया,[18] ।
ती शारदाभिधाना[19] रूपवती गुणवती[20] अपातनया.[21] ॥ २
तीतें मृतदार[22] धनी,[23] शूर,[24] कुलज,[25] पद्मनाभ या नांवें ।
ब्राह्मण, वृद्धहि मागे, ज्या सर्वांहीं सदाहि मानावें.[26] ॥ ३
देता झाला धन्या कन्या त्या परमरत्नलोभ्याला,[27] ।
याञ्चाभंग[28] कराया देवरथ द्विजहि साधु तो भ्याला. ॥ ४
मध्यान्हीं[29] पाणिग्रहविधि[30] विप्रप्रोक्तें[31] आदरें केला, ।

---

१. शिवपूजा आटोपल्यावर. २. पदासि लागाया=पायांची सेवा करायास. ३. सूर्यबिंबासारखें. ४. खालीं. ५. सर्व. **अनुप्रास.** ६. शिवासारखें ज्यांचें रूप असे. ७. उत्तम विमान. ८. सूर्य. ९. अभिमान. **संबंधातिशयोक्ति.** १०. आपल्या कांतीस. **व्यतिरेक.** ११. शिवदूतांच्या हस्तस्पर्शानें. १२. स्वर्गीय वैभव व सौंदर्य. १३. मैत्रीण. **उत्प्रेक्षा.** १४. आनंदयुक्त. १५. शिवपार्वती नामाच्या व्रताचें चांगलें सामर्थ्य. १६. पाठभेदः—वानावे. १७. पाठभेदः—मानावे. १८. मुलगी. १९. शारदा नांवाची. २०. गुणांनीं युक्त. २१. जिनें नीति टाकिली नाहीं अशी. २२. ज्याची स्त्री मेली आहे असा. २३. श्रीमंत. २४. पराक्रमी. २५. कुलीन. २६. मान द्यावा. २७. (कन्यारूपी) मोठ्या रत्नाच्या लोभ्याला. २८. याचनेचा मोड. २९. दोनप्रहरीं. ३०. विवाहविधि. ३१. ब्राह्मणांनीं सांगितलेला.

मग पद्मनाभ सांजे[1] संध्येकरितां सरोवरा गेला. ॥ ५
संध्योपासन[2] करुनि द्विज फिरला, तों तमीं[3] तया व्याळ[4] ।
डसला, डसतांचि पथीं तत्काळ प्राप्त जाहला काळें[5]. ॥ ६
त्या पद्मनाभमरणें ती बाळा[6] शारदा, तिचे पितरें[7], ।
तद्दुःख किति वदावें? 'हाय' म्हणुनि मोहें[8] पावले इतर. ॥ ७
संस्कारूनि मृतातें, गेले स्वस्वस्थळासि[9] ते लोक, ।
वाढे बहुतचि, वसतां जनकगृहीं[10], शारदामनीं शोक. ॥ ८
झाली क्षीणशरीरा[11], शोकाग्नि[12] करील कां न हुत[13] मांस? ।
विधवा होउनि, कंठी[14] पितृसदनीं[15] शारदा बहुत मास[16]. ॥ ९
द्विज अंध वृद्ध नैध्रुवनामा त्या देवरथगृहा आला, ।
त्याला विधवा कन्या बहु पूजी, सुप्रसन्न तो झाला. ॥ १०
तो द्विज वदला, 'वत्से! पतिसह करिसिल विहार[17] तूं सुचिर[18], ।
तुज एक पुत्र होइल, गुणवान् रूपेंकरूनि जो रुचिर[19]. ॥ ११
लोकीं तव कीर्ति असो, विभव[20] भजो तुज सदा, जसा दास, ।
माझ्या आशीर्वादें योग्या हो देवताप्रसादास[21].' ॥ १२
ती बाळा त्यासि म्हणे, 'बा! आशीर्वाद तव[22] सदा सांचे[23], ।
साक्षात्[24] कल्पद्रुमसे[25] हे करिती पूर्ण नवस दासाचे. ॥ १३
परि मी विधवा बाळा, माझ्या ठाईं तुझी तसी आशी[26], ।
छिन्नलतेवरि[27] जैसी वृष्टि[28], शुनी[29] जेविं सत्क्रिया[30] नाशी. ॥ १४
मी परम मंदभाग्या[31], मज आशीर्वाद हा कसा फळतो? ।
चळतो स्पर्शमणी[32], बा! महिमा दावी न खर्परीं[33] बळ तो.' ॥ १५

---

१. संध्याकाळीं. २. संध्येची उपासना. ३. अंधारांत. ४. सर्प. ५. मृत्यु. ६. तरुणी. ७. वडील. ८. मूर्च्छा. या गीतीचा अन्वय–त्या पद्मनाभमरणें इतर 'हाय' म्हणुनि मोह पावले, (मग) ती बाळा शारदा (व) तिचे पितर तद्दुःख (त्यांचें दुःख) किती वदावें! ९. आपआपल्या घरीं. १०. पित्याच्या घरीं. ११. जिचें शरीर अशक्त झालें आहे अशी. १२. शोकरूप अग्नि. १३. मांसाची आहुती घेईल, मांस जाळील. १४. लोटी, ढकली. १५. बापाच्या घरीं. १६. महिने. १७. क्रीडा. १८. फार काळ. १९. मनोहर. २०. संपत्ति, वैभव. २१. देवाच्या कृपेस. २२. तुझे. २३. खरे. २४. मूर्तिमंत. २५. कल्पवृक्षासारखे. २६. आशीर्वाद. २७. तोडलेल्या वेलीवर. २८. (मेघाचा) वर्षाव. २९. कुत्री. ३०. सत्कृत्य, यज्ञयागादि क्रिया. अन्वय–परि मी विधवा बाळा, जैसी छिन्नलतेवरि वृष्टि (कीं) जेविं शुनी सत्क्रिया नाशी, तशी तुझी आशी माझ्या ठाईं. **मालोपमा.** ३१. दुर्दैवी. ३२. परिस. **दृष्टांत.** ३३. खापराच्या ठायीं. अन्वय–बा! स्पर्शमणि चळतो, (त्याचा) तो (लोहास सुवर्ण करण्याचा) महिमा खर्परीं बळ न दावी.

विप्र म्हणे, 'म्यां अंधें नेणुनि आशी तुला दिली जरि ती, ।
न [1]रिती पडेल, वत्से! [2]दासवचन सत्य **शिवशि**[3]वा करिती. ॥ १६
कथितों [4]**उमाम**हेश्वरभव्यव्रत, हें मुली जपोनि करीं. ।
करिल कृपा **सांब**; असे जें यांत, न तेज तें [5]तपोनिकरीं.' ॥ १७
ती नमुनि म्हणे, 'स्वामी! उपदेशावें, [6]तनू न लक्षीन, ।
करिन व्रत [7]दुष्करही, [8]यमनियमांतें जपोनि रक्षीन.' ॥ १८
मुनि सांगे, '**चैत्रीं** कीं [9]**मा**र्गीं, उत्तमदिनीं, [10]सितीं पक्षीं, ।
व्रत आरंभावें, हें पापीं, [11]शिखितेज तें जसें [12]कक्षीं. ॥ १९
तिथि अष्टमी [13]सुपुण्या, तैसीच बरी चतुर्दशी श्रेष्ठा, ।
या [14]दोहीं पक्षींच्या [15]**सांबशि**वाराधनीं [16]अतिप्रेष्टा. ॥ २०
मंडप रम्य करावा, त्यामध्यें [17]पंचवर्ण [18]सत्पद्म, ।
[19]तन्मध्यधान्यराशिस्थितकलशोपरि सुवस्त्र **शि**[20]वसद्म. ॥ २१
प्रतिमा **उमाम**हेश्वर यांची [21]कांचनविनिर्मिता, भावें ।
ती पूजावी संध्याकाळीं, येणें [22]अभीष्ट लाभावें. ॥ २२
**सांबशि**वाचें पूजन नियमानें [23]षोडशोपचारांहीं, ।
हें वर्षभरि करावें, [24]नामांहीं [25]सांग होय [26]सारांहीं. ॥ २३
विप्राज्ञेनें रात्रौ [27]क्षीरविभावित [28]हविष्य भक्षावें, ।
वर्षभरि करावें हें व्रत, [29]उद्यापनहि [30]इष्ट लक्षावें. ॥ २४

---

१. व्यर्थ. २. भक्ताची वाणी. ३. शिवपार्वती. ४. शिवपार्वतीचें उत्तम व्रत. ५. तपाच्या समुदायांत. **व्यतिरेक.** ६. शरीर न पाहीन, शरीराची पर्वा करणार नाहीं. ७. करण्यास कठीण. ८. यम—ब्रह्मचर्यं दया क्षांतिर्दानं सत्यमकल्कता । अहिंसाऽस्तेयमाधुर्ये दमश्चेति यमाः स्मृताः ॥ १ ॥ नियम—शौच्यमिज्या तपो दानं स्वाध्यायोपस्थनिग्रहः । व्रतमौनोपवासं च स्नानं च नियमा दश ॥ १ ॥. ९. मार्गशीर्षांत. १०. शुद्धीं. हें 'पक्षीं' याचें विशेषण. ११. अग्नीचें तेज. १२. गवतांत. १३. मोठी पुण्यकारक. १४. दोन्हीं शुक्ल व कृष्ण. १५. अंबेसह शिवाच्या पूजनीं. १६. अतिशय प्रिय. १७. पांच रंगांचें. १८. चांगलें कमल अर्थात् कमलाचें (रांगोळीनें वगैरे काढिलेलें) चित्र. १९. त्या (पद्माच्या) मध्यभागीं धान्याच्या राशीवर असलेल्या कलशावर. २०. शिवाचें आसन. २१. सोन्याची केलेली. २२. इच्छिलेलें. २३. सोळा उपचारांनीं. ते उपचार पुढें लिहिल्याप्रमाणें:—आसनं स्वागतं पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् । मधुपर्काचमस्नानं वसनाभरणानि च । गंधपुष्पे धूपदीपौ नैवेद्यं वंदनं तथा ॥ २४. सहस्र नामांनीं. २५. यथास्थित. २६. श्रेष्ठांहीं. २७. दुग्धमिश्रित. २८. पवित्र अन्न. २९. समाप्ति. ३०. इच्छिलेलें.

या [1]सद्व्रतप्रभावें त्रि:[2]सप्त पळांत [3]पितर उद्धरती, ।
सांबशिवाच्या भजनीं [4]वृद्धिप्रति [5]पावतीच [6]शुद्ध रती. ॥ २५

[7]व्रतसुकृतें विधिलोकीं, हरिलोकीं प्राप्त होतसे [8]वास, ।
शिवलोकीं [9]कल्पशत [10]स्थिति, पावे भक्त त्याचि देवास.' ॥ २६

आला उपदेश [11]मना, श्रद्धेनें शारदा धरी चित्तीं, ।
प्रीति व्रतीं बहु तिची, लोभ्याची जेविं वाढते [12]वित्तीं. ॥ २७

[13]जनकजनन्यादि तिचे आप्तहि आले, तयांसि तें कळलें, ।
झाले [14]प्रमुदित वदले, "[15]वत्से! [16]त्वद्भाग्य सर्वथा फळलें". ॥ २८

'[17]सांग व्रत सिद्धिप्रति पावाया तो [18]महर्षि राहविला, ।
कीं [19]गुरुसन्निधिनेंचि [20]प्रारंभपरार्थ [21]पार पावविला. ॥ २९

तेही गुरुनें कथिल्या मार्गें व्रत आचरावया लागे, ।
मागे [22]पतिसंगमना, [23]अनुदिन [24]यमनियमरक्षणीं [25]जागे. ॥ ३०

लिहिली कथा यथामति रामसुतें गुरुसि हस्त जोडून, ।
सोडून [26]खलभयातें, रसिकाचें मन न [27]लेश [28]मोडून. ॥ ३१

---

## अध्याय एकोणिसावा.

सांबशिवव्रत करितां नियमें, [29]निर्विघ्न लोटला [30]अब्द, ।
गुरुच्या [31]पदप्रसादें लागों दिधला न लेशही [32]शब्द. ॥ १

[33]उद्यापनहि यथाविधि केलें, मग विप्रभोजनहि भावें, ।
गुरुजन वदले, "वत्से! सत्वर तुझिया करासि फळ यावें." ॥ २

१. चांगल्या व्रताच्या सामर्थ्यानें. २. एकवीस. ३. पूर्वज. या अर्धाचा अन्वय—या सद्व्रतप्रभावें त्रि:सप्त पितर पळांत उद्धरती. ४. वाढीस. ५. पावतेच. ६. खरें प्रेम. ७. व्रताच्या पुण्यानें. ८. स्थान. ९. शंभर कल्प. कल्प=ब्रह्मदेवाचा एक दिवस. १०. वास. ११. मना आला=आवडला. १२. द्रव्यावर. १३. मातापिता इत्यादि. १४. आनंदित. १५. मुली. १६. तुझें दैव. १७. यथास्थित. १८. नैध्रुव. १९. गुरुसामीप्यानें. २०. प्रारंभाविषयीं (कोणतेंही कार्य, व्रत इत्यादि करण्याविषयीं) जो पर (तत्पर) त्याचा हेतु. २१. पार पावविला=शेवटास नेला. २२. पतीच्या सहवासाला. २३. सदैव. २४. व्रत व इंद्रियदमन यांच्या रक्षणाविषयीं. २५. सावध राही. २६. दुष्टाच्या भयास. २७. अल्प. २८. मन मोडणें=मन दुखविणें. २९. विघ्न न येतां. ३०. वर्ष. ३१. पायांच्या कृपेनें. ३२. शब्द लागणें=दोष लागणें. ३३. समाप्तिहि.

जनकगृहसमीप मठीं गुरुसन्निध मंत्रजप करित राहे, ।
साहे ती उपवास, ध्यानीं श्रीसांबशिवचरण पाहे. ॥ ३

तो नैध्रुवहि उपोषित बसला होता समाधितें धरुनी, ।
स्मरुनि श्रीगौरीतें, श्रीशंभुप्रार्थना मनीं करुनी. ॥ ४

करुनि कृपा विप्रावरि, विप्रसुताशारदेवरिहि, देवी ।
श्रीजगदंबा रात्रौ प्रकटे, यश सत्सभा जिचें सेवी. ॥ ५

प्रकट शिवा होतां, त्या अंधासी प्राप्त जाहली दृष्टी, ।
सृष्टिप्रसू नतीं ती, जैसी वत्सीं दयावती गृष्टी. ॥ ६

तो द्विज जगदंबेच्या पायांवरि पुष्पसेंचि शिर वाहे, ।
ती शारदा धरी श्रीचरण, म्हणे, "आपणांत शिरवा हे." ॥ ७

त्या दोघांतें उठवुनि निरुपमलीलाविलाससद्मानें ।
स्पर्शे माथां देवी दुर्गा श्रीमत्स्वहस्तपद्मानें. ॥ ८

विश्वेश्वरी वदे, "वर विप्रवरा! व्यक्त काय अर्पावे? ।
वात्सल्यें मातेनें इष्टार्थें भक्ततोक तर्पावे. ॥ ९

झालें प्रसन्नहृदया, दुर्लभ देवांसही असें मागा, ।
देतें, अभिमत पावुनि, गाया मत्कीर्तिसुरभितें लागा.' ॥ १०

नमुनि स्तवुनि मुनि म्हणे, 'वरदे! परदेवते! सदाधारे! ।
ब्रह्मादिकांसि म्हणती त्वत्पदपद्में 'सुखें सदा धा रे!' ॥ ११

अंधपणीं वदलों या कन्येतें, 'करुनि पतिसह क्रीडा, ।
पुत्रवती हो' ऐसें, विधवा जाणोनि पावलों व्रीडा. ॥ १२

१. बापाच्या घराजवळ. २. मठांत. ३. समाधि हें योगाचें आठवें अंग आहे. यांत चित्ताचें भान सुटून तो विषयच दिसूं लागतो. ४. श्रीजगदंबेतें. ५. ब्राह्मणकन्या जी शारदा तीवरही. ६. साधूंची मंडळी. ७. नैध्रुवास. ८. श्रीजगदंबा. कविकुलगुरु कालिदास यांनींही हीस जगन्माता ह्मटलें आहे—वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये । जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥ १ ॥ रघुवंश. ९. एकदां व्यालेली गाय. १०. श्रीजगदंबेचे पाय. ११. हे आपणांत शिरवा= हिला सायुज्यमुक्ति द्या. १२. अतुललीलांच्या क्रीडागृहानें. याचें विशेष्य 'श्रीमत्स्वहस्तपद्मानें.' १३. श्रीयुक्त (सुंदर) अशा आपल्या हस्तकमलानें. १४. विश्वाची स्वामिनी. 'व'काराच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** १५. स्पष्ट. १६. इच्छिलेल्या वस्तूनें. १७. भक्तरूप बालक. १८. तृप्त करावे. **अर्थान्तरन्यास.** १९. प्रसन्न आहे चित्त जिचें अशी. २०. अलभ्य. २१. इच्छिलेलें. २२. माझ्या कीर्तिरूप कामधेनूतें. २३. वर देणारे! २४. श्रेष्ठदेवी! २५. साधूंस आश्रय अशा देवी! 'नि' आणि 'रदे' यांच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** २६. तुझीं चरणकमलें. २७. तृप्त व्हा. २८. लज्जा.

तें माझें आशीर्वच[1] सत्य तुवां मंदें[2] पण[3] करावेंच, ।
माते! अल्पहि यश घे, धनिक[4] म्हणे 'मार्गकण[5] करा![6] वेंच[7].' ॥ १३
भगवति! भक्तां आम्हां विप्राचें जें जगांत यश[8] आहे, ।
तें त्वत्पदप्रसादें[9]; लेश, न असतां अनुग्रह[10], न राहे.' ॥ १४
जगदीश्वरी म्हणे, "मी आलें तुमच्या करावया कार्या, ।
हे भामिन्यभिधाना[11] होती द्रविडद्विजातिची[12] भार्या. ॥ १५
पूर्वभवीं[13] चातुर्यें, रूपें, वश्यादिकैतवें[14], मतितें ।
मोहुनि, वश करिती हे झाली अत्यंत सर्वदा पतितें. ॥ १६
ज्येष्ठस्त्रीसीं[15] पतिसीं, मन मोहुनि, पाडिलें इणें विपट[16], ।
ती अनपत्या[17] मेली, पतिविरहें[18] दुःख पावली निपट[19]. ॥ १७
त्या पापें या जन्मीं हे विधवा विप्रसत्तमा[20]! झाली, ।
कीं ज्येष्ठसपत्नीचा[21] करितां घात, न मनांत हे भ्याली. ॥ १८
ज्या पतिपत्नीविप्रिय[22] हें लोकीं जोडिती महापाप, ।
त्या होति बाळविधवा, जन्में त्रिःसप्त[23] भोगिती ताप[24]. ॥ १९
सेजारी विप्र तरुण ईच्या संगार्थ फार यत्न करी, ।
या सुंदरीस पाहुनि, कामार्ताचें[25] कुचित्त[26] हस्त धरी. ॥ २०
नेत्रें करूनि शोणें[27], ब्राह्मण झिडकाविला इणें रोषें[28], ।
मेला 'हाय' म्हणत तो, ईच्या अप्राप्तिसंभवें[29] दोषें[30]. ॥ २१
या जन्मीं तोच इचा पाणिग्रह करुनि, पावला मरण, ।
वैधव्यदुःखदायक[31] झाला, नव्हतेंहि जरि तया स्मरण. ॥ २२
त्या जन्मीं परि मातें भजली होती, तयास्तव स्वल्प[32] ।

---

१. आशीर्वाद. २. हळुहळू. ३. परंतु. ४. श्रीमंत. **दृष्टांत.** ५. मार्गांतील (धान्याचे) कण. ६. बा! हाता! ७. वेचल, गोळा कर, जमव. ८. कीर्ति. ९. तुझ्या चरणकृपेनें. १०. कृपा. या अर्धाचा अन्वय–तें (यश) त्वत्पदप्रसादें (आहे). (तुझा) अनुग्रह न असतां (तें) लेश न राहे. ११. भामिनी नांवाची. १२. द्रविड ब्राह्मणाची. १३. पूर्वजन्मीं. १४. वशीकरणादि कपटमंत्रानें. १५. वडील स्त्रीबरोबर. १६. वैर. १७. संततिहीन. १८. पतीच्या वियोगानें. १९. अत्यंत. २०. ब्राह्मणश्रेष्ठा. २१. वडील सवतीचा. २२. नवराबायकोचें वैर. २३. एकवीस. २४. दुःख. ही गीती **सुभाषित**रूप आहे. २५. मदनपीडिताचें. २६. वाईट मन. २७. तांबडीं. याचें विशेष्य 'नेत्रें.' २८. रागें. २९. अलाभापासून उत्पन्न झालेल्यानें. ३०. दुःखानें. ३१. वैधव्याचें दुःख देणारा. ३२. थोडें.

घडला भोग[1], मुनिवरा! लागावा स्पष्ट अन्यथा कल्प[2]. ॥ २३
प्राग्जन्मपति[3] इचा जो, तो द्विजवर[4] पांड्य[5]जनपदीं झाला[6]. ।
श्रीमान् सदार[7] सात्मज[8] आहे, स्वप्नीं भजेल[9] हे त्याला. ॥ २४
सार्धत्रिशत[10] दशोत्तर योजन[11] येथून दूर तो आहे, ।
स्वप्नीं इजसीं नित्य क्रीडेल, म्हणेल नच कधीं 'हा' हे. ॥ २५
स्वप्नींच्या पतिसंगें होइल या एक पुत्र मुलगीतें, ।
तो निवविल पितरांतें आत्मयशें[12] सर्वसुकविकुलगीतें[13]. ॥ २६
स्वप्नींचा पति संगें पुरविल अभिलाष[14] तो विलासाचा[15]; ।
त्यां[16] स्वसुत स्वपरिग्रहें[17], तैसाचि कळेल पति इला[18] साचा. ॥ २७
'पूर्वभवीं[19] आराधन[20] माझें याही भवीं इला घडलें, ।
झडलें पातक, केवळ अस्मद्ध्यानींच[21] मन इचें जडलें. ॥ २८
यास्तव वरदान इला अर्पाया, प्रकट जाहलें आहे; ।
तर्पीलचि वृष्टि, करिल जरि, लक्षुनि मार्ग, चातकी[22] 'आ'[23]हे." ॥ २९
ऐसें मुनिसीं बोले, मग देवी शारदेसि हें सांगे, ।
'वत्से! मी भक्तजना पावना[24] शरण आलिया कां गे? ॥ ३०
स्वप्नीं अनुभव ज्याचा येइल, तो परम[25] प्रिय तुझा कर्ता, ।
हर्ता[26] हृत्तापाचा[27], दैवें भेटेल जेधवां[28] भर्ता[29], ॥ ३१
सुतरत्न[30], व्रतसुकृतहि, तूं देवुनि तत्करीं[31], तयाजवळ ।
वस वश होउनि वत्से! होइल कलियुगहि सद्यशें[32] धवळ[33]. ॥ ३२
प्रत्यक्ष अंगसंग स्वप्नावांचुनि कधीं नसावा, गे! ।
वागो तव देह, जसा पतिशीं स्त्रीचा अधीनसा वागे. ॥ ३३

---

१. दुःखभोग. २. ब्रह्मदेवाचा एक दिवस. एका कल्पांत १४ मनु होतात. प्रत्येक मनूचा काल ४३,२०,००० वर्षें असतो. ३. पूर्वजन्मींचा पति. ४. ब्राह्मणश्रेष्ठ. ५. पांड्य देशांत. ६. उत्पन्न झाला. ७. स्त्रीसह. ८. पुत्रासह. ९. सेवील. १०. साडेतीनशें अधिक दहा, तीनशें साठ. ११. चार कोस. १२. आपल्या कीर्तीनें. १३. सर्व सज्जनांच्या समुदायानें गाइलेल्या. याचें विशेष्य 'आत्मयशें.' १४. इच्छा. १५. क्रीडेचा. १६. प्राग्जन्मपतीस. १७. स्वस्त्री. १८. शारदेला. १९. पूर्वजन्मीं. २०. पूजन. २१. आमच्या ध्यानाच्या ठायींच. २२. चातकाची स्त्री. २३. 'आ' करणें=तोंड उघडणें, तत्पर राहणें. **रूपकातिशयोक्ति.** २४. पावणार नाहीं. २५. पुढें 'प्र' असल्यामुळें 'म' या अक्षरावर विकल्पानें दीर्घत्व येतें, यामुळें छंदोभंग झालाच आहे, असें म्हणतां येणार नाहीं. २६. हरण करणारा. २७. मनोदुःखाचा. २८. जेव्हां. २९. पति. गीति ३१ व ३२ यांचें **युग्मक** आहे. ३०. उत्तम पुत्र. ३१. त्याच्या हातीं. ३२. सत्कीर्तीनें. ३३. शुद्ध, शुभ्र, कलियुगाचा रंग काळा मानिला आहे. **तद्गुण.**

त्वां सहगमन[1] करावें, जेव्हां पावेल मृत्यु पति, तनये! ।
शिवपद वरिशील, भवीं[2], जेथुनि होऊनि भक्त पतित, न ये.' ॥ ३४
ऐसें कथुनि अदृश्या[3] होय शिवा[4], शारदा तया गुरुतें ।
नमुनि म्हणे, 'बा! साधुनि दिधलें त्वां, त्रिभुवनांत जें गुरु[5], तें.' ॥ ३५
नैध्रुवमुनि, एकांतीं जगदंबेनें प्रसाद जो केला, ।
कर्णी कथुनि सदारा देवरथा[6], पुसुनियां तया, गेला. ॥ ३६
ती शारदा प्रतिक्षण पावे स्वप्नांत कांतसंगातें[7], ।
वरदान भगवतीचें वर्णी सप्रेम[8] नित्य गंगा तें. ॥ ३७
मग झाली गर्भवती[9], ग्रामस्थ[10] जनासि कर्म तें कळलें, ।
'मळलें पितृमुख[11]' म्हणती, 'धिक्[12] कुलजे[13]! मन तुझें कसें चळलें[14]?' ३८
जो सर्पदष्ट[15] मृत पति, कोणी पाहति बरें न तज्जाती[16], ।
स्पष्ट भ्रमली, गमली कुलटा[17] सर्वा जना अतज्ज्ञा[18] ती. ॥ ३९
ती शारदा सभेंत क्रोधें आणूनि, करिति बभ्रा[19] ते, ।
दभ्रा[20] तेव्हां गमली मृतिहि[21], भ्राते खरेंच अभ्राते[22]. ॥ ४०
म्हणती, "पापे[23]! जारिणि[24]! उपजतचि[25] न पावलीस कां मरण? ।
तुज विधवेसि कसा गे! आठवला नरकहेतु[26] कामरण[27]." ॥ ४१
कोणी वदले, 'नासाकर्णच्छेदन[28] करूनि सोडावी,' ।
'बोडावी[29]' किति वदले, किति म्हणती, 'हे कुबुद्धि[30] झोडावी'. ॥ ४२
ऐसे वदले, झाले सिद्ध करायासि, तों नभोवाणी[31] ।
गगनीं[32] प्रकटे, आणी प्रेमळ[33]नयनांत तत्क्षणीं पाणी[34]. ॥ ४३

---

१. सहगमन करणें=सती जाणें. २. संसारांत. या अर्धाचा अन्वय–जेथुनि भक्त पतित होऊनि भवीं नये, (असें) शिवपद वरिशील. ३. गुप्त. ४. पार्वती. ५. मोठें. ६. शारदेच्या पित्यास. ७. पतिसंगातें. ८. प्रेमानें. **व्यतिरेक.** ९. गर्भिणी. १०. गांवांत राहणाऱ्या. ११. बापाचें मुख. १२. धिक्कार असो. १३. कुलस्त्रिये! १४. चंचल झालें. १५. सर्पानें चावलेला. १६. त्याचे जातभाई. १७. जारिणी. १८. मूर्खांस. १९. गवगवा. २०. क्षुल्लक, कमी दुःखदायक. याचें विशेष्य 'मृति'. २१. मरण. २२. अबंधु, भाऊ नव्हेत असे, परके. दुसऱ्या चरणाचा अन्वय–तेव्हां मृतिहि दभ्रा गमली (व) भ्राते खरेंच अभ्राते गमले. अर्थ–तेव्हां मरणसुद्धां तिला थोडें वाटलें, ह्मणजे मरणापेक्षांही तें तिला जास्त वाटलें, व भाऊबंध खरोखरच भाऊबंध नव्हेत, असें वाटलें. **विरोधाभास.** २३. पापिणी. २४. कुलटे. २५. जन्मतांच. २६. नरकाचें कारण. २७. रतियुद्ध. २८. नाक व कान यांचें छेदन. २९. विकेशा करावी. ३०. दुर्बुद्धि. ३१. आकाशवाणी. ३२. आकाशांत. ३३. प्रेमळ मनुष्याच्या डोळ्यांत. ३४. पाणी आणी= आसवें आणी, वाईट वाटवी. **छेकानुप्रास.**

"जनहो! मन हो तुमचें न [1]भ्रांत, स्त्री सती न गांजावी, ।
धैर्य पहातांचि इचें, त्यजुनि [2]अहंता [3]महानगां जावी. ॥ ४४

स्वप्नींहि इच्या केलें न, कुळ मळायासि, [4]पापलेश मनें, ।
हे जेथें, तेथें नच धाडावे दूत आपले [5]शमनें. ॥ ४५

[6]यावरि म्हणेल जो या [7]साध्वीतें 'जारिणी' असें दुष्ट, ।
तत्क्षणिं चिरेल त्याची जिव्हा, प्रकटेल [8]तन्मुखीं [9]कुष्ठ. ॥ ४६

'साधु' म्हणेल, तया [10]यांपरलोकींही सुखा मग न [11]वाणी," ।
ऐसी झाली सहसा आयकिली त्या जनें [12]गगनवाणी. ॥ ४७

देवरथ सदार तया वाणीतें श्रवण करुनियां हर्षे, ।
होउनि [13]नतमुख सज्जन सर्व [14]प्रेमाश्रु तेधवां वर्षे. ॥ ४८

त्यांत किति अविश्वासें वदले, '[15]वाणी [16]मृषाच हे वाटे,' ।
फाटे त्यांची जिव्हा, [17]कृमिकुलही तत्क्षणीं मुखीं [18]दाटे. ॥ ४९

जन सर्व शारदेचें लागे प्रार्थुनि [19]संभाजन कराया, ।
तत्ताता 'धन्य' म्हणति, जैसी [20]सज्जनसभा जनकराया. ॥ ५०

बहु 'साधु [21]साधु' वदले; वृद्ध [22]ज्ञातिस्त्रिया तिला लोभें ।
आलिंगुनि, समजावुनि, म्हणती, 'वत्से! सुकीर्तिनें शोभें.' ॥ ५१

किति जन म्हणती, 'दैवत [23]मिथ्या न वदेचि, नियम हा [24]भारी, ।
गर्भवती होउनिही [25]शीलभ्रष्टा कसी न हे नारी.' ॥ ५२

ऐसें तेव्हां झालें [26]सभ्यहि [27]जनचित्त [28]संशयाविष्ट, ।
[29]शिष्ट ब्राह्मण बोले, जैसा [30]आम्नाय बोलतो इष्ट. ॥ ५३

१.भ्रमलेलें.२. गर्व. ३.मोठ्या पर्वतांस. पर्वतांपेक्षांही हिचें धैर्य अधिक निश्चळ आहे म्हणजे ही अतिधैर्यवती आहे, हा भाव.**व्यतिरेक.** ४.यत्किंचितही पातक. कुळाला कलंक लागेल असें थोडेंही पातक हिच्या मनानें स्वप्नांतही केलें नाहीं, हा अर्थ. ५. यमधर्मानें. ६.यापुढें. ७. सतीतें. ८. त्याच्या मुखावर. ९. कोड. १०. यालोकीं व परलोकींही (स्वर्गी सुद्धां). ११. तोटा. १२. आकाशवाणी. १३.अधोमुख, खालीं तोंड घातलेला. १४.आनंदाश्रु. १५.आकाशवाणी. १६.खोटीच. १७.कीटकसमुदायही. १८.बुजबुजे. १९. पूजन. २०.सज्जनांची मंडळी. २१.भलें, चांगलें. २२. स्वजातीच्या स्त्रिया. २३. खोटें. २४. बळकट, अढळ. २५. पातिव्रत्यापासून पतन पावलेली. या गीतीचा अन्वय–किति जन म्हणति 'दैवत मिथ्या न वदेचि; हा नियम भारी. (पण) हे नारी गर्भवती होऊनिहि शीलभ्रष्टा कसी न?' अर्थ–किति एक लोक म्हणूं लागले, देव खोटें बोलत नाहीं हा नियम खरा आहे, पण ही स्त्री गर्भिणी होऊनही पातिव्रत्यापासून भ्रष्ट कशी झाली नाहीं? २६. थोर. २७. लोकांचें मन. २८. संशययुक्त. २९. शहाणा. ३०. वेद.

“[१]श्रुत [२]दृष्ट विश्व जें, हें [३]मायामय, यांत सर्वही घडतें, ।
अडतें [४]विधिमन जेथें, कार्य न मायेसि [५]लेशही जड तें. ॥ ५४

वीर्य [६]विभांडकमुनिचें [७]नद्युदकसमेत तें मृगी प्याली, ।
[८]व्याली [९]महर्षितें, हे कर्णी [१०]कविवरमुखें कथा आली. ॥ ५५

[११]मुनिमंत्रबळें झाला [१२]युवनाश्वनृपासि गर्भ, हेहि कथा ।
[१३]अत्यद्भुता पुराणी तुमच्या आली असेचि [१४]कर्णपथा. ॥ ५६

तैसीच [१५]सुराष्ट्रनृपतिहस्तस्पर्शें [१६]मृगांगना [१७]धाली, ।
झाली गर्भवती ती, तत्काल [१८]सुतापसा सुता व्याली. ॥ ५७

तैसी हेही [१९]नैध्रुवमुनिपदभजनें [२०]महाव्रताचरणें, ।
झाली गर्भवती, हें, जी माया [२१]शांभवी, तिचें करणें. ॥ ५८

या अर्थी एकांतीं आप्तांच्या [२२]शुद्धकीर्ति ज्या [२३]भार्या, ।
त्या शारदेसि [२५]धन्यीं अन्याहि पुसोत बायका [२४]आर्या.” ॥ ५९

या पूज्य [२६]पुरुषवाक्यें एकांतीं शारदेसि ज्या [२७]सुसती, ।
‘[२८]गर्भप्राप्ति अकस्मात् वद वत्से! तुज कसी?’ असें पुसती. ॥ ६०

१. ऐकलेलें. २. पाहिलेलें. ३. मायायुक्त. ४. ब्रह्मदेवाचें मन. ५. थोडेंही. या अर्धाचा अन्वय—जेथें विधिमन अडतें, तें कार्य मायेसि लेशही जड न. जें काम करण्यास ब्रह्मदेवाचीही बुद्धि अगदीं चालत नाहीं, तें काम ही परमेश्वराची माया सहज करून टाकते. ६. शुक्र. ७. नदीच्या पाण्यावरोबर. विभांडक ऋषि एकदां एका नदीवर स्नानास गेला. तेथें पुष्कळ अप्सरा स्नान करीत होत्या, त्यांस पाहून त्याचें वीर्य नदींत पतन पावलें. तें एक हरिणी पाण्याबरोबर प्याली. त्यापासून तीस ऋष्यशृंग पुत्र झाला. ह्यास अनुलक्षून हें वर्णन आहे. ८. प्रसवली. ९. मोठ्या ऋषीस. ऋष्यशृंगास. १०. कविश्रेष्ठाच्या मुखानें. वाल्मीकीच्या मुखानें. ११. ऋषिमंत्राच्या सामर्थ्यानें. १२. युवनाश्व राजाला. याची कथाः—हा युवनाश्व राजा इक्ष्वाकुकुलोत्पन्न होय. यास शंभर भार्या होत्या, पण पुत्र होईना म्हणून वनांत गेला. त्याला पुत्र व्हावा म्हणून ऋषींनीं पाणी मंत्रून यज्ञमंडपांत ठेविलें होतें. तेथें जाऊन तो तान्हेलेला राजा तें प्याला. या योगें त्यास गर्भ राहून पुत्र झाला. या पुत्राचें नांव मांधाता. १३. अतिआश्चर्यकारक. १४. कर्णमार्गास. १५. सुराष्ट्राच्या राजाच्या हस्तस्पर्शानें. १६. मृगाची स्त्री, हरिणी. १७. तृप्त झाली. १८. मोठ्या तपस्व्यास. १९. नैध्रुवऋषीच्य चरणसेवेनें. २०. मोठ्या व्रताच्या आचरणानें. २१. शिवाची. २२. ज्यांची कीर्ति निष्कलंक आहे अशा. २३. स्त्रिया. २४. ‘मान्या’ असा पाठभेद. २५. श्रेष्ठा. २६. पूज्यपुरुषाच्या भाषणानें. २७. पतिव्रता. २८. गर्भसंभव.

ती, सद्गुरूपदिष्टव्रतमाहात्म्यें[1]करूनि जो घडला, ।
गौरीप्रसाद[2] सांगे, त्यांच्या विश्वास मानसीं जडला. ॥ ६१

गर्हिवरल्या बहु साध्वी, त्या वदल्या शारदेसि तूं धन्या, ।
अन्या बहु कुलजन्या[3], परि वत्से! त्वत्समा नसे कन्या.' ॥ ६२

आधीं पुष्कळ, नेणुनि[4] तें कन्यारत्न अनघ[5], रागेले[6], ।
मग 'साधु[7] साधु' वदले; बहु मान करूनि, जन घरा गेले. ॥ ६३

ती प्रसवली पितृगृहीं शुभकाळीं[8] शारदा सुतनयातें[9], ।
द्विज वदले, 'मंदलेश[10]हि धरिल विलोकुनि शचीसुत[11] न यातें'. ॥ ६४

उपनयनान्त[12] सुसमयीं[13] केले संस्कार सर्व आज्यानें, ।
'वरचि करील हित' म्हणे, 'याचें होईल काय मौज्यानें[14]?' ॥ ६५

ऋग्वेद अष्टमीं[15] ये पाठ, यजुर्वेद रविसमा[16] नवमीं[17], ।
ज्या सामवेद दशमीं[18], त्याहि म्हणों काय कविस मानव[19] मी? ॥ ६६

गोकर्णातें यात्रा शिवपर्वी[20] सुकृतसंचयें[21] नेली, ।
पितृमातृबंधुसहिता[22] ससुता[23] ती शारदा स्वयें गेली. ॥ ६७

स्वप्नीं संगें[24] जयासीं, तो आला पूर्वजन्मपति[25]हि, तया ।
ती शारदा विलोकी, दर्शन तीचेंहि होय अति हितें[26] या. ॥ ६८

स्वप्नपरिचित[27] स्वपती, स्पष्ट असें शारदामनीं[28] बोणे[29]; ।
तोही विप्र स्वस्त्री[30], स्वसुत, असें स्वप्नपरिचयें[31] जाणे. ॥ ६९

---

१. सद्गुरूनें उपदेशिलेल्या व्रताच्या महिम्यानें. २. पार्वतीची कृपा. ३. कुलीन. हे मुली! दुसऱ्या कुलीन मुली असतील पण तुझ्यासारखी दुसरी नाहीं, हा अर्थ. **असमालंकार.** ४. न जाणुनि. ५. पवित्र. ६. रागावले. या अर्धाचा अन्वय–तें कन्यारत्न अनघ नेणुनि आधीं पुष्कळ रागेले. अर्थ–ती शारदा निष्पाप आहे असें न समजल्यामुळें आधीं पुष्कळ लोक रागावले होते. ७.चांगलें.८.उत्तम वेळीं, चांगल्या मुहूर्तावर. ९.उत्तम पुत्रास. १०.यत्किंचितही गर्व.११.इंद्राणीचा पुत्र, जयंत. **व्यतिरेक.**१२.उपनयन आहे अंतीं ज्यांच्या. याचें विशेष्य 'संस्कार'. १३. योग्य वेळीं. १४. माझ्यानें. या अर्धाचा अन्वय–(आजा) म्हणे वरचि याचें हित करील, माझ्यानें काय होईल? १५. आठव्या वर्षी. १६. सूर्यासारख्याला. १७. नवव्या वर्षीं. १८. दहाव्या वर्षीं. १९. मनुष्य. या आर्येचा अन्वय–(ज्या) रविसमा अष्टमीं (वर्षीं) ऋग्वेद, नवमीं (वर्षीं) यजुर्वेद, (व) दशमीं (वर्षीं) सामवेद पाठ ये; त्याहि कविस मी मानव म्हणों काय? २०. शिवपर्वणीच्या वेळीं. २१. पुण्याच्या सांठ्यानें. २२. आई, बाप व भाऊ यांसहित. २३. पुत्रासह. २४. सहवास. २५. पूर्वजन्मींचा पति. २६. हितकारक, आनंद देणारें. २७. स्वप्नांत ओळखीचा झालेला. २८. शारदेच्या मनांत. २९. ठसे. ३०. आपली स्त्री. ३१. स्वप्नींच्या सहवासानें.

रोमांचिततनु होउनि, त्याचिकडे शारदा सती पाहे, ।
राहे चित्रसम उभी, जळ खळखळ लोचनद्वयें वाहे. ॥ ७०
तो विप्र म्हणे 'भद्रे! कांहीं पुसणें तुला मनीं आहे, ।
एकांतीं चाल;' असें बोलों एकीकडे तिला बाहे. ॥ ७१
एकांतीं वृत्त पुसे, 'गहिंवरलिस दर्शनें' म्हणे, 'कां? गे!' ।
निजकुलनामहि दुःसह वैधव्यप्रभृति दुःख ती सांगे. ॥ ७२
पुनरपि हास्य करुनियां, कौतुकि ब्राह्मण असें पुसे तिस तो, ।
'भद्रे! वद, कोणाचा 'हा पुत्र सुरूप चंद्रसा दिसतो?' ॥ ७३
ती शारदा म्हणे, हा मन्नंदन शारदेय या नांवें, ।
मानावें बहु यातें, मेधाविशतें सदैव वानावें.' ॥ ७४
विप्र म्हणे, 'भद्रे! तूं जरि म्हणसी पुत्र आपुला याला, ।
वदलीस, 'बाळविधवा मी' ऐसें, पुत्र हा कसा झाला?' ॥ ७५
ऐसें विप्रें पुसतां नम्रमुखी होय शारदा, लाजे. ।
राजे म्हणति कवींचे, 'लवली लवलीलतातसी साजे.' ॥ ७६
ती धैर्य धरूनि म्हणे, 'झाला उपहास बहु, पुरे, स्वामी! ।
मज जाणतसांच तुम्ही, जाणतसें निश्चयें तुम्हांला मी. ॥ ७७
किंबहुना यांअर्थीं तुमचें माझें प्रमाण मन आहे;' ।
ऐसें बोले, सांगे, श्रीदेवीदत्त वर सती त्या हे. ॥ ७८
मग शारदा तयाच्या सुतरत्न व्रतफळार्ध दे हातीं, ।
तद्दर्शनें निवे तो, निववी तत्स्वजनचित्तदेहा ती. ॥ ७९
तो विप्र जनकजननीबंधुस्त्रीस्वजनसंमतें जाया ।
स्वीकारी, तात सुखें आज्ञा त्या शारदेसि दे जाया. ॥ ८०

---

१. रोमांचयुक्त आहे शरीर जिचें अशी. २. चित्रासारखी. ३. दोन्ही डोळ्यांनीं. ४. कल्याणी. ५. बोलण्याला, संभाषण करण्यास्तव. ६. वृत्तांत. ७. असह्य. ८. वैधव्यप्रमुख. ९. पुन्हा. १०. कौतुक वाटलें आहे ज्यास असा, थट्टेखोर. 'कि' याच्या पुढें जोडाक्षर आल्यामुळें त्यास दीर्घत्व येऊन **छंदोभंग** झाला आहे. कदाचित् येथें खरा पाठ 'कुतकी' असा असावा. ११. रूपवान्. १२. माझा मुलगा. १३. शेंकडों सुज्ञांनीं. १४. अधोमुखी. १५. कवींचे राजे=कविश्रेष्ठ. १६. नामविशेष वेलीप्रमाणें. **यमक.** १७. शोभे. **उपमा.** १८. थट्टा किंवा उपरोध. १९. या विषयासंबंधें. २०. साक्ष. २१. श्रीदेवीनें दिलेला. २२. व्रताच्या फळाचें अर्ध. २३. त्याच्या दर्शनानें. २४. त्याच्या (पतीच्या) आप्तांचें मन व देह यांस. २५. बाप, आई, भाऊ, स्त्री व आप्त यांच्या संमतीनें. २६. स्त्री.

त्या पूर्वजन्मपतिच्या सदनातें शारदा सती गेली, ।
केली स्वप्नींच तसी त्या विप्रें श्रीशिवावरें केली. ॥ ८१
त्या शारदासतीचें सर्व जन करिति सदा संभाजन हो ! ।
कीं तीस शिवा वदली 'वत्से! कविनुतपदास भाजन हो.' ॥ ८२
करुनि विलास स्वप्नीं, त्या विप्रगृहीं वसोनि बहु वर्षे, ।
मग अवसानीं त्यासह शिरली देहनांत ती परम हर्षे. ॥ ८३
पतिसह बसुनि विमानीं, श्रीशिवलोकास ती सती पावे, ।
या वेदसमाख्यानश्रवणें जनदोष सर्वही जावे. ॥ ८४
लिहिली कथा यथामति रामसुतें संत्प्रसाद जोडाया, ।
थोडा यांहुनि सुरतरुमहिमा, लोकीं नसेचि जोडा या. ॥ ८५

## अध्याय विसावा.

सूत म्हणे, 'अतिजडहित शंभुभजन अन्य शौनका! नाहीं, ।
रुद्राक्षाचा महिमा प्राशावा, धरुनि मौन, कानाहीं. ॥ १
भक्त अभक्तहि, नीचहि नीचेतरहि, सर्व सर्वथा जरि तो, ।
प्राणी पापापासुनि सुटतो, रुद्राक्ष जो सदा धरितो. ॥ २
'रुद्राक्षधारण परमपुण्य महाव्रत' असें म्हणति सुकवी, ।
चुकवी जन्म मरण हें, कामाद्यखिलारिचें वदन सुकवी. ॥ ३
रुद्राक्षसहस्रातें धरितो जो, नमिति सुर तया सर्व. ।
तो तैसाचि प्राणी वंद्य अशेषां जनां, जसा शर्व. ॥ ४
नसतां सहस्र, एकचि रुद्राक्ष शिखेंत मनुज जो धरिल, ।
बारा बारा हस्तीं, सोळा सोळा भुजद्वयीं वरिलें. ॥ ५

१. गृहातें. २. श्रीपार्वतीच्या वरानें. ३. क्रीडा. ४. पूजन. ५. कवींनीं स्तविलेल्या स्थानास. ६. पात्र. ७. क्रीडा. ८. मृत्यूच्या वेळीं. ९. सती गेली. १०. मोठ्या आनंदानें. ११. वेदासारख्या कथेच्या श्रवणानें. १२. लोकांचें पातक. १३. साधूंची कृपा. १४. पाठभेदः—पाहुनि. १५. कल्पवृक्षाचें माहात्म्य. **व्यतिरेक.** १६. उपमा, गुणानें साजणारी अन्य वस्तू. **असम.** १७. अति अज्ञानाचें हित करणारें. १८. शिवाची सेवा. १९. 'भक्त' 'नीच' आणि 'सर्व' यांच्या आवृत्तीमुळें **अनुप्रास.** २०. अधिक नीच. २१. पाठभेदः—सर्वथा जगीं जरि तो. २२. मोठें पुण्य-कारक. २३. मोठें व्रत. २४. कामप्रमुख सर्व शत्रूंचें. २५. वाळवी. २६. हजार रुद्राक्षांस. २७. देव. २८. वंदन करण्यास योग. २९. सर्वांस. ३०. शिव. ३१. शेंडींत. ३२. मनुष्य. ५,६ आर्यांचें युग्म आहे. ३३. पाठभेदः—धरितो. ३४. दोन दंडांत. ३५. पाठभेदः—वरितो.

बत्तिस कंठीं, चालिस माथां, [1]सा सा तसेचि कर्णांत, ।
[2]वक्षीं [3]अष्टोत्तरशत, **शि**वसम तो पूज्य [4]सर्व वर्णांत. ॥ ६

[5]स्फटिकप्रवालमुक्तावैडूर्यस्वर्णमणि इहीं युक्त ।
रुद्राक्षातें धरितो जो, संसारीं असोनि तो [6]मुक्त. ॥ ७

केवळ रुद्राक्षचि जो [7]निर्धनें कीं मनुज आळसी धरितो, ।
जेविं [8]तमाचा [9]भास्कर, पापाचा होय सर्वथा [10]अरि तो. ॥ ८

जपला रुद्राक्षाच्या माळेनें मंत्र [11]जपरतें जो, तो ।
[12]क्षिप्र [13]अनंतफलप्रद [14]सर्वरहस्यज्ञजनमतें होतो. ॥ ९

रुद्राक्ष [15]शिरीं धरितां [16]श्रीगंगास्नानफळ [17]सुखें मिळतें, ।
[18]तत्वज्ञजनमतें तों अधिकचि होयील [19]तोलितां [20]तिळ तें. ॥ १०

ज्याच्या [21]बहुपुण्यप्रद रुद्राक्ष नसेल एकही अंगीं, ।
त्याचें जन्म [22]निरर्थक, जैसें न वसोनि साधुच्या संगीं. ॥ ११

**शि**वलिंगपूजनीं जें, तें फल रुद्राक्षपूजनीं आहे.' ।
हें **सू**त [23]रहस्य कथी, [24]भूतदयेस्तव न तन्मनीं राहे. ॥ १२

एकमुख, पंचमुख किति, एकादशमुख, [25]समस्तसन्महित, ।
रुद्राक्ष चतुर्दशमुख, हे **शि**वसम करिति [26]भक्तजन्महित. ॥ १३

[27]**रु**द्रात्मक रुद्राक्ष प्रेमें जरि नित्य पूजिला, तरि तो ।
करितो [28]जन्मदरिद्रा [29]**ध**नपतिच, [30]दुरित [31]कुलक्षणें हरितो. ॥ १४

याविषयीं आख्यान श्रवण करावेंचि [32]निजहितप्रवणें, ।
[33]सर्वमहापापक्षय करितें तत्काल कीर्तन श्रवणें. ॥ १५

[34]**का**श्मीरदेशपालक राजा तो **भ**द्रसेन या नांवें, ।

---

१. प्रत्येकीं सहा. २. उरीं. ३. एकशें आठ. ४. सर्व जातींत. ५. स्फटिक, पोंवळीं, मोतीं, वैडूर्य रत्न व सोन्याचे मणि. ६. **विभावनालंकार.** ७. दरिद्री. ८. अंधाराचा. ९. सूर्य. १०. शत्रू. ११. जपाच्या ठायीं रमलेल्यानें. १२. सत्वर. १३. अपार फल देणारा. १४. सर्व मर्म जाणणाऱ्या लोकांच्या मतानें. १५. मस्तकीं. १६. श्रीगंगेच्या स्नानाचें फळ. १७. सहज. १८. तत्व जाणणाऱ्या लोकांच्या मतानें. १९. तुलना करितां. २०. तिळभर. २१. फार पुण्य देणारा. २२. व्यर्थ. २३. तत्व. २४. प्राणिमात्रांवरील दयेमुळें. २५. सर्व साधूंनीं मान दिलेले. २६. दासाच्या जन्माचें हित. २७. रुद्र आहे आत्मा ज्याचा. २८. जन्मापासून जो निर्धन त्यास. २९. कुबेरच. ३०. पातक. ३१. सामुद्रिक दुश्चिन्हें. ३२. आपल्या कल्याणाविषयीं दक्ष अशानें. ३३. महापापें:–ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः । महान्ति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमम् ॥ मनुस्मृति. ३४. काश्मीर देशाचा राजा.

ज्या गुणसंपन्नातें[1] राष्ट्रें सप्रेम नित्य वानावें. ॥ १६

ज्याचा पुत्र **सु**धर्मा, **ता**रकनामा तदीय[2] सचिवाचा[2], ।

ज्यांची मूर्ति सुरांच्या पुत्रींहि, रसींहि[3] लाज रचि[4] वाचा. ॥ १७

नृपसचिवकुमार[5] सखे, सुगुणांहीं स्वजनमानसें[6] हरिती. ।

विद्याभ्यास क्रीडा दोघे एकत्र सर्वदा करिती. ॥ १८

रत्नसुवर्णविभूषा[7] क्षणभरि निजगुरुजनाग्रहें[8] धरिती, ।

परि तीव्रविरक्तिरसिक[9] सादर[10] रुद्राक्षभूषणें[11] वरिती. ॥ १९

त्या **भ**द्रसेनसदनीं[12] मुनिवर्य[13] **प**राशर[14] स्वयें आला, ।

त्याला पूजुनि नृप तो अंजलि जोडुनि[15] विचारिता झाला. ॥ २०

'हा मत्पुत्र **सु**धर्मा सुज्ञानें[16] मृत्यु जन्म नाशील ? ।

हा सचिवपुत्र[17] **ता**रक, पाहें याचेंहि सन्मना! शीलें[18]. ॥ २१

रुद्राक्षालंकार[19] प्रिय यांला[20] या[21] दशेंत[21] कां गमला ? ।

आंग मळा[22] तेंवि नगा[23] देति न हे[24], काय तत्व! सांग मला.' ॥ २२

सर्वज्ञ मुनि म्हणे, 'या दोघांचें पूर्व वृत्त[25] तुज, राया! ।

कथितों, मी श्रोत्यांची श्रद्धाभक्ति क्षणांत उजराया[26]. ॥ २३

**नं**दिग्रामीं बहुगुणरूपें[27] धन्या गणांगना[28] होती, ।

तन्नाम **म**हानंदा, सेवी, जो धर्म जातिचा, तो ती. ॥ २४

राज्ञी जसी प्रजांहीं, ती पूजावी सदैव गणिकांहीं, ।

---

१. गुणवानातें. २. त्याच्या प्रधानाचा. ३. या अर्धाचा अन्वय–ज्यांची मूर्ति सुरांच्या पुत्रींहि (व) (ज्यांची) वाचा सुरांच्या रसींहि लाज रचि. त्या राजपुत्राचें व प्रधानपुत्राचें रूप देवपुत्रांपेक्षां चांगलें होतें व त्यांची वाणी अमृतापेक्षांही मधुर होती, हा भावार्थ. ४. आणी. **प्रतीप.** ५. राजाचा व प्रधानाचा पुत्र. ६. आप्तांचीं मनें. ७. रत्नें व सोनें यांचे अलंकार. ८. आपल्या वडिलांच्या आग्रहानें. पाठभेदः–निजजनन्याग्रहें. ९. कडक वैराग्याचे भोक्ते. १०. आदरानें. ११. रुद्राक्षांचे अलंकार. १२. भद्रसेनाच्या वाड्यांत. १३. ऋषिश्रेष्ठ. १४. वसिष्ठाचा नातु. १५. अंजलि जोडून=नम्रतापूर्वक. १६. चांगल्या ज्ञानानें. १७. प्रधानपुत्र. १८. स्वभाव. १९. रुद्राक्षाचे अलंकार. २०. पाठभेदः–यांना. २१. या दशेंत=बाल्यावस्थेंत. २२. पापास. २३. भूषणांस. २४. पाठभेदः–हें. २५. वृत्तांत. २६. उजळण्यास. २७. पुष्कळ गुण व रूप यांनीं. पाठभेदः–(१) बहुगुणरूपधनाढ्या गणांगना; (२) बहुजनगुणरूपें धन्य अंगना. २८. वेश्या.

नऱ्हतें देहीं गेहीं[1] स्वल्प जिच्या प्राज्यमूल्य[2] मणि कांहीं. ॥ २५
त्या वेश्येनें मर्कट[3], कुक्कुटहि[4] तसाच बाळसा राया! ।
नाचायासि[5] शिकविले होते, क्रीडोनि काळ[6] साराया[7]. ॥ २६
मर्कट रुद्राक्षांहीं भूषित[8] केला, असे जसा बाल, ।
तैसाच कुक्कुटहि ती, नाचवि दोघांसि धरुनियां ताल. ॥ २७
कोणीएक **शि**वव्रतरत[9] सर्वांगीं विभूतिनें[10] न्हाला[11], ।
धृतरुद्राक्षविभूषण[12], जटिल[13], असा वैश्य तद्गृहा[14] आला. ॥ २८
भुलली वेश्या त्याच्या करगतवलयें[15] अमूल्यरत्नमयें[16], ।
वाटे[17] तच्चित्ता कीं घडिलें कंकण करूनि यत्न मयें[18]. ॥ २९
गणिका वैश्यासि म्हणे, 'अंशीं[19] एकींहि कटक[20] हें न रितें, ।
हरितें मम चित्तातें, चुंबकसें[21] स्ववश चक्षुतें[22] करितें.' ॥ ३०
वैश्य म्हणे, 'घे, देतों, जरि तव मन रत्नकंकणीं[23] लोलें[24]. ।
बोलें[25] स्पष्ट गुणज्ञे! याचें देतीस काय तूं मोल[26]?' ॥ ३१
स्मित करुनि ती म्हणे, 'हो! नरतनु[27] अधिकचि गुणें, न मणि[28] कांहीं; ।
त्रिदिनें[29] तव वधू[30] होइन, कीं द्यावें हेंचि मोल गणिकांहीं.' ॥ ३२
वैश्य म्हणे, 'साक्षी या व्यवहारीं **चंद्र**, **रवि**, महाभूतें[31]; ।
शपथ करीं, कीं सत्यें चाले व्यवहार, रथ जसा सूतें[32]. ॥ ३३

---

१. घरीं. 'हीं'च्या आवृत्तीमुळें **यमक.** २. फार मूल्यवान् मणि. या अर्धाचा अन्वय–जिच्या देहीं (व) गेहीं प्राज्यमूल्य मणि कांहीं स्वल्प नऱ्हते. अर्थ–जिच्या शरीरावर व घरांत फार किंमतीचे मूल्यवान् मणी कांहीं स्वल्प नऱ्हते (=विपुल होते). ३. माकड. ४. कोंबडा. ५. पाठभेदः–(१) नाचाया शिकवीलें होतें; (२) नाचायासि शिकविलें होतें. ६. वेळ. ७. घालविण्यास. या गीतीचा अन्वय–राया! या वेश्येनें मर्कट तसाच बाळसा कुक्कुटहि क्रीडोनि काळ साराया नाचायासि शिकविले होते. ८. शोभित. ९. शिवव्रताच्या ठायीं रमलेला. १०. भस्मानें. ११. भरलेला. १२. ज्यानें रुद्राक्षांचीं भूषणें धरलीं आहेत असा. १३. जटायुक्त. १४. तिच्या घरीं. पाठभेदः–तद्गृहीं. १५. हातांतील कंकणानें. १६. बिनमोल रत्नजडित अशा. याचें विशेष्य 'करगतवलयें.' १७. **उत्प्रेक्षा.** १८. मयासुरानें. हा उत्तम शिल्पी होता. यानेंच पांडवांची मयसभा बांधली. १९. अल्पभागानें. २०. कंकण. ज्या रीतीनें घडलें पाहिजे, त्या रीतीनें तें पूर्णपणें घडलें आहे, हा भावार्थ. पाठभेदः–ऐसें एकहि न कटक, हें न रितें. २१. लोहचुंबकासारखें. २२. नेत्रांतें. २३. रत्नजडित कांकणाच्या ठायीं. २४. लुब्ध. २५. पाठभेदः–बोलें. २६. किंमत. २७. मनुष्यदेह. २८. रत्नें. मनुष्यदेहच गुणानें श्रेष्ठ आहे, रत्नें कांहीं श्रेष्ठ नाहींत, हा चतुर्थचरणाचा अर्थ. पाठभेदः–नरतनुहुनि अधिकगुण न मणि कांहीं. **व्यतिरेक.** २९. तीन दिवस. ३०. स्त्री. ३१. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश. ३२. सारथ्यानें.

घे वारवल्लभे[1]! करभूषण[2], माझी त्रिरात्र[3] हो भार्या[4], ।
वर्तावें मजसीं त्वां, वर्ते पतिसीं जसी सदा आर्या[5].' ॥ ३४

वैश्याच्या हृदयातें स्पर्शुनि ती शपथ करि **म**हानंदा, ।
मग तें रत्नवलय[6] घे, भास्करभा[7]ही[8] जयापुढें मंदा[9]. ॥ ३५

मणिमय[10] **शि**वलिंग करीं[11] दे वैश्य तितें, म्हणे, 'करीं जतन, ।
वतन प्राण तसें हें, याच्या नाशींच मत्तनूपतन[12].' ॥ ३६

ती वेश्या तें **लिं**ग स्थापी त्या नाट्यमंडपस्तंभीं[13], ।
केलिगृहीं[14] जाय, जसी गजसहित गजी[15] सरोवरस्वंभीं[16]. ॥ ३७

दांतीं[17] पर्यंकीं[18] त्या वैश्यासीं करुनियां सुखें केली[19], ।
निवुनि **म**हानंदेनें निद्रा सुस्वस्थमानसें[20] केली. ॥ ३८

अग्नि निशीथीं[21] दैवें सहसा त्या नाट्यमंडपा लागे, ।
जावुनि वेश्या सोडी कुक्कुट मर्कट, जरी स्वयें भागे. ॥ ३९

त्या नाट्यमंडपासह तें **लिं**ग जळोनि जाहलें भग्न, ।
शोकार्णवांत[22] झाला तो वैश्य महा**शि**वव्रती[23] मग्न. ॥ ४०

वैश्य म्हणे, 'स्वप्नींहि न ऐकोवें[24] **लिं**ग भंगलें[25] कानीं, ।
वेंचावेंचि **शि**वार्थीं, पित्रर्थीं[26] जेविं अंग लेंकानीं. ॥ ४१

**वि**[27]धि, हरि, हरहि न वारों शकतिल दयिते[28]! करीव आशु[29] चिता. ।
सत्य मज **म**हानंदे! देयिल दहनप्रवेश[30] हा शुचिता[31].' ॥ ४२

दृढतर निश्चय जाणुनि, ती वेश्या वैश्यसत्तमा उचिता[33], ।
स्वगृहा[33]समीप करवी, सांगुनि भृत्यांसि[34], चंदनें सुचिता[35]. ॥ ४३

---

१. वेश्ये. पाठभेदः–वीरवल्लभे! २. हस्तालंकार. पाठभेदः–तूं भूषण. ३. तीन रात्र. ४. स्त्री. ५. श्रेष्ठ स्त्री. ६. रत्नकंकण. ७. सूर्यकांति. ८. पाठभेदः–हो. ९. फिक्की. **व्यतिरेक.** १०. रत्नाचें. ११. हातीं. १२. माझ्या शरीराचा नाश. १३. नृत्यमंडपाच्या खांबावर. १४. क्रीडागृहांत. पाठभेदः–केलिगृहा. १५. हत्तीण. १६. सरोवराच्या उत्तम पाण्यांत. पाठभेदः–सरोवरीं स्तंभीं. **उपमा.** १७. हस्तिदंताच्या. १८. पलंगीं. १९. क्रीडा. २०. फार स्वस्थचित्तानें. २१. मध्यरात्रीं. २२. शोकसमुद्रांत. २३. मोठा शिवभक्त. २४. पाठभेदः–स्वप्नींही नैकावें. २५. भग्न झालें. २६. वडिलांसाठीं. २७. **संबंधातिशयोक्ति.** पाठभेदः–विधिहरिहि न वाराया. २८. प्रिये. २९. त्वरित. ३०. अग्निप्रवेश. ३१. पाठभेदः–(१) दहन प्रवेशतां शुचिता. (२) सर्वसंग्रहपाठः–दहनप्रवेश आशुचिता. 'आशुचिता=आसमंतात् शुद्धता' अशी टीप आहे. ३२. योग्य. ३३. आपल्या घराजवळ. ३४. चाकरांस. ३५ उत्तम प्रकारची चिता.

स्नान करुनि, भस्म धरुनि, मौन वरुनि, शंभुतें मनीं [1]स्मरुनी, ।
बहुजन देखत असतां, वैश्य जळे [2]सविधि [3]पावकीं [4]भरुनी. ॥ ४४
दु:[5]खार्ता ती वेश्या बंधुजनातें म्हणे, “[6]अहो! क्षिप्र ।
प्रार्थुनियां [7]पाचारा नंदिग्रामस्थ सर्वही विप्र. ॥ ४५
[8]सर्वस्व दान देउनि, करितें [9]वैश्यानुगमन मी, जाणा; ।
मेला शिवव्रती हा [10]मत्पापें, सत्य हें मनीं आणा. ॥ ४६
मणि[11]कंकण घेउनियां झालें याची त्रिरात्र मी पत्नी, ।
[12]सहधर्मचारिणीनें न चुकावें पति[13]हितावहीं यत्नीं ॥ ४७
धर्मार्थ[14]काम सत्यें, मुक्ती अत्यंत [15]दुर्लभा, पण ती; ।
सत्यचि हरिहर, सत्कवि ‘[16]सत्ये सर्वं प्रतिष्ठितं’ म्हणती.” ॥ ४८
ऐसें वदली वेश्या, बंधुजनें बहु निवारिली, तरि ती, ।
न रिती [17]उक्ति पडाया, झाली [18]शिष्टोक्त [19]सिद्धता करिती. ॥ ४९
आप्तांतें समजावुनि, वेश्या [20]तीर्थोदकीं करी स्नान, ।
सर्वस्व दान देवुनि [21]सद्विप्रांकारणें, धरी ध्यान. ॥ ५०
[22]सांब [22]ध्यावुनि, घाली दी[23]प्तानल तीन वेळ उजवा ती. ।
प्रभुसि म्हणे, ‘मम [24]नाडी ओवाळाया असोत तुज वाती.’ ॥ ५१
होतो धन्य, [25]सुदीनहि जो जन ज्याच्या मनें [26]पदा शिवतो, ।
[27]दहनांत शिरावी जों, तों प्रकटे तीपुढें सदाशिव तो. ॥ ५२
प्रभुच्या [28]अनुग्रहेंचि प्रभुतें उघडूनि [29]लोचनें पाहे, ।
राहे परि चि[30]त्रंतसी; क्षण भय, मग सुख [31]अनंत, ती [32]लाहे. ॥ ५३

---

१. पाठभेद:–धरुनी. २. यथाविधि. ३. अग्नींत. ४. शिरून. ५. दु:खपीडिता. ६. पाठभेद:–अहा! ७. बोलवा. ८. सर्व द्रव्य. ९. वैश्याबरोबर सहगमन. १०. माझ्या पापानें. ११. रत्नकंकण. १२. पत्नीनें. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. १३. पतीला हितकर अशा (यत्नीं). पाठभेद:–पतिहितार्थही. १४. पुण्यकर्म, द्रव्य व सुख. हे तीन पुरुषार्थ होत. १५. मिळण्यास कठीण. १६. सत्याच्या ठिकाणीं सर्व भरलेलें आहे. ही गीती **सुभाषित**रूप आहे. अन्वय–सत्यें धर्मार्थकाम (व) अत्यंत दुर्लभा मुक्ति पण ती (ही मिळते). सत्याचे [मूर्तिमंत] हरिहर, सत्कवि ‘सत्ये सर्वं प्रतिष्ठितं’ म्हणती. १७. बोली, वचन. १८. सभ्यांनीं सांगितलेली. १९. तयारी. २०. तीर्थाच्या पाण्यानें. २१. चांगल्या ब्राह्मणांस. २२. पाठभेद:–सांबा ध्याउनि. २३. प्रज्वलित अग्नि. २४. शिरा. **नीरंगरूपक**. २५. अत्यंत गरीब. २६. पदा शिवतो=शरण जातो. २७. अग्नींत. या गीतीचा अन्वय–जो सुदीनहि जन मनें ज्याच्या पदा शिवतो (तो) धन्य होतो, तो सदाशिव (ती) जों दहनांत शिरावी तों तीपुढें प्रकटे. २८. कृपेनें. २९. डोळे. ३०. चित्रासारखी. ३१. अपार. ३२. लाभे.

शंभु प्रसन्न होउनि सज्जनशतवर्णनीय[1] वदला हें, ।
'ऐक[2] महानंदे! तूं सत्वाढ्या[3], शुद्धकीर्तिपद[4] लाहें. ॥ ५४
कोण असी अन्य स्त्री? सर्वस्वाहूनि अधिक सत्य जिला. ।
धन्या सुमहाभागा[5] तूं, कीं त्वां मुख्य धर्म न त्यजिला. ॥ ५५
झालों वैश्य, पहाया कीं करिसी भक्ति कसि? कसा धर्म? ।
छळ केला, परि तुझिया सत्वें मी फार पावलों शर्म[6]. ॥ ५६
परधनलुब्धा[7] असती[8] असती बहुकपटपंडिता[9] गणिका, ।
तूं सत्यधर्मनिरता[10] लघुहि[11] बहुमता[12], जसी सुधाकणिका[13]. ॥ ५७
देहें[14] शिरलीसचि तूं, जेव्हां निश्चय तुवां बरा केला, ।
तव कीर्तिची धवलता[15] सुभगे! कोणाहि ये न राकेला[16]. ॥ ५८
द्रवलों[17], लवलों तव उपकारभरें[18], इष्ट तूज अनघेतें[19] ।
देतों वर; मागचि, जें व्हावें आयुष्य, भोग[20], धन[21], घे तें.' ॥ ५९
नमुनि महानंदा ती प्रभुसि म्हणे, "आयु, भोग, धन, नाकीं[22] ।
वास, सुधाहि[23] मज नको. सर्वहि हे हेतु[24] मृत्युजनना[25] कीं. ॥ ६०
स्वामी! त्वत्पादाब्ज[26]स्पर्शाचा मात्र काम[27], दे वर हा. ।
'स्वपदच्छायेंत[28]' म्हणसि, दीनातें तूंचि वामदेव[29] 'रहा.' ॥ ६१
मज सर्वदासदासीबंधुजनासह समस्तवरदेशा[30] ।
स्वपदीं ने निजदेशीं, यावरि[31] धाडूं नकोचि परदेशा[32]." ॥ ६२
ऐसें वेश्या विनवी प्रभुतें, पायांकडेचि पाहून. ।
प्रभुनें स्वपदीं नेली सुविमानीं स्वजन[33]युक्त वाहून. ॥ ६३

---

१. शेंकडों सज्जनांनीं वर्णन करण्यास योग्य. २. पाठभेदः—ऐक. ३. सत्वानें पूर्ण भरलेली. ४. शुद्धकीर्तीचें स्थान. ५. मोठी दैवाची. ६. सुख. ७. दुसऱ्याच्या द्रव्याविषयीं हापापलेल्या. ८. जारिणी. ९. कपटांत निपुण. १०. खऱ्या धर्माच्या ठायीं आसक्त. ११. अल्प. १२. फार मान्य. १३. अमृताचा थेंब. १४. अग्नींत. १५. शुभ्रता. १६. शरदृतूंतील सुद्धां पौर्णिमेला. **व्यतिरेक.** १७. विरघळलों, करुणेनें पाझरलों. १८. उपकाराच्या भारानें. १९. निष्पापेतें. पाठभेदः— मन घेतें. २०. विषय. २१. द्रव्य. या गीतीचा अन्वय—(तुजवर) द्रवलों, तव उपकारभरें लवलों, तूज अनघेतें इष्ट वर देतों, मागचि; जें आयुष्य, भोग [व] धन व्हावें, तें घे. २२. स्वर्गीं. २३. अमृत. २४. कारण. २५. मृत्यु व जन्म यांस. २६. तुमच्या चरणरूपकमलस्पर्शाचा. २७. इच्छा. या अर्धाचा अन्वय—स्वामी! त्वत्पादाब्जस्पर्शाचा मात्र काम (आहे.) [तरी त्वत्पदस्पर्शाचा] वर दे. २८. आपल्या पायाच्या सावलींत. २९. महादेव. 'वाम' याचा 'वक्र, वांकडा' असा अर्थ असल्यामुळें येथें **विरोधाभास** आहे. ३०. समस्त+वरद+ईशा=सर्व वर देणाराच्यां स्वामी! ३१. यापुढें. ३२. अन्य स्थलास. ३३. आप्तांसह.

शिवलोक महानंदा वेश्या पात्रे असी अगा! राया! ।
तो मर्कट मग मेला, पुण्यें आला तुझ्या अगारा या. ॥ ६४
रुद्राक्षधारणानें कुक्कुट झाला प्रधानसुत राया! ।
होइल संसारनदी श्रीशिवभजनेंकरूनि सुतरा या." ॥ ६५
सांगे असें पराशरमुनि, जें रुद्राक्षधारणीं फळ, तें. ।
गळतें अघ या श्रवणें, कळतें हित जन्ममरणही टळतें. ॥ ६६
ऐसी कथा यथामति लिहिली ही रामनंदनें नमुनी, ।
श्रवणें इच्या निववीले, पूर्ण करुनि काम, नंदनें न, मुनी. ॥ ६७

---

## अध्याय एकविसावा.

श्रीमत्पराशरातें नमुनि म्हणे भद्रसेन, 'बापा! या ।
संसारीं पुरुषार्थप्रासादा साधुसंग हा पाया. ॥ १
कथिलें परम रहस्य, ज्ञानिवरा! हें तुवांचि सांगावें. ।
सर्वज्ञा तुज आम्ही, साक्षात् शिव म्हणुनि, मग न कां गावें? ॥ २
वर्णिति वेद पुराणें तीर्थाधिक म्हणुनि साधुच्या संगा, ।
ईतरांची काय कथा? सत्संगा वांछिती स्वयें गंगा. ॥ ३
बा! या मत्पुत्राचें जें काय भविष्य, तेंहि आयकिव. ।
सद्रसना जसि विनतीं; तसि न करी औरसींहि माय किंव. ॥ ४
त्यासि मुनि म्हणे, 'पडला संकोच मला भविष्य सांगाया. ।
आंगा यावा श्रवणें कंप, असें पुससि उग्र कां गा! यां?' ॥ ५
भूप म्हणे, 'मुनिवर्या! हा दास तुला अधीर कां गमला? ।
करिसिल बा! तूंचि दया, मत्पुत्राचें भविष्य सांग मला. ॥ ६
मुनिराज म्हणे, 'झालीं वर्षें जन्मोनि आजि बारा या, ।
सप्तम दिवसीं आहे मरण तुझ्या नंदनासि. बा! राया!' ॥ ७

---

१. घरास. २. संसाररूप नदी. ३. तरून जाण्यास सोपी. ४. पातक. ५. शांत केले. ६. इच्छा. ७. इंद्राच्या नंदननामक बागेनें. **व्यतिरेक.** ८. धर्मार्थकाममोक्षरूप राजवाड्यास. हें अर्ध **सुभाषित**रूप आहे. **परंपरितरूपक.** ९. ज्ञानिश्रेष्ठा. १०. मूर्तिमंत. ११. तीर्थापेक्षां श्रेष्ठ. ही गीति **सुभाषितरूप** आहे. १२. **काव्यार्थापत्ति.** १३. साधुसंगतीस. १४. साधूंची वाणी. **व्यतिरेक.** १५. नम्रीं. १६. स्वतांच्या मुलावर. १७. दया. ही गीति **सुभाषित**रूप आहे. १८. भीड. १९. भयंकर. २०. मला पराशराला. २१. मुनिश्रेष्ठा. २२. भ्याड. २३. पुत्रास.

त्या कालकूटतुल्यें[1] वचनें पावे नृपाळ मोहातें,[2] ।
केला सावध मुनिनें, अतिपुण्यें[3] स्पर्श करुनि तो हातें. ॥ ८

देउनि अभय,[4] कृपामृतसिंधु[5] पराशर दयापर[6] महर्षी, ।
सांगुनि सदुपाय, करी तत्काळचि तो तया परम हर्षी.[7] ॥ ९

'सर्वाद्यें[8] परम शिवें ब्रह्मा निर्मुनि दिले तया वेद, ।
रुद्राध्यायहि दिधला, ज्यातें जपतां उरों नये खेदें.[9] ॥ १०

सर्वोपनिषत्सार[10] श्रीरुद्राध्याय दोष जाळाया, ।
टाळाया मरणातें, क्षम[11] हा श्रीशंभुभक्त पाळाया. ॥ ११

विधि[12] विनविला यमानें निर्विघ्नें[13] स्वाधिकार[14] चालाया, ।
कीं दंडार्ह[15] असावें नरकीं बहु पापी[16] जीव[17] घालाया. ॥ १२

विधिनें दोन अविद्याकन्या[18] निर्मूनियां दिल्या त्याला,[19] ।
अश्रद्धा दुर्मेधा, सुकृतपथीं[20] घालितात या घाला. ॥ १३

श्रद्धा मेधा नामें विधेच्या सर्वसंमता[21] तनया, ।
रुद्राध्यायफळातें पात्र करिति सुदृढनिश्चयें[22] जन यों.[23] ॥ १४

रुद्रायुताभिमंत्रित[24] पुण्यजळें स्नान यासि घालावें, ।
अयुताब्द[25] रोमें[26] याचें मृत्युबळें एकही न हालावें. ॥ १५

रुद्रायुताभिषिक्त[27] त्वत्सुत पाळिल धरा[28] अयुत वर्षें, ।
पावेल शिवपदातें, पूर्वज उद्धरुनि, हा परम हर्षें.' ॥ १६

भूप म्हणे, 'बा! मज दे करुनि अनुष्ठान[29] दान तनयाचें. ।
दास्य स्वीकारूत[30] प्रेमें त्वत्प्रभृति[31] साधुजन याचें.' ॥ १७

१. कालकूटविषासारख्या. याचें विशेष्य 'वचनें.' **उपमा.** २. मूर्च्छेस. ३. अतिशय पवित्र अशानें. याचें विशेष्य 'हातें.' ४. धीर. ५. कृपारूप अमृताचा समुद्र. **नीरंगरूपक.** ६. दयेविषयीं तत्पर. ७. आनंदित. ८. सर्वांचा आदि अशानें. याचें विशेष्य 'शिवें.' ९. दुःख. १०. सर्व उपनिषदांचें सत्त्व. ११. समर्थ. १२. 'वि'च्या आवृत्तीमुळें **यमक.** १३. विघ्नें न येतां. १४. आपला अधिकार. १५. दंड करण्यास योग्य. १६. पापी. १७. प्राणी. १८. अविद्येपासून जन्मलेल्या कन्या. १९. यमाला. २०. पुण्यमार्गांत. २१. सर्व साधूंस मान्य. २२. फार बळकट निश्चयानें. २३. श्रद्धा व मेधा. २४. दहाहजार रुद्रांनीं मंत्रिलेल्या. २५. दहाहजार वर्षें. २६. केश. २७. दहाहजार रुद्रांनीं अभिषेकिलेला. २८. पृथ्वी. २९. धर्मसंबंधीं कृत्य. ३०. अंगीकरोत. हें आज्ञार्थी तृतीय पुरुषाचें अनेकवचन आहे. ३१. तूं ज्यांत मुख्य आहेस असे.

तो मुनि तें मान्य करी, सद्ब्राह्मण बहुसहस्र आणवुनी, ।
त्या सदनुष्ठानातें प्रारंभी[1], धर्मकृत्य जाणवुनी. ॥ १८
सप्तम दिवसीं करिती अभिषेक यथोक्त[2] जों महाविप्र, ।
मूर्च्छित होय नृपतनुज[3] पळभरि, मग सावधानही क्षिप्र. ॥ १९
पुसतां कुमार[4] सांगे, 'उग्र पुरुष मज वधावया आला, ।
झाला मोह[5] पहातां दंडधरा[6] अतिभयानका त्याला. ॥ २०
तोंचि महावीर[7] पुरुष आले धांवोनि, [8]तो तिहीं धरिला, ।
पाशें बांधुनि सहसा, मग येथुनि दूर तत्क्षणीं हरिला[9]. ॥ २१
इतुकें पाहुनि झालों मुनिहो! मी सावधान, भय नाहीं ।
कांहीं आतां, आहें स्वस्थ विलोकुनि तुम्हांसि नयनांहीं[10].' ॥ २२
त्यातें पराशरादिक[11] सन्मुनि ते, करुनि वृष्टि आशींची[12], ।
सुखविति, जयापुढें बहु कीर्ति [13]उणी अमृततोयराशीची[14]. ॥ २३
भूपें नमुनि प्रेमें रत्नालंकार भव्य[15] लेवविले[16], ।
जेवविले, मणिकांचनराशि[17] तयां ब्राह्मणांसि देवविले. ॥ २४
भोजन करुनि सभेंत क्षितिपति[18] तो भद्रसेन जों बसला, ।
तों श्रीनारद आला, ज्याचा महिमा जगत्रयीं[19] वसला. ॥ २५
कनकासनीं[20] समर्चुनि[21], नमुनि शिरें पाय, तो पुसे राय, ।
'सांग सविस्मय[22] दिससी, बा! त्वां आश्चर्य देखिलें काय?' ॥ २६
देवर्षि[23] म्हणे, 'राया! गगनपथें[24] उतरतां नवल भारी[25] ।
अवलोकिलें[26], करो तें तुजसह हे[27] सत्सभा श्रवण सारी. ॥ २७
मृत्यु तुझ्या पुत्रातें आला होता स्वयेंचि[28] माराया, ।
बा! राया! त्या शंभुप्रभु धाडी वीरभद्र[29] वाराया. ॥ २८
तो वीरभद्र भगवान् सहसा गांठूनि मृत्युला, रागें ।
बांधुनि घेवुनि जाय, प्रभुपार्षद[30] त्यासि ताडिती मागें. ॥ २९

---

१. आरंभ करी. २. यथाविधि. ३. राजपुत्र. ४. मुलगा. ५. मूर्च्छा. ६. दंड धारण करणाऱ्याला. ७. मोठे शूर. ८. दंडधर. ९. नेला. १०. नेत्रांनीं. ११. पराशरप्रमुख. १२. आशीर्वादांची. १३. कमी, थोडी. १४. अमृतसमुद्राची. **व्यतिरेक**. १५. उंची, तेजस्वी. १६. धारण करविले. १७. रत्नें व सोनें यांच्या राशी. १८. राजा. १९. स्वर्ग, मृत्यु व पाताळ यांत. २०. सुवर्णाच्या आसनावर. २१. पूजून. २२. आश्चर्ययुक्त. २३. नारद. २४. आकाशमार्गें. २५. मोठें आश्चर्य. २६. पाहिलें. २७. ही. २८. स्वतांच. २९. हा शंकराचा गण. दक्षयज्ञाचे वेळीं दक्षाचा नाश करावयासाठीं यास शिवानें जटेपासून उत्पन्न केलें. ३०. प्रभूचे (शिवाचे) गण.

तें जाणुनि **यम**धर्महि नमुनि म्हणे, '**वीर**भद्रजी! याचा, ।
अपराध काय? सांगा. राजाचा सुत गतायु तो साचा.' ॥ ३०

श्री**वीर**भद्र वदला, 'अपराध कसा **यम**! नसे याला? ।
रुद्रस्नानगताशुभ अयुतायु नृपाळपुत्र कीं झाला. ॥ ३१

संदेह असे तुज, तरि सत्वर तो **चि**त्रगुप्त आणावा. ।
अगतायु **भ**द्रसेनक्षितिपतिसुत, कीं गतायु, जाणावा.' ॥ ३२

स्मरतांचि **चि**त्रगुप्त प्रकटे, त्यातें **यम** स्वयें बा! गा! ।
आयुष्य तव सुताचें पुसता झाला नृपा! महाभागा! ॥ ३३

प्रथम 'द्वादश वर्षें' ऐसें बोलोनियां उगा राहे, ।
पाहे नीट विचारुनि, 'नृपसुत अयुतायु' मग म्हणे, 'आहे.' ॥ ३४

**यम** भिवुनि **वीर**भद्रा 'चुकलों' ऐसें म्हणोनि, करे जोडी. ।
करुनि कृपा, अभय नृपा! देवुनि, तो प्रणत मृत्युतें सोडी. ॥ ३५

मुक्त **यम** स्वस्थाना, **कै**लासीं **वीर**भद्र जाय, नृपा! ।
मी तव सदना आलों, **प्र**भुची तुज जाणवावयासि कृपा. ॥ ३६

रुद्रायुताभिमंत्रिततीर्थस्नानेंचि मृत्यु ओसरला, ।
त्वत्पुत्र अयुतजीवन झाला बा! दोष सर्वही सरला.' ॥ ३७

ऐसें सांगुनि **ना**रद, राजाचा हरुनि ताप, गेला हो! ।
त्याची कीर्ति म्हणतसे देवांच्या, 'आलि' आपगेला, 'हो.' ॥ ३८

यापरि **का**श्मीरनृपति **रु**द्राध्यायाचिया प्रभावानें ।
केला पूर्णमनोरथ, ऐसा अमृतांशुच्या न भावानें. ॥ ३९

लिहिली कथा यथामति **राम**सुतें नमुनि संतरायांतें, ।
हे **ह**रि**ह**रयश गातां, बाधों देती न अंतरायांतें. ॥ ४०

---

१. माझा यमाचा. २. सरलें आहे आयुष्य ज्याचें असा. ३. रुद्रस्नानें गेलें आहे अशुभ (मरण) ज्याचें. ४. दहा हजार वर्षें ज्याचें आयुष्य आहे असा. ५. राजपुत्र. ६. संशय. ७. प्राण्यांच्या पापपुण्याचा हिशेब ठेवणारा यमाचा लेखक. ८. ज्याचें आयुष्य सरलें नाहीं असा. ९. भद्रसेन राजाचा मुलगा. १०. बारा वर्षें. ११. कर जोडणें=शरण येणें. १२. नम्र झालेल्या यमास. १३. यमलोकीं. १४ वीरभद्र शिवपार्षद असल्यामुळें शिवलोकीं गेला. १५. दहा हजार रुद्रानें मंत्रिलेल्या तीर्थाच्या स्नानानें. १६. दूर गेला, टळला. १७. भागीरथी नदीला. १८. सखी. कीर्ति व गंगा यांमध्यें शुभ्रत्व, पावनत्व व दिव्यत्व हे समान धर्म आहेत. **निदर्शना.** १९. ज्याची इच्छा पूर्ण झाली असा. २०. चंद्राच्या भावानें म्हणजे सूर्यानें. **व्यतिरेक.** २१. साधुश्रेष्ठांतें. २२. संतराय. २३. विघ्नांतें.

## अध्याय बाविसावा.

सूत म्हणे, 'मुनिहो! जे नानापातकसमृद्धिनें[1] युक्त, ।
ते होतात शिवकथाश्रवणें[2] तत्काल सर्वही मुक्त. ॥ १

याविषयीं इतिहास श्रवण करा, परम पुण्यही आहे, ।
याच्या श्रवणें पातक, लघु[3] गुरुहि[4] असो, न लेशही[5] राहे. ॥ २

प्रख्यात[6] दक्षिणापथदेशीं[7] 'बाष्कल' असें जया नाम, ।
ग्राम कुशूद्रजनाचा[8] चौर्यव्यभिचारदुष्क्रियाधाम[9]. ॥ ३

तेथें बिंदुगनामा, वेश्यापति, विप्र, अधम[10] पापरत[11], ।
न म्हणे कोणीहि तया ऐसें कीं, 'त्यजुनि कुपथ[12] हा परत.' ॥ ४

त्याची पत्नी तरुणी, ती नामें वंजुला, तिला सोडी; ।
जोडी गणिकासंगति[13], बिंदुग पाहे गृहीं[14] न ती गोडी. ॥ ५

पति गणिकेसींच रमे, न धरी चित्तांत लेशही व्रीडा[15], ।
ती वंजुलाहि तरुणी जारासीं सर्वदा करी क्रीडा. ॥ ६

तो जारसंगतीतें विप्राधम[16] बिंदुग स्वयें पाहे, ।
साहेना तें, तीतें ताडी, कीं ती न सत्पथीं[17] राहे. ॥ ७

भय न धरुनि, कोपें ती पतिस म्हणे, 'परम मूढ[18] तूं गमसी, ।
मज तरुणीतें त्यागुनि, वेश्येसीं सर्वदा कसा रमसी? ॥ ८

तुज ती वेश्या न सुटे, माझी गति[19] काय? तूंच सांग मला. ।
अपराध आपला कां न गमे, स्त्रीचाचि फार कां गमला?' ॥ ९

तो अधम म्हणे, 'भार्ये! सत्य वदसि, मंतुला[20] न तूं पात्र, ।
गात्र[21] व्यर्थ[22] न अर्पी, जारापासूनि वित्त[23] घे मात्र. ॥ १०

जें जार तुला देतिल धन, तें सर्वहि मलाचि अर्पावें, ।
त्वां आपणासि विषयें, म्यांही भार्ये! यथेष्ट तर्पावें. ॥ ११

मज जोडुनि देशिल जें, देयिन पण्यांगनांसि[24] मी वित्त. ।

---

१. पुष्कळ पातकांच्या सांठ्यानें. २. शिवकथेच्या ऐकण्यानें. ३. अल्प. ४. मोठें. ५. थोडेंही. ६. प्रसिद्ध. ७. दक्षिण हिंदुस्थानांत. ८. वाईट शूद्रलोकांचा. ९. चोरी, व्यभिचार व दुष्कर्मे यांचें घर. १०. नीच. ११. पापाच्या ठिकाणीं आसक्त. १२. दुष्ट मार्ग. १३. वेश्येची संगति. १४. घरीं, स्त्रीच्या ठायीं. १५. लज्जा. १६. नीच ब्राह्मण. १७. सन्मार्गांत. १८. मूर्ख. १९. वाट, परिणाम. २०. रागाला. २१. शरीर. २२. फुकट. २३. द्रव्य. २४. वेश्यांसि.

माझें तुझेंहि होइल विषयसुखें[1] तुष्ट सर्वदा चित्त. ॥ १२
ती स्त्री म्हणे, 'अवश्य'; व्यभिचारीं मग शिरे, द्रविण[2] जोडी[3], ।
थोडी पहिली होती, बहु वाटे विषय सेवितां गोडी. ॥ १३
स्त्रीदत्तधनें[4] गणिकाभोगें स्वप्नांतही न घामेला[5], ।
आनन[6] करूनि काळें, जोडुनि तोही अशा अघा[7] मेला. ॥ १४
पतिमागें पुत्रयुता[8] ती स्त्री होती तसीच निजगेहीं[9], ।
गेली गोकर्णातें, होतां तारुण्यभर[10] उणा देहीं[11]. ॥ १५
विधियोगें[12] क्षेत्रातें पावे ती बंधुजनयुता[13] असती[14], ।
तीर्थस्नान करुनियां, झाली श्रीशंकरालयीं[15] बसती. ॥ १६
सुब्राह्मण[16] पौराणिक सांगत होता महापुराणकथा[17], ।
ती पूर्वजन्मसुकृतें[18] आली तीच्या नवीच कर्णपथा[19]. ॥ १७
'यमकिंकर[20] असतीच्या[21] घालिति योनींत परिघ[22] तापविला, ।
पापविलासांचा[23] परिपाक[24] सुदुःसह गमेल हा पविला[25].' ॥ १८
ऐसें ऐकुनि झाला प्राप्त बहु भयेंकरून कांप तिला, ।
चित्तांत म्हणे, 'हां[26] ! मी भजलें जारा, त्यजूनि कां पतिला.' ॥ १९
एकांतीं शरण तया धर्मज्ञा[27] जाय, ती धरी पाय, ।
प्रायश्चित्त विचारी, अनुतप्ता[28] अघ[29] कथी, म्हणे, 'हाय'! ॥ २०
तो साधु म्हणे, 'भद्रे[30] ! प्राशावें पूत[31] शंभुयश[32] कानीं, ।
श्रीशिवनामाग्निपुढें[33] न टिकावें पलहि पापमशकांनीं[34]. ॥ २१

१. रतिसुखानें. २. द्रव्य. ३. मिळवी. ४. स्त्रीनें दिलेल्या द्रव्यानें. ५. न घामेला=कष्टी झाला नाहीं. ६. आनन काळें करून=आपल्या कीर्तीला डाग लावून. ७. पातकास. ८ पुत्रानें युक्त. ९. आपल्या घरीं. १०. तरुणपणाचा भर. ११. शरीरीं. १२. दैवयोगानें. १३. आप्तांनीं युक्त. १४. जारिणी. १५. श्रीशंकराच्या मंदिरांत. १६. चांगला ब्राह्मण. १७. महापुराणांतील कथा. पुराणाचें लक्षण—सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च। वंशानुचरितं चेति पुराणं पंचलक्षणं. हीं महा॰ पुराणें १८ आहेत. (१) ब्रह्म, (२) पद्म, (३) विष्णु, ४ शिव, (५) लिंग, (६) गरुड, (७) नारद, (८) भागवत, (९) अग्नि, (१०) स्कंद, (११) भविष्य, (१२) ब्रह्मवैवर्त, (१३) मार्कंडेय, (१४) वामन, (१५) वाराह, (१६) मत्स्य, (१७) कूर्म, (१८) भारत. १८. पूर्वजन्मींच्या पुण्यानें. १९. कर्णमार्गास, कर्णीं. २०. यमाचे सेवक. २१. जारिणीच्या. २२. प्रहार. २३ पापयुक्त क्रीडांचा. २४. परिणाम. २५. वज्राला. **व्यतिरेक.** २६. हाय. २७. धर्म जाणणाऱ्यास. २८. पश्चात्ताप पावलेली. २९. पाप. ३०. भल्या स्त्रिये! ३१. पवित्र. ३२. शिवकीर्ति. ३३. श्रीशिवनामरूप अग्नीपुढें. ३४. पापरूप माशांनीं. **परंपरितरूपक.**

श्रीशंभुकथाश्रवणें ज्ञान ध्यानहि सुखेंचि लाधेल,[1] ।
कथिलें याहुनि[2] शतगुण[3] अधिक असो दुरित[4], तुज न बाधेल. ॥ २२
झाला पश्चात्ताप, प्रायश्चित्तांत मुख्य हा होय. ।
यापरि पवित्र न करी पापिजना[5] देवसिंधुचें[6] तोय[7]. ॥ २३
संतत सज्जनसेवन[8], सत्क्षेत्रनिवास[9], सत्कथाश्रवण[10], ।
यांहीं मुक्त प्राणी पश्चात्तापी न जाहला कवण? ॥ २४
शिवपादाब्जध्यानें[11] जन्में एकेंचि होतसे मुक्ती. ।
श्रीशंभुकथाश्रवणें तरसी तूं, सत्य सत्य हे उक्ती[12].' ॥ २५
करितां उपदेश असा, त्या सद्गुरुचे मनीं धरी चरण. ।
त्या गोकर्णींच वसे, ऐके सुकथा, करी शिवस्मरण[13]. ॥ २६
देहीं रुद्राक्ष धरी, भस्मोद्धूलन[14] करी, कथाश्रवण, ।
तीर्थस्नान, मिताशन[15], चित्तिं शिवध्यान, सत्पथप्रवण[16]. ॥ २७
आधीं वैराग्यकथा[17] तो सद्गुरु तीस नित्य आयकवी, ।
मग भक्तिकथा सांगुनि रोमांचित[18] करि तदीय[19] काय[20] कवी. ॥ २८
सुकथाश्रवणें होतां मन निर्मळें[21], तीस जाहलें ज्ञान. ।
ध्यान श्रीकंठाचें[22] ठसलें, द्यायासि मुक्तिचें दान. ॥ २९
दृढ पद्मासन[23] घालुनि, हृदयीं आणूनि सांबमूर्ति, सती[24] ।
प्रेमें पूजि, प्रार्थी, साधाया भक्तिकामपूर्तिस[25] ती. ॥ ३०
'करुणेच्या अंभोदा[26]! शंभो! दासामरद्रुमा[27]! बा! हे ।
आहे दासी सक्ता[28] पायांपासीं, प्रभो! मला बाहें. ॥ ३१
नमितां, न लोटिला त्वां पायें कोणीहि रंक[29] रागानें[30], ।

---

१. मिळेल. २. तूं सांगितलेंस त्याहून. ३. शंभरपट. ४. पातक. ५. पापी लोकांस. ६. भागीरथीचें. ७. पाणी. **व्यतिरेक.** ८. साधूंची सेवा. **अनुप्रास.** ९. चांगल्या क्षेत्रांत राहणें. १०. चांगल्या कथेचें श्रवण (ऐकणें). **समुच्चया**लंकार. २३,२४ ह्या गीति **सुभाषित**रूप आहेत. ११. शिवचरणकमलाच्या ध्यानानें. १२. वचन. १३. शिवाचें चिंतन. १४. भस्माचें उधळणें. १५. मोजकें (नियमित) अन्न. १६. सन्मार्गाचे ठायीं–सदाचरणाविषयीं–दक्ष. १७. विरक्तीच्या (=विषयत्यागाच्या) कथा. १८. रोमांचयुक्त. १९. तिचा. २०. देह. २१. शुद्ध. २२. शिवाचें. २३. योगसाधनांतील एक कमलाकार बैठक. २४. पार्वती. २५. भक्तीच्या इच्छेच्या पूर्णतेस. २६. मेघा. २७. भक्तांच्या कल्पवृक्षा! २८. रमलेली, गढलेली. २९. दीन. ३०. कोपानें.

मुलली तव सुयशाच्या, हेच न, कवि[1]कोटि **शं**करा! गानें. ॥　　३२
भक्तें समर्पिलें तुज, रत्न मुकुट तेंवि, **शं**करा! बेल, ।
भक्तिमुळें दासगृहीं[2] **सि**द्ध्यष्टक[3] तें विशंक[4] राबेल[5]. ॥　　३३
श्री**सां**बा नित्य तुझा माझ्या ठायीं कृपाकटाक्ष[6] असो, ।
कमळीं मधुपकुल[7], तसें त्वच्चरणयुगीं[8] मदीय[9] चित्त वसो.' ॥　　३४
ऐसें **म**हेश्वरातें कर जोडुनि भक्तिनें सदा विनवी. ।
**शि**वसागरीं[10] नदी ती होय, न उपमा बुधें वदावि नवी. ॥　　३४
असतीहि[11] गुरुदयेनें[12] **शि**वभजनें कर्मबंध[13] ती तोडी[14], ।
जोडी **शं**भुध्यानीं मानस[15], वपु[16] जीर्णवस्त्रसें[17] सोडी. ॥　　३६
स्पर्शुनि **शि**वदूतांहीं दिव्याकृति[18] तत्क्षणींच ती केली, ।
नेली श्री**शि**वलोकीं, दिव्यविमानीं[19] बसोनियां गेली. ॥　　३७
पाहे **ज**गदीशातें, तद्वामांकीं[20] तयाहि **दे**वीतें[21]. ।
परमामृत[22] मूर्त[23] नयनयुग्में[24] भाग्येंकरूनि सेवी तें. ॥　　३८
[25]कोटिदिनकरद्युति **शि**व, विद्युत्पुंजप्रभा[26] **शिवा दे**वी,
पाहुनि भाग्यें, त्यांच्या चरणावरि शिर पुनःपुन्हा ठेवी. ॥　　३९
ज्याच्या ध्यानें, स्मरणें, [27]तीनीही तांप संपती, ती तें ।
पदयुग्म[28] नमी प्रेमें, कुरवाळिति आद्य[29] दंपती[30] तीतें. ॥　　४०
सांत्विति तितें **शि**व **शि**वा, जैसे चिरदृष्ट[31] पितरें[32] तनयेतें[33], ।

---

१. कोटि साधु. या अर्धांचा अन्वय–शंकरा! तव सुयशाच्या गानें [केवळ] हेचि न, [तर] कविकोटि(ही) भुलली. २. भक्ताच्या घरीं. ३. आठ सिद्धि. ४. निःसंशय. ५. सेवा करील, नांदेल. ६. कृपादृष्टि. ७. भुंग्यांचा समुदाय. **वाक्योपमा.** ८. तुझ्या चरणद्वयाच्या ठायीं. ९. माझें. १०. शिवरूप समुद्रांत. शिवसागरीं ती नदी होय=ती शिवरूपांत समरस झाली, ती शिवस्वरूपाशीं एकरूप होऊन गेली. ११. जारिणीहि. १२. गुरूच्या कृपेनें. १३. प्रारब्धाचें बंधन. १४. पाठभेदः–सोडी. १५. मन. १६. देह. १७. जुन्या वस्त्रासारखें. १८. सुंदर आहे आकृति जिची अशी. १९. तेजस्वी विमानांत. २०. त्याच्या (शिवाच्या) डाव्या मांडीवर. २१. पार्वतीतें. २२. श्रेष्ठ अमृत. २३. मूर्तिमंत. २४. नेत्रांच्या जोडीनें. २५. कोटि सूर्यांप्रमाणें ज्याचें तेज आहे असा. २६. विजेच्या राशीप्रमाणें कांति आहे जिची अशी. २७. कायिक, वाचिक व मानसिक दुःखें. २८. चरणयुग. २९. पहिले. ३०. जायापती. 'दंपती' हा शब्द अनेकवचनी आहे. कालिदासानें रघुवंशांत आरंभीं मंगलाचरणांत हीच आद्यदंपतीची कल्पना आणिली आहेः–वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये । जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ॥ १।१. ३१. फारा दिवसांनीं भेटलेले. **उपमा.** ३२. आईबाप. ३३. कन्येतें.

परि तें प्रेम, बहुत जरि असति अपत्यें[1], असें तरि न[2] येतें. ॥ ४१

पहिली होती असती[3], सेवुनियां शंभुसत्कथारस[4] ती, ।
शिवमंदिरांत[5] वसती पाहुनि, सानंद[6] जाहली, असती. ॥ ४२

श्रीशंभुप्रासादीं[7] एका समयीं स्मरोनियां पतितें, ।
प्रार्थुनि जगदंबेतें[8], पुसती झाली तयाचिया गतितें[9]. ॥ ४३

श्रीजगदंबा देवी, ज्ञानें प्रत्यक्ष सर्व जी पाहे, ।
सांगे, 'पिशाच[10] होउनि तव भर्ता[11] विंध्यपर्वतीं आहे.' ॥ ४४

नमुनी म्हणे, 'शरण तुज, विधिचें[12] व्हायासि पद महा[13] सद[14], ये, ।
तो सुगतितें[15] उपायें कवणें पावेल? वद महासदये[16]!' ॥ ४५

जी अतिसदया वाढी स्वकरें भक्ता जना सुपायस[17], ती, ।
सांगे सर्वोपास्या[18], शरणागतवत्सला[19], उपाय सती. ॥ ४६

'वत्से! जरि तव पति तो पुण्या अस्मत्कथा[20] श्रवण करिल, ।
तरि लब्धशुद्धि[21] होउनि, या शिवलोकीं सुखस्थिती[22] वरिल.' ॥ ४७

पुनरपि नमन करुनि, ती बहु विनवी स्वपतिचें अघ हराया[23], ।
पावुनि उच्चपदस्थिति[24], तेथून पुन्हा कधीं न घसराया[25]. ॥ ४८

या बद्धांजलिवरि[26] ती द्रवली देवी दयासुधासरिता[27], ।
अबुधाहि[28] जिच्या नांवें होय भवार्णव[29], जसा बुधास, रिता[30]. ॥ ४९

१. संतति. या अर्धाचा अन्वय—परि जरि बहुत अपत्यें असति, तरि तें प्रेम असें न येतें. आई-बापांस एकुलती एक मुलगी असून ती फार काळ दृष्टीस पडली नसतां जसें प्रेम उत्पन्न होतें तसें पुष्कळ मुलें असल्यास उत्पन्न होत नाहीं; पण शिवपार्वती यांचें तसें नाहीं म्हणजे त्यांचे जरी पुष्कळ भक्त असले तरी सर्वांवर सारखेंच उत्कट प्रेम असतें, हा अर्थ. २. **व्यतिरेक.** ३. जारिणी. ४. शिवसत्कथारूप रस. ५. देवालयांत. ६. आनंदयुक्त. अन्वय—असती (प्राप्त झालेली) शिवमंदिरांत वसती (वास) पाहुनि सानंद जाहली. ७. श्रीशिवाच्या मंदिरांत. ८. जगाची माता पार्वती तीतें. ९. स्थितीतें, परिणामातें. १०. भूत. ११. पति. १२. ब्रह्मदेवाचें. १३. आनंदाला आश्रयस्थान. १४. सभा. अन्वयः—विधिचें सद महा पद व्हायासि, [मी] तुज शरण ये. अर्थः—ब्राह्मणाचा उद्धार होऊन सत्यलोकीं ब्रह्मसभेंत आनंदोत्सव व्हावा म्हणून मी तुला शरण येतें. १५. उत्तमगतीला. १६. अतिदयाळे! १७. दुधाचा उत्तम पदार्थ, खीर. १८. सर्वांनीं उपासना करण्याजोगी. १९. शरण आलेल्याविषयीं दयाळू. २०. आमचें चरित. २१. मिळाली आहे शुद्धि ज्यास असा. २२. सुखावस्था. २३. संपावयास. २४. उत्तम पदाची अवस्था. २५. पतन पावायास. २६. हात जोडिले आहेत जिणें अशीवर. २७. दयारूप अमृताची नदी. २८. अज्ञानास. २९. संसारसमुद्र. ३०. रिकामा.

आज्ञापि स्वमुखें, जो गं[1]धर्वाधिपति तुंबर, तया ते, ।
गुण गात्यातें भेटे जी, जैसी गाय हुंबरतयातें. ॥ ५

'या स्त्रीतें दूता तूं घेउनि जा विंध्यपर्वतीं तू[2]र्ण, ।
अ[3]घनग ईच्या पतिचा अ[4]स्मत्कीर्त्यशनिनें करीं चू[5]र्ण. ॥ ५

अस्मत्कथा पिशाच श्रवण करी तो, असें करीं त्वरित. ।
स्वस्थ करावा आप्तें वैद्यें अ[6]गदें बळें जसा ज्व[7]रित. ॥ ५

जरिहि करिल ऐकाया पुण्या अस्मत्कथा पि[8]सा चा[9]र, ॥
ऐकिव बळेंचि; कथिती [10]कवि, न वळे ज[11]ड, तथापि सा[12]चार. ॥ ५

करिलचि तो ऐकवितां पु[13]ण्या अस्मत्कथा पिहि[14]तें कान, ।
शि[15]शु नायके करावें, त[16]न्मातेनें तथापि हि[17]तें कां न ? ॥ ५

अ[18]स्मत्पूतकथांनीं पा[19]तकपादप स[20]मूळ खो[21]णावा, ।
आणावा शि[22]वसन्निध, हा आवश्यक निदे[23]शें जाणावा.' ॥ ५५

ऐसी आज्ञा होतां, जीतें न भजोनि सर्व ता[24]पावे, ।
तीतें वंदुनि तुंबर [25]सुविमानें विंध्यपर्वता पावे. ॥ ५६

त्या स्त्रीसह येउनि तो तुंबर विं[26]ध्याचळांत तो पाहे, ।
आहे पिशाच भी[27]षण, कोणी ज्याच्या न दर्शना साहे. ॥ ५७

१. गंधर्वांचा राजा. या गीतीचा अन्वयः—जैसी हुंबरतयातें (=हंबरणाऱ्याला, हंबरडा फोडणाऱ्या वासराला) [तैसी] जी गुण गात्यातें (=गुण गाणाऱ्या) भेटे, ते (=ती पार्वती), जो गंधर्वपति तुंबर तया स्वमुखें आज्ञापी. पाठभेदः—·········, तयातें । गुण गा त्यातें भेटे जा जैसी गाय हुबरतयातें. २. त्वरित. ३. पातकरूप पर्वत. ४. आमच्या कीर्तिरूप वज्रानें. **परंपरितरूपक.** ५. पीठ, चुरा. ६. औषधानें. **उपमा.** ७. ताप आलेला. या अर्धाचा अन्वय–जसा आप्तें वैद्यें बळें ज्वरित स्वस्थ करावा. ८. वेडा. ९. चेष्टा. १०. सुज्ञ. ११. अज्ञ. १२. खरें. हा भाग **सुभाषितरूप** आहे. १३. पुण्यकारक. १४. आच्छादित. १५. बालक. १६. त्याच्या मातेनें. १७. कल्याण. हें अर्ध **सुभाषितरूप** आहे. **अप्रस्तुतप्रशंसा** व **प्रश्न.** १८. आमच्या पवित्र चरित्रांनीं. १९. पातकरूप वृक्ष. **नीरंगरूपक.** २०. मुळासकट. २१. खणून काढावा. **अनुप्रास.** २२. शिवाजवळ. २३. आज्ञा. २४. दुःख पावावे. **पर्यायोक्त.** कारण पार्वतीतें असें न म्हणतां 'जीतें न भजोनि सर्व पावे तीतें' असें म्हटलें आहे. २५. ही तृतीया आहे. वाहनाचें साधन संस्कृतांत नेहमीं तृतीयेंत वापरितात. मराठींतही हा प्रकार बहुमान्य आहे. जसें:–तो आगगाडीनें आला. उद्याच्या बोटीनें मी जाणार आहें. इंग्रजींत सुद्धां 'By' या अव्ययाचा असा उपयोग होतो. २६. विंध्यपर्वतांत. २७. भयंकर.

प्रभुचे दूत[1] प्रेरुनि[2], परमोग्र[3] पिशाच तो धरविला हो! ।
पापें प्रभुप्रतापा[4], तरि तिमिरें[5] प्राप्त रोध[6] रविला हो. ॥ ५८
करकरुनि[7] बांधिला तो शिवदूतांनीं महापिशाच पळें[8], ।
घटिका न भरों देतां, ज्या[9] लंघाव्या दहा दिशा चपळें[10]. ॥ ५९
निश्चळ[11] करुनि, बसविला तो भूत बळेंचि आयकायास. ।
शिवदूतायास[12] तसा होय जसा अगददायकायास[13]. ॥ ६०
तो आसनीं बसविला पाप, हयीं[14] जेविं रडत राऊत[15], ।
श्रीशिवकारुण्याचा[16] म्हणतो, 'रे! सर्व जड[17]! तरा,' ऊत[18]. ॥ ६१
यश गायासि शिवाज्ञा[19] बसवी तैशापुढेंहि तुंबर[20], ते, ।
जे प्रेमभरीं[21] भरले असते, म्हणतेचि 'गाय हुंबरते.' ॥ ६२
जरि बद्ध[22] हस्त नसते, तो कां कानीं न घालिता बोटें? ।
खोटें पिशाचपण जरि, भगवत्कारुण्य[23] सर्वथा मोटें. ॥ ६३
करिता विघ्न श्रवणीं, लाजविता[24] वारिदासि[25] हाकांनीं, ।
न पडों देता तुंबरशब्द अघार्णव[26] पिशाच हा कानीं; ॥ ६४
यास्तव वांटे[27] त्याच्या वदनीं दडपूनि घातला गोळा, ।

१. सेवक. २. पाठवून. ३. फार भयंकर. ४. शिवसामर्थ्यास. ५. अंधकारानें. ६. अडथळा, अटकाव. अन्वय=(जरि) पापें प्रभुप्रतापा [रोध होय,] तरि तिमिरें रविला रोध प्राप्त हो. (=होवो, व्हावा.) **मिथ्याध्यवसिति**नामालंकार. ७. आवळून. ८. पळांत. 'बळें' असा स० सं० चा पाठ आहे. ९. याचा संबंध 'चपळें' या शब्दाकडे. १०. चंचलानें. ११. स्थिर. १२. शिवदूतांचा श्रम. १३. औषध देणाऱ्याचा श्रम. १४. घोड्यावर. १५. स्वार. रडत राऊत घोड्यावर बसविणें=एखाद्याची इच्छा नसतां, एखादें लौकिकाचें महाकार्य त्यास करावयास लावणें. येथें **उपमा** आणि **लोकोक्ति** यांचा संकर आहे. १६. श्रीशिवाच्या दयेचा. १७. अज्ञ हो! १८. पूर, भरतें. अन्वय—श्रीशिवकारुण्याचा ऊत म्हणतो 'रे सर्व जड तरा.' १९. पार्वतीची आज्ञा. २०. तुंबरास. कर्म असतां विशेषनाम द्वितीयांत असतें, पण येथें प्रथमांत आहे. या गीतीचा अन्वय—शिवाज्ञा तैशापुढेंहि यश गावयासि तुंबर बसवी. जे प्रेमभरीं भरले असते, ते 'गाय हुंबरते' (असें) म्हणतेचि. अर्थ—पार्वतीच्या आज्ञेमुळें तशा त्या अतिनीच पिशाचापुढें शिवकीर्ति गावयास तुंबर बसला. त्या वेळीं जे प्रेमाच्या भरानें भरून गेले असते, ते 'गाय स्वतःच हंबरून आपल्या वत्साला बोलावीत आहे' असें म्हणाले असते. २१. प्रेमाच्या भरानें. २२. बांधलेले. २३. भगवंताचें दयालुत्व. २४. **प्रतीप.** २५. मेघास. २६. पापांचा समुद्र. या गीतीचा अन्वय—हा अघार्णव पिशाच श्रवणीं विघ्न करिता, वारिदासि हाकांनीं लाजविता (व) तुंबरशब्द कानीं न पडों देता. ६४,६५ या गीतींचें **युग्मक** आहे. २७. **उत्प्रेक्षा.**

भोळा शिव, परि तज्जन [1]करितो बळ सर्व कुमतिचें गोळा. ॥ ६५
सांबशिवातें वंदुनि मग तुंबरु, [2]वल्लकी करीं धरुनी, ।
गाय कथा, गाव्या ज्या [3]परमोदारा [4]सुरांचिया तरुंनीं. ॥ ६६
होता गात शिवकथा [5]सुस्वर [6]सुप्रेम तो दिवस [7]सप्त, ।
झाला शांत पिशाच [8]क्रूरमति, जसा [9]सुधाघनें तृप्त. ॥ ६७
[10]परमपवित्रशिवकथाश्रवणें गेलें समस्तही पाप, ।
[11]तापप्रशमें डोले तो, गीतें [12]जेविं डोलतो साप. ॥ ६८
[13]पैशाच [14]वपु त्यागुनि, सहसा [15]दिव्य स्वरूप तो पावे, ।
लोपावे [16]यत्तेजें, होउनि परि[17]भूत, देव कोपावे. ॥ ६९
दिव्य पुरुष तो प्रेमें आपणही मधुर गावया लागे, ।
वागे [18]रागकुल मनीं, [19]सात्विकभावहि [20]तदागमें जागे. ॥ ७०
वंदी तो तुंबरुतें, शिवदूतातें, तयाहि [21]आर्यैतें ।
वर्णुनि, '[22]सावित्रीतें [23]स्मरलों,' ऐसें म्हणे [24]स्वभार्येतें. ॥ ७१
मग तो चढुनि विमानीं [25]तुंबरुशिवदूतनिजवधूसहित, ।
शिवलोकातें गेला, केला [26]भगवद्यशें [27]महामहित. ॥ ७२
[28]पील्या ताप, तसाचि [29]त्रिदशेंद्रा, अमृत [30]सुरसदा शिवतो; ।
शुद्ध कथारस होतो प्राप्त, जया भजति सुर, सदाशिव तो. ॥ ७३

---

१. नाहीसे करितो. २. वीणा. हिचे नांव कलावती होतें. ३. फार उदार. याचे विशेष्य 'कथा.' ४. कल्पवृक्षांनी. **व्यतिरेक.** ५. मधुरस्वराने. ६. मोठ्या प्रेमानें. ७. सात. ८. निर्दय आहे बुद्धि ज्याची असा. याचे विशेष्य 'पिशाच.' ९. अमृतमेघानें. १०. फार पवित्र अशा शिवकथांच्या श्रवणाने. ११. दुःखशांतीने. १२. **वाक्योपमा.** १३. पिशाचसंबंधी. १४. शरीर. १५. सुंदर. १६. ज्याच्या तेजाने. १७. पराभविलेले. **प्रतीप.** १८. फार प्रीति. १९. सात्विकपण. २०. प्रीतीच्या प्राप्तीनें. २१. श्रेष्ठेते. २२. ही अश्वपति राजाची कन्या व द्युमत्सेन राजाचा पुत्र सत्यवान् याची स्त्री. हिने आपल्या पतीस मृत्यूपासून सोटविलें. २३. **स्मरणालंकार.** कारण येथे स्मर धातूचा प्रयोग होऊन उपमेत पर्यवसान झाले आहे. २४. आपल्या स्त्रीते. २५. तुंबरु, शिवदूत व आपली स्त्री यांसह. २६. भगवंताच्या (शिवाच्या) कीर्तीने. २७. मोठा प्रख्यात. २८. पिणारास. २९. देवेंद्रास. ३०. देवसभेला. या गीतीचा अन्वय–अमृत पील्या सुरसदा, तसाचि त्रिदशेंद्रा ताप शिवतो, [परंतु] शुद्ध कथारस [पील्या], जया (=ज्या सदाशिवाला) सुर (=देव) भजति, तो सदाशिव (=नित्यमंगलप्रद, तापाचा ज्यांत लेशही नाही असा शंभु) प्राप्त होतो. अमृतरस पिणाऱ्याला ताप प्राप्त होतो, परंतु कथारस पिणाऱ्याला सदाशिव लाभतो, असे म्हणून कवीने कथारसाचे अमृतावर श्रेष्ठत्व स्थापित केले आहे. **व्यतिरेका**लंकार.

सस्यातें[1] वृष्टि[2] जसी, ज्ञानातें शंभुची कथा पिकवी[3]. ।
रुचि[4] शुचि[5] अतुलाचि[6] इची, कीं सेविति, मुक्त[7] जरि, तथापि कवी[8] ॥ ७४

उपसंहार.

श्रीशिवकथा यथामति लिहिली हे रामनंदनें बाळें, ।
भाळें[9] ईस, असें मज केलें गुरुपदरजःप्लुतें[10] भाळें. ॥ ७५
साधु सदाशिववदनें[11] आज्ञा ज्या ईश्वरें मला केली, ।
त्या लिहुनि वाहिला हा शिवकीर्तिग्रंथ, हृद्व्यथा[12] गेली. ॥ ७६
ग्रहण करी प्रभु, जरिही ग्रंथ प्राकृत असाधु[13], तरि याचें; ।
स्वीकारी तें भक्तें कुसुम[14] समर्पित[15] जसा[16] धुतरियाचें[17]. ॥ ७७
शिवकीर्तिग्रंथ ललित[18] रचिला भावेंकरूनि आर्यांहीं[19], ।
करुणा करुनि सकृत्[20] तरि वाचावा हा समूळ[21] आर्यांहीं[22]. ॥ ७८
हरिहरभक्त रसिकें[23] जे, त्यांच्या म्हणिजेल 'गोड' कानांहीं, ।
थोडा अंकें[24], अर्थें[25] शिवकीर्तिग्रंथ थोडका नाहीं. ॥ ७९
विनवितसें साधूंतें अणिकहि देवूनि हांक[26] विनवीन, ।
कीं आशुचि[27] शुचि[28] होवू, सद्यश सेवूनि हा कवि नवीन[29]. ॥ ८०

---

१. धान्यातें. **उपमा.** २. (मेघांचा) वर्षाव. ३. पिकविते, उत्पन्न करिते. ४. गोडी. **यमक.** ५. शुद्धि. ६. अनुपमेय. याचें विशेष्य 'रुचि' व 'शुचि'. **असम.** ७. मोक्ष पावलेले. **विभावना.** ८. शहाणे. या अर्धाचा अन्वय–इची (शंभुकथेची) रुचि (व) शुचि अतुलाचि, कीं कवी जरि मुक्त तथापि [हीस] सेविति. ९. लुब्ध होईन. १०. गुरुचरणधूळीनें भरलेल्यानें. याचें विशेष्य 'भाळें.' ११. सदाशिव पाध्ये यांच्या मुखानें. मागें पृ० १७८, टी० १० पहा. १२. मनाची पीडा. १३. हीन, वाईट. १४. पुष्प. १५. अर्पिलेलें. १६. पाठभेदः–जसें. १७. धोतऱ्याचें. या गीतीचा अन्वय–तें भक्तें समर्पित धुतरियाचें कुसुम प्रभु जसा स्वीकारी (तसा) जरिही (हा) ग्रंथ प्राकृत असाधु तरी प्रभु याचें ग्रहण करी. १८. सुंदर. १९. आर्या [वस्तुतः गीति] छंदांनीं. २०. एकदा. २१. सर्व, आरंभापासून एकंदर. २२. श्रेष्ठांनीं. २३. मर्मज्ञ, गुणाचे पारखी. २४. संख्येनें. २५. अर्थानें. या अर्धाचा अन्वय–(हा) शिवकीर्तिग्रंथ अंकें थोडा (आहे, तरी तो) अर्थें थोडका नाहीं. पंत म्हणतात, 'हा जो मीं शिवकीर्तिग्रंथ लिहिला तो संख्येनें जरी लहान आहे, तरी त्यांतील अर्थानें तो मोठा आहे', हा भाव. येथें पूर्वार्ध व उत्तरार्ध यांत कार्यकारणभाव असल्यामुळें **काव्यलिंग.** २६. हाक देऊन=हाक मारून. येथें 'मी लवकरच आणखीही ईशकथाग्रंथ लिहून साधुसंतांस दाखविणार आहें' असें सांगून पंतांनीं ईशसेवेंत व काव्यरचनेंत दिवस क्रमण्याचा आपला निश्चय व्यक्त केला आहे. २७. त्वरितच. २८. शुद्ध. 'आशी' असाही अन्य पाठ आहे. २९. या अर्धावरून या वेळीं पंत नवीनच कविता करूं लागले असावे, असें वाटतें.

सज्जन म्हणति, 'कलीतें श्रीहरिहरचरितकीर्तनश्रवण, ।
परम प्रशस्त', मग हें न करील मुमुक्षु तापला कवण! ॥ ८१

मंत्र 'श्रीशिव, जय शिव, जय जय शिव,' हा मनीं मुखीं राहे, ।
आमरण ग्रंथ रसिक शिवचरणीं रत मयूर हा वाहे. ॥ ८२



१. कलियुगांत. ही अधिकरणार्थी चतुर्थी आहे. २. श्रीविष्णु व शिव यांच्या चरित्राचें कीर्तन व श्रवण. ३. उत्तम. ४. मुक्त होण्याची इच्छा करणारा. ५. त्रासलेला. ६. पाठभेदः– सुखी. ७. मरेपर्यंत. ८. भक्तिरसाचें मर्म जाणणारे जे शिवचरण त्यांवर. या गीतीचा अन्वय– आमरण [शिवचरणीं] रत मयूर हा ग्रंथ रसिक शिवचरणीं वाहे.

# मोरोपंतकृत स्फुट प्रकरणें भाग ३, यावरील
# अधिक टीपा, शुद्धाशुद्ध, पाठभेद इत्यादिकांचें परिशिष्ट.

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| १ | २ | जपा=जपाला, हरिनामस्मरणाला वगैरे. |
| ,, | टीप १ | या टीपेंत 'विनायकमाहात्म्य हें प्रकरण गणेशपुराणावरून लिहिलेलें दिसतें' असें म्हटलें आहे. परंतु हें प्रकरण पंतांनीं वस्तुतः श्रीस्कंदपुराणान्तर्गत विनायकमाहात्म्यावरून लिहिलें आहे. |
| ४ | १५ | उत्तरार्धपाठभेदः-घेउनि, निघोनि, धरि निजनाशा सुंदोपसुंदरीतीतें. ॥ |
| ,, | १६ | उ० अ०-पाठभेदः-प्रमथजनांहीं. |
| ,, | २० | स्वयेंचि=आपण होऊनच, खटपटीशिवाय, आपोआप. |
| ५ | २२ | उ० अ०-योग्य पाठः-हस्तींहीं, सिंहांहीं, कीं शरभांहीं जसा समरयांहीं. अन्वयः-जसा समरयांहीं (ज्यांचा वेग सारखा आहे अशा, सारख्या पराक्रमी किंवा संतापी) [दोन] हस्तींहीं, [किंवा दोन] सिंहांहीं कीं (किंवा) [दोन] शरभांहीं [समर आरंभावा]. येथील उपमानांची पायरी गुणक्रमानें चढती असल्यामुळें सारालंकार. या पाठांत शिव व सिंदूर यांचा समतोलपणा उत्तम सिद्ध होतो. |
| ६ | ३२ | उ० अ०-योग्य पाठः-व्यसन निवारुनि देतें इ०. 'देतें' याचा कर्ता 'तें'. |
| ७ | ४ | या गीतीचा योग्य पाठ-दर्शन दे प्रभु करिती तोंचि प्रणती तयां; असी माया. । आली धांवत घेउनि जगदवनास्तव दया असीमा या. ॥ अन्वयार्थः-[ते देव व ऋषी] प्रणती (नमस्कार किंवा प्रार्थना) करिती, तोंचि प्रभु तयां (त्यांना) दर्शन दे; अशी [त्या प्रभुची] माया (ममता) [असते]. [प्रभूची] दया [च] या असीमा [प्रभूला] जगदवनास्तव घेउनि धांवत आली. |
| ,, | टी. १३ | 'देवांस' ऐवजीं 'देवांस व मुनींस' पाहिजे. |
| ८ | १० | पू० अ०-पाठभेदः-प्रभु पर्यलीवनांत क्रीडे इ०. |
| ९ | १७ | 'महोदार' हें 'वेगातें' याचें विशेषण घेतलें असतां, 'पुष्कळ, अत्यंत' असा अर्थ होईल. |
| १० | २१ | गजासुर 'जातिस्मर' होण्याचें कारण त्याच अध्यायांत मागें १४ व्या गीतींत दिलें आहे. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ११ | ३ | 'सुमंदर' ऐवजीं '**सुमंदर**' पाहिजे. **मंदर**पर्वताचें **सुमंदर** व **मेरु**पर्वताचें **सुमेरु** अशींही नांवें आढळतात. |
| १३ | १४ | त्यापासुनि=त्या वेळेपासून, तेव्हांपासून. |
| ,, | १७ | विलक्षण शब्दार्थसाम्यः–देवककन्या प्रभुतें, दीप करायासि अच्छवि. प्रसवे । ज्याच्या पदपद्माची लाविति चित्तासि अच्छ विप्र सवे. ॥ मोरोपंती हरिवंश, १२।४६. |
| १५ | २९ | उ० अ०–पाठभेदः–साजे शोकनगाची **देवीच्या** या परा सुता इ०. **देवीच्या**=पार्वतीच्या. या पाठांत 'परा' हें 'सुता'चें विशेषण होईल. |
| ,, | ३१ | पू० अ०–'तो' ऐवजीं '**तों**' हा योग्य पाठ. तों=इतक्यांत. या अर्धांत **विभावनालं**कार आहे. |
| १५ | ३५ | उ० अ०–याचा अन्वय असाही होईलः–म्यां साहिलें, तरि [तें दुःख] सुदुःसह; परि तुमचें मन [तें] तसेंचि साहो. |
| ,, | टी. १५ | 'ढाल' ऐवजीं 'चिलखत' पाहिजे. |
| १९ | ११ | उ० अ०–पाठभेदः–**विच्छिन्नमस्तक**, परमरुचिराकृति इ०. |
| ,, | १२ | उ० अ०–पाठभेदः–······जैसें **सांडुनि हंसांसि** वायसां गावें ॥ मूळपाठांतही 'हंसा' व 'वायसा' यांच्या अंत्याक्षरांवर अनुस्वार पाहिजेत, हें यमकावरून उघड दिसतें. |
| ,, | १३ | उ० अ०–पाठभेदः–···तैसा **तों** इ० तैसा तों=त्या प्रकारचा तर. |
| २१ | २५ | येथील उत्तरार्धांतील विशेषणें याच क्रमानें योजिलेलीं **पंतांच्या** काव्यांत वारंवार आढळतात. 'निर्दय, निर्भय, निस्त्रप, भस्म करावाचि हा तुवां शापें.' ॥ स्त्रीपर्व ३।५१. |
| २३ | ४२ | येथें पूर्वार्धांत 'परिपक्व **शोणरस फळ** इ०' असा पाठ घ्यावा, असें एक मित्र सुचवितात. |
| २४ | — | **कुशल**वाख्यानाच्या पहिल्या अध्यायाला **जै**मिनिकृत अश्वमेधांत **'अयोध्याप्रवेश'** असें नांव आहे. |
| २६ | ८ | या श्लोकांत अंत्यचरणांत 'रामानें कैकेयीला नमन करून आनंदविलें' असें वर्णन आहे. कालिदास याच प्रसंगींचें असें वर्णन करितोः–कृताञ्जलिस्तत्र 'यदम्ब सत्यान्नाभ्रश्यत स्वर्गफलाद्गुरुर्नः । तच्चिन्त्यमानं सुकृतं तवे'ति जहार लज्जां भरतस्य मातुः ॥ रघुवंश, १४।१६. |
| २७ | ९ | हें वर्णन खास **मो**रोपंती आहे; याला मूळांत आधार नाहीं. |
| ,, | ११ | याला मूळ **जै**मिनिकृत अश्वमेधांत मुळींच आधार नाहीं; परंतु या श्लोकाचें पुढील **का**लिदासीय श्लोकाशीं निकट साम्य आहेः–'उत्तिष्ठ वत्से ननु सानुजोऽसौ वृत्तेन भर्ता शुचिना तवैव । कृच्छ्रं महत्तीर्ण' इति प्रियार्हां तामूचतुस्ते प्रियमप्यमिथ्या ॥ रघुवंश, १४।६. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| २८ | १६ | तृतीयचरण–'त्रिलोकी' ऐवजीं 'त्रिलोकीं' पाहिजे. |
| ,, | १७ | **पां**डवप्रतापांत **जै**मिनिकृत **अश्व**मेधासंबंधें असें म्हटलें आहे:–मागें संपलें **शां**तिपर्व । पुढें **अश्व**मेध अति अपूर्व । **व्यास**शिष्य **जै**मिनिकृत सर्व । रस सुरस बोलिला. ॥ ३ **जैमिनीनें** केलें **भारत** । **व्यासें** शापिलें तें समस्त । **अश्व**मेध रसिक सत्य । म्हणूनी वंद्य केला. ४ (श्रीधरकृत पांडवप्रताप, अ० ५८). **जै**मिनिकृत **अश्व**मेधांत **कुशलवो**पाख्यान पंचवीस ते छत्तीस या बारा (१२) अध्यायांत आलें आहे. |
| २९ | अ० २ | मूळांत या अध्यायाचें '**रामवाक्य**' असें नांव आहे. |
| ,, | १ | 'नवसहस्र समा' ऐवजीं जैमिनिकृतींत 'दशसहस्र समा' आहे. |
| ,, | २ | या श्लोकाच्या पूर्वार्धाशीं पुढील श्लोकाचें साम्य आहे:–अथाधिकस्निग्धविलोचनेन मुखेन सीता शरपांडुरेण । आनंदयित्री परिणेतुरासीदनक्षरव्यंजितदोहदेन ॥ रघुवंश, १४।२६. |
| ,, | ५ | पू० अ०–'मी' ऐवजीं 'मीं' पाहिजे. |
| ३१ | १८ | अशा प्रकारचें वर्णन जैमिनिकृतींत नाहीं. परंतु तें रघुवंशांत आढळतें. 'तामंकमारोप्य कृशांगयष्टिं···पप्रच्छ रामां रमणोऽभिलाषम् ॥' रघुवंश, १४।२७. |
| ,, | २१ | 'सद्ध्वान' ऐवजीं 'सुधान' असा अन्यपाठ. |
| ,, | २१-२३ | हे तिन्ही श्लोक खुद्द **पं**तांचे आहेत. 'परं भागीरथीतीरे गन्तुमिच्छामि राघव । ऋषिपत्न्यश्च यत्रासन्नृषयोऽजिनवासिनः' एवढेंच मूळांत आहे. |
| ,, | २२ | समाधिमुळें=ब्रह्मचिंतनाच्या योगानें. |
| ३३ | ३७-३८ | हें वर्णन **पं**तांचें स्वतःचें आहे. |
| ३४ | ४३ | याचें **संस्कृत** मूळ असें आहे:–कथं तां मृगशावाक्षीं सीतां पद्मनिभाननाम् । त्यजामि श्रोत्रियो मुख्यामाचारस्येव पद्धतिम् ॥ |
| ३४।३५ | ४५ | मूळांत नाहीं. |
| ३५ | ४९ | '०चित्तातें' ऐवजीं '०चित्तांतें' पाहिजे. |
| ,, | टी. ९ | '**उद्गीति**' ऐवजीं '**आर्या**' पाहिजे. **आर्येत** प्रथम व तृतीय पादात बारा बारा मात्रा असून, द्वितीय पादांत अठरा व चतुर्थ पादांत पंधरा असतात. परंतु **उद्गीतींत** १२,१५,१२, व १८ अशा मात्रा अनुक्रमें चार चरणांत असतात. मागें, पृ० २८, टी० २० पहा. |
| ,, | अ० ३ | या अध्यायाला '**लक्ष्मणप्रस्थान**' असें नांव आहे. |
| ३६ | ८ | हें सबंध पद्य **द**शरथाच्या तोंडचें आहे. |
| ,, | ९ | 'सदैव' ऐवजीं '**तदैव**' हा योग्य पाठ. तदैव=**सी**तेनें अग्नींत उडी घेऊन दिव्य केलें, तेव्हांच. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ३७ | टी. ८ | 'अ० ११-१२' ऐवजीं 'अ० ३, गी० ११-१२' पाहिजे. |
| ३८ | १९ | याला मूळांत आधार नाहीं. |
| ,, | २१ | पू० अ०-'तुम्हांसवें' ऐवजीं **'तुह्मांसही'**—असा पाठभेद. |
| ३९ | २३ | 'नयनाहीं' ऐवजीं 'नयनांहीं' पाहिजे. |
| ,, | २७ | स्वागत पुसुनी=कुशल प्रश्न विचारून. |
| ४० | ३०,३२ व ३३ | यांना मूळांत फारच थोडा आधार आहे. वर्णनकौशल केवळ मोरोपंतीच आहे. |
| ४१ | ३७ | '[या] गृहागमनें' ऐवजीं **'अत्र आगमनें'** असा अन्य पाठ. |
| ४२ | ४२ | यांत 'तिघींस' याबद्दल **'तिघेंस'** असा मूळ पाठ असावा, असें यमकावरून वाटतें. |
| ,, | ४३ | 'बसोनियां' ऐवजीं **'सोनियाच्या.'** असा काव्येतिहाससंग्रहकारांचा पाठ आहे. परंतु छंदावरून तो केवळ अपपाठ आहे, असेंच म्हणावें लागतें. |
| ,, | अ० ४ | या अध्यायाचें **'वाल्मीकिसमागम'** असें नांव मूळांत आहे. |
| ४३ | ७ | येथें 'प्रत्यर्थीप्रति' हा शब्द **श्लिष्ट** आहे. प्रत्यर्थी=(१) प्रत्येक याचक, (२) शत्रू. |
| ४३,४४ | ८,१३ | हीं पद्यें पंतांच्या प्रतिभेचींच फळें आहेत. |
| ४४ | १३ | मूळाशीं ताडून पाहतां, आम्हीं सुचविलेला **'क्षितिपतिकीर्तिशुभ्रवर्णा'** हाच पाठ योग्य ठरतो. 'रामस्य कीर्तिमिव शुभ्रतमां प्रवाहैः पापानि सर्वजगतः खलु नाशयन्तीम् ॥' असें मूळांत गंगेचें वर्णन आहे; पंतांनीं तीच उपमा 'श्वेत हंसींनां' लाविली आहे, हाच काय तो फरक. |
| ४५ | १५ | **संदष्टयमक.** |
| ४५-४६ | १८-२० | हें वनवर्णन खुद्द पंतांचें आहे; जैमिनीचा आधार नाहीं. |
| ४७ | २८ | 'लक्षीजे तो' ऐवजीं 'लक्षीजेतो' असा अन्य पाठ. |
| ४८ | ३३ | या प्रसंगींच्या मूळांतील उपमा अगदीं निराळ्या आहेतः-इति तस्य वचः श्रुत्वा पपात धरणीतले । मूर्च्छिता जानकी तस्मिन्नंबराद् रोहिणी यथा ॥ छिन्नमूला यथा वल्ली गृष्टिः शूलाभिपीडिता । कुमारी सर्पदष्टेव तद्वत् सा भूतलेऽपतत् ॥ हें मूळांतील वर्णन पंतांच्या वर्णनाहून सरस वाटतें. |
| ,, | ३७ | 'निघूनियां' ऐवजीं 'जाऊनियां' असा अन्य पाठ. |
| ४९ | ३९ | परमपाप=(पूर्वजन्मीं घडलेलें) घोर पातक. |
| ,, | ४१-४२ | यांचें मूळः-मुखं पद्मविशालाक्षं निर्मलं चंद्रबिंबवत् । चारुदंष्ट्रं श्मश्रुलं च कुंडलाभ्यां सुशोभितम् ॥ मुक्तामाणिक्ययुक्तेन किरीटेनोपलक्षितम् । |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| | | द्रक्ष्यामि रामस्य कथं पतिता गहने वने ।। हल्लीं रामकृष्णादिकांच्या ज्या तसबिरा काढण्यांत येतात, त्यांत देवावतारांना श्मश्रू नसते. परंतु येथें '**श्मश्रुलं**' असें स्पष्ट वर्णन आहे. |
| ४९ | ४३ | 'अंतर्बहिर्भव°' एवजीं 'अंतर्बहिर् भव°' असें पाहिजे. अंतर्बहिर्=आंत-बाहेर दोहींकडून. (हें क्रियाविशेषण आहे.) |
| ५१-५२ | ५१-६३ | हा **सी**तेनें पाठविलेला निरोप **जै**मिनिकृतींत मुळींच नाहीं. परंतु अशा प्रकारचें वर्णन रघुवंशांत मात्र आहे, व येथें बऱ्याच **मो**रोपंती श्लोकांचें **र**घुवंशांत श्लोकांशीं अर्थसाम्य व कित्येक प्रसंगीं शब्दसाम्यही आढळतें |
| <br>५१ | ५२ व<br>५६ | समानार्थक श्लोकः–किंवा तवात्यन्तवियोगमोघे कुर्यामुपेक्षां हतजीविते-ऽस्मिन् । स्याद्रक्षणीयं यदि मे न तेजस् त्वदीयमन्तर्गतमन्तरायः ।। रघुवंश, १४।६५. |
| ५१ व<br>५२ | ५५ व<br>६० | अर्थसादृश्यः–मां लोकवादश्रवणादहासीः श्रुतस्य किं तत्सदृशं कुलस्य ।। रघुवंश, १४।६१. |
| ५१ | ५४ | उ० अ०–अर्थसादृश्यः–ममैव जन्मान्तरपातकानि विपाकविस्फूर्जथुरप्रसह्यः ।। रघुवंश, १४।६२. |
| ५१-५२ | ५७ | अर्थसादृश्यः–(१) मज आलिंगतां श्रीरामचंद्र । तेव्हां कंठीं न सोसवेचि हार । आतां गिरिकानन समुद्र । दोघांमध्यें पडियेले. ।। **श्री**धरकृत **राम**विजय, अ० २०. (२) 'रघुपति तुज प्रेमें क्षेम देतां विनोदें, जंव किं निकरिं वैरी हार फेडीं विषादें; । गिरि, सरि, तरु, आतां मंडळें आंत ठेलीं' । म्हणवुनि बहु शोकें **जा**नकी साद घाली. ।। **मु**क्तेश्वरकृत कौतूहलरामायण अरण्यकांड, श्लो० ७४. |
| ५२ | ५८ | अर्थसादृश्यः–साहंतपः सूर्यनिविष्टदृष्टिर् ऊर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये । भूयो यथा मे जननान्तरेऽपि त्वमेव भर्ता नच विप्रयोगः ।। रघुवंश, १४।६६. या कालिदासी श्लोकांत व पंतांच्या श्लोकांत विलक्षण शब्दसादृश्यही आहे. |
| ५३ | ६६ | मुरडे=परत फिरे. |
| ५५<br>५६ | ८१<br>८६-८७ | यास मूळांत आधार नाहीं. |
| ,, | अ० ५ | आमच्या जवळील **जै**मिनिकृत **अश्वमेधां**तील २९ व्या अध्यायांतील मजकूर **मो**रोपंती **कुशल**वोपाख्यानाच्या ५ व्या व ६ व्या अध्यायांत आला आहे. **जै**मिनीच्या २९ व्या अध्यायाला '**तुरगग्रहण**' असें नांव आहे. अर्थात् हें नांव **मो**रोपंती ६ व्या अध्यायालाच साजणारें आहे. प्रस्तुत अध्यायाला '**कुशलवजन्म**' हें नांव शोभण्यासारखें आहे. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ५७ | ६ | यास जैमिनींत आधार नाहीं; परंतु पुढील रघुवंशश्लोकाशीं त्याचें अत्यंत साम्य आहे:–तवोरुकीर्तिः श्वशुरः सखा मे सतां भवोच्छेदकरः पिता ते । धुरि स्थिता त्वं पतिदेवतानां किं तन्न येनासि ममानुकंप्या? ॥ १४।७४. |
| ,, | ७ | मूळांत नाहीं. रघुवंशसाम्य:–उत्खातलोकत्रयसंकटेऽपि सत्यप्रतिज्ञेऽप्य-विकत्थनेऽपि । त्वां प्रत्यकस्मात्कलुषप्रवृत्तावस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे ॥ १४।७३. |
| ५७-५८ | ९-१० | मूळांत नाहीं. रघुवंशसाम्य:–विनोदयिष्यन्ति नवाभिषंगामुदारवाचो मुनिकन्यकास्त्वाम् ॥ १४।७७. तपस्विसंसर्गविनीतसत्वे तपोवने वीतभये वसास्मिन् । इतो भविष्यत्यनघप्रसूतेरपत्यसंस्कारमयो विधिस्ते ॥ १४७५. तन्मा व्यतिष्ठा विषयान्तरस्थं प्राप्तासि वदेहि पितुर्निकेतम् ॥ १४।७२. |
| ५९ | १७ | तृतीयचरण:–'**तमसा**' ऐवजीं '**पयसा**' असा पाठभेद. |
| ,, | १८ | यास मूळांत आधार नाहीं. रघुवंशसाम्य:–तत्राभिषेकप्रयता वसन्ती प्रयुक्तपूजा विधिनातिथिभ्यः । वन्येन सा वल्कलिनी शरीरं पत्युः प्रजासंततये बभार ॥ १४।८२. |
| ५९-६० | २०-२३ | यांचें मूळ संस्कृत:–प्रदक्षिणार्चिस्तत्रासौ व्यशोभत हुताशनः । ततः शिष्याः प्रधावंति वाल्मीकिं प्रतिशंसितुम् ॥ अनयोः प्रभया वेश्म दीप्तमासीत्समन्ततः । दिशस्तु विमला जाता ववौ वातोऽातसौरभः ॥ अर्थसादृश्य:–दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे । बभूव सर्वं शुभशंसि तत्क्षणं भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम् ॥ अरिष्टशय्यां परितो विसारिणा सुजन्मनस्तस्य निजेन तेजसा । निशीथदीपाः सहसा हतत्विषो बभूवुरालेख्यसमर्पिता इव ॥ रघुवंश, ३।१४–१५. रघुवंशप्रदीपेन तेनाप्रतिमतेजसा । रक्षागृहगता दीपाः प्रत्यादिष्टा इवाभवन् ॥ रघु० १०।६८. 'सुदिनीं शिवा तयातें, दीप करायासि अच्छवि, प्रसवे'. ॥ मोरोपंती विनायकमाहात्म्य, ३।१७. देवककन्या प्रभुतें, दीप करायासि अच्छवि, प्रसवे.' मोरोपंती हरिवंश, १२।४६. |
| ६० | २४ | **यथासंख्यालंकार.** |
| ,, | २५ | **आद्ययमक.** |
| ,, | २७ | विप्रांची मुंज आठव्या वर्षी, परंतु क्षत्रियांची अकराव्या वर्षी व्हावी असा शास्त्रनियम आहे:–गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राम्हणस्योपनायनम् । **गर्भादेकादशे राज्ञो** गर्भाच्च द्वादशे विशः॥ (मनुस्मृति). परंतु वाल्मीकीनें कुशलवांची मुंज **बाराव्या** वर्षी केली, असें म्हटलें आहे, मूळांतही असेंच आहे:–**द्वादशाब्दे** ततो मौंजीबंधनं व्यदधात्तयोः ॥ |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
| --- | --- | --- |
| ६१ | ३३ | येथील सर्व 'कोणी' शब्दांवर अनुस्वार पाहिजेत. |
| ६२ | ३७ | तृ० च० **विभावनालंकार.** च०च०-**परिसंख्यालंकार.** |
| ,, | अ० ६ | वर ५६ व्या पानावरील टीप पहा. |
| ६४ | ६-७ | यांस मूळांत आधार नाहीं. |
| ,, | ८ | च०च०-'सार्थ' ऐवजीं '**बाहु**-' असा पाठभेद. |
| ६५ | १०-१२ | या तीन सुंदर पद्यांना मूळांत आधार नाहीं. ही पंतांच्या काव्यशक्तीची लीला आहे. |
| ,, | १३ | 'हरि' व 'श्री' या शब्दांवर **श्लेष** साधलेला आहे. हरि=(१) घोडा, (२) विष्णू. श्री=(१) शोभा, (२) लक्ष्मी. |
| ६६ | अ० ७ | या अध्यायास '**लवमूर्च्छाप्राप्ति**' असें जैमिनिकृतींत नांव आहे. |
| ,, | १ | मूळांत आधार नाहीं. |
| ६७ | ३ | |
| ,, | ८ | टीपेंत 'प्रधानीं' हें तृतीयेचें रूप घेऊन 'आयुधांनीं' याचें विशेषण केलें आहे. परंतु 'प्रधानीं' हें सप्तमीचें रूप घ्यावें हें बरें. त्या प्रधानीं=[मुलांच्या] म्होरक्यावर, लवावर. |
| ७० | २१ | द्वि० च०-मूळांत 'पूर्वार्धा' ऐवजीं 'उत्तरार्ध' लवाकडे आलें असें वर्णन आहे. 'पूर्वार्धं न्यपतद्भूमावुत्तरार्धं च नापतत् । तेनार्धेन धनुश्छिन्नं लवस्य हृदयं तथा ॥' |
| ७१ | अ० ८ | या अध्यायाचें मूळांत '**कुशयुद्धवर्णन**' असें नांव आहे. |
| ,, | २ | या वृत्ताचें नांव **लीलाकरदंडक** आहे. हें '**लीलाकर**' या शब्दानें सुचविलें आहे. 'दशैर्व्याल आख्यातो **जीमूतो** रुद्रैर्मतः। **लीलाकरः** सूर्यैः स्याद् **उद्दामो** विश्वैर्मतः ॥' या नियमानें '**लीलाकर**' दंडकाला **बारा रगण** अवश्य आहेत. परंतु प्रस्तुत पद्याच्या पहिल्या चरणांत अकराच **रगण** आहेत म्हणजे एक **रगण** कमी आहे. हा लेखकप्रमादानें **छंदोभंग** झालेला आहे. 'त्वत्सुतें दिव्यलीलाकरें' ऐवजीं 'त्वत्सुतें [भास्वरें] दिव्यलीलाकरें' असा पाठ घेतला म्हणजे ही उणीव भरून येईल. दुसऱ्या चरणांत '[त्या] निषेधासि' या ऐवजीं '**त्यासि**' असा पाठ **काव्येतिहाससंग्रहांतील** या आख्यानाच्या शुद्धिपत्रांत दिला आहे. परंतु '**त्यासि**' या पाठानें या चरणांतही एक **रगण** कमी येऊन पुन्हा छंदोभंगाचा प्रसंग येईल. पुढील दोन्ही चरणांत बरोबर बारा बारा **रगण** आहेत. |
| ७२ | ६-७ | या सुंदर पद्यांस मूळांत जागा नाहीं. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
| --- | --- | --- |
| ७३ | १३ | 'निजोटजांतीं' याचा 'आपल्या आश्रमांत' असाही अर्थ होईल. |
| ७४ | २१ | पू० अ०–**अतिशयोक्ति.** |
| ७६ | ३२ | मूळांत सेनापतीच्या भावाचें नांव **'नाग'** नसून **'नग'** असें आहे. |
| ,, | ३४ | 'मुंड मालेस्तव' याऐवजीं 'मुंडमालेस्तव' असा पाठभेद. |
| ७७ | अ० ९ | या अध्यायाचें **'लक्ष्मणगमन'** असें मूळांत नांव आहे. |
| ८१ | अ० १० | या अध्यायाचें **'लवयुद्धविजय'** असें मूळांत नांव आहे. |
| ८१-८२ | ३-४ | मूळांत **सौर** (सूर्यस्तव) अष्टश्लोकी आहे. **मोरो**पंती गीती अगदीं स्वतंत्र आहेत. |
| ८३ | १० | 'भृशुंडि' ऐवजीं **'भुशुंडि'** असें पाहिजे. भुशुंडि-(तोफेसारखें) एक अग्न्यस्त्र. |
| ८४ | १४ | 'माया' ऐवजीं 'माथा' हा अन्यपाठ. |
| ,, | १५ | या मंत्र्याचें नांव **'सुज्ञ'** असून, त्याच्या दहा मुलांचीं नांवें अशीं आहेतः–**जि**तश्रमो **धा**र्मिकश्च **सु**केतुः **श**त्रुसूदनः। **चं**द्रो **म**दः **श**लः **का**लो **म**ल्लः **सिं**हश्च ते दश ॥ |
| ,, | टी. १४ | 'अठरा अठरा मात्रा' ऐवजीं 'वीसवीस मात्रा' पाहिजे. |
| ,, | अ० ११ | या अध्यायाचें **'लक्ष्मणसेनापराजय'** असें मूळांत नांव आहे. |
| ८५ | २ | योग्य पाठः–'भावे' ऐवजीं **'भोंवे'**. भोंवे=भ्रमे, गरगर फिरे. **'हरिपदीं'** ऐवजीं 'हरिपदीं' पाहिजे. |
| ,, | ३ | येथील पूर्वार्धावरील टीपांत दिलेला अर्थ मूळ संस्कृताशीं मिळता नाहीं. योग्य अन्वयः-कुश म्हणे, 'भला, भला! (शाबास, शाबास! वाहवा, वाहवा!) जरि (ज्या अर्थी) वैरिता त्यजुनि (शत्रुभाव मनांत न आणितां) संप्रति तूं मदीय भाराप्रति (किरीटरूपी ओझ्यास) रणांत हरिलेसि, [तरि–त्या अर्थी] मी तुझ्या बळभरासि (बळरूपी ओझ्याला) आज हरीन, [व या प्रकारें तुझा उपकार फेडीन] इ०. येथें मागील श्लोकांत लक्ष्मणानें कुशाचा किरीट उडविल्याचें वर्णन आहे. त्या गोष्टीला अनुलक्षून कुशानें हा लक्ष्मणाशीं अवहेलनामूलक **विनोद** केला आहे. |
| ,, | ४ | चतुर्थचरण–'मिळालीं' ऐवजीं **'मळालीं'** असा पाठभेद. या पाठाला यमकाचा पाठिंबा आहे. |
| ८६ | ६ | मूळ संस्कृताशीं ताडून पाहतां, पहिल्या दोन ओळींचा योग्य पाठ असा वाटतो:–सेनानी मग लक्ष्मणाप्रति म्हणे, 'मी यासि संहारितों, एकाकी **तंव** साध्य होइल, पहा, अस्त्रांस मी वारितों.'। येथें, यासि=कुशास; एकाकी=एकटा, लवाचें साहाय्य ज्याला नाहीं असा; तंव=तों, तर. |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ८७ | अ० १२ | या अध्यायास '**हनुमद्वाक्य**' असें मूळांतील नांव आहे. |
| ,, | २ | तया=द्विजशिशूला. |
| ८८ | ९ | **आर्यागीतिच्छंद.** |
| ८८ | टीप १ | 'आरोप केला आहे' ऐवजीं 'आरोप ध्वनित किंवा सूचित झाला आहे' असें वाचावें. |
| ९० | टी. १८ | येथें '**अनुज्ञा** नांवाचा' ऐवजीं '**लेश** नांवाचा' वाचावें. जेथें दोषाचें गुणरूपानें किंवा गुणाचें दोषरूपानें वर्णन केलें असतें, तेथें **लेश**नामक अलंकार होतो. प्रस्तुतस्थळीं दोषाचें गुणरूपानें वर्णन आहे. **अनुज्ञा**नामक अलंकारांत दोषाचें गुणरूपानें वर्णन करून, त्या दोषाचा पत्कर किंवा याचना केलेली असते. |
| ९१ | २७ | मूळांत 'अंगद' हाच 'सचिव' असें आहे; तेव्हां 'सुमति' हें विशेषनाम न घेतां, 'अंगदाचें'च विशेषण घ्यावें. |
| ,, | २८ | मूळांतील अंगदाचें भाषणः—मन्येऽहं बालकौ तौ तु रामदुर्मंत्ररूपिणौ । सीतां लोकापवादेन यज्जहौ रघुनंदनः ॥ |
| ,, | ३२ | अर्थसादृश्यः—भूमी रुळती सप्तही चामरें । नृत्य करिती उफाळे थोरें । पृथ्वी स्पर्शती ना पुढिल्यानि खुरें । बहुतीं भोगिली म्हणोनी. ॥ कृष्णदास-मुद्गल, रामायण युद्धकांड १६।१९. |
| ९१-९२ | ३०-३४ | हें सुंदर सेनावर्णन मूळांत नाहीं. |
| ९२ | ३५ | येथें '**सुमित्रासुत**' याचा अर्थ '**लक्ष्मण व शत्रुघ्न**' असा घेतला पाहिजे. |
| ९४ | अ० १३ | याला '**रामाश्वमेधपरिसमाप्ति**' असें मूळांत नांव आहे. |
| ,, | २ | चतुर्थचरणः—हें सूर्यास्ताचें वर्णन खुद्द **मोरोपंती** शिक्याचें आहे. वर्णनसादृश्यः—गमला तेजस्वित्वें **भीष्म**स्तव तो स्व अस्तव नवासा, । जाणों जावूं लागे रवि सोडुनि लोक अस्तवनवासा ॥ मोरोपंती शांतिपर्व ७।७८. अशींच उत्प्रेक्षायुक्त सूर्यास्तवर्णनें मोरोपंती कर्णपर्व १९।३१, ३२ व ५०।३८ या स्थळीं आहेत. |
| ९५ | ६ | या ठिकाणीं मूळांत हस्तनक्षत्राची अशी उत्पत्ति दिली आहेः—तावत् क्रुद्धो महाबाहुः कुशो बाणान् मुमोच सः । शिरांसि चिच्छिदे वीरो बाहूनंगदभूषितान् ॥ शिरांसि करिणां बाणैर् अनयद् दिवमोजसा । आकाशेऽद्यापि ते प्राप्ता एकीभावं व्यवस्थिताः ॥ अतःपरं न क्षत्रं न भूतं न भविष्यति । तस्मान्नक्षत्रतां प्राप्ताः स्वे हस्ता हस्तिनां तथा ॥ वर्षन्त्यद्यापि भूपृष्ठे हस्ता दानोदकं बहु । सावित्रं तस्य पानीयं निदानं मौक्तिकस्य च ॥ |

| पृष्ठ. | पद्य. | टीप. |
|---|---|---|
| ९६ | १४ | पूर्वार्ध–**आक्षेपा**लंकार. |
| ९८ | २४ | हें वर्णन मूळांत नाहीं. |
| ९९ | २८-३१ | ,, ,, ,, |
| १०३ | ५३ | पू॰ अ॰–**अतिशयोक्ति.** |
| १०५ | ६१ | तृतीयचरण–अर्थसादृश्य:-रघुर्भृशं वक्षसि तेन ताडित: पपात भूमौ सह सैनिकाश्रुभि: ॥ रघु॰ ३।६१. |
| ,, | ६४ | पूर्वार्धांतील सुंदर उपमा मूळांत नाहीं. |
| १०६ | ६७ | लवें=क्षणांत, त्वरेनें, लौकर. |
| ,, | ७०-७१ | या गीतींत **तुल्ययोगिता**नामक अलंकार आहे. |
| १०७ | ७७ | मूळांत **वाल्मीकि** वरुणाच्या घरीं कांहीं धर्मकृत्य करण्यासाठीं गेला होता, असें वर्णन आहे. |
| ११८ | १ | उ॰ अ॰–**सुभाषित.** |
| ,, | २ | उ॰ अ॰–**सुभाषित.** |
| १३३ | टी. २७ | 'याचें विशेष्य पतंगी' हें गाळावें. |
| १३७ | ६ | 'पुरराष्ट्रजना' ऐवजीं 'पुरराष्ट्रजनां' असें पाहिजे. |
| १४१ | २ | 'हें' ऐवजीं 'हे' वाचावें. हे=शिवपूजा. |
| १४२ | टी. १४ | 'विभावना' हा शब्द नको. |
| १४५ | टी. ८ | 'हजार वर्षें' येथें 'दहाहजार वर्षें' वाचावें. |
| १५० | ३६ | पू॰ अ॰–'क्रीडे यमुनेंत' ऐवजीं 'क्रीडे यमुनेंत' असें समजावें. |
| १६८ | २२ | उ॰ अ॰–'परि हे' ऐवजीं 'परि हे' असें वाचावें. |
| १७७ | टी. ३५ | 'बारा हत्तींच्या सामर्थ्यानें' ऐवजीं 'बारा हजार हत्तींच्या सामर्थ्यानें' असें वाचावें. |
| १८१ | ३४ | उ॰ अ॰–योग्य पाठ:–'न लागतां' ऐवजीं 'न लागता'=लागला नसता. |
| १९३ | टी. १ | **'संसारहीनत्व'** याऐवजीं **'संस्कारहीनत्व'** पाहिजे. |